

# श्री वाल्मीकिरामायण

या ग्रंथाचें

# मराठी सुरस भाषांतर

## भाग पांचवा

## उपसंहार

## द्वितीयखंड

प्रकाशक :

ग. वि. चिपळूणकर आणि मंडळी, पुणें.

श्रीरामायण संपूर्ण सेट भाग १ ते ५ किं. रु. पंधरा फक्त



श्री.

# श्री. सौ. लक्ष्मीबाई राणीसाहेब संस्थान भोर यांचें अल्प चरित्र.

## पितृकुल.

श्री. सौ० लक्ष्मीबाई राणीसाहेब यांचे वडिलांचें नांव रा. रा. वासुदेवराव पुराणिक व मातोश्रींचें नांव सौ. भागीरथीबाई ऊर्फ अम्मा असें आहे.

## या घराण्याचें प्राचीनत्व.

पुराणिकांचें घराणें पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. यांचें मूळ गांव येरवड्याचे उत्तरेस ५ मैलांवर असलेलें लोहगांव हें होय. यांचें मूळचें उपनांव सनकाडे होतें. परंतु ह्या घराण्यांत पुराण सांगणारे पुरुष निघाले त्यामुळें पुढें त्यांचें पुराणिक असें आडनांव पडलें. हे लोहगांवीं पुराण सांगत असत. श्रीतुकाराममहाराज लहानपणीं आपल्या आजोळीं लोहगांवीं जात असत, तेव्हां ते ह्या पुराणिकांचें पुराण श्रवण करीत. हेच पुराणिक पुढें तुकारामाचे भक्त झाले, अशी आख्यायिका आहे.

## स्थानांतर.

पुराणिकांची वस्ती पुढें लोहगांवाहून थेऊर येथें झाली व थोडेच दिवसांत त्यांनीं थेऊर सोडून आळंदीस वास्तव्य केलें. नंतर कांहीं कारणामुळें ते आळंदी सोडून पुण्यास येऊन राहिले. श्रीशिवाजी छत्रपति पुण्यांत कसब्यांत राहात असत त्या वेळीं पुराणिक घराणें कसब्यांतच राहात होतें. शिवाजीमहाराजांना राज्याभिषेक झाल्यानंतर त्यांनीं सुवर्णतुला केली ती या पुराणिक घराण्यासच देण्यांत आली होती.

इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतरहि या घराण्यांत महादेवशास्त्री व विनायकशास्त्री हे दोघे जाडे विद्वान् होऊन गेले. महादेवशास्त्री यांनीं सिंधमध्यें मराठी व इंग्रजी शिक्षणाचा पाया घातला. त्यांनीं कराची येथें बऱ्याच सार्वजनिक

संस्था स्थापण्याचे कामीं पुढाकार घेऊन दक्षिणी लोकांकरितां तेथें वाडे बांधविले. पुराणिक घराण्यांतील मंडळींनीं सिंधमध्यें बरींच कामें केलीं आहेत.

रा. रा. वासुदेवराव पुराणिक यांचा जन्म सन १८६९ सालीं कराची येथें झाला. त्यांचे वडील तेथेंच नोकर होते. रा. रा. वासुदेवराव यांची सन १८८७ सालीं कराची येथील एन्. जे. हायस्कूलमधून मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाली. नंतर त्यांनीं पी. डब्ल्यू. डी. खात्यांत नोकरी धरून सन १८९१ सालीं त्याच खात्यांतील अकाउन्टंटची परीक्षा दिली व ते १८९२ सालीं मुंबईस अकाउन्टंट झाले. सन १८९४ सालीं त्यांची ब्रह्मदेशांत बदली झाली. तेथें १६ वर्षें काम केल्यानंतर ते अलाहाबाद येथें बदलून आले. यू. पी. मध्यें ८ वर्षें काम केल्यानंतर स. १९२० सालीं पेन्शन घेऊन ते पुण्यास राहाण्यास आले. तेव्हांपासून ते पुण्यासच राहात आहेत. पुण्यास आल्यापासून ते आरोग्यमंडळांत काम करीत असतात व इतर सार्वजनिक कामांतहि फार झटून मदत करीत असतात. त्यांना लहानपणापासूनच सार्वजनिक कामाची अत्यंत आवड असल्यामुळें ते ज्या ज्या ठिकाणीं नोकरीनिमित्त गेले त्या त्या ठिकाणच्या बऱ्याच सार्वजनिक कामांत त्यांनीं पुढाकार घेतलेला आहे. त्यांच्या अंगचा नियमितपणा, टापटीप, शिस्त, अंग मोडून काम करणें, निरलसपणा, बाणेदारपणा, निस्पृहता या गुणांमुळें ते लोकादरास पात्र झाले आहेत.

## मातृकुल.

रा. रा. वासुदेवराव यांच्या पत्नीचें नांव सौ. भागीरथीबाई ऊर्फ अम्मा असें आहे. ह्या पुण्यांतील एकबोटे यांचे घराण्यांतील आहेत. या घराण्यानें पेशवाईंत एके वेळीं चांगली कामगिरी बजाविलेली आहे. सौ. अम्मा यांनीं आपल्या पतीबरोबर बराच प्रवास केला असल्यामुळें त्यांना प्रवासजन्य ज्ञान व चातुर्य चांगलें प्राप्त झालें आहे. त्यांचे अंगचा सोशीकपणा तर प्रशंसनीय आहे. त्यांचा स्वभाव मनमिळाऊ असून प्रेमळ आहे.

## जनन.

अशा सत्कुलोत्पन्न व सुशील मातापितरांचे पोटीं श्री. सौ. लक्ष्मीबाई राणीसाहेब यांचा जन्म पुणें येथें एकबोटे यांचे वाड्यांत पौष शु. २ शके १८१८ रोजीं झाला. यांचें नांव चंपूताई असें ठेवण्यांत आलें.

## देशांतरयोग.

कु. चंपूताई आपल्या वडिलांबरोबर ब्रह्मदेशांत होत्या. तेथें त्यांनीं अनेक शहरें पाहिलीं. त्यांचे वडील तेथें पब्लिक वर्क्स खात्यांत अकाउन्टंट होते, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. ब्रह्मदेशांत कामावर हत्ती लावितात. रा. रा. वासुदेवराव पुराणिक यांचे घरावरून रोज हत्ती कामावर जात असत. कु. चंपूताईस हत्तींचें वेड फार असे. रोज त्यांचे घरावरून जे हत्ती जात त्यांपैकीं एका हत्तीचें प्रेम ह्या मुलीवर बसून तो तेथें थांबत असे व कु. चंपूताई त्या हत्तीवर नेहमीं बसत. त्या वेळीं त्यांचें वय चारपांच वर्षांचेंच होतें. कु. चंपूताईस नेहमीं हत्तीवर बसतांना पाहून ब्रह्मी लोक म्हणत ही मुलगी पुढें राणी होणार व हें त्यांचें भविष्य पुढें खरें ठरलें. ह्या वेळीं रा. रा. वासुदेवराव भामो गांवीं होते. हें गांव इरावती नदीच्या कांठावर असून फार रमणीय आहे. हवा मोकळी व निरोगी असून भोवतालची वनश्री मनोहर आहे. अशा आरोग्यदायक ठिकाणीं राहिल्यामुळें कु. चंपूताईंची प्रकृति सहजच फार सुदृढ झाली.

## शिक्षणारंभ.

सन १९०१ सालीं रा. रा. वासुदेवराव यांची बदली रंगून शहरीं झाली. येथें कु. चंपूताईंनीं मराठी शिकण्यास आरंभ केला व दोन वर्षांतच त्यांना चांगलें लिहितां वाचतां येऊं लागलें. पुढें दोन वर्षेपर्यंत त्यांनीं बंगाली भाषेचा अभ्यास केला व ती भाषाहि त्यांना बरीच समजूं लागली. सन १९०६ सालीं त्यांनीं इंग्रजी व तामिल भाषा शिकण्यास सुरवात केली व दोन वर्षांत ह्या दोनहि भाषा त्यांना बऱ्याच कळूं लागल्या. सन १९०८ सालीं त्या आपल्या वडिलांबरोबर पुण्यास आल्या. त्या वेळीं त्यांना १२ वें वर्ष सुरूं होतें. इतक्या अल्पवयांत त्या मराठी, बंगाली, इंग्रजी व तामील ह्या चार भाषा अवगत करून शिवाय तसेंच कशिद्याचीं कामें करण्यास व पेटी वाजविण्यास शिकल्या, यावरून त्यांची बुद्धिमत्ता कशी आहे हें कोणाचेंहि सहज लक्षांत येईल. ह्या वेळीं त्यांचें वय जरी १२ वर्षांचें होतें तरी त्या १८ वर्षांप्रमाणें दिसत, इतकी त्यांची प्रकृति निकोप होती.

## विवाहयोग.

**श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव** हे युवराज असतांना त्यांचें पहिलें कुटुंब ता. २८ नोव्हेंबर सन १९०७ इ. रोजीं कैलासवासी झालें. दुसरें लग्न करण्याचा त्यांचा विचार ठरल्यानंतर त्यांना बऱ्याच मुली सांगून आल्या. कु. चंपूताई या वेळीं पुण्यासच होत्या. त्यांचे वडील रा. रा. वासुदेवराव पुराणिक यांनीं त्यांना श्रीमंत बाबासाहेब यांना दाखविल्या. श्रीमंत बाबासाहेब यांनीं पुष्कळ मुली पाहिल्या होत्या; परंतु त्यांना एकहि पसंत झाली नाहीं. कु. चंपूताईस जेव्हां त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांचे अंगचा बहुश्रुतपणा, त्यांचें सुदृढ शरीर व त्यांची निरोगी प्रकृति पाहून श्रीमंत बाबासाहेब यांनीं त्यांना पसंत केलें व त्यांचबरोबर भोर येथें ता. २० मे सन १९०८ इ. रोजीं त्यांचा विवाह झाला. कु. चंपूताईंचें नांव सौ. **लक्ष्मीबाईसाहेब** ठेवण्यांत आलें.

## भाग्योदय–युवराज्ञीपदाचा लाभ.

श्री. सौ. लक्ष्मीबाईसाहेब ह्या एका सामान्य मध्यम स्थितींतील घराण्यांतून राजघराण्यांत येऊन पडल्या; तथापि त्यांचे ठिकाणीं श्रीमंतीचा गर्व मुळींच उत्पन्न न होतां त्यांचा पहिला साधा स्वभाव कायम राहिला आहे. सन १९०८ पासून सन १९२२ पर्यंत म्हणजे सुमारें १४ वर्षें त्या युवराज्ञीपदाचा अनुभव घेत होत्या. हा काल त्यांनीं चैनींत व विलासांत न घालवितां अनेक विषयांवरील पुस्तकें वाचून ज्ञानार्जन करण्यांत घालविला.

## राज्यारोहण.

सन १९२२ चे जुलै महिन्यांत श्रीमंत बाबासाहेब यांचे वडील परलोकवासी झाल्यामुळें त्यांचे अंगावर राज्याची जबाबदारी पडून त्यांनीं राज्यसूत्रें हातीं घेतलीं व ता. १८ आगस्ट सन १९२२ रोजीं राज्यारोहणसमारंभ झाला. श्री. सौ. लक्ष्मीबाई याहि राणीसाहेब होऊन त्यांचे अंगावरहि जबाबदारी येऊन पडली. ही जबाबदारी यशस्वी रीतीनें पार पाडण्यास लागणारी तयारी त्यांनीं अगोदरच करून ठेविली होती.

## सामाजिक उद्योग ( स्त्रीशिक्षणविषयक. )

राज्यारोहणानंतर लगेंच भोर येथील मुलींच्या शाळेंतील मुलीं बक्षिसें व

मिठाई वांटण्याचा समारंभ भोर हायस्कूलच्या भव्य हॉलमध्यें झाला. या समारंभास शहरांतील बहुतेक प्रतिष्ठित स्त्रिया हजर होत्या. समारंभाचें **अध्यक्षपद** श्री. सौ. राणीसाहेबांना देण्यांत आलें होतें. त्यांचे हस्तें बक्षिसें व मिठाई वांटण्यांत आली. त्या वेळीं त्यांनीं जें भाषण केलें, त्यांतील महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे. त्यावरून स्त्रीशिक्षणाविषयीं त्यांचे विचार किती उदात्त आहेत, तें दिसून येईल. त्या म्हणाल्या:—

## राणीसाहेबांचें भाषण.

“ आतांच येथील मुलींच्या शिक्षणाची जी स्थिति मला सांगण्यांत आली, ती समाधानकारक नाहीं, असें मला वाटतें; तथापि येथें दिवसानुदिवस स्त्रीशिक्षणाची आवड वाढत आहे, हें पाहून मला संतोष वाटतो. पुरुषांना जशी शिक्षणाची जरूरी आहे, तशी बायकांनाहि आहे, ही गोष्ट आतां सर्वांना मान्य झाली आहे. मातांची योग्यता किती मोठी आहे, हें सर्व विचारी लोकांच्या लक्षांत पूर्णपणें आलें आहे. परमेश्वरानें पुरुषांप्रमाणें बायकांनाहि बुद्धि दिली आहे. पुरुषांचे बुद्धीची जशी वाढ झाली पाहिजे, तशी बायकांच्याहि बुद्धीची वाढ झाली पाहिजे. बायकांना घरांतील झाडसारव, स्वयंपाक, धुणेंपाणी इत्यादि कामें करावयाचीं असतात, त्यांना शिक्षण कशाला पाहिजे? असें म्हणणारे कांहीं लोक आहेत. त्यांना भीति वाटते कीं, बायका शिकल्या तर हीं कामें कोण करील? परंतु अशी भीति बाळगणें म्हणजे मनाचा कोतेपणा व्यक्त करणें आहे, असें मला वाटतें.

पुरुषांचीं व बायकांचीं कामें निरनिराळीं असल्यामुळें पुरुषांना ज्या प्रकारच्या शिक्षणाची जरूरी आहे, त्याच प्रकारचें शिक्षण बायकांना मिळालें पाहिजे, असें नाहीं. आर्यधर्माला, आर्य चालीरीतींला व आर्य समाजपद्धतीला अनुसरून स्त्रियांना शिक्षण मिळालें पाहिजे. समाजव्यवस्था न बिघडतां कौटुंबिक सुख वाढेल अशा प्रकारच्या शिक्षणाची बायकांना गरज आहे. प्रत्येक स्त्रीला लिहितां वाचतां येऊन तिनें धार्मिक, नैतिक, बौद्धिक व शारीरिक शिक्षण मिळविलें पाहिजे, तरच तिला तिचेवर येणारी जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडतां येईल. स्त्रियांचेवर मुख्य जबाबदारी गृहव्यवस्थेची, बालसंगोपनाची व बालशिक्षणाची

आहे. त्यांचें मुख्य कर्तव्य हेंच आहे व हें बजावितां येण्याकरितां धार्मिक, नैतिक व आरोग्यविषयक शिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे. मुलें चांगलीं किंवा वाईट निघणें हें त्यांच्या मातांवर अवलंबून आहे. म्हणून आपणा स्त्री-वर्गावर केवढी जबाबदारी आहे, हें ओळखून आपण आपल्या मुलींना शिक्षण देण्याचे कामीं बिलकुल हलगर्जीपणा करितां कामा नये. मुलींना शिवणकाम, विणकाम, सूत काढणें इत्यादि उपयुक्त कामें येऊन त्यांना थोडी गायनकले-चीहि माहिती असली पाहिजे. येथील मुलींची शाळा नमुनेदार व्हावी अशी माझी इच्छा आहे व ती तशी करण्याचे कामीं मी शक्य तो प्रयत्न करीन. ''

वरील भाषणावरून स्त्रियांना कोणत्या प्रकारच्या शिक्षणाची आवश्यकता आहे याविषयीं श्री. सौ० राणीसाहेब यांचे विचार कळून येणार आहेत. गेल्या पांच वर्षांत भोर येथील मुलींच्या शाळेंतील मुलींची संख्या तिपटीनें वाढली आहे व त्याचें बरेचसें श्रेय श्री. सौ. राणीसाहेबांना आहे. स्त्रीशिक्षणाविषयीं त्याना जितकी आस्था व कळकळ वाटत आहे, तितकी दुसऱ्या कशाविषयीं वाटत नाहीं.

## परठिकाणच्या संस्थांतील कामगिरी.

वांई येथील कन्याशाळेचा उद्घाटनसमारंभ ता. ३ माहे जून सन १९२५ इ. रोजीं श्री. सौ० राणीसाहेब यांचे हस्तें झाला. त्या वेळींहि सुविचारपरि-प्लुत भाषण करून त्यांनीं त्या संस्थेस १०० रुपयांची देणगी दिली व तसेंच मधूनमधून सार्वजनिक कार्याकरितां त्या थोड्या थोड्या देणग्या देत असतात.

## संततियोग.

श्री. सौ० राणीसाहेबांस पहिलें अपत्य सन १९१९ सालीं कन्यारत्न झालें, परंतु तें निवर्तलें. सन १९२० सालीं पुत्ररत्न झालें. त्याचें नांव रामनाथसाहेब ठेविलें होतें. तोहि लहानपणींच परलोकवासी झाला. त्या वेळीं श्रीमंत सरकार बाबासाहेब व श्री. सौ० राणीसाहेब या उभयतांना अपरिमित दुःख झालें.

सन १९२२ सालीं दुसरें पुत्ररत्न होऊन त्याचें नांव अनंतराव ऊर्फ बापू-साहेब ठेवण्यांत आलें आहे. हल्लीं ते भोर येथील मराठी शाळेंत शिकत असतात.

सन १९२४ सालीं त्यांस तिसरें पुत्ररत्न झालें. ह्यांचें नांव नारायणराव ऊर्फ रावसाहेब असें ठेविलें आहे. चालू सालीं म्हणजे १९२७ सालीं कन्यारत्न झालें आहे. ह्या कन्येचें नांव पद्मावतीबाईसाहेब असें ठेविलें आहे.

## सध्यांचा आजार.

कु. पद्मावतीबाईसाहेबांच्या जन्मानंतर एक महिन्यानें श्री. सौ. राणीसाहेबांना ताप येऊं लागला व त्यांतच अर्धांग वायूचा झटका झाला. त्याच विकारानें हल्लीं त्या आजारी आहेत. भोर येथील सुप्रसिद्ध राजवैद्य वे. शा. संपन्न **श्रीधरशास्त्री गोखले** यांचें औषध चालू असून श्री. सौ. राणीसाहेब यांची प्रकृति हळू हळू सुधारत आहे. लवकरच त्यांची प्रकृति पूर्वीप्रमाणें होवो व त्यांचे हातून लोककल्याणाचीं अनेक कामें घडोत अशी परमेश्वराजवळ त्यांचे सर्व प्रजाजन रात्रंदिवस प्रार्थना करीत आहेत.

श्री. सौ. राणीसाहेबांना दोन भाऊ व दोन बहिणी आहेत. धाकटी बहीण सौ. शांताबाई यांना इंदूर येथील पिढीजात दिवाण पळशीकर यांचे येथें दिल्या आहेत. धाकटे बंधु शिवरामपंत यांची यंदांच बी. ए. ची परीक्षा पास झाली आहे. आणखी एक बंधु रा. महादेव व सर्वांत धाकटी बहीण कु. त्रिवेणी हीं दोघे शाळेंत शिकत आहेत.

शेवटीं श्रीमंत सरकार बाबासाहेब पंत सचिव व श्री. सौ. लक्ष्मीबाईराणीसाहेब यांना व त्यांचे कुटुंबांतील मंडळींना दीर्घायुरारोग्य प्राप्त होऊन त्यांचे हातून चिरसंस्मरणीय अशीं प्रजाहिताचीं कामें होऊन संस्थानची सर्वांगीण उन्नति व भरभराट होवो, अशी श्रीप्रभु रामचंद्रचरणीं अनन्यभावें प्रार्थना करून हें अल्पचरित्र समाप्त करितों.

---

# अनुक्रमणिका.

## द्वितीय खंड.

### भाग ८ वा,

### संकीर्ण विवेचन.

### (पृ० १ ते १३५.)

(सूचना-गोल कंसांतील आंकडे पृष्ठांचे आहेत.)

## भाग ९ वा,

## रामायणांतील स्थलनिर्णय.

(पृ० १३६ ते २४०.)



## भाग १० वा,

## रामायणांतील पात्रांचें गुणदोषविवेचन.

(पृ० २४१ ते ३३८.)

## भाग ११ वा,

## रामायणाचे अवतार.

### ( पृ० ३३९ तें ४४८. )



## परिशिष्टें

### ( पृ० ४४९ ते ५०४. )

———

# शुद्धिपत्र.

## प्रथम खंड.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १० | १८ | कणक | कनक |
| ४० | १ | गोविंदरावजीय | गोविंदराजीय |
| ४० | १७ | वर्षतु | वर्षर्तु |
| ५३ | २ | ब्रह्मणा | ब्राह्मणा |
| ५४ | १९ | तिस | तिला |
| ७४ | १५ | हरन्त | हरन्तु |
| ८९ | २ | राज्याचा | मठाचा. |
| ९५ | १ | ऋत्विजांसह राजा | ऋत्विजांसह, राजाला |
| ९९ | ८ | विद्धयन्ति | विध्यन्ति |
| ११० | १९ | तिचा तिचा | तिच्यामध्यें |
| १२६ | २२ | गृह | ग्रह. |
| १४० | ९ | ङीष | ङीष् |
| १४४ | २ | स्त्रियः | स्त्रियाः |
| १४५ | १४ | ,, | ,, |
| १५८ | ४ | मदरस्यान्तरे | मंदरस्यांतरे |
| १६२ | २२,२३ | तोडिलेलें | तोडिलें |
| १७५ | २१ | दाम | दान |
| १८६ | ५ | बलाधिपत्याचे | बलाधिक्याचे |
| १९६ | ६ | पुरुष | सामान्य पुरुष |
| २०२ | १८ | वाहून | राहून |
| २०८ | ९ | अध्यन | अध्ययन न |
| २१९ | १ | वालि | वाली हा |
| २२२ | ४ | तमाहः | तमाहुः |
| २४६ | १४ | सूत्रें | सूक्तें. |
| २५२ | ४ | जग्राहतुः | जग्रहतुः |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २५९ | २१ | उत्तररामचरीत | उत्तररामचरित |
| २६९ | १६ | तादृश्य | तादृश |
| २७७ | १७ | दहावें | अकरावें |
| २८४ | १९ | अच् स्वर | अच् ( स्वर ) |
| २८९ | १६ | प्रेक्षपक | प्रक्षेपक |
| २९३ | २ | मिथुनोदक | मिथुनादेक |
| २९३ | ६ | दिली | केली |
| ३१६ | ५ | स्वयंभुरिय | स्वयंभूरिव. |

## द्वितीय खंड.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५ | २२ | दिसतें | दिसलें |
| ६ | ९ | त्युच्चिरे | त्यूच्चिरे |
| ७ | ६ | हें लक्षण | हें एक लक्षण |
| ७ | २३ | विषस्वान् | विवस्वान् |
| १० | अंत्य | यांत | मध्यें |
| ११ | २१–२२ | निर्देश केला आहे | निर्देश करितांना–त्यानें युधिष्ठिराचे वेळीं सप्तर्षि मघांत असल्याचा निर्देश केला आहे. |
| १५ | ८ | गृहलाघवी | ग्रहलाघवी |
| १५ | २२ | वाटणार | वाढणार |
| १६ | १७ | सीता | सीतेला |
| १९ | ६ | कालांत | काळांला |
| २० | १०–११ | निश्चित | निश्चित तिथि |
| २१ | १० | पुष्प | पुष्य |
| २३ | १ | पुष्पनीता | पुष्यनीता |
| ३० | अंत्य | संभवनीय | असंभवनीय |
| ३८ | २१ व २३ | रावसाहेब | रायसाहेब |
| ३८ | २२ | आहे | आहेत. |
| ४८ | २५ | नसून | करून |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ६३ | ३-४ | प्रस्तावना आहेत | प्रस्तावना जोडिल्या आहेत' |
| ६४ | २१ | टीकांमध्यें | टीकाकारांनीं |
| ६७ | १५ | कां | का |
| ७८ | १३ | पण अर्थ | पण हा अर्थ |
| ८१ | उपांत्य | नाग्निवृत्त | वनाग्निवृत्त |
| ८१ | अंत्य | संरस्यसे | संरंस्यसे |
| ८५ | ४ | व मृत्यूपूर्वी | व तो, मृत्युपूर्वी |
| ८७ | ७ | कोणीहि समर्थ | समर्थ असा कोणीहि |
| ९१ | १८ | स्वमर्षा | स्त्वमर्षा |
| ९१ | १९ | राम | रामं |
| ९८ | ३ | सविस्तर | समाप्तिपर |
| ११५ | ५ | पाहिजे | म्हणजे |
| ११७ | ११ | लढविला | ठरविला |
| ११९ | २३-२४ | रामचरित्राचे | रावणचरित्राचे |
| १२४ | ४ | कल्पना | ही कल्पना |
| १४३ | ७ | त्र्यह्वै | त्र्यह्व् |
| १४३ | १५ | रामायणांतहि | रामायणाहूनहि |
| १४४ | उपांत्य | मलंदव करूष | मलंद व करूष |
| १५० | १७ व १८ | कांनोज | कांबोज |
| १५३ | टीप ६ | किन्तु | किन्नु |
| १५५ | १८ | माग | मार्गे |
| १६२ | २ | आह्मीं. रामाला | आह्मीं; व त्यावरून हा प्रवास करण्यास रामाला |
| १६४ | टीप १२ | त्यांतला | त्यांला |
| १७० | १ | असल्यामुळें | नसल्यामुळें |
| १७१ | २ | बाजूनें | बाजूचे |
| १७१ | अंत्य | प्रति | प्रतिज्ञा |
| १८९ | १ | रामानें | यमानें |
| २०१ | १३ | नौपथाश्चापि | नौपथश्चापि |
| २०५ | २० | सत्र | तत्र |
| २१० | १० | अंतर १३° | अंतर १६° |
| २३३ | २५ | स्वर्णप्रस्थश्चंद्र | स्वर्णप्रस्थश्चंद्रः |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २४६ | १ | योग्यतेविषयीं कितीहि | योग्यतेविषयीं रामायणांत कितीहि |
| २४९ | १ | चार करून | चार भाग करून |
| २५९ | १३ | असून | होता. |
| २७२ | अंत्य | सांगितलें | सांगितलें आहे |
| २७९ | ५ | शुश्रूषणा | शुश्रूषा |
| २८४ | उपांत्य | हाक | हाल |
| ३०७ | ५ | संबंधाचें | यासंबंधाचें |
| ३०९ | ८ | दोघांचेमध्यें | दोघांचे वयांमध्यें |
| ३२० | १३ | उतावळेपणामुळें | उतावळेपणानें |
| ३२७ | ९ | पातिव्रत्यार्थ | पातिव्रत्यधर्म |
| ३३६ | अंत्य | आली | आली आहे. |
| ३५१ | १० | रायायणाप्रमाणें | रामायणाप्रमाणें. |
| ३५६ | उपांत्य | २४।४३।४४ | ४२।४३।४४ |
| ३५९ | ४ | वसलेल्या | नसलेल्या |
| ३८९ | ११ | होते व आणि | होते व त्यांना आणि |
| ३९४ | ७ | चैत्र | चैत्रे |
| ३९४ | २४ व २७ | पूषाणि | पूषणि |
| ३९५ | ५ | मेघ | मेष |
| ४१७ | ८ | मागाहून | मागाहूनचा |
| ४२९ | १८ | राममोहित | राममेहीति |
| ४३७ | ८ | रामानें | राजानें |
| ४३८ | १२ | जाला | आला |
| ४५२ | १३ | संश्रत्य | संश्रुत्य |
| ४५४ | १० | च्छेद | ऽछेद |
| ४५६ | २२ | घृताचा | घृताची |
| ४६५ | ८ | श्रेष्ठते व कनिष्ठतेविषयीं | श्रेष्ठतेकनिष्ठतेविषयीं |
| ४६८ | २२ | स्त्रियो | स्त्रिया |
| ४६९ | २१ | अपि पर्वणि | अप्यपर्वणि |
| ४७१ | ८ | पाराहार | पाराशर |
| ४७४ | ४ | महान् | महत् |
| ४७९ | ४ | मातश्चैव | मातृश्चैव |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४८२ | टीप ७ | aud | and |
| ४८८ | १४ | मतभेत | मतभेद |
| ५०१ | ३ | सहस्रकायां | सहस्रिकायां |
| ५०१ | १६ | युद्धकांडांत | उत्तरकांडांत |

---

**विशेष सूचनाः**—वाचतांना अर्थबोध होण्याला अडचण होईल अशा अशुद्ध शब्दांचें शुद्धिपत्र येथें दिलें आहे. "मारिच" "ऋष्यशृंग" असलीं अशुद्धें वाचकांस वाचतांना शुद्ध करून घेतां येण्यासारखीं आहेत व यासाठीं त्यांचें येथें शुद्धिपत्र दिलेलें नाहीं.

# श्रीरामायण-समालोचना

अथवा

# रामायणाचा उपसंहार

## भाग ८ वा

## संकीर्ण विवेचन

### कालपरामर्ष.

रामायणाची योग्यता सांगण्याच्या निमित्तानें रामायणांतील कथा कल्पित नसून ऐतिहासिक आहे, असें आम्हीं दाखविलें आहे. रामायणकालीं लोकांची स्थिति कशी होती, रामायणांत वर्णिलेले राक्षस व वानर हे कोण होते, याविषयीं विवेचन पुढें केलें असून पूर्वीच्या सिद्धान्ताला त्याचे योगानें दृढता आली आहे. या विवेचनांत रामायणांतील कथा इतिहास असल्याचें दाखविलें, तेव्हांच ती गतकालीं होऊन गेलेली असल्याचें व पुढें राक्षस आणि वानर यांविषयीं जें विवेचन केलें अथवा आम्हांला करावें लागलें त्यावरून ही फार प्राचीन कालीं होऊन गेल्याचें आपोआप सिद्ध झालें आहे. तथापि हा काळ कोणता असावा, याविषयीं तेथें कांहीं लिहिलेलें नसल्यामुळें व वरील विवेचन वाचल्यावर हा प्रश्न ओघानेंच आमच्या वाचकांच्या मनांत येण्यासारखा असल्यामुळें त्याविषयीं विवेचन करणें अवश्य आहे. सांप्रत विक्रमसंवत्, शालिवाहन शक वगैरे कांहीं कालगणना प्रचारांत आहेत. यांपैकीं एकीचाहि निर्देश करून रामायणांतील कथा सांगितलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या कालीं प्रचलित असलेल्या कोणत्याहि कालगणनेचा उल्लेख त्यांत आलेला नाहीं. अशा प्रकारचा निर्देश रामायणांत असता तर ती गणना लुप्त होऊन प्रचलित कालगणना कधीं चालू

झाली हें सांगण्यापलीकडे आमचेवर भार राहिला नसता; परंतु दुर्दैवानें तसा निर्देश रामायणांत नाहीं. तेव्हां रामायणांतील कांहीं उल्लेखांवरून त्याचा काल आपणांस ठरवावयाचा आहे. म्हणजे तो स्थूल मानानें ठरवावयाचा आहे, हें उघड आहे. निश्चित काल ठरविण्यासारखें साधन रामायणांत नाहीं, हें आम्हीं प्रथमच सांगून ठेवितों. मात्र एवढें खरें कीं, रामायणांत मुहूर्त, दिवस, पक्ष, मास, ऋतु व संवत्सर या कालमापक परिमाणांचे उल्लेख आहेत व ते आमच्या सध्यां प्रचलित असलेल्या परिमाणांसारखे आहेत, किंबहुना तींच परिमाणें परंपरेनें आमचेपर्यंत चालत आलीं आहेत; आणि यावरून सृष्टिचमत्कारांकडे कधीं कौतुकानें तर कधीं भीतीनें पाहात बसण्याचा जो काल फार पूर्वी होऊन गेल्याची आपली कल्पना आहे, त्यानंतरच्या कालांत रामायणांतील कथा घडून आली एवढें निर्विवाद आहे. तथापि अशा रीतीनें कांहीं स्थलीं कालाचे निश्चित निर्देश असले तरी पुष्कळ स्थलीं कालाचे निर्देश मोघम व अत्युक्तिपूर्ण आहेत; व त्यामुळें रामायणाचा काल निश्चित ठरविण्यासारखें प्रबल प्रमाण रामायणांत नाहीं, असें आम्हीं वर सांगून ठेविलें आहे.

## कालाची स्थूल मर्यादा

रामायणाच्या कालाविषयीं विचार करितांना प्रथम दोहों बाजूंच्या मर्यादा कोणत्या येतात हें पाहूं. रामायणांत वेदांचा उल्लेख आहे व स्वतां रामानें सांगवेदांचें अध्ययन केल्याचें सांगितलें आहे. मारुती अशोकवनिकेंत गेल्यावर त्यानें सीतेची भेट घेतली, त्या वेळीं आपण रामाचा दूत आहों हें तिला पटण्याकरतां त्यानें रामाचें स्वरूप, गुण वगैरेंविषयीं जी माहिती तिला सांगितली तींत रामानें यजुर्वेदाचें अध्ययन केल्याचें त्यानें सांगितलें आहे. (५।३५-१४) रामानें वनांत निघते वेळीं जीं दानें केलीं, त्यानिमित्त आलेल्या ब्राह्मणांविषयीं "तैत्तिरीयशाखा म्हणणाऱ्यांचे आचार्य" (२।३२।१५) "कठकालापशाखांचें अध्ययन करणार" (२।३२।१९) असे निर्देश आले आहेत. मारुतीची रामाशीं प्रथम गांठ पडली त्या वेळीं रामानें त्याची जी प्रशंसा केली, तींत तीन वेदांचा उल्लेख आला आहे. (४।३।२८) या उल्लेखांवरून रामायणकाल वैदिक कालानंतरचा होय, हें उघड आहे. ऋग्वेदांत असलेल्या मृग-

शीर्षांतील वसंतसंपाताचे उल्लेखावरून कै. लो. टिळक यांनीं कांहीं सूक्तांचा काल शकपूर्व ४००० वर्षे ठरविला आहे. पुनर्वसूंत वसंतसंपात येत असल्याचाहि उल्लेख ऋग्वेदांत आहे व यावरून त्या सूक्ताचा काल कै. लो. टिळक यांनीं शकपूर्व ६००० वर्षे अनुमानिला आहे. परंतु अशीं सूक्तें फार थोडीं आहेत. तेव्हां स्थूल मानानें ऋग्वेदकाल शकपूर्व ४००० वर्षे धरण्यास प्रत्यवाय नाहीं. रामायणकाल ठरवावयाचा म्हणजे कितीहि पाठीं लोटीत गेलें तरी या कालाचे मागें आपणांस जातां येणार नाहीं. म्हणजे रामायणकाल शकपूर्व ४००० वर्षांच्या अलिकडे येणार हें आपणांस यावरून निश्चित कळलें आहे.

रामायणावरून निर्माण झालेलीं नाटकें व काव्यें पुष्कळ आहेत. तथापि अलिकडे उपलब्ध झालेलीं भासाचीं नाटकें त्यांतल्या त्यांत प्राचीन समजलीं जातात. रामायणांतील कथानकांवर भासाचीं दोन नाटकें आहेत. हीं दोन नाटकें म्हणजे "प्रतिमा" व "अभिषेक" हीं होत. या दोन नाटकांत मिळून सर्व रामायण भासानें आणिलें आहे. भवभूतीनें ज्याप्रमाणें रामायणावर "महावीरचरित" व "उत्तर रामचरित" अशीं दोन नाटकें लिहिलीं आहेत, त्याप्रमाणें ही योजना आहे. भवभूतीची उपमा परिचित म्हणून दिली असली तरी खरें पाहूं गेलें तर भासाची ही योजना पाहूनच भवभूतीनें आपल्या नाटकांची योजना केली असावी हें अधिक संभवनीय आहे. भासानें आपल्या नाटकांची रचना रामायण पुढें ठेवून केली असली पाहिजे असें त्यांतील संविधानकावरून व कित्येक स्थलीं असलेल्या कल्पनांवरून उघड दिसतें. हें कसें, तें आतां पाहूं. वालिवधाचें समर्थन वाल्मीकिरामायणांत पुढीलप्रमाणें केलें आहे.

**वागुराभिश्च पाशैश्च कूटैश्च विविधैर्नराः ।**
**प्रतिच्छन्नाश्च दृश्याश्च गृह्णन्ति सुबहून् मृगान् ॥४।१८।३८॥**
**तस्मात्त्वं निहतो युद्धे मया बाणेन वानर ।**
**अयुध्यन् प्रतियुध्यन् वा यस्माच्छाखामृगो ह्यसि ॥४१॥**

"लोक उघड किंवा गुप्तपणें, जाळें अथवा पाश लावून, किंवा दुसरें कोणतें तरी कपट योजून पुष्कळ मृग धरीत असतात."…. "आणि म्हणून हे

वानरा, तूं शाखामृग आहेस, यासाठीं तूं माझ्याशीं युद्ध करीत नसून अन्याशीं युद्ध करीत होतास तरी मीं बाण मारून तुझा वध केला. "

भासकवीच्या " अभिषेक " नाटकांत प्रस्तुत प्रसंगीं रामाचे तोंडीं पुढील वचन आहे–

**वागुराच्छन्नमाश्रित्य मृगाणामिष्यते वधः ।**
**वध्यत्वाच्च मृगत्वाच्च भवाञ्छन्नेन दण्डितः ॥१।१९॥**

" जाळें लावून व आपण गुप्त राहून मृगांचा वध करणें इष्ट असतें, आणि तूं तर मृग आहेस व वध्य आहेस. म्हणून मीं तुला गुप्त राहून दण्ड केला आहे. "

रामाचें येथील भाषण वाल्मीकिरामायणांतील भाषणांतले मुद्याचे शब्द घेऊन संक्षेपानें सांगितलें आहे, असें उघड दिसत नाहीं काय?

वालिवधानंतर वर्षाकालीं रामानें किष्किंधेंत मुक्काम केला व या मधील विश्रांतीच्या कालांत सुग्रीवानें वालीची स्त्री तारा हिशीं संबंध ठेविला, हें रामायणांत स्पष्ट सांगितलें आहे. पण त्याचा हा व्यवहार वाली जिवंत असतां होता व या भावांमध्यें इतका द्वेष वाढण्यास तो कारण झाला असावा असें अंगदाच्या तोंडच्या उद्गारांवरून दिसतें. मात्र हें रामायणांत स्पष्ट सांगितलेलें नाहीं व लोकांतहि तें प्रसिद्ध नाहीं. पुढील गुणदोषविवेचनात्मक भागांत याविषयींचें विवेचन यावयाचें आहे, यासाठीं तें येथें करीत नाहीं. त्यांचा हा व्यवहार पूर्वींपासून होता एवढाच मुद्दा येथें घ्यावयाचा आहे. वालिवधाचें समर्थन करितांना रामानें वालीचा सुग्रीवाचे स्त्रीशीं असलेल्या संबंधाचा उल्लेख केला आहे व तो भासानें अनुवादिला आहे. या वेळीं वालीनें रामाला जे उलट प्रश्न केले त्याचा अनुवाद करितांना त्याचे तोंडीं भासकवीनें पुढील प्रश्न दिले आहेत:––

**भ्रातृदाराभिमर्शनेन तुल्यदोषयोरहमेव दण्डितो न सुग्रीवः ।**
**सुग्रीवेणाभिमृष्टाऽभूद् धर्मपत्नी गुरोर्मम ।**
**तस्य दाराभिमर्शेन कथं दण्ड्योऽस्मि राघव ॥१।२१॥**

" भावजयीशीं संबंध ठेवण्याचा दोष पाहिला तर दोघांलाहि सारखाच आहे. मग सुग्रीवाला सोडून मला मात्र दंड! "

"सुग्रीवाचा ज्येष्ठ बंधु या नात्यानें मी त्याला गुरुस्थानीं आहें; असें असतां माझ्या धर्मपत्नीशीं त्यानें संबंध ठेविला; मग मी त्याच्या स्त्रीशीं संबंध ठेविला म्हणून मला दंड करण्याचें कारण काय?"

वाली जिवंत असतां त्याचे स्त्रीशीं सुग्रीवाचा संबंध होता व तो वालीला कळला होता असें येथें भासकवीनें स्पष्ट सांगितलेलें आहे. ही गोष्ट रामायणांत स्पष्ट सांगितलेली नसून लोकांत प्रसिद्ध नाहीं; आणि आम्हींहि ती अंगदाचे भाषणावरून अनुमानलेली आहे. तेव्हां भासानें वाल्मीकिरामायण मार्मिकपणें वाचून तिची येथें नोंद केली, असें उघड होत नाहीं काय? रामचरित्र अनेक पुराणांतून आलेलें आहे; महाभारतांतहि तें आलें आहे; परंतु ही गोष्ट एकाहि चरित्रांत सांगितलेली नाहीं. अर्थात् भासानें हा शोध वाल्मीकिरामायण वाचून केला असें मानणें भाग आहे. वाल्मीकींचा ग्रंथ जर दुसऱ्या ग्रंथाचा विस्तृत अनुवाद असता तर त्यांत ही गोष्ट येणें शक्य नव्हतें. भासानें तर ती कल्पनेवर उभारलेली नाहीं; कारण नाटकांत सोयीचे दृष्टीनें तिची आवश्यकता नाहीं. तेव्हां भासाला तसेंच इतर रामचरित्रविषयक ग्रंथांला आधार वाल्मीकीचा आहे. अर्थात् तोच त्या सर्वांहून प्राचीन होय.

भासाच्या कालाविषयीं विद्वानांमध्यें मतभेद आहे. कोणी त्याला शकाचे पूर्वीं ओढतात, तर कोणी त्याला शकापुढें ढकलितात. तेव्हां दुसरें प्राचीन नाटक घ्यावयाचें तर शूद्रकाचें मृच्छकटिक घेतां येईल. यांत शकाराचे तोंडीं मारुतीचा उल्लेख आला आहे. शूद्रकाचा काल सामान्यपणें शकाचे पूर्वींचा मानितात. त्याचे कालाविषयींहि मतभेद आहेत. भासाचे चारुदत्त नाटकावरून त्यानें आपलें नाटक रचिलें असें दोन नाटकांच्या संविधानकांतील सादृश्यावरून उघड दिसून येतें. दोन ग्रंथांत सादृश्य दिसतें, तरी कोणीं कोणाचा अनुवाद केला हें त्यावरून सांगतां येणार नाहीं. तथापि दोन नाटकांचीं संविधानकें पाहिल्यावर भासाचा अनुवाद शूद्रकानें केला हें अधिक संभवनीय वाटतें. तें कांहीं असलें तरी या दोनहि कवींनीं रामायणांतील एका पात्राचा निर्देश आपल्या नाटकांतील पात्रांचे तोंडीं भाषणाचे ओघाबरोबर केला आहे, हें निर्विवाद आहे. आणि या दोन कवींचा काल अनिश्चित मानिला तरी स्थूल मानानें शकापूर्वी

रामायणांतील कथा लोकांत प्रचलित होती, असें निर्विवाद अनुमान यावरून करण्यास अडचण नाहीं.

कवि कल्हण याच्या राजतरंगिणीमध्यें काश्मीरचे राजांचा इतिहास दिलेला असून त्यांत दामोदरनामक एका राजाची कथा दिलेली आहे. या राजाला शाप झाला असून त्याची शापमुक्तता रामायणवाचनानें होईल, असा त्याला उश्शाप मिळाल्याचें या कथेंत सांगितलेलें आहे. त्याला मिळालेला उश्शाप पुढील-प्रमाणें आहे.

अशेषमेकेनैवाह्ना श्रुत्वा रामायणं तव।
शापस्य मोक्षो भवितेत्युचिरे ते प्रसादिताः ॥

" साग्र रामायण एका दिवसांत श्रवण केल्यानें तुझी शापमुक्तता होईल, असें त्यांना प्रसन्न केल्यावर त्यांनीं सांगितलें.

या दामोदर राजाचा काल निश्चित आहे, असें नाहीं; तथापि त्याचा काल शककालाचे पुढें कोणी आणीत नाहीं, हें निर्विवाद आहे. म्हणजे नाटकांवरून केलेल्या वरील अनुमानाला हें पोषकच आहे. दुसरें असें कीं, नाटकांतील वरील उल्लेखांवरून रामायणांतील कथा त्या कालीं प्रचलित होती एवढेंच दिसून आलें; आणि दामोदर राजाच्या वरील कथेवरून त्या वेळीं रामयणांतील कथा प्रचलित होती एवढेंच नव्हे तर तिच्या श्रवणानें पातकांचा नाश होतो इतकें तिला पावित्र्य आलें होतें, असें सिद्ध झालें आहे. तेव्हां रामायणांतील कथेला इतकें पावित्र्य येऊन तीवि-षयीं लोकांत श्रद्धा उत्पन्न होण्यास रामायणाची रचना या कालाचे फार पूर्वीं झाली असली पाहिजे, हें काय सांगावयाला हवे? उश्शापांतील एक दिवसाची अट संभवनीय दिसत नाहीं; कारण वाचनाचें कार्य भिन्न वाचकांकडून करून घेतां आलें तरी रामायणाचें वाचन एका दिवसांत आटोपणार नाहीं. तेव्हां एक दिव-साची येथील अट रामायणाचें श्रवण अखंडित व्हावें इतकें दर्शविण्यापुरती असावी असें वाटतें.

## उपास्य देवतांवरून अनुमान

वैदिक कालानंतर व शकारंभापूर्वीं रामायणाची रचना झाली असावी असें येथवर सिद्ध झालें आहे. ऋग्वेदांतील देवतांविषयीं पाहूं गेलें तर त्यांत इंद्र, अग्नि,

वरुण वगैरे देवतांच्या स्तुति आढळून येतात. वेदांतील कथांतहि या देवतांचें प्राबल्य विशेष दिसून येतें. शिव, विष्णु या देवतांच्या स्तुति वेदांत मुळींच नाहींत असें नाहीं; तर पुराणादिकांतून यांविषयींचीं जशीं वर्णनें अथवा स्तुति आढळून येतात तशीं वेदांत आढळून येत नाहींत. पुराणांचीं जीं पांच लक्षणें सांगितलेलीं आहेत त्यांत शिव किंवा विष्णु यांच्या अवताराची अथवा त्यांची स्वतांची कथा असणें, हें लक्षण आहे. अर्थात् इंद्रवरुणादि देवतांचें माहात्म्य त्यांत असणें संभवनीयच नाहीं. वेदांमध्यें इंद्र सर्वांचें रक्षण करणारा, सर्वांहून पराक्रमी असा सांगितलेला आहे. अशा प्रकारची इंद्राची स्तुति पुराणें किंवा महाभारत यांत नाहीं. उलट विष्णूला अवतार घेण्याविषयीं विनंति करण्याकरितां येणाऱ्या देवादिकांतच त्याची गणना केलेली असते. म्हणजे वैदिक व पौराणिक कालामध्यें समाजांतील विचारांत इतकी क्रांति घडून येण्याइतकें अंतर पडलेलें आहे.

आतां रामायणाचें स्वरूप कसें आहे, तें पाहूं. रामायणाची गणना कोणी पुराणांत करीत नाहीं; व त्यांतील प्रक्षिप्त भाग काढून टाकिल्यावर मूळ काव्य पाहिलें तर त्यांत विष्णूचा अवतार म्हणून रामाचें चरित्र सांगितलेलें नाहीं, या आधीं महत्त्वाच्या गोष्टी होत. एका थोर विभूतीचें चरित्र या दृष्टीनें महर्षींनीं तें ग्रथित केलेलें आहे व याकरितां पौराणिक ग्रंथांप्रमाणें आद्यंतीं मंगल अथवा वंदन वगैरे आचार त्यामध्यें पाळलेले दिसत नाहींत. ग्रंथाला प्रारंभ एकदम केलेला आहे. पौराणिक ग्रंथ संवादरूपानें आहेत, तर हा अगदीं स्वतां कवीनें वाचकांना निरूपण केला आहे. रामायणांतील देवतांकडे पाहिलें तर त्यांतहि असाच प्रकार आहे. राम अगस्त्याश्रमीं गेले असतां तेथें त्यांनीं निरनिराळ्या देवतांचीं स्थानें अवलोकन केल्याचें सांगितलें आहे. येथील वर्णनांत ब्रह्मदेव, अग्नि, विष्णु, महेंद्र, विवस्वान्, सोम, भग, कुबेर, धाता, विधाता, वायु, वरुण, गायत्री, वसु, नागराज, गरुड, कार्तिकेय आणि धर्म, इतकीं आणि या क्रमानें नांवें आलेलीं आहेत. ( ३।१२।१७–२१ ) या देवतांपैकीं विष्णूवांचून एकाहि देवतेविषयीं पुराणांमध्यें प्रामुख्यानें वर्णन नाहीं. या सर्वच देवतांविषयीं वेदामध्यें प्रामुख्यानें वर्णन आहे, असें नाहीं; तथापि यांतील पुष्कळ देवतां-

विषयीं स्तुतिपर अथवा वर्णनपर स्वतंत्र मंत्र वेदामध्यें कोठें तरी आढळून येतील. आतां एवढें खरें कीं, अगस्त्याश्रमांतील वरील देवतांचीं स्थानें शास्त्रानुसार असणार; तेव्हां यावरून समाजांतील विचारांतील क्रांति अनुमानितां येणार नाहीं. तर त्याकरितां दुसरीं प्रमाणें पाहूं. यौवराज्याभिषेकाचा विचार कळल्यावर तो कौसल्येला कळविण्याकरितां राम तिजकडे गेला. त्या वेळीं ती "जनार्दनाचें" ध्यान करीत असल्याचें वर्णन आहे. ( २।४।३३ ) यौवराज्याभिषेकाचे आदल्या रात्रीं रामानें "नारायणाचें" ध्यान करून "विष्णूचे आयतनाचे ठायीं" शयन केलें होतें. ( २।६।१ ) प्रातःकालीं संध्यावंदनानंतर त्यानें शिरसा प्रणाम करून "मधुसूदनाची" स्तुति केली. ( २।६।६ ) हीं सर्व वर्णनें विष्णूचे उपासनेचीं द्योतक होत. राम वनाला निघाल्या वेळीं कौसल्येनें त्याला जे आशीर्वाद दिले त्यांत "देवांचे आयतनामध्यें ज्यांना तूं प्रणाम करितोस ते देव तुझें रक्षण करोत" ( २।२५।४ ) असा उपक्रम केला असून पुढें "साध्य, मरुद्गण, विश्वेदेव, धाता, विधाता, पूषा, भग, अर्यमा, वासवप्रभृति लोकपाल, स्कंद, सोम, बृहस्पति, वरुण, नक्षत्रें, ग्रह, शुक्र, सूर्य, धनाधिपति कुबेर, यम, अग्नि, वायु, ब्रह्मदेव" इतक्या देवतांचीं नांवें आलीं आहेत. विष्णूचें नांव यापुढें एकदां आलें आहे. ( २।२५।३५) यज्ञादि श्रुतिविहित कर्मे करितांना मंत्रोक्त देवतांची आराधना करणें युक्त असतें व अजूनहि कोणी यज्ञयाग करूं लागल्यास त्यास तें करावें लागणार. परंतु वरील प्रसंग व्यवहारांतील आहे आणि यासाठीं त्यावरून सामाजिक विचारांतील क्रांति दिसून येत आहे. मात्र महाभारतादि ग्रंथांतून ही क्रांति जितकी पूर्ण झालेली दिसते, तितकी रामायणांत दिसत नाहीं. अर्थात् ही क्रांति घडून येण्याला मध्यंतरीं बराच काल लोटणें आवश्यक आहे. पुराणें व महाभारत यांवरून सामान्यतः शकारंभींची स्थिति अनुमानितां येते. व त्यांतील देवतांचें स्वरूप वर सांगितलें असून तें वाचकांच्या परिचयाचें आहे. रामायणांतील देवतांविषयींच्या वरील उल्लेखांवरून वरील क्रांति घडून येण्याला त्या वेळीं आरंभ झाला होता, हें निश्चित दिसून येतें. अर्थात् हा संधिकालांतील ग्रंथ होय.

## युगगणनेची अडचण.

सध्यां कलियुग चालू असून त्याचा प्रारंभ होऊन चालू शक १८४८ मध्यें ५०२७ वर्षें पुरीं झालीं, असें पंचांगांमध्यें सांगितलेलें असतें. म्हणजे शकापूर्वी ३१७९ वर्षें कलियुगाला प्रारंभ झाला आहे. रामावतार त्रेतायुगांत झाला, अशी समजूत आहे; व तो त्रेत्याचे अंतीं झाला, असें म्हटलें तरी द्वापराची संबंध वर्षसंख्या ८,६४,००० मध्यंतरीं निघून गेली, असें मानणें भाग आहे. वर्षांची ही विशाल संख्या पाहिल्यावर यापूर्वी केलेलीं अनुमानें कशीं टिकावीं, हा प्रश्न पुढें आल्यावांचून राहात नाहीं. युगाची ही वर्षसंख्या प्राचीन ग्रंथांतून दिलेली असून ती परंपरेनें दृढ झाली आहे; तेव्हां या संख्येकडे दुर्लक्ष करून भागणार नाहीं. तेव्हां या संख्येचा प्रथम विचार करूं.

युगशब्दानें किती काल घ्यावयाचा, याविषयीं निश्चितपणें कांहीं सांगतां येत नाहीं. युगशब्दानें सध्यां किती काल मानण्यांत येतो, त्याचें दिग्दर्शन वर केलें आहे; परंतु आपणांपुढील प्रश्न प्राचीन कालचा आहे; व यासाठीं प्राचीनकालीं युगशब्दानें किती काल मानीत असत, हें आपणांस पाहावयाचें आहे. पंडित रुद्रपट्टण श्यामशास्त्री यांनीं "**गवामयनम्**" म्हणून जो ग्रंथ लिहिला आहे, त्यांत प्राचीनकालीं चार वर्षांच्या चौकडीला युग संज्ञा असल्याचें दाखविलें आहे. वेदांगज्योतिषामध्यें पांच वर्षांना युग संज्ञा सांगितलेली आहे. वर दिलेला दीर्घ काल मनुस्मृत्यादिकांत आलेला आहे. महाभारतामध्यें दोनहि कल्पनांना आधार मिळतात. कौरवपांडवांचा संग्राम कलियुगाला प्रारंभ होण्यापूर्वी दोन युगांचे संधिकालीं झाल्याचें त्यांत सांगितलें आहे. युग शब्द चार अथवा पांच वर्षांचा द्योतक मानिल्यास अशा रीतीनें कालनिर्देश करण्यांत स्वारस्य रहात नाहीं. कारण त्यानें कालाचें ज्ञान कसें होणार ? द्वापाराचा संध्यांश दोनशें वर्षें व कलीची संध्या शंभर वर्षे मिळून दोन युगांचा संधिकाल तीनशें वर्षांचा आहे. संधिकालीं युद्ध झालें असें मानिलें, तरी युद्धकाल सारा अठरा दिवसांचा असतां त्याचा निर्देश इतक्या दीर्घकालानें केला, असें कसें म्हणावें ? तेव्हां संधिकाल इतका दीर्घ मानितां येणार नाहीं, हें उघड आहे. भारतीययुद्धानंतर ३६ वर्षांनीं श्रीकृष्णाचें निर्याण झालें व त्याच दिवशीं कलि-

युगाला प्रारंभ झाला, असें सांगितलें आहे; अर्थात् संधिकालाची मर्यादा ३६ वर्षांपेक्षां कमी धरितां येत नाहीं. संधिकाल ३६ वर्षांपेक्षां अधिक असेल, तर युगाचें मान चार अथवा पांच वर्षांचें धरून कसें चालेल ? कै. त्र्यंबक गुरुनाथ काळे * यांनीं वरील अडचणी लक्षांत घेऊन युगशब्द एक वर्षाचा द्योतक मानून कालनिर्णय करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांची कल्पना " गवामयनम् " वरूनच घेतलेली आहे. परंतु अशा रीतीनें संवत्सराचे स्थानीं युगशब्द योजिल्यानें कालाचा बोध कसा व्हावयाचा ? तसेंच प्राचीन पौराणिक ग्रंथांतून वंशावळि सांगतांना युगाचा निर्देश न करितां वर्षांचा निर्देश केलेला असतो, त्याचें कारण काय ? त्यांनीं चार वर्षे म्हणजे एक चतुर्युग व ७२ चतुर्युगें म्हणजे एक मन्वन्तर अशी कल्पना सुचविली आहे. म्हणजे त्यांचे मतें एका मन्वन्तरांत २८८ वर्षे येतात; पण वंशावळि सांगतांना पुराणांतून याहून अधिक वर्षे स्पष्ट शब्दांनीं सांगितलीं आहेत. अमुक वंशांतील पुरुषांनीं अमुक मन्वन्तरें राज्य केलें, असें कोठेंहि सांगितलेलें आढळत नाहीं. तेव्हां त्यांची कल्पना ग्राह्य कशी मानावी ? एकंदरींत युगशब्दानें कालनिर्देश केला असेल तेथें किती काल घ्यावयाचा, हें निश्चित सांगतां आलें नाहीं, तरी मनुस्मृतींतील दीर्घकाल किंवा वेदांगज्योतिषांतील अल्पकाल यांपैकीं कोणताहि काल सर्वत्र घेतां येणार नाहीं, हें निर्विवाद आहे.

## कलियुगारंभकाल

युगमान किती वर्षांचें हें याप्रमाणें अनिश्चित असलें तरी कलियुगारंभकाल बरोबर कळेल तर ती इष्टापत्तिच आहे. कलियुगारंभकाल शकपूर्व ३१७९ वर्षे सध्यां मानण्यांत येतो. भारतीय युद्ध संधिकालीं झालें असल्यामुळें कलिवर्षाचा निर्देश त्यानंतरच्या प्राचीन ग्रंथांत पाहाणें अवश्य आहे. भारतीय युद्ध व कलियुग यांचें वर्ष देऊन त्याबरोबर सर्वांना परिचित असलेलें शकवर्ष देणारा प्राचीन आधार म्हटला म्हणजे ऐहोळें येथील रविकीर्तींचा शिलालेख होय. यांत भारतीय युद्ध होऊन किंवा कलियुगारंभ होऊन ३७३५ वर्षें झालीं, असें शकवर्ष ५५६ यांत दिलें आहे. अर्थात् सध्यांचे पंचांगांत दिलेल्या

* पुराण-निरीक्षण, पृष्ठ २५२-२५३.

गतकलीशीं याचा मेळ आहे. या कामीं याहून प्राचीन शिलालेख मिळत नाहीं. प्राचीन ज्योतिषी आर्यभट्ट यानें स्वतांचे ग्रंथरचनेचा काळ कलिवर्षानें सांगितला आहे व तो प्रचलित समजुतीशीं मिळता आहे; परंतु दुर्दैवाची गोष्ट हीं कीं, यापूर्वीं कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत कलिवर्षाचा निर्देश मिळत नाहीं. आर्यभट्ट हा पांचव्या शतकांतील ग्रंथकार असून त्यानें स्वतांचे वेळीं कलीचीं ३६०० वर्षें झाल्याचें सांगितलें आहे. भारतीय युद्ध द्वापरांतीं झाल्याचें त्यानें सांगून ठेविलें आहे. पण हा काळ त्याला कसा कळला हें तो सांगत नाहीं. वराहमिहिर हा आर्यभट्टाचे कालचा–त्याहून सहा वर्षांनीं लहान-ज्योतिषी असून त्यानें युधिष्ठिर शकपूर्व २५२६ वर्षे होऊन गेल्याचें सांगितलें आहे. म्हणजे कलीचे ६५३ वे वर्षीं युधिष्ठिरशकाला प्रारंभ झाला असें त्याचें म्हणणें आहे. समकालीन ग्रंथकारांत ऐतिहासिक कालनिर्देशासारख्या बाबींत इतका मतभेद असावा व तोहि त्यांनीं प्रतिपक्षाचें खंडन न करितां किंवा स्वपक्षसमर्थनार्थ प्रमाण न देतां व्यक्त केलेला असावा हें अगदीं विचित्र आहे. सप्तर्षि एकएक नक्षत्रीं शंभर वर्षे असतात असें वराहमिहिरानें आपल्या ग्रंथांत सांगितलें आहे. वास्तविक सप्तर्षींना गति मुळींच नाहीं. सप्तर्षींचा पुंज विशाल असल्यामुळें ते एकाच वेळीं चारपांच नक्षत्रीं असल्याचें दिसून येतें व यामुळें त्यांना गति असल्याचा भास होतो. युधिष्ठिराचे वेळीं सप्तर्षि मघांत असल्याचें पुराणांतरीं आहे. वराहमिहिराला ते मघांतच दिसले. तेव्हां ते एकाच नक्षत्रीं पुनः येण्यास २७०० किंवा त्यांची कोणतीहि पट इतकीं वर्षे झालीं असणार; व दुप्पट करण्याइतका काल तर असंभाव्य दिसतो, असें मनांत आणून त्यानें हा काल ठरविला असावा, असा कै. दीक्षित * यांचा तर्क आहे. युधिष्ठिराचे कालाचा निर्देश केला आहे व यावरून दीक्षित यांचा तर्क संभवनीय दिसतो. पण सप्तर्षींच्या गतीची कल्पना निराधार असल्यामुळें पुढील सिद्धांत निराधार होय, हें निराळें सांगावयास नको. वराहमिहिराचे वरील वचनावरून द्वापरांतीं पांडव झाल्याविषयींचा महाभारतांतील निर्देश संशयित वाटतो, असें कै. दीक्षित यानीं लिहिलें आहे. परंतु हा संशय प्रचलित कलिवर्ष बरोबर ठरल्यास युक्त म्हणतां येईल. महाभारताची शेवटची आवृत्ति घेतली तरी ती या ग्रंथकाराचे पूर्वीची आहे.

* भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास, पृ. ११८

तेव्हां वरील निर्देश त्या कालापर्यंत सर्वमान्य होता, असेंच निर्विवादपणें मानणें भाग आहे मग सप्तर्षींच्या कल्पित गतीवर वराहमिहिरानें केलेल्या उल्लेखानें त्याला बाध कसा येईल? आर्यभट्ट व वराहमिहिर यांनीं दिलेल्या कलिवर्षांत ६५३ वर्षांचें अंतर आहे. आणि यांतील वराहमिहिराची कल्पना कशी चुकली हें वर दाखविलें आहे. मात्र यावरून आर्यभट्टाची कल्पना ग्राह्य आहे असें आमचें मत आहे असें नव्हे; त्यानें कलिवर्ष सांगतांना महाभारतांतील द्वापरांतीं भारतीय युद्ध झाल्याविषयींच्या निर्देशाचा तोल सांभाळला, इतकें फार तर म्हणतां येईल. आर्यभट्टानें कलिवर्ष सांगतांना त्याविषयीं प्रमाण कोणतेंच दिलें नाहीं. अर्थात् त्यानें हें गणितावरून काढलें असावें. मागाहून झालेल्या बहुतेक ग्रंथकारांनीं तें मान्य केलें आहे व यामुळें तें दृढमूल झालें आहे हें खरें; तथापि आर्यभट्ट मानितो त्या कल्पारंभापासून शकारंभापर्यंतच्या दीर्घ कालांत जे अनेक ग्रंथ झाले त्यांनीं याविषयीं कांहीं सांगितलें नाहीं व यामुळें आर्यभट्टाच्या कल्पनेची ग्राह्याग्राह्यता ठरविण्यास कांहीं साधन नाहीं. युगारंभीं व कित्येकांचे मतें कल्पारंभीं सर्व ग्रह एकत्र अश्विनींत असतात असें ज्योतिःशास्त्राचे ग्रंथांत सांगितलें आहे. या कल्पनेला प्राचीन ग्रंथांचा आधार नाहीं. तथापि या कल्पनेवरून कलियुगारंभकाल आर्यभट्टानें ठरविला असावा असा संशय येतो. कै. दीक्षित यांनीं या दृष्टीनें विचार करण्याकरितां कलियुगारंभींच्या ग्रहस्थितींचें कोष्टक आपल्या ग्रंथांत दिलें आहे व सर्व ग्रह एकत्र असल्याची कल्पनाहि त्या कालाशीं मिळत नाहीं, असें स्वतांचें मत स्पष्ट सांगून ठेविलें आहे. तेव्हां रामायणाचा काल ठरवितांना कालियुगाचें कालमान लक्षांत घेऊन विचार करण्याचें कारण नाहीं, हें उघड आहे.

## कल्यारंभ का कल्पारंभ?

प्रचलित कलिवर्षाची अशा प्रकारची निराधार स्थिति पाहून कै० त्र्यंबक गुरुनाथ काळे यांनीं शकपूर्व ३१७९ हा कल्यारंभकाल नसून कल्पारंभकाल असावा अशी कल्पना सुचविली आहे. लेखनसादृश्यावरून ही चूक झाली असावी अशी त्यांची कल्पना आहे.* बोलूनचालून ही कल्पना आहे.

* पुराणनिरीक्षण, पृ. २५६

परंतु ती त्यांनीं आणखी इतर ऐतिहासिक कथांशीं मिळवून दाखविली आहे व यासाठीं तिच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं विचार केला पाहिजे. कलिवर्ष चुकीचें ठरवून व तेंच कल्पवर्ष मानून त्यांनीं कित्येक ऐतिहासिक व्यक्तींच्या कालाची संगति लावण्याचा यत्न केला आहे; परंतु कलिवर्ष चुकीचें ठरविण्यास त्यांनीं ज्याप्रमाणें प्रमाणें दिलीं आहेत त्याप्रमाणें तेंच कल्पवर्ष मानण्यास दिलेलीं नाहींत. याच कल्पांतील पूर्वींच्या मन्वंतरांत झालेल्या कित्येक गोष्टींचे काल त्यांनीं पुराणांवरून दिले आहेत, ते पाहूं लागलें असतां त्यांतील अर्थाची ओढाताण स्पष्ट दिसते आणि त्यांची कल्पारंभविषयक कल्पना निराधार असल्याचा प्रत्यय येतो. बृहद्देवतेमध्यें ययातीचे सहस्रवार्षिक सत्राचा उल्लेख आहे व तें अवतरण देऊन काळे यांनीं ययातीनें कल्पाचे सहस्रावे वर्षीं सत्र केलें असा त्याचा निष्कर्ष काढिला आहे. सहस्रवार्षिक सत्र याचा वास्तविक अर्थ सहस्र वर्षें मुदतीचें सत्र असा आहे. मनुष्याचें आयुर्मान पाहतां तें असंभाव्य दिसतें हें खरें आहे; पण " सहस्रावे वर्षीं " असा त्याचा अर्थ कसा करतां येईल? सहस्रवार्षिक सत्राचें विधान शास्त्रामध्यें आहे व तें इतक्या दीर्घ कालानें करावयाचें असेल तर त्याचा विधि सांगण्यांत स्वारस्य काय? काळे यांचे कल्पनेप्रमाणें या कल्पांत तरी असे योग आतांपर्यंत अवघे पांच येतील. पुराणांतून तर अनेकांनीं हें सत्र केल्याचे उल्लेख आहेत. हीं सर्व सत्रें एकाच कालीं व भिन्न स्थलीं झालीं असें म्हणतां येत नाहीं. पूर्व मीमांसाकारांनीं येथें वर्ष याचा दिवस असा अर्थ करून संगति लाविली आहे व तीच एकंदरींत युक्त दिसते. इक्ष्वाकूचा पुत्र निमि यानें हें सत्र केल्याचें विष्णुपुराणांत सांगितलें आहे व त्याचें अवतरण काळे यांनीं दिलें आहे.* येथें निमि हा इक्ष्वाकूचा पुत्र असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. वैवस्वत मनूची वंशावलि सांगतांना काळे यांनीं भागवताचें अवतरण प्रथमच दिलें* आहे. त्यांतहि निमि इक्ष्वाकूचा पुत्र म्हणून सांगितलेला आहे. निमि व ययाति या दोघांनींहि हें सत्र केल्याचे उल्लेख आहेत व ते दोघे तर समकालीन म्हणतां येत नाहींत. काळे यांनीं येथें निमि हा इक्ष्वाकूचा पुत्र नसून वंशोत्पन्न असावा असा तर्क केला आहे

* पुराणनिरीक्षण, पृ. २७८; कित्ता पृ. २६८

व तो तर मूळ ग्रंथाचे विरुद्ध आहे. कल्पारंभ श. पू. ३१७९ मध्यें झाला हें सिद्ध करण्यासाठीं काळे यांनीं बृहदुक्थांतील एक प्रमाण दिलें आहे. यांत ४६० गवामयनाचा उल्लेख आहे व यावरून १८४० वर्षे गेल्याचा बोध होतो असें काळे लिहितात; आणि तें सरळ आहे. " गवामयनम् " ही कालगणनेची प्राचीन काळची एक पद्धति आहे. वर्षाचे दिवस ३६५ 1/4 असल्याचें आमचे पूर्वजांना माहीत होतें. व्यवहारांतील वर्ष ३६० दिवसांचें होतें व पुढें ५ दिवस मलदिवस म्हणून धरून मधील तूट भरून काढीत व वर्ष पुरें करीत. पारशी लोकांमध्यें असे दिवस प्रतिवर्षी मानण्याची पद्धति आहे व ते दिवस पंचांगांत देतांना पुढें " गा " असें लिहिलेलें असतें, हें सर्वांला माहित आहे. " गवामयनम् " ही पद्धति अशा प्रकारचीच आहे. अशा रीतीनें पांच दिवसांची तूट भरून आली तरी प्रतिवर्षी 1/4 दिवस रहात असे; अर्थात् चार वर्षांनीं एक दिवसाचा फेर पडत असे व तो चार वर्षांनीं एक दिवस अधिक धरून भरून काढीत असत. " गवामयनम् " म्हणजे अशा रीतीनें चार वर्षांचे शेवटीं येणाऱ्या या एकेक दिवसाची गति होय. इंग्रजी कालगणनेंत चार चार वर्षांनीं फेब्रुवारीचा एक दिवस अधिक धरण्याची चाल आहे व त्या वर्षाला लीपवर्ष म्हणतात. दोनहि पद्धतींतील तत्त्व एकच आहे. गवामयनाच्या कालगनणेंत केलेल्या यज्ञांचे उल्लेख कित्येक ब्राह्मणग्रंथांतून केलेले आहेत. एका दिवसाचे गवामयनानें चार वर्षांचा बोध होतो व यासाठीं बृहदुक्थांतील ४६० गवामयनांचे उल्लेखावरून १८४० वर्षांचा बोध झाला. वेदांगज्योतिषाचा काल काळे यांनीं इ. पू. ११८१ सांगितला आहे. स्थूल मानानें हा काल १२०० वर्षांचा धरून व वरील १८४० वर्षे त्यांत मिळवून कल्पारंभापासून इसवी सनापर्यंत ३०४० वर्षे झालीं आणि कल्पारंभ श. पू. ३१७९ म्हणजे इ. पू. ३१०१ असून त्याशीं हा काल स्थूल मानानें मिळतो असें काळे यांनीं लिहिलें आहे. * वर्षसंख्येचा मेळ जवळजवळ मिळतो हें कांहीं खोटें नव्हे; परंतु काळे यांनीं वर्षसंख्येचा मेळ जुळेल असें पाहून कित्येक अनुमानें त्यांच्या युक्तायुक्ततेचा विचार न करितां केलेलीं आहेत. बृहदुक्थां-

* पुराणनिरीक्षण पृ. २५९–२५३

तील ४६० गवामयनांचा उल्लेख त्यांनीं दिला आहे. परंतु ही कालगणना कल्पारंभीं चालू झाली याला कांहीं त्यांनीं प्रमाण दिलेलें नाहीं. त्या उल्लेखांवरून कालगणनेची ही पद्धति १८४० वर्षें चालू होती, असें फार तर म्हणतां येईल. बरें, मूळांत प्रारंभाविषयीं कसलाच स्पष्ट निर्देश नाहीं. यासाठीं कल्पारंभापासून ही पद्धति चालू झाली असें गृहीत धरिलें तरी ही पद्धति बंद पडून वेदांगज्योतिषांतील पद्धति लागलीच प्रचारांत आली असें कसें म्हणतां येईल ? १८४० वर्षें चाललेल्या पद्धतीचा त्यांनीं १८४१ वे वर्षीं त्याग कां करावा? सध्यां आपणांकडील प्रचलित पंचांगाचा इतिहास पहाना ! गृहलाघवी पंचांग दृक्प्रत्ययास येत नाहीं हें मान्य झालें तरी त्याचें आसन सुटत नाहीं व दृक्प्रत्ययाच्या प्रतिज्ञेनें पुढें येणाऱ्या नवीन पंचांगाला स्थिरता येत नाहीं, हें आपण नित्य पाहात आहों; मग प्राचीन काळीं एक कालगणना बंद पडून दुसरी लागलींच चालू झाली असें कसें म्हणावें ? अर्थात् मध्यंतरीं कांहीं तरी काल गेल्याचें गृहीत धरणें भाग आहे. वर दोन कालांचा मेळ घेतांना ६१ वर्षांचें अंतर पडलेलें दिसत आहे. इतका काल नवीन कालगणना प्रचारांत येण्यास पुरेल असें वाटत नाहीं; अर्थात् हा काल त्याहून अधिक धरणें भाग आहे व तसा घेतल्यानें वरील मेळ मिळणार नाहीं. "गवामयनाचे" पद्धतींत चार वर्षांचें युग आहे व वेदांगज्योतिषांत पांच वर्षांचें युग आहे, म्हणजे एक पद्धति जाऊन दुसरी सहज प्रचारांत येण्याइतकें दोहोंत सादृश्य तर मुळींच नाहीं. काळे यांनीं वेदांगज्योतिषाचा काल इ. पू. १२०० धरिला आहे. तो कै० दीक्षित यांनीं इ. पू. १४०० असल्याचें सिद्ध केलें आहे.* दीक्षित यांचें अनुमान काळे यांनीं खोडून काढिलेलें नाहीं व हा काल घेतला म्हणजे दोनशें वर्षांची भर अधिक पडून विसंगतता वाटणार! एकंदरींत काळे यांच्या कल्पनेला ग्रंथाचा आधार नाहीं व पुढील ऐतिहासिक कालाशीं ती मिळतहि नाहीं.

## युगाविषयीं रामायणांतील कल्पना.

युगाविषयीं रामायणांत कांहीं निर्देश असेल तर आतां पाहूं. विशाला नगरीचा इतिहास सांगतांना विश्वामित्रांनीं तेथें पूर्वीं दितीनें तपश्चर्या केली व त्या

* भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास, पृ. ८८

वेळीं इंद्रानें तिची सेवा करीत राहून तिच्या गर्भाचे तुकडे केले वगैरे कथा रामाला निवेदन केली. या कथेचा उपक्रम " पूर्वं कृतयुगे " ( १।४५।१५ ) असा केला आहे. म्हणजे झालेली कथा पूर्वींचे कृतयुगांतील; अर्थात् प्रस्तुतचें युग त्यापुढील त्रेता असावें असें सूचित होत आहे. अशा प्रकारें कृतयुगाविषयींचे उल्लेख पुढें उत्तरकांडामध्यें आले आहेत. (७।२।४; १७।६१।३) यांपैकीं पहिला उल्लेख प्रक्षिप्त भागांतीलच आहे. या कांडांत प्रक्षिप्त भाग बराच असून त्यांत एके स्थलीं तर "त्रेतायुगांतील कथा प्राचीन" म्हणून सांगण्याचा उपक्रम केला आहे. ( ७।७७।१ ) परंतु पूर्वींचे दोन उल्लेख निर्विवादपणें मूळांतले आहेत व ते रामचरित्र त्रेतायुगांत घडल्याच्या समजुतीला पोषकच आहेत. सीतेनें दुसऱ्यानें दिव्य केलें त्या वेळीं सुखमय वायु वाहूं लागल्याचें वर्णन करितांना पूर्वीं कृतयुगाप्रमाणें लोकांत अनुभव येऊं लागल्याचें सांगितलें आहे. (७।९७।१३) व ही उपमा त्रेतायुगाविषयींच्या समजुतीला अधिक पोषक आहे. युग शब्दानें किती काल घ्यावयाचा याचा बोध वरील उल्लेखांवरून होत नाहीं; तथापि तो काल पांच किंवा चार वर्षांसारखा अल्प नसून फार दीर्घ होता, इतकें अनुमान त्यावरून केल्यास त्याला बाध येणार नाहीं. युगांतील प्रथम व चतुर्थ युगांचें तुलनात्मक लक्षण रामायणांत सहजगत्या एके स्थलीं आलें आहे. रावणाचे दरबारांत त्याचा मातामह माल्यवान् सीता परत देऊन रामाशीं संधि करण्याचा रावणाला उपदेश करतांना म्हणतो:—

**धर्मो वै ग्रसतेऽधर्मं यदा कृतमभूद्युगम् ।**
**अधर्मो ग्रसते धर्मं तदा तिष्यः प्रवर्तते ॥ ६।३५।१५ ॥**

" जेव्हां कृतयुग होतें, तेव्हां धर्म अधर्माला ग्रासून टाकितो व जेव्हां अधर्म धर्माला ग्रासून टाकितो तेव्हां कलियुगाची प्रवृत्ति होते. "

येथें युगाला कालाची मर्यादा न सांगतां गुणांची सांगितली आहे हें यांत विशेष आहे. म्हणजे रामायणकालीं युगाला कालाची मर्यादा नव्हती, असें मात्र नव्हे. कारण यापूर्वीं दिलेल्या सर्व उल्लेखांवरून कालाची मर्यादा कळली नाहीं तरी ती त्यांना होती, हें निःसंशय दिसून येतें. ब्राह्मणकुलांत जन्मल्यानें ब्राह्मण्य प्राप्त होतें हें शास्त्रांत सांगितलें आहे. तसेंच ब्राह्मणाचे गुणधर्म शास्त्रांत सांगि-

तलेले आहेत. अर्थात् जन्मतः ब्राह्मण्य व्यवहारांत ध्यावयाचें व गुणतः ब्राह्मण्य कोणालाहि संपादितां आलें तरी व्यवहारांत ध्यावयाचें नसतें; म्हणजे जन्मतः ब्राह्मण झालेल्या व्यक्तीनें तें संपादन करण्याचा प्रयत्न करावा असा तें सांगण्याचा शास्त्रांचा उद्देश असतो; तसाच प्रकार येथें समजावयाचा आहे. व्यवहारतः व गुणतः असलेला हा ब्राह्मण्यांतील विवेक जशाचा तसा युगाचे कामीं लागू पडतो हें आम्हांला येथें वाचकांस दाखवावयाचें आहे. कृतयुगांत धर्म चतुष्पाद असतो व पुढील युगांत क्रमानें एकएक पाद कमी होऊन कलियुगांत तो एकपाद असतो, अशी शास्त्रांत मर्यादा सांगितलेली आहे; व रामायणांत वरील वचनांत तीच प्रतिबिंबित झालेली आहे. जन्मतः ब्राह्मण असलेली व्यक्ति शूद्रधर्मानें वागूं लागल्यास व्यवहारांत ती ब्राह्मण म्हणून समजली गेली तरी गुणतः शूद्र होते; व जन्मतः जो शूद्र, त्यानें ब्राह्मणाचे शमदमादि गुण संपादिले असतां व्यवहारांत तो शूद्र राहिला तरी गुणतः ब्राह्मण होतो; तसेंच युगाचे बाबींत समजावयाचें आहे. शास्त्रविहित कालमर्यादेच्या दृष्टीनें युग कोणतेंहि असलें तरी धर्माचरणाच्या न्यूनाधिक्यानुरूप त्या त्या युगाची संज्ञा त्याला प्राप्त होते, हेंच तत्त्व रामायणांतील वरील वचनांत व्यक्त होत आहे. रावणाचा अत्याचार पाहून त्या वेळीं त्रेतायुग असलें तरी त्यामुळें तें कलियुग होऊं पहात आहे व त्यानें सीता रामाला परत देऊन संधी केल्यास त्रिपाद धर्माची--त्रेतायुगाची शास्त्रोक्त मर्यादा ओलांडून आपणाला गुणतः कृतयुगाची प्रवृत्ति येथें करितां येईल, असें माल्यवानानें आपल्या भाषणांत सुचविलें आहे. गुणतः कृतयुगाची प्रवृत्ति करणें झाल्यास कलियुगाचे अंतकालाची वाट पहात न बसतां ती केव्हांहि करितां येते, या तत्त्वाकडे आमच्या वाचकांचें लक्ष जावें याकरितां इतकें विवरण केलें आहे.

## कालनिर्णयाचें साधन—ज्योतिर्विज्ञान.

रामायणकालाविषयीं प्रथम स्थूल मर्यादा ठरविली व मध्यंतरीं युगकल्पनेची येणारी अडचण दूर केली; आतां अंतर्गत साधनांविषयीं विचार करूं. रामायणांत अशा प्रकारचे निर्देश आहेत. पण ते मोघम आहेत, हें आम्हीं प्रारंभीं सांगून ठेविलें आहे. तथापि असे निर्देश कशा प्रकारें व कोठें आहेत, आणि त्यांवरून कालाविषयीं काय अनुमान करितां येईल, याविषयीं पूर्वी विवेचन केलें नाहीं; तें

आतां करावयाचें आहे. कालचक्र अखंड फिरत राहिलें आहे व तें आमचेपासून दूर आहे असें नाहीं; तथापि त्याचे गतीचें माप आकाशांतील ज्योतींवरून करावयाचें असतें व हें साधन तर दूर आहे. घड्याळाचे तबकडीवर ज्याप्रमाणें कालदर्शक अंक असतात तशी आकाशाच्या तबकडीवर कालमापनासाठीं या ज्योतींची त्या जगन्नियंत्यानें योजना केली आहे. प्राचीन कालीं असो, प्रस्तुत कालीं असो अथवा भविष्यकालीं असो, कालाचें ज्ञान आकाशांतील ज्योतींवर अवलंबून आहे व रामायणांतील अशा प्रकारच्या उल्लेखांवरूनच त्याचा काल ठरवावयाचा आहे.

आकाशांतील ज्योतींचें साकल्यानें ज्ञान अद्यापि मनुष्यास झालेलें नाहीं, इतकेंच नव्हे तर अद्यापि कित्येक ज्योतींच्या अस्तित्वाची कल्पनाहि आलेली नाहीं, अशी स्थिति आहे. परंतु हें ज्ञान संपादन करण्याचे मनुष्याचे प्रयत्न अव्याहत चालले आहेत. आमच्या प्राचीन वाङ्मयांत अशा प्रयत्नांचें स्वरूप थोडथोडें दृग्गोचर होतें. कै. दीक्षित यांनीं आपल्या ग्रंथांत त्याविषयीं क्रमपूर्वक विवेचन केलें आहे. आमच्या प्राचीन वाङ्मयावरून कळणारा हा इतिहास पाहिला तर तो आरंभापासून मिळत नसून कांहीं ज्ञान झाल्यानंतरचा मिळतो, हें सहज लक्षांत येईल. कै. दीक्षित यांनीं आपल्या इतिहासांत या ज्ञानाचा क्रम लाविला आहे व त्याचे काल अनुमानिले आहेत. रामायणाचा काल ठरवावयाचा म्हणजे त्यांतील ज्योतिर्विषयक ज्ञानावरून अशाच प्रकारचा यत्न करावयाचा आहे. रामायणकालीं ज्योतिर्विषयक ज्ञान किती होतें याविषयींची माहिती आम्हीं पूर्वीं दिली आहे व त्यावरून त्या वेळीं ऋतु, अयन, मास, पक्ष वगैरे कालमापनाचीं साधनें प्रचारांत असल्याचें दाखविलें आहे. या साधनांचें ज्ञान कसकसें होत गेलें याविषयीं विचार करून जर क्रम लाविला, तर प्रथम दिवस, रात्र व पक्ष असा लावितां येईल. ऋतुमान बदलत जाऊन पूर्वीचा ऋतु पुनः प्राप्त झाल्यावर हा क्रम लक्षांत येऊन संवत्सराचें ज्ञान होणार. यांपैकीं पक्षापर्यंतचें ज्ञान चंद्रावर व संवत्सराचें ज्ञान सूर्यावर अवलंबून आहे. ऋतूंपैकीं वर्षाकाल तत्काल पटणारा असतो. यासाठीं आमची कल्पना आहे कीं, वर्षाकालानें संपणाऱ्या कालचक्राचे फेऱ्याला " वर्ष " हें अन्वर्थक नांव पडलें असावें. संव-

त्सर शब्दाची उत्पत्ति तर ( संवसन्ति ऋतवो यस्मिन्—सर्व ऋतु ज्यामध्यें चांगल्या-प्रकारें वास करितात ) ऋतूंवर अवलंबून आहे. आपणांला सहा ऋतु सध्यां माहीत आहेत, पण खरें पाहूं गेलें तर आबालवृद्धांना तत्काल पटणारे ऋतु तीनच आहेत. तैत्तिरीय ब्राह्मणामध्यें तीन ऋतु सांगितले असून त्यांचीं अग्नि, सूर्य व चंद्रमा अशीं नांवें दिलीं आहेत. पावसाळा, हिंवाळा व उन्हाळा या तीन कालांत अग्न्यादि त्रयीची अपेक्षा क्रमानें वाटत असते व यावरून त्या त्या कालांत तीं नांवें प्रथम प्राप्त झालीं असावीं. संवत्सरचक्राचा निश्चय झाल्यावर पक्षाची व नंतर मासाची कल्पना मनुष्याला आली असावी. दिवस व रात्र यांचें ज्ञान झाल्यावर पक्षाची प्रचीति आधीं येते व यास अनुसरून संवत्सरांतील २४ अर्धमासांचीं नांवें तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितलेलीं आहेत. तेथें " अर्धमास " असा स्पष्ट शब्द आहे व त्यावरून मासाचें ज्ञान आधीं होऊन मग त्याचे हे खंड केले असावेत, असें वाटतें; परंतु वस्तुस्थिति तशी संभवत नाहीं. मासविषयक कल्पनेची घडी बसल्यावर दीर्घ कालानंतर ही माहिती सदैव सांगितलेली आहे व यामुळें तेथें ' अर्धमास ' असें म्हटलें आहे. एका मासाचे दोन पक्ष अशी कल्पना आधीं संभवत नाहीं, व तशी असती तर त्यांना चोवीस भिन्न नांवें देण्याचें प्रयोजन नव्हतें. मासविषयक कल्पनाहि प्रथम ऋतूंवरून आली व यासाठीं मासांच्या वैदिक संज्ञा " मधु, माधव " वगैरे ऋतुदर्शक आहेत. नक्षत्रांचें ज्ञान यानंतरचें व चैत्रादि प्रचलित संज्ञा नक्षत्रांवर अवलंबून असल्यामुळें त्यांचें ज्ञान त्यानंतर व्हावयाचें, हें उघड आहे. प्रतिपदादि तिथींचा क्रम त्यानंतरचा. वास्तविक या संज्ञा तिथींना अनुलक्षून नसून रात्रींना अनुलक्षून आहेत व नांवांवरूनच त्यांचा क्रम सूचित होतो. शुक्ल-कृष्णपक्षांतील रात्री व दिवस यांच्या वेगवेगळ्या संज्ञा पूर्वीं होत्या व त्या तैत्तिरीय ब्राह्मणांत आलेल्या आहेत. ज्याप्रमाणें पूर्वीं संवत्सराचे चोवीस अर्धमास होते व पुढें दोन अर्धमासांचा एक गट बनवून त्याला मास ही संज्ञा मिळाली, त्याप्रमाणें पूर्वीं रात्र व दिवस यांचीं भिन्न नांवें असून मागाहून रात्र व दिवस यांचा एक गट बनवून त्यांना तिथि संज्ञा मिळाली असावी, हें संभवनीय दिसतें. दिवस व रात्र यांच्या वेगवेगळ्या संज्ञा असतां शुक्लपक्षांतील १५

ऱ्या रात्रीला पौर्णमासी म्हणत असत; पुढें रात्रींना क्रमवाचक संज्ञा मिळाल्या, तरी तिची पूर्वीची संज्ञा तशीच राहिली. तसेंच "पौर्णमासी" या संज्ञेंत त्या रात्रीं मास पूर्ण होत असल्याचा बोध होतो; ( पूर्णो मासो अस्याम् ) व आतां इकडे मास अमान्त झाल्यामुळें तिची ही संज्ञा निरर्थक झाली आहे, तरी अद्यापि प्रचारांत आहे. रात्रींच्या क्रमबोधक संज्ञा प्रचारांत येण्यापूर्वीं सर्व व्यवहार नक्षत्रांवर चालत असत. सध्यां आपणांस छापील पंचांगें मिळतात, यामुळें तिथिनिश्चय करण्यास अडचण वाटत नाहीं; परंतु प्राचीन कालीं आकाशस्थ ज्योतींकडे पाहूनच हा निश्चय करावयाचा असे. चंद्राच्या क्षयवृद्धीवरून हें अनुमान करितां येणें शक्य आहे; परंतु या कामींहि नित्य निरीक्षण आवश्यक आहे. नित्य न पाहातां मध्येंच एकाद्या रात्रीं चंद्राकडे पाहून निश्चित सांगतां येणार नाहीं; परंतु नक्षत्रांचें ज्ञान असल्यानें मास, पक्ष व तिथि हीं सर्व कळतील. यामुळें नक्षत्रांकडे प्राचीन कालीं लक्ष फार ठेवावें लागत असे.

## रामायणांतील दिननक्षत्रांविषयींचा प्रघात.

ज्योतिर्विषयक ज्ञानाचा हा काल्पनिक इतिहास आहे व यांतील क्रम प्रायः कै० दीक्षित यांच्या इतिहासावरून सांगितला आहे. आतां यांतील कोणत्या पर्यायांत रामायणकाल येतो, तें पाहूं. रामायणांत मास, ऋतु, नक्षत्रें यांचे उल्लेख आहेत व त्यांवरून त्यांचें ज्ञान त्या कालीं असल्याचें दिसून आलें तरी मास आणि तिथि यांचेपेक्षां कोणत्याहि गोष्टीचा काल सांगतांना दिन-नक्षत्र सांगण्याची पद्धति विशेष दिसून येते. चैत्र मासाचा उल्लेख रामायणांत रामजन्म सांगतांना ( १।१८।८ ) व पुढें रामाला यौवराज्याभिषेक करण्याचा राजानें उपक्रम केल्याचें सांगतांना ( २।३।४ ) असा दोन वेळां आला आहे. किष्किंधेंत रामाचा वर्षाकालीं मुक्काम असतांना त्या निमित्तानें श्रावण ( ४।२६।१४ ), आश्विन ( 'आश्वयुजे मासि' ४ । ५३ । ९ ) व कार्तिक ( ४।२६।१७ ) यांचे उल्लेख आले आहेत. तिथींचे उल्लेख रामजन्मकाल ( १।१८।८ ), वनांतून प्रत्यागमन ( शु. ५; ६।१२४।१ ) व शेवटीं रावण-युद्धार्थ बाहेर पडण्याचा प्रसंग ( ६।९२।६४; वद्य १४ व ३० ) सांगतांना आले आहेत. मात्र यांतील पुढील दोनहि प्रसंगीं मासाचें नांव मुळींच सांगि-

तलेलें नाहीं. पण याखेरीज इतर सर्व प्रसंगीं नक्षत्रांचे उल्लेख आहेत. जनक रामाचे विवाहाविषयीं राजा दशरथाला विनंति करितांना म्हणतो:—

**मघा ह्यद्य महाबाहो तृतीयदिवसे प्रभो ।**

**फाल्गुन्यामुत्तरे राजंस्तस्मिन् वैवाहिकं कुरु ॥ १।७२।२४ ॥**

रामाचे यौवराज्याभिषेकाविषयीं निरूपण करितांना:—

**श्व एव पुष्यो भविता श्वोऽभिषेच्यस्तु मे सुतः ॥ २।४।२ ॥**

याप्रमाणें राजानें निश्चय केल्याचें सांगितलें आहे. पुष्य नक्षत्राचा उल्लेख या निमित्तानें व दिननक्षत्र म्हणून आणखीहि आला आहे. (२।३।४१; २।२६।९.) वनांतून परत आल्या वेळीं भरताकडे मारुती पुढें गेला. त्याचे भाषणांत दुसरे दिवशीं पुष्य नक्षत्रावर भेट होईल असें म्हटलें आहे. (६।१२६।५४) किष्किंधेहून पुढें लंकेकडे निघते वेळीं रामाचे तोंडीं प्रयाणाचा काल—

**उत्तराफल्गुनी ह्यद्य श्वस्तु हस्तेन योक्ष्यते ॥ ६।४।६ ॥**

याप्रमाणें आला आहे. वास्तविक या दिननक्षत्रांवरून ऋतु अथवा मासांचा बोध मुळींच होत नाहीं; परंतु त्या वेळीं तिथीपेक्षां नक्षत्रांनीं काल सांगण्याचा प्रघात विशेष होता असें दिसतें व हें कळण्यासाठींच वरील अवतरणें दिलीं आहेत.

## रामायण वेदांगज्योतिषापूर्वी

महाभारतांतहि पुष्कळ कालनिर्देश नक्षत्रांनीं केले आहेत. या दृष्टीनें हे दोनहि ग्रंथ एका पर्यायांत येऊं शकतील; परंतु या एका मुद्यावर निर्णय करितां येणार नाहीं; इतर बाबींचेंहि निरीक्षण करणें अवश्य आहे. महाभारतांत पंच-संवत्सरात्मक युगपद्धतीचा उल्लेख कांहीं स्थलीं आला आहे. प्रतिवर्षी एकेक असे पांच वर्षी पांच पांडव पांच संवत्सरांप्रमाणें क्रमानें जन्मले असें त्यांत वर्णन केलें आहे. पंच संवत्सरात्मक युगपद्धतीचें वर्णन वेदांगज्योतिषांत आहे. वेदांगज्योतिषकारांनीं वास्तविक ही पंचसंवत्सरात्मक युगपद्धति प्रचलित केली असें नव्हे, तर त्या वेळीं प्रचारांत असलेली पद्धति त्यांनीं ग्रथित केली. वेदांग-ज्योतिषांत नक्षत्रगणना धनिष्ठादि आहे व यास्तव त्या वेळीं धनिष्ठारंभीं उदगयन होत असल्याचें सूचित होतें. हा काल सुमारें शकपूर्व १५००

येतो. धनिष्ठारंभीं उदगयन होण्याचा काल याप्रमाणें कळला तरी वरील युगपद्धतीचा प्रारंभ तेव्हां झाला असें नव्हे; ती त्याचे पूर्वींहि प्रचारांत असणें संभवनीय आहे. तथापि स्थूलमानानें या पद्धतीचा प्रारंभकाल हाच धरिला तरी त्यावरून रामायणकाल त्याचे पूर्वीं लोटणें भाग आहे. कारण रामायणांत या युगपद्धतीचा मुळींच उल्लेख नाहीं. रामायण महाभारताचे पूर्वींचें असल्या-मुळें या पद्धतीचा प्रसार थांबल्यावर त्याची रचना झाली असें म्हणतां येणार नाहीं, हें तर स्पष्ट आहे; तेव्हां या पद्धतीच्या प्रवृत्तीचे पूर्वीं रामायणकाल मानिल्यावांचून गति नाहीं.

## रामायणांतील वर्षारंभ उदगयनारंभीं पौषांत.

वेदांगज्योतिषांत वर्षारंभ माघमासीं उदगयनारंभीं सांगितलेला आहे; पुढील ग्रंथांतून वसंत हा पहिला ऋतु व चैत्र हा प्रथम मास मानिलेला आहे. वैदिक ग्रंथांतून मधु हा वसंतसूचक मास पहिला सांगितलेला आहे. माघमासीं वर्षारंभ वेदांगज्योतिषांत मात्र आढळून येतो. आणि यावरून वैदिक कालानंतर या दोनहि पद्धति प्रचारांत आल्या असें कै. दीक्षित यांचें अनुमान आहे.* रामायणांत वर्षारंभ कधीं मानीत असत हें स्पष्ट सांगितलेलें नाहीं; पण तो पौषमासीं होत असे असें अनुमान आहे. पंचवटींत वास करीत असतां एकदां राम, लक्ष्मण व सीता तिघेंहि प्रातःकालीं गोदावरीवर स्नानाकरितां गेलीं; या वेळीं मार्गानें जात असतां लक्ष्मण सृष्टिवर्णन करीत म्हणतोः—

**अयं स कालः संप्राप्तः प्रियो यस्ते प्रियंवद ।**
**अलंकृत इवाभाति येन संवत्सरः शुभः ॥ ३।१६।४६**

“ हे प्रिय भाषण करणाऱ्या रामा, तुझा जो आवडता काल तो **संप्राप्त झाला आहे** व त्याच्या योगानें **हा संवत्सर** भूषित झाल्यासारखा दिसत आहे.

येथें संवत्सर शब्द मोठा महत्त्वाचा असून त्याचेयोगानें संवत्सराला नुक्ताच प्रारंभ झाला असावा, असें दिसत आहे. सर्गाचा उपक्रम करितांना शरदृतु संपून हेमंत लागल्याचें सांगितलें आहे. पौषमासाचें अनुमान पुढील श्लोकावरून करितां येतें. लक्ष्मण म्हणतोः—

* भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास, पृ. १३२

**निवृत्ताकाशशयनाः पुष्यनीता हिमारुणाः।**
**शीतवृद्धतरायामास्त्रियामा यान्ति सांप्रतम् ॥ ३।१६।१२ ॥**

"( सांप्रत ) कोणीहि उघड्यावर शयन करीत नाहींत; ( सर्व प्रदेश ) बर्फामुळें पांढुरका होऊन गेला आहे; रात्री पुष्य नक्षत्रावर चालत असून त्या अतिशय मोठ्या झाल्या आहेत व थंडी तर फार पडली आहे."

रात्री पुष्य नक्षत्रावर चालावयाच्या म्हणजे पुष्य नक्षत्र सूर्यास्ताबरोबर उगवावयाचें व सूर्योदयाबरोबर अस्तास जावयाचें; हा योग पौष शुद्ध १५ ला यावयाचा हें उघड आहे. आतां पुढील श्लोक पहा:—

**ज्योत्स्ना तुषारमलिना पौर्णमास्यां न राजते।**
**सीतेव चातपश्यामा लक्ष्यते न च शोभते ॥ ३।१६।१४ ॥**

"सीता उन्हानें काळवंडून गेल्यामुळें, ज्याप्रमाणें आहे असें मात्र कळतें, त्याचप्रमाणें पौर्णिमेची चंद्रिका तुषारांचे योगानें मलिन होऊन गेल्यामुळें तिचें अस्तित्व कळण्यापुरतीच ती दिसत आहे. तिला कांहीं शोभा नाहीं."

येथें पौर्णिमा असा स्पष्ट शब्द आहे. मात्र तेथें आज पौर्णिमा असल्याचें म्हटलें नाहीं, हें खरें; तथापि त्या दिवशीं पौर्णिमा नसेल, तर त्या पौर्णिमेचा निर्देश करून वर्णन करण्याचें कारण काय? दुसरें असें कीं, गोदावरीवर स्नानाकरितां जातेवेळीं पडलेल्या चंद्रिकेचें हें वर्णन आहे. पौर्णिमेचे पूर्वीची रात्र घेतल्यास चंद्राचा अस्त सूर्योदयाचे पूर्वी व्हावयाचा व पुढें तर "धुकें व दंव पडल्यामुळें सूर्य दूरवर उगवला असूनहि चंद्रासारखा भासत असल्याचें" ( ३।१५।१८ ) सांगितलें आहे. पौर्णिमेचे पूर्वी सूर्योदयाचे वेळीं चंद्र असणें शक्य नाहीं. अर्थात् हें सर्व वर्णन पौष शुद्ध १५च्या दिवशीं रात्र उलटल्यावर सूर्योदयाचे सुमाराचें आहे. वर्णनाचा उपक्रम करितांना लक्ष्मणानें हेमंताचे योगानें संवत्सर भूषित झाल्यासारखा दिसत असल्याचें सांगितलें आहे. संवत्सराला प्रारंभ नुकताच झाला असेल तरच त्याचें स्मरण या वेळीं लक्ष्मणाला झालें, असें म्हटलें असतां शोभण्यासारखें आहे. संवत्सराचा प्रारंभ, मास व संवत्सर यांची संगति राखावयाची असल्यामुळें, कोणत्या तरी मधील तिथीवर होणें संभवत नाहीं. तेव्हां मास अमान्त असतील तर पौष शुद्ध १

ला व पूर्णिमान्त असतील तर मार्गशीर्ष शुद्ध १५ चे दुसऱ्या दिवशीं प्राप्त होणाऱ्या पौष वद्य १ ला संवत्सरारंभ त्या वेळीं होत असला पाहिजे, यांत शंका नाहीं. पक्ष कोणता, हें काय तें येथें संशयित आहे; मास पौष होता, हें निर्विवाद आहे.

वेदांगज्योतिषपद्धतीनें वर्षारंभ माघमासीं व उदगयनाचे दिवशीं होत असल्याचें सांगितलें आहे. रामायणांतील वर्षारंभ वरील विवेचनावरून पाहतां माघमासीं संभवतच नाहीं. उदगयनारंभाबरोबर वर्षारंभ व्हावयाचा, हें या पद्धतींत विशेष आहे. रामायणांतून घेतलेल्या वरील अवतरणांत रात्री अतिशय मोठ्या झाल्याचें वर्णन आहे, तें दक्षिणायनाचे शेवटीं संभवतें. लक्ष्मणानें आपल्या भाषणांत ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली आहे. पुढील श्लोक पहा:—

सेवमाने दृढं सूर्ये दिशमन्तकसेविताम् ।
विहीनतिलकेव स्त्री नोत्तरा दिक् प्रकाशते ॥ ३।१६।८ ॥

" सूर्य दक्षिणदिशेचें अतिशय सेवन करूं लागल्यामुळें तिलकहीन स्त्रीप्रमाणें उत्तरदिशा शोभेनाशी झाली आहे. "

अर्थात् रामायणांतील वर्षारंभाचा उदगयनारंभाशीं संबंध दिसत नाहीं.

आतां पौषमासीं वर्षारंभ कधीं होत असे किंवा काय, हें पाहूं. मृगशीर्ष नक्षत्राला अग्रहायण असें नांव आहे. मृगशीर्ष नक्षत्रानें युक्त असलेली पौर्णिमा ज्या मासीं असते, तो मार्गशीर्ष मास होय. अग्रहायण या नांवावरून त्याला आग्रहायणिक असेंहि नांव आहे. 'अग्रहायण' याचा अर्थ ज्याचे पुढें वर्ष लागतें—वर्षाला प्रारंभ होतो—तें नक्षत्र. मार्गशीर्ष शुद्ध १५ ला वरील नक्षत्रावरून आग्रहायणी असें म्हणतात. म्हणजे जिचे दुसरे दिवशीं वर्षारंभ व्हावयाचा ती आग्रहायणी ज्या मासीं आहे, तो आग्रहायणिक मास. नांवाच्या या व्युत्पत्तीवरून मार्गशीर्ष शुद्ध १५ चे दुसरे दिवशीं वर्षारंभ कधींतरी होत असे, हें निर्विवाद सिद्ध होतें. अमान्त मास घेतल्यास मार्गशीर्ष शु. १५ चे दुसऱ्या दिवशीं तोच मास राहणार व पौर्णिमान्त मास घेतल्यास दुसऱ्या मासाचा प्रारंभ त्या दिवशीं होणार, इतकें दोहोंमध्यें अंतर आहे. पण मार्गशीर्ष शुद्ध १५ चे दुसऱ्या दिवशीं वर्षारंभ होत असे, हा मुद्दा दोहोंमध्यें एक आहे.

## महाभारतांतील वर्षारंभ मार्गशीर्षांत.

महाभारतामध्यें मासांचीं नांवें सांगतांना मार्गशीर्ष प्रथम सांगितला* आहे; अर्थात् वर्षारंभ मार्गशीर्ष मासीं होत असल्याचें त्यावरून सूचित होतें. भगवद्गीतेमध्यें श्रीकृष्णांनीं विभूतींचें निरूपण करितांना मासांमध्यें मार्गशीर्षमास हीं परमेश्वरी विभूति सांगितली आहे; यावरूनहि तो वर्षारंभाचा मास असल्याचें दिसून येतें. मात्र त्याबरोबर वसंत ही ऋतूंतील विभूति सांगितली आहे; व यावरून मार्गशीर्ष मास व वसंतऋतु यांचा सहयोग विवक्षित असावा, असें वाटतें; परंतु इतर प्रमाणांनीं हा संशय निरसन करितां येतो. कारण महाभारतामध्यें ऋतूंचे उल्लेख करितांना शिशिरादि व वसंतादि असे दोन प्रकारचे उल्लेख केले आहेत. म्हणजे शिशिरादि गणना ही आपणांला परिचित असलेल्या "चैत्र-वैशाख वसंतऋतु" या परिभाषेला जवळजवळ धरून आहे, असें दिसतें; निदान मार्गशीर्ष मासीं वसंतऋतु असेल असा जो संदेह उत्पन्न झाला होता तो तरी त्यानें निरस्त होतो. अर्थात् ऋतूंची गणना करितांना "ऋतूंमधें हा पहिला वसंत" अशी जी परिभाषा एकदां पडली, ती दृढमूल झाली आहे. वर्षारंभाचे मास बदलल्यास वरील परिभाषेला अनुसरून जरी ऋतु सांगितले तरी तो फेरफार सोयीसाठीं केला, असें समजावयाचें आहे. वसंताचा अग्रपूजेचा मान त्यानें लुप्त व्हावयाचा नाहीं. महाभारतांतील इतर वचनें पाहिलीं म्हणजे हें लक्षांत येतें व भगवद्गीतेंतील वरील वचनाची संगति लागते. अमरकोशांतहि मार्गशीर्षादि मास व हेमन्तादि ऋतु सांगितलेले आहेत. म्हणजे त्यानें पूर्वींची परिभाषा न बदलतां क्रम मात्र बदलला आहे. अमरकोशाचे या मासगणनेवरूनहि त्या वेळीं मार्गशीर्षमासीं वर्षारंभ होत असे, असें दिसतें. गिजनीचे महंमदाबरोबर आलेला प्रवासी अल्बेरुणी यानें तो येथें आल्यावेळीं सिंधप्रांतांत मार्गशीर्षीं वर्षारंभ होत असल्याचें लिहिलें असून तें याला पोषक आहे.

## मार्गशीर्षांतील वर्षारंभाचा काल

कृत्तिकादि गणना सुमारें श. पू. ३००० या कालीं प्रचारांत आली व नंतर

* अनुशासनपर्व, अध्याय १६३.

मार्गशीर्ष मासीं वर्षारंभ होऊं लागला, असा क्रम कै. दीक्षित यांनीं* आपल्या ग्रंथांत सांगितला आहे. शतपथ ब्राह्मणांतील " कृत्तिका पूर्व दिशेपासून चळत नाहींत " ( एता ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते ॥ २।१।२ ) अशा अर्थाचे एका वाक्यावरून त्या वेळीं त्या विषुववृत्तावर असावयाच्या व त्या तेथें असण्याचा काल श. पू. ३०६८ वें वर्ष येतो, अशी त्यांनीं आपल्या अनुमानाची उपपत्ति दिली* आहे. परंतु कृत्तिका विषुववृत्तावर असल्यामुळें कृत्तिकादि गणना प्रचलित झाली असें म्हणण्यापेक्षां कृत्तिकांत त्या वेळीं संपात असल्यामुळें ती प्रचारांत आली हें अधिक संभवनीय दिसतें. कारण वेदांगज्योतिषांतील श्रविष्ठादि गणनेवरून श्रविष्ठांत संपात त्या वेळीं असावा असें ज्याप्रमाणें आपण मानितों त्याप्रमाणें कृत्तिकादि गणनेच्या बाबींत कां मानितां नये ? कृत्तिकांत संपात असण्याचा काल कै. दीक्षित यांनीं इ. स. पू. २३२० दिला आहे. चिनी लोकांत कृत्तिकादि गणना होती व त्यावरून त्या वेळीं कृत्तिकांत संपात असावा असें गृहीत धरून तो काल इ. पू. २३५७ असावा असें बायोनामक ज्योतिष्यानें ठरविलें आहे व कै. दीक्षित यांनीं ही माहिती आपल्या ग्रंथांत प्रस्तुत प्रसंगीं नमूद केली आहे. कृत्तिकांत संपात असण्याचा हा काल निर्विवाद आहे व कृत्तिकादि गणनेचा काल घ्यावयाचा तर तो हाच घेणें अधिक सयुक्तिक दिसतें. कृत्तिकादि गणनेचा मुद्दा आमचेकडील व चिनी लोकांतील पद्धतींमध्यें एक आहे; आणि दीक्षित यांनींहि प्रस्तुत प्रसंगीं मात्र विषुववृत्तावर कृत्तिका असण्याचा काल कां घ्यावा याचें कोणतेंहि कारण दिलेलें नाहीं; तेव्हां त्यांचीं इतर अनुमानें व क्रम आम्हीं येथें सर्वमान्य म्हणून घेतले असले तरी कृत्तिकादि गणनेचा काल घेतांना विवेक करणें भाग आहे. म्हणजे त्याकरितां आम्हीं स्वतंत्र मत प्रतिपादन करीत आहों असें नव्हे; तर कृत्तिकांत संपात असण्याचा जो काल त्यांनीं दिला आहे तोच त्यांनीं व इतर पंडितांनीं स्वीकारलेल्या पद्धतीला अनुसरून कृत्तिकादि गणनेचा काल धरून चालणार आहों. हा काल त्यांनीं इ. पू. २३२० दिला आहे म्हणजे श. पू. २३९८ अथवा स्थूल मानानें श. पू. २४०० हा काल होय. कृत्तिकादि गणने-

---

* भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास, पृ. १३३; * कित्ता, पृ. १२८.

नंतर मार्गशीर्षांत वर्षारंभ होऊं लागला असें कै. दीक्षित यांनीं सांगितलें आहे. अर्थात् मार्गशीर्षांत वर्षारंभ होण्याचा काल श. पू. २४०० होय.

## शतपथ ब्राह्मणाचा प्रश्न स्वतंत्र.

येथें आमच्या वाचकांस एक सावधानतेची सूचना देणें अवश्य आहे. मार्गशीर्षांत वर्षारंभ कधीं होत असे, हें आम्हांला शोधावयाचें आहे व कृत्तिकादि गणना चालू झाल्यानंतरचा तो काल इतकें आम्हांला कळलें आहे. कृत्तिकांत संपात असतां कृत्तिकादि गणना चालू व्हावयाची व यासाठीं कृत्तिकांत संपात केव्हां यावयाचा हें आपण पाहूं लागलों. हा काल गणित करून स्वतंत्रपणें काढितां येतो. कै० दीक्षित यांनीं असा स्वतंत्र प्रयत्न करून काढिलेला कालच आम्हीं वर अनुमानिलेला आहे. वास्तविक शतपथ ब्राह्मणाशीं याचा संबंध नाहीं. कै० दीक्षित यांनीं संबंध जोडिला, म्हणून वरील चर्चा करितांना आम्हांला याचा उल्लेख करावा लागला. शतपथ ब्राह्मणांतील वाक्यांत कृत्तिका थेट पूर्वेस उगवत असल्याचा उल्लेख आहे व त्यावरून त्या विषुववृत्तावर त्या वेळीं होत्या, असें अनुमान करून कै० दीक्षित यांनीं तो काल गणित करून काढिलेला वर दिला आहे. अर्थात् कृत्तिकादि गणनेचा काल भिन्न झाल्यानें शतपथ ब्राह्मणाच्या वरील वाक्यावरून निष्पन्न होणारा काल बदलण्याचें कारण नाहीं. शतपथ ब्राह्मणाचा काल ठरविण्याचा प्रस्तुत मुद्दा नाहीं व यासाठीं त्याची चर्चा आम्ही करीत नाहीं. शतपथ ब्राह्मणांतील वरील उल्लेखावरून इ० स० पू० ३००० यापूर्वीं त्याचा काल जावयाचा नाहीं, हें मात्र निश्चित होय. कृत्तिकादि गणनेचा जो काल वर दिला आहे, त्याला अनुकूल वा प्रतिकूल इतर प्रमाणें त्यांत जीं मिळतील, त्यांवर हा निर्णय अवलंबून आहे. अर्थात् कृत्तिकादि गणनेचा काल हा शतपथ ब्राह्मणाचाहि काल आहेच असें नाहीं, इतकें आमचे वाचकांस येथें सुचवावयाचें आहे.

## पौषांतील वर्षारंभाचा काळ.

कृत्तिकादिगणना चालू झाल्यानंतर मार्गशीर्ष हा पहिला मास कित्येक प्रांतांतून मानूं लागल्याचें सांगितल्यावर कै० दीक्षित लिहितात :—

" कृत्तिकायुक्त पूर्णिमेच्या दुसऱ्या दिवशीं वर्षारंभ होई, त्याप्रमाणें त्यापूर्वीं

मृगशीर्षयुक्त पूर्णिमेच्या दुसऱ्या दिवशीं वर्षारंभ होत असावा, हें सहज दिसतें. यास सकृद्दर्शनीं एक अडचण दिसते. त्या दिवशीं जो मास सुरू होईल त्याला सांप्रतच्या पद्धतीनें पौष हें नांव येतें आणि पौषांत वर्षारंभ असा दाखला तर कोठेंहि नाहीं; परंतु हें ठीकच आहे. कृत्तिकापूर्वी मृगशीर्ष हें पहिलें नक्षत्र असण्याचें कारण त्यांत वसंतसंपात असणें यावांचून दुसरें कांहीं दिसत नाहीं, आणि मार्गशीर्षांत वसंतसंपात शकापूर्वी सुमारें ४००० वर्षें या कालीं होता. तेव्हां नक्षत्रयुक्त माससंज्ञा प्रचारांत आल्या नव्हत्या. यामुळें नक्षत्रास मात्र आग्रहायण अथवा आग्रहायणी अशी संज्ञा प्राप्त झाली आणि पौषांत वर्षारंभाचा दाखला नाहीं, हें ठीकच आहे." (भा. ज्यो. इ. पृ. १३३)

कृत्तिकादि गणना व मार्गशीर्षांत वर्षारंभ यांचा काल श.पू.२४०० असल्याचें पूर्वी सांगितलें आहे व त्यापूर्वी मार्गशीर्षांत वसंतसंपात श.पू. ४००० यापूर्वी झाला, तेव्हां मृगशीर्षादि गणना व पौषांत वर्षारंभ होऊं लागला असला पाहिजे, असा कै० दीक्षित यांचा तर्क आहे व तो पूर्वापर इतिहासाला धरून आहे. पौषांत वर्षारंभ होत असल्याचें प्रमाण प्राचीन ग्रंथांत कै० दीक्षित यांना मिळालें नव्हतें; परंतु त्यांना वाटलेली न्यूनता रामायणांतील वरील निर्देशानें भरून निघाली आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. अर्थात् रामायणकाल श.पू. ४००० नंतर व श.पू. २४०० पूर्वी केव्हां तरी असला पाहिजे, हें निर्विवाद आहे.

## चैत्रादि संज्ञांचा काल.

शकपूर्व ४००० नंतर रामायणाचा काल असला पाहिजे हें आम्हीं प्रारंभीं कालाची स्थूल मर्यादा पाहतांना ठरविलेलें आहे व त्याहून यांत नवीन असें कांहीं नाहीं. श. पू. २४०० पूर्वी ही मर्यादा मात्र आपणांस नवीन कळली आहे. श. पू. ४००० नंतर हा काल स्थूलत: कळला आहे. तेव्हां या कालानंतर तो काल किती अलिकडे येईल हें आतां पाहूं. मृगशीर्षांत वसंतसंपात असण्याचा काल श. पू. ४००० येतो; परंतु या वेळीं नक्षत्रांनिमित्त मासांना प्राप्त झालेल्या संज्ञांची उत्पत्ति झाली नव्हती, हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. मार्गशीर्ष शुद्ध १५ ला मिळालेलें "आग्रहायणी" हें नांव या कालांतील होय. रामाय-

णांत पाहूं गेलें तर मासांचीं नक्षत्रांवरून पडलेलीं नांवें आढळून येतात; तेव्हां श. पू. ४००० नंतर रामायणकाल समजला तरी तो त्या कालाजवळचा काल असावा असें म्हणतां येणार नाहीं. मासांना नक्षत्रांवरून नांवें प्राप्त होऊन तीं पूर्णपणें प्रचारांत येण्याइतका काल मध्यंतरीं गेला पाहिजे. कार्याचे दृष्टीनें पाहिलें तर हा काल दीर्घ असणें साहजिक आहे. तेव्हां चैत्रादि संज्ञांची उत्पत्ति केव्हां झाली असावी हें आतां पाहूं. "चैत्रवैशाख वसंतऋतु" ही परिभाषा सर्वत्र सारखी आहे व ऋतुमान बदलून पाठीं येत चाललें तरी ती कांहीं बदलत नाहीं. वसंत ऋतूंतील मासांना वैदिक ग्रंथांतून मधु-माधव हीं नांवें आढळून येतात. हीं नांवें ऋतुदर्शक असल्याचें नांवांवरून कळतें. वास्तविक मधु व चैत्र यांचा कांहीं संबंध नाहीं; पण ज्यापक्षीं चैत्राला मधु हा प्रतिशब्द म्हणून रूढ झाला आहे, त्यापक्षीं चैत्रादि संज्ञांची प्रवृत्ति झाली त्या वेळीं चैत्रांत वसंत होता व त्यामुळें वरील परिभाषा व चैत्राला मधु हा प्रतिशब्द हीं दोनहि प्रवृत्त झालीं, हें निर्विवाद आहे. पौर्णिमेला चित्रा नक्षत्रीं चंद्र असेल तेव्हां त्या पौर्णिमेला त्यानिमित्त चैत्री व पुढें त्यानिमित्त त्या मासाला चैत्र हें नांव प्राप्त होतें. सूर्य अश्विनींत असतां हा योग येतो. वसंतसंपातीं सूर्य येण्याचे पूर्वीं सुमारें एक महिना वसंताचा आरंभ होतो; पण हा आरंभ सर्वत्र याच वेळीं होतो असें नाहीं. कोठें कोठें तो आधीं दीड महिना होतो. याहून पूर्वीं कोठें होत नाहीं. गणितानें हा काल काढून तो कै. दीक्षित यांनीं इ. पू. २९०० असा दिला आहे. कै. दीक्षित यांनीं येथें इतर साधकबाधक बाबींचें विवेचन केलें आहे व त्यावरून या कालाची स्थूल मर्यादा श. पू. ४००० ते श.पू. २००० इतकी दिसून येते; पण रामायणकाल ठरवितांना आपण श. पू. ४००० ते श. पू. २४०० यामधील कालापर्यंत आलों आहों. तेव्हां त्यापेक्षांहि दीर्घ अंतराचें हें स्थूलमान घेऊन आपणांस चालावयाचें नाहीं. वसंतसंपातीं सूर्य येण्याचे पूर्वीं वसंतारंभ कोणत्याहि प्रांतांत दीड महिन्याचे पूर्वीं होत नाहीं, असें कै. दीक्षित यांनीं सांगितलें असून त्यावरून गणितानें येणारा काल त्यांनीं दिलेला वर सांगितला आहे. तेव्हां स्थूलमान ठरवावयाचें असलें तरी श. पू. ३००० चे पाठीं गेलें पाहिजे असें वाटत नाहीं. येथील विवेचनांत कै. दीक्षित लिहितात "तैत्ति-

रीय संहितेंत चैत्रादिक संज्ञा नाहींत; आणि त्या संहितेच्या कांहीं भागाचा काल शकापूर्वी सुमारें ३००० वर्षे हा आहे असें मागें दाखविलेंच आहे. तैत्तिरीय संहितेंतील यज्ञक्रिया आणि ऋतुमासादिक कालावयव यांचा ज्यानें विचार केला आहे, त्यास असें दिसून येईल कीं, त्या संहितेच्या कालीं चैत्रादिक संज्ञा असत्या तर त्या तींत आल्यावांचून राहिल्या नसत्या. यावरून शकपूर्व ३००० च्या पूर्वी चैत्रादिक संज्ञा नव्हत्या असें म्हणण्यास हरकत नाहीं.*" म्हणजे गणितानें येणाऱ्या कालाला हें प्रमाण पोषकच आहे. तैत्तिरीय संहितेहून अर्वाचीन असलेल्या सुमारें चार ब्राह्मणग्रंथांत चैत्रादिक संज्ञा नाहींत व यावरून कै. दीक्षित यांनीं हा काल श. पू. २००० असा सांगितला आहे व तो शेवटचा निर्णय म्हणून त्यांनीं दिलेला आहे; तथापि कृत्तिकादि गणनेचा काल गणितानें श. पू. २४०० येत असल्यामुळें चैत्रादि संज्ञांचे प्रवृत्तीचा काल श. पू. २००० इतका अलिकडे येणें शक्य नाहीं; आणि कै. दीक्षित यांनीं ब्राह्मणग्रंथांचें जें प्रमाण दिलें आहे तें उल्लेखाच्या अभावाचें आहे. कृत्तिकादि गणना व त्यावरून मार्गशीर्षांत वर्षारंभ केव्हां होत असे हें कळल्यावर त्यांचा उल्लेख त्या ग्रंथांत नसला तरी त्याला महत्त्व देतां येत नाहीं. तेव्हां चैत्रादि संज्ञांचे प्रवृत्तीचा काल श. पू. ३००० ते श. पू. २४०० यामध्यें केव्हां तरी असावयाचा हें निर्विवाद आहे. चैत्रादि संज्ञा प्रवृत्त होऊन प्रचारांत येण्यास कांहीं तरी काल लागणार; तेव्हां श. पू. ३००० नंतर कांहीं काल गेल्यावर व श. पू. २४०० च्या पूर्वी केव्हां तरी रामायणाची रचना झाली असली पाहिजे.

## रामायणांतील वर्षारंभ–मार्गशीर्ष का पौष ?

रामायणांतील वर जें अवतरण घेतलें आहे, त्यावरून पौष शुद्ध १५ चा बोध होतो व वर्षारंभ नुकताच झाला असावा, असें दिसतें; पण वर्षारंभ कधीं झाला हें तेथें स्पष्ट सांगितलेलें नाहीं व याकरितां पौषांतच वर्षारंभ त्या वेळीं होत असे, असें कशावरून म्हणावें, अशी शंका येथें उपस्थित होण्याचा संभव आहे. कारण मार्गशीर्षमासीं वर्षारंभ होत असला तरी पौष शुद्ध १५ चे दिवशीं बोलतांना वर्षारंभ नुकताच झाला, असें म्हणणें संभवनीय नाहीं.

---

* भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास, पृ. १३२

वर्षारंभ बदलल्यास कृत्तिकादि गणना ज्या वेळीं प्रवृत्त झाली, त्या वेळीं हा काल येईल. अर्थात् रामायणकाल वर ठरविला आहे, त्याचे पुष्कळ अलीकडे येऊं लागेल. तेव्हां आतां याचा विचार करूं.

कृत्तिकादि गणना श.पू. २४०० चे सुमारें प्रवृत्त झाली व तदनुषंगानें येणाऱ्या मार्गशीर्षांतील वर्षारंभाचा उल्लेख महाभारतांत आहे. ऋतुगणनाहि प्रस्तुत प्रचलित पद्धतीला धरून आहे. वेदांगज्योतिषांत सांगितलेली पंचसंवत्सरात्मक युगपद्धति त्या वेळीं होती, असें एकंदरींत दिसतें. निदान त्या वेळीं तिला निश्चितता आली नसल्यास तिची प्रवृत्ति तरी झाली असावी. पांच वर्षांनीं दोन अधिक मास धरून चांद्रवर्ष व सौरवर्ष यांचा मेळ वेदांगज्योतिषांत घातलेला आहे व ही पद्धति महाभारतांत दिसून येते. वेदांगज्योतिषांतील ही पद्धति फार दिवस टिकली नाहीं व पुढें सुमारें ३० मासांनीं एक अधिक मास येऊं लागला. ही पद्धति अद्यापि प्रचलित आहे. या पद्धतीमुळें सौरवर्ष व चांद्रवर्ष यांचा जवळजवळ मेळ बसतो. वेदांगज्योतिषांत या पद्धतीचे नियम दिले आहेत. महाभारतांत ही पद्धति ध्वनित होत असली तरी तिजविषयीं नियम कोणते होते, हें कळत नाहीं. वनवासाच्या मुदतीसंबंधानें जो वाद महाभारतामध्यें दिसून येतो, त्यावरून निश्चित व सर्वमान्य वर्षपद्धति त्या वेळीं होती, असें म्हणतां येत नाहीं; व अशी नव्हती म्हणूनच मुदतीसंबंधाचा वाद उपस्थित झाला. जसजसे अनुभव येतात तसतशा सुधारणा होत जातात, हा नियम सर्वसाधारण आहे. सध्यां सर्वत्र साधनांची सुलभता असतां पंचांगांसंबंधानें किती वाद आहेत ? मग त्या वेळीं असे वाद उपस्थित झाले तर नवल काय ? अधिक मासाचा उल्लेख वेदांत आहे; पण तो कधीं यावयाचा, याविषयीं नियम तेथें सांगितलेला नाहीं व तो अनुमानावयासारखें साधन नाहीं. अर्थात् महाभारताचे वेळीं पांच वर्षांनीं दोन अधिक मास धरण्याची जी पद्धति होती, ती म्हणजे अनुभव घेऊन पाहण्याकरितां केलेला एक प्रयोग होता. कांहींतरी नवीन योजना करून प्रयोग पहावयाचा म्हणजे मागें घेतलेल्या अनुभवांवरून प्राप्त झालेल्या ज्ञानाला अनुसरून पुनः करावयाचा प्रयत्न होय. अर्थात् त्यापूर्वीं अधिक महिन्याचे योजनेसंबंधानें जी पद्धति असावी, तिच्या-

योगानें मेळ मिळत नसल्याचा अनुभव आला असावा. रामायणांत अधिक-मासाचा उल्लेख नाहीं; पण उल्लेखाचा अभाव हें कांहीं प्रमाण नव्हे व त्याचा उल्लेख असण्याचा प्रसंगहि रामायणांत नाहीं. तेव्हां रामायणांतील ऋतु व मास यांचा मेळ कसा काय मिळतो, हें पाहणें अवश्य आहे. अधिकमासाची योजना केली असली तरी ऋतु व मास यांचा मेळ निश्चित राहात नाहीं. सुमारें ४३०० वर्षांनीं ऋतुमान एकएक ऋतुकालानें पाठीं येत असतें, असा नियम आहे. हा फेरफार दीर्घ कालानें होणारा आहे, यामुळें त्याजकडे तादृश लक्ष जात नाहीं; पण अधिक मासाची योजना नसल्यामुळें मुसलमानी महिने व ऋतु यांचे बदल वरचेवर होतात व त्याचा अनुभव तर सर्वांना परिचित आहे. चैत्रादिसंज्ञांचा गणितानें येणारा काल इ. पू. २००० हा आहे. म्हणजे या वेळीं चैत्रमासीं वसंतऋतु होता व त्या वेळीं " चैत्र-वैशाख वसंतऋतु " ही परि-भाषा प्रवृत्त झाली. या परिभाषेप्रमाणें मार्गशीर्ष व पौष हे दोन मास हेमंताचे होतात. वेदांगज्योतिषांतील अधिकमासाचे योजनेप्रमाणें त्या वेळीं योजना असेल तर वरील नियमाप्रमाणें ऋतुमान पाठीं येत जावयाचें हें सरळ आहे. रामायणां-तील जें अवतरण वर दिलें आहे, त्यापूर्वीं त्या वर्णनाचे उपक्रमाचा श्लोक पुढीलप्रमाणें आहे :—

**वसतस्तस्य तु सुखं राघवस्य महात्मनः ।**
**शरद्व्यपाये हेमन्त ऋतुरिष्टः प्रवर्तत ॥ ३।१६।१ ॥**

" तो महात्मा राम तेथें सुखानें वास करीत असतां शरदृतु संपून प्रिय असा हेमंतऋतु प्राप्त झाला. "

यावरून शरदृतूची समाप्ति व हेमंताचा प्रारंभ नुकताच झाला असावा, असें दिसतें. ऋतूचें सारें आयुष्य दोन महिने, तेव्हां ऋतूला प्रारंभ होऊन एक महिना झाल्यास ऋतूचें अर्धें आयुष्य समाप्त होत असल्यामुळें ऋतु नुकताच लागला, असें कोणी म्हणणार नाहीं. एकंदर मुदतीचा एक तृतीयांश अथवा एक चतुर्थांश काल जाईपर्यंत असें म्हणण्याचा सामान्यतः परिपाठ आहे. तेव्हां स्थूल मानानें पौष शुद्ध १ नंतर हेमंतारंभ होऊन त्या वेळीं कांहीं दिवस गेले होते, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. म्हणजे आमचे प्रचलित भाषेप्रमाणें ऋतु

समाप्त होण्याचा समय आला असतां ऋत्वारंभ नुकताच झाला, असें तेथें विधान केलेलें आहे. अर्थात् ऋतु मागें यावयाचा बाजूला राहून पुढें आला असें होत आहे. सौरवर्षाला अनुसरून ऋतुचक्र फिरत असतें व मास चंद्रावर अवलंबून असतात. या दोन प्रकारच्या वर्षांत पडणारें अंतर अधिक मासानें भरून काढावयाचें असतें. अधिक मास मुळींच नसेल, तर पांच वर्षांनीं ऋतुकाल दोन दोन महिन्यांनीं पुढें जात जाईल. म्हणजे चालू वर्षीं चैत्रमासीं वसंतारंभ झाला, तर पांच वर्षांनीं ज्येष्ठमासीं वसंतारंभ होईल. रामायणांतील वरील प्रकार असाच झालेला आहे. अधिकमासाची कल्पना त्या वेळीं होती, यांत शंका नाहीं; पण त्या वेळीं त्या संबंधाचा नियम निश्चित झाला नव्हता, असें यावरून म्हणावें लागतें.

हेमन्तांत पौषमास ध्वनित होत असल्यामुळें व तो परिचित असल्यामुळें येथील ऋत्वारंभाचे निर्देशाकडे तादृश लक्ष जात नाहीं; पण त्याच पद्धतीला अनुसरून पुढें फेर पडल्यास तो याहून महत्त्वाचा असणार. हेमन्ताचें वरील वर्णन पंचवटींत रामवास करीत असल्यावेळचें आहे. यानंतर लवकरच रावणानें तेथून सीतेचा अपहार केला. पुढें रावणवधानंतर वनवासाची मुदत समाप्त होऊन राम अयोध्येंत चैत्रमासीं परत आले. ( ६।१२४।१ ) राज्याभिषेक यानंतर पुष्यनक्षत्रीं झाला. म्हणजे चैत्र शुद्ध ९ वा १० ही तिथि येते. राज्याभिषेकानंतर साग्र मास पूर्ण झाल्याचा उल्लेख भरताचे भाषणांत आला आहे. (७।४१।१९) म्हणजे हें भाषण वैशाख मासांतील होय. यानंतर रामानें अशोकवनिकेंत प्रवेश केल्याचें सांगून पुढें दोन श्लोकांत त्यांच्या विहाराचा काल दर्शविला आहे:—

**एवं रामो मुदा युक्तः सीतां सुरसुतोपमाम् ।**
**रमयामास वैदेहीमहन्यहनि देववत् ॥ ७।४२।२४ ॥**
**तथा तयोर्विहरतोः सीताराघवयोश्चिरम् ।**
**अत्यक्रामच्छुभः कालः शैशिरो भोगदः सदा ॥ २५ ॥**

"अशा रीतीनें आनंदयुक्त असलेला राम देवकन्येप्रमाणें ( सुंदर ) असलेल्या वैदेहीला देवाप्रमाणें प्रत्यहीं रमवूं लागला. याप्रमाणें सीता व राम दोघेंहि पुष्कळ वेळ विहार करीत असतां सर्वदा भोग देणारा शिशिरऋतूचा काल निघून गेला."

वैशाखांतील कांहीं दिवस गेल्यानंतरचें हें वर्णन असून यांत शिशिर ऋतु समाप्त होऊन गेल्याचें सांगितलें आहे. त्यावरून त्या वेळीं वसंतारंभ झाल्याचें सूचित होत आहे; म्हणजे पौष शुद्ध १५ ला हेमंत नुकताच लागल्याचें जें वर्णन वर दिलें आहे, त्यानंतर बरोबर एक वर्ष होऊन गेल्यावर पुढील वर्षांतील वैशाख मासानंतरचें हें वर्णन आहे. ऋतुमानांत अधिक मास नसला तरी एकदम मोठा फेर पडणार नाहीं. पौष शुद्ध १५ नंतर पुढील वर्षांतील वैशाख शुद्ध १५ पर्यंत सोळा मास अर्थात् आठ ऋतु जावयाचे; आणि पौष शुद्ध १५ ला हेमंत धरून तेथपासून पुढील वर्षाचे वसंतापर्यंत आठच ऋतु होतात. तेव्हां ऋतु व मास यांची येथें बरोबर संगति लागते.

यानंतर सीतेविषयीं लोकापवाद रामाचे कानीं येऊन त्यानें तिचा त्याग केला. रामाज्ञेप्रमाणें लक्ष्मण तिला अरण्यांत सोडून परत आला व नंतर राम व लक्ष्मण बोलत बसले, यापुढील निरूपण करितांना पुढील श्लोक आहे:—

**तयोः संवदतोरेवं रामलक्ष्मणयोस्तदा ।**
**वासन्तिकी निशा प्राप्ता न शीता न च घर्मदा ॥** ७।६३।१ ॥

" अशा रीतीनें ते रामलक्ष्मण बोलत बसले असतां वसंतऋतूंतील रात्र प्राप्त झाली; त्या वेळीं विशेष थंडी नव्हती किंवा विशेष उकाडाहि होत नव्हता. "

पूर्वींचे शिशिरसमाप्तीनंतर पुढील एका ऋतुकालांतच वरील सर्व प्रकार घडले असें दिसून येतें व पूर्वींच्या शिशिरानंतर वसंताचा येथील उल्लेखहि सुसंगत दिसतो.

महाभारतकालीं मार्गशीर्षादि गणना होती व पांच वर्षांनीं दोन अधिक मास धरीत असत, हें आपणांस माहित आहे. या वेळीं ऋतुमानांत फेर पडला तरी अत्यंत दीर्घकालानें पडणारा असल्यामुळें तो इतका दृष्टोत्पत्तीस येण्यासारखा नाहीं व याचा अनुभव आपणांस आहे. सांप्रतच्या पद्धतींत फेर पडला तरी ऋतुकाल मागें घेण्यांत पडतो व रामायणांतील ऋतुकाल पुढें गेला आहे, हें तर त्याहून विचित्र आहे. वेदांत अधिक मासाचे उल्लेख आहेत, त्यांवरून रामायणकालीं अधिक मासाची योजना केलेली असणार यांत शंका नाहीं. मात्र ऋतुक्रम पुढें गेला यावरून या योजनेंत कांहीं तरी दोष असावा असें मानणें भाग आहे.

रामाच्या वनवासाची मुदत चौदा वर्षांची होती. यांत आमचे प्रचलित पद्धतीप्रमाणें अधिक मास पांच यावयाचे व अधिकमास मुळींच नसेल तर ऋतु पांच महिन्यांनीं मागून व्हावयाचा; परंतु रामायणांतील अवतरणें देऊन वर जें विवेचन केलें आहे त्यावरून हा फेर जवळजवळ दोन महिन्यांचा दिसतो. अर्थात् त्या वेळीं अधिकमास धरीत असत, पण त्याची मर्यादा प्रचलित पद्धतीप्रमाणें नव्हती, हें निर्विवाद आहे. चौदा वर्षांनीं ऋतुकालांत सुमारें दोन महिन्यांचें अंतर ज्यापक्षीं पडलें आहे, त्यापक्षीं या मुदतींत निदान दोन अधिक मास गेले असले पाहिजेत. म्हणजे पांच किंवा सहा वर्षांनीं एक अधिक मास धरण्याची पद्धति त्या वेळीं होती असें म्हणावें लागतें. चौदा वर्षांच्या मुदतींत दोन महिन्यांनीं ऋतु पुढें गेल्याचें जें आम्हीं दाखविलें आहे त्यांत वनवासारंभीं चैत्रमासीं वसंतऋतु होता असें गृहीत धरिलें आहे; व त्यासाठीं प्रमाण देणें अवश्य आहे. वनवासाला निघाल्या वेळचें जें वर्णन रामायणांत आहे, त्यांत वसंत असा स्पष्ट उल्लेख नाहीं, हें खरें; परंतु रामाचे यौवराज्याभिषेकाचा निश्चय करण्यासाठीं दशरथानें जी परिषद भरविली होती तींत राजाला सर्वांचें अनुमोदन मिळाल्यावर त्यानें अभिषेकाची सिद्धता करण्याविषयीं जी आज्ञा केली तींत तो म्हणतो:—

**चैत्रः श्रीमानयं मासो रम्यः पुष्पितकाननः ॥ २।३।४ ॥**

" हा श्रीमान् व पवित्र असा चैत्र मास प्राप्त झाला असून अरण्यांतील सर्व वृक्ष अगदीं फुलून गेले आहेत. "

वनांतील फुललेल्या वृक्षांचें जें वर्णन आहे त्यावरून त्या वेळीं वसंत असल्याचें स्पष्ट दिसून येतें. असलीं वर्णनें अलंकारिक असलीं तरी वस्तुस्थितीचा त्यांत विपर्यास केलेला नसतो हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हेमंताच्या वर्णनांतील जें अवतरण वर दिलें आहे त्यापुढें ऋतूचें वर्णन करितांना:—

**प्रसुप्ता इव लक्ष्यन्ते विपुष्पा वनराजयः ॥ ३।१६।२३ ॥**

" पुष्परहित अरण्यें ( धुक्यानें आच्छादिलीं असल्यामुळें ) झोपीं गेल्यासारखीं दिसत आहेत. "

असें स्पष्ट म्हटलें आहे. येथील वर्णन अत्यंत मनोहर आहे; पण त्यांत

वस्तुस्थिति लपविलेली नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रामायणांतील वर्णनाचा हा विशेष कळला म्हणजे राम वनवासाला निघाले त्या वेळीं चैत्र मासीं वसंत ऋतु असल्याचें जें त्या प्रसंगींच्या वर दिलेल्या अवतरणावरून आम्हीं गृहीत धरिलें आहे, तें सयुक्तिक आहे असें आमच्या वाचकांनाहि पटल्यावांचून राहाणार नाहीं.

कांहीं ब्राह्मणांवरून पांच किंवा सहा वर्षांनीं अधिक मास धरण्याची पद्धति कांहीं काल असावी, असें ज्ञानकोशकारांचें अनुमान असून* तें आमच्या वरील अनुमानाला पोषक आहे. वेदांत अधिक मास सांगितला असला तरी संवत्सराचे मास १२ व दिवस ३६० सांगितले आहेत. दिवसांची ही गणन स्थूल मानानें घेतली आहे. तथापि चांद्रवर्ष किंवा सौरवर्ष यांचे निश्चित दिवस कोठें सांगितलेले नाहींत व यावरून या दोन वर्षांचा काल व त्यांचा मेळ घालण्याची योजना हीं दोनहि निश्चित झालीं होतीं, असें म्हणवत नाहीं. मात्र या दोन वर्षांत अंतर आहे व त्यांचा मेळ घेण्यासाठीं अधिक मासाची योजना आवश्यक आहे, इतकी जाणीव होती, यांत शंका नाहीं. अधिक मासाचा निर्देश हा त्याचा द्योतक होय. दोन वर्षांचा मेळ घेतां घेतां, कृत्तिकादि गणनेची प्रवृत्ति झाली, त्या वेळीं पांच वर्षांनीं दोन अधिक मास मानण्याची योजना पुढें आली व सध्यां सुमारें ३० महिन्यांनीं एक अधिक मास धरण्याची जी पद्धति आहे, ती त्या पद्धतीची सुधारलेली आवृत्ति होय. अधिक मासाविषयीं निश्चित नियम कृत्तिकादि गणनेपूर्वीं झाला नव्हता हें यावरून स्पष्ट दिसतें. अधिक मासाविषयींच्या या अनिश्चित स्थितीवरून रामायण-काल कृत्तिकादि गणनेपुढें आणितां येणार नाहीं व तो कृत्तिकादि गणनेपूर्वीं आणावयाचा म्हणजे पौषांत वर्षारंभ होत असे तो काल ओघानें प्राप्त होतो. रामायणांतील वर्षारंभ पौषांत होत असे, हें निश्चित झाल्यावर त्यावरून पूर्वीं ठरविलेल्या कालाविषयीं शंकित राहण्याचें कारण नाहीं.

## कालनिर्णयाचीं बाह्य प्रमाणें.

रामायणांतील कथा काल्पनिक नसून तो एक प्राचीन काळीं घडलेला इति-

* ज्ञानकोश, प्रस्तावनाखंड, विभाग ३ रा, पृष्ठ २०४.

ह्रासच आहे, असें दाखवितांना महाभारतांतील रामचरित्रविषयक उल्लेखाचें प्रमाण आम्हीं दिलें आहे व त्याबरोबर रामाचे वंशांतील एक पुरुष भारतीय युद्धाचे वेळीं कौरवांकडे होता, असें सांगितलें आहे. भागवतांत ही वंशावलि सांगितली असून* ती पुढीलप्रमाणें आहे:--

| | | | |
|---|---|---|---|
| १ राम | ९ अनीह | १७ पुष्य | २५ अमर्षण। |
| २ कुश | १० पारियात्र | १८ ध्रुवसंधि | २६ महस्वान्। |
| ३ अतिथि | ११ बल | १९ सुदर्शन | २७ विश्वसाव्ह । |
| ४ निषध | १२ स्थल | २० अग्निवर्ण | २८ प्रसेनजित्। |
| ५ नभ | १३ वज्रनाभ | २१ शीघ्र | २९ तक्षक। |
| ६ पुंडरीक | १४ खगण | २२ मरु | ३० बृहद्बल। |
| ७ क्षेमधन्वा | १५ विधृति | २३ प्रसुश्रुत | |
| ८ देवानीक | १६ हिरण्यनाभ | २४ संधि | |

रामाचे वंशांतील शेवटचा राजा बृहद्बल हा भारतीय युद्धांत अभिमन्यूचे हातून मरण पावल्याचें येथें सांगितलें आहे. म्हणजे रामापासून भारतीय युद्धापर्यंत मध्यंतरीं २९ पिढ्या झाल्या आहेत. एका पिढीला स्थूल मानानें २० वर्षें धरण्याची पद्धति आहे, तीप्रमाणें मध्यंतरीं ५८० वर्षें इतका काल गेला, असें यावरून स्पष्ट होतें. भारतीय युद्धाचा काल अद्यापि सर्वमान्य असा निश्चित झालेला नाहीं व त्यामुळें त्यापूर्वीं वरील काल धरावयाचा तरी त्याला निश्चितता येणार नाहीं. भारतीय युद्धाचा काल ठरविण्याचा प्रयत्न या प्रसंगानिमित्त करावयाचा म्हणजे रामायणांतून महाभारतांत उडी मारावयाची आहे आणि इतकें विषयांतर वाचकांस रुचणार नाहीं. भारतीय युद्धाविषयीं वादहि इतके झाले आहेत कीं, ते सर्व एकत्र केल्यास तेंहि एक लहानसें महाभारत

* स्कन्ध ९, अध्याय १२.

होईल. तथापि असुरांचें राज्य किंवा परिचित भाषेंत बोलावयाचें झाल्यास असीरियन साम्राज्य इ.पू. १९०० वर्षांच्या सुमारास नष्ट झालें, असें अलीकडे लागलेल्या शोधांवरून सिद्ध झालें आहे; व भारतीय युद्ध झालें त्या वेळीं असुरांचे राजे होते, हें कोणासहि मान्य होण्यासारखें आहे. तेव्हां भारतीय युद्ध वरील कालापूर्वीं कांहींतरी काल झालें असावें, असें आपलें मत कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलें आहे व त्यांत कांहीं आक्षेपांस वाव नसल्यामुळें निदान त्यापुढें तरी तो काल आणितां येणार नाहीं, हें निश्चित होय. वर वंशावलीवरून जो काल दिला आहे, तो या कालाचे पूर्वींचा धरावयाचा आहे; म्हणजे स्थूल मानानें इ.पू. २५०० च्या पूर्वीं रामायणकाल येतो व तो आमचे वरील अनुमानाशीं जुळता आहे. पिढयांवरून कालगणना केली तरी ती स्थूलमानानें करावयाची हें उघड आहे व आम्हींहि गौण म्हणूनच या मार्गाचा अवलंब केला आहे. तथापि पुराणांतील वंशावलि विश्वसनीय नसतात, असा एक त्यांवर आरोप आहे व त्यांत थोडें तथ्यहि आहे. हरिवंशाचा उपसंहार करितांना रा. रा. माधव हरि मोडक यांनीं एकाच पुरुषाच्या दोन ग्रंथांतील दोन वंशावलि देऊन त्यांत कसें अंतर पडलें आहे, तें दाखविलें आहे. रामायणांत वंशावलीचे प्रसंग पुराणांप्रमाणें नाहींत; तथापि एक-दोन आहेत, त्यांतहि असा घोंटाळा आहे. रामाचे विवाहाचे प्रसंगीं जनकानें स्वतांची वंशावलि सांगतांना मूळ पुरुष निमि म्हणून सांगून त्यापासून देवरात हा सहावा पुरुष सांगितला आहे ( १।७१।३–६ ) व त्यापूर्वीं धनुष्याचा इतिहास सांगतेवेळीं हाच देवरात याच जनकानें निमीचा पुत्र म्हणून सांगितलेला आहे. ( १।६६।८ ) बालकांड प्रक्षिप्त ठरवितांना रावसाहेब दिनेशचंद्र सेन यांनीं जीं कारणें सांगितलीं आहे, त्यांतीलच येथील विसंगतता हें एक कारण *आहे. रा. रा. मोडक किंवा रावसाहेब दिनेशचंद्र सेन यांनीं दाखविलेली विसंगतता व त्या निमित्तानें येणारी अविश्वसनीयता उघड दिसणारी आहे; तथापि याविषयीं दुसऱ्या बाजूनेंहि विचार करणें अवश्य आहे. प्राचीनकालीं अशा वंशावलि जपून ठेवीत असत व राजेलोकांच्या पदरीं असलेल्या

* Bengali Ramayanas, P. 95.

बंदिजनांना त्या त्या राजाची वंशावलि मुखोद्गत असे. पुराणांतून वंशावलि सांगतांना अशा माहितीचाच उपयोग केलेला आहे. ही माहिती पुराणांतून ग्रथित झाली त्या वेळीं या वर्गाकडून परंपरेनें मिळाली तशीच ती घेतलेली आहे परंतु या वंशावलींचा अनुवाद एकांतून दुसऱ्यांत होतांना प्रमाद झाले आहेत. हे प्रमाद पूर्वापर संबंध धरून निवडण्याचें काम आपलें आहे. कित्येक वेळां वंशावलि सांगतांना मुख्य पुरुष सांगितलेले असतात; पण त्याचा उपक्रम करितांना कोणी तसें स्पष्ट लिहितात, तर कोणी लिहीत नाहींत. जेथें तसें स्पष्ट लिहिलें असेल तेथें शंका येत नाहीं; पण तसें स्पष्ट लिहिलें नसलें तर, दुसऱ्या ग्रंथांत त्याच वंशांतील पुरुषांची सांगितलेली संख्या अधिक भरल्यास किंवा तेथेंच त्या वंशांतील पुरुषांचा काल सांगितला असून तो हिशेबाबाहेर दिसल्यास, शंका आल्यावांचून रहात नाहीं. अशा प्रसंगीं त्यांतल्यात्यांत जो प्राचीन ग्रंथ असेल तो अधिक विश्वसनीय धरला पाहिजे; वर्षांची संख्या निश्चितपणें सांगितली असल्यास पिढयांवरून हिशेब पटत नसला तरी कांहीं पुरुष गौण म्हणून म्हणा किंवा दुसऱ्या कारणांस्तव म्हणा, सांगावयाचे राहिले आहेत असें समजून चाललें पाहिजे. वास्तविक हें सर्व धोरणानें करावयाचें आहे, त्याविषयीं नियम सांगतां येणार नाहींत. ‘ फिर्याद आल्याबरोबर आरोपीस शिक्षा ’ असें करितां नये, हा मुद्दा आहे. रामायणांतील वर दाखविलेली विसंगतता खरी आहे; पण निमीचा देवरात हा पुत्र असें सांगतांना जनक वंशावलि सांगण्यास बसला नसून तो धनुष्याचा इतिहास सांगत आहे, हा भेद लक्षांत ठेवणें अवश्य आहे. निमि हा मूळ पुरुष म्हणून त्याचें नांव प्रथम सांगितलें व देवरात याला तें धनुष्य प्रथम मिळालें म्हणून त्याचें नांव पुढें घेतलें. धनुष्याच्या इतिहासाचे दृष्टीनें हीं दोन नांवें तेथें आवश्यक होतीं व तीं त्यानें सांगितलीं. पुढील वंशावरून अशा स्थलीं सांशक होण्यापेक्षां देवरात हा निमीचा एक वंशज असा अर्थ येथें विवक्षित आहे असें मानणें अधिक उचित नव्हे काय ? मात्र वंशावलि सांगतांना कोठें कोठें असे प्रकार झाले आहेत व याकरितां त्यांवरून शेवटचा निर्णय करितां नये; गौण

म्हणून तें एक प्रमाण घेण्यास प्रत्यवाय नाहीं व आम्हींहि वर गौण म्हणूनच तें एक प्रमाण दिल्याचें सांगितलें आहे.

दुसरें महत्त्वाचें प्रमाण म्हटलें म्हणजे " राजावलि " नामक ग्रंथाचें होय. या ग्रंथांत जी माहिती दिलेली आहे तीवरून इ. पू. २३७० वे वर्षी रामरावणांचें युद्ध झालें असें दिसून येतें. हा एक बौद्ध ग्रंथ असून तो सिंहलींत लिहिलेला आहे. हा ग्रंथ आम्हीं स्वतः पाहिलेला नाहीं व प्रयत्न करूनहि मिळाला नाहीं. रा. वामन सोमनारायण दलाल यांचा हिंदुस्थानच्या इतिहासावर History of India म्हणून जो ग्रंथ आहे त्याचे पहिल्या भागांत हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाविषयीं विवेचन केलेलें असून त्यांत ही माहिती आलेली आहे. रा. दलाल यांनीं तेथें काय सांगितलें आहे तें प्रथम त्यांच्याच शब्दांत येथें सांगतों. रा. दलाल म्हणतातः—

We may therefore with great probability accept the date of the event as given in " राजावलीय " a सिंहली work, which fixes it to be 1844 years before गौतमबुद्ध entered on his mission, that is, about 2370 B. C. The arguments in favour of this date are that the राजावलि being a सिंहली work is the book to which we should look for the date of the event. Again the date is not mentioned in round numbers and from this we may infer that the writer of the book has quoted the date from sources which had exactly computed the date. Lastly, it may be mentioned that the Epic period begins where the ब्राह्मण period ends and as the date of the शतपथ ब्राह्मण is not later than 2500 B. C., the date of 2370 B. C. for the रामायण would not be inappropriate. " पृष्ठ १९६.

" म्हणून रामरावणांतील युद्धाचा काल, ' राजावलि ' नामक एका सिंहली ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें गौतम बुद्धाच्या धर्मप्रसाराच्या कार्याला प्रारंभ होण्यापूर्वी

१८४४ वर्षे म्हणजे इ. स. पू. सुमोर २३७० वर्षे हाच बहुतांशीं संभवनीय अतएव ग्राह्य मानणें योग्य आहे. हाच काल ग्राह्य मानण्याला कारणें खालील-प्रमाणें आहेत. प्रथमतः राजावलि हा सिंहली ग्रंथ असल्यामुळें या गोष्टीच्या कालनिर्णयाचे कामीं त्याचा आधार घेणें रास्त आहे. दुसरें असें कीं, या ग्रंथांतील काल स्थूलमानानें न सांगतां निश्चितपणें अमुक वर्षें असा सांगितलेला आहे आणि यावरून या ग्रंथकाराला परंपरेनें जी माहिती मिळाली होती तिचा अनुवाद त्यानें आपल्या ग्रंथांत केला असला पाहिजे, असें अनुमान आपणांस करितां येण्यासारखें आहे. सरतेशेवटीं इतकेंच सांगावयाचें कीं, ब्राह्मणकाल जेथें संपतो तेथेंच पौराणिक कालाला प्रारंभ होतो; आणि ज्याअर्थीं शतपथब्राह्मणाची कालमर्यादा इ. पू. २५०० च्या अलिकडे* येत नाहीं, त्याअर्थीं इ. पू. २३७० ही कालमर्यादा रामायणाचे बाबींत अयोग्य होणार नाहीं."

राजावलींतील हा काल रामरावणांचे युद्धाचा होय. इ. पू. २३७० म्हणजे श. पू. २४४८ होत. यापूर्वीं सुमोर ३२ वर्षें रामजन्मकाल येतो. म्हणजे श. पू. २४८० हें रामजन्माचें वर्ष म्हणतां येईल. लंकेंतून परत आल्यावर रामाला राज्याभिषेक झाला व पुढें लवकरच लोकापवादानिमित्त सीतेचा रामानें त्याग केला. या वेळीं सीता गरोदर होती व पुढें प्रसूत होऊन तिला झालेल्या दोन पुत्रांनीं वयाचे बारावे वर्षीं रामाचे दरबारांत रामायणकाव्याचें गायन केल्याचें रामायणांत सांगितलें आहे. म्हणजे यापूर्वीं कांहीं काल रामायणाची रचना झाली होती. स्थूलमानानें हा काल रामाचे राज्याभिषेकानंतर १० वर्षांनंतरचा घेतल्यास रामायणाची रचना सुमोर श. पू. २४३८ वे वर्षीं झाली असें दिसून येतें. रामायणांतील प्रमाणांवरून वर जो काल सांगितला आहे त्याशीं राजावलींतील हा काल मिळता आहे व म्हणून त्यावर येथें इतकें विवेचन केलें आहे. हा ग्रंथ पहावयास मिळाला असता तर त्यांतील इतर माहितीवरून त्याची विश्वसनीयता कितपत

---

* शतपथ ब्राह्मणाचे कालासंबंधानें रा. दलाल यांनीं केलेलें विधान सबंध ग्रंथाविषयीं ग्राह्य मानितां येण्यासारखें नाहीं; त्यांतील कांहीं भाग अत्यंत प्राचीन आहे तर कांहीं अगदीं अलीकडचा आहे. तो विषय स्वतंत्र आहे व म्हणून तो सोडून दिल्याचें पूर्वीं आम्हीं सांगितलेंच आहे.

आहे हें सांगतां आलें असतें व रामायणांतील इतर कथानकांवरहि त्यांत कांहीं प्रमाणें मिळतीं तर अधिक प्रकाश पडला असता; पण त्यास उपाय नाहीं. तेव्हां मिळालेलें प्रमाण सुसंगत वाटल्यावरून तेवढें येथें सांगून ठेविलें आहे.

## रा. रा. दप्तरी आणि रामजन्मकाल.

पंचांगप्रवर्तक मंडळीच्या " करणकल्पलता " ग्रंथाचे कर्ते रा. रा. केशव लक्ष्मण दप्तरी यांनीं आपल्या " वैदिककालगणनापद्धति आणि रामजन्मकालनिर्णय " या पुस्तकांत रामजन्मकालाविषयीं विस्तृत विवेचन केलें आहे. प्रारंभीं युगशब्दानें किती काल घ्यावा याविषयीं चर्चा त्यांनीं केली असून पुढें रामजन्मकालाविषयीं विचार केलेला आहे. प्रथम त्यांचें म्हणणें काय आहे तें संक्षेपानें सांगून मग त्याच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं विचार करूं.

'युग' शब्दाचा वास्तविक अर्थ 'तीच गोष्ट पुनः होण्याचा काल' असा आहे, व या अर्थाला अनुसरून युग शब्दाचे अनेक अर्थ होतात. वर्षानें तोच ऋतु पुनः येतो म्हणून वर्ष हें युगच आहे. प्राचीन कालगणनापद्धतीप्रमाणें प्रत्येक चौथ्या वर्षीं एक विषुवान् येत असे. वर्षाचे दिवस ३६० व ऋतूंचा पर्याय ३६५$\frac{1}{4}$ दिवसांचा; तेव्हां ऋतूंचा व संवत्सराचा मेळ घालण्याकरितां चौथे वर्षीं २१ दिवस अधिक धरीत. या २१ दिवसांना विषुवान् म्हणतात व हे २१ दिवस ज्या संवत्सरीं घ्यावयाचे त्याला विषुवद्युक्त संवत्सर म्हणतात. अशा रीतीनें चौथ्या वर्षीं विषुवान् येत असे, म्हणून चार वर्षांची चौकडी हें एक युगच. वेदांगज्योतिषांतील पद्धतीप्रमाणें ५ वर्षांचें एक युग होत असे. स्मृतींतून व पुराणांतून सांगितलेलें दीर्घकालाचें प्रमाण तर प्रसिद्ध आहे. युगाचे अर्थाविषयीं रा. दप्तरी यांनीं याप्रमाणें चर्चा केली असून "सहस्रवार्षिक सत्र" याचा अर्थ सहस्रावे वर्षीं करावयाचें सत्र असा सांगून त्यांनीं वायुपुराणांतील कांहीं श्लोक अवतारिले आहेत. नारायणाचे अवतार सांगतांना प्रथम तीन दिव्य अवतार सांगून पुढें मानुष अवतार सांगितले आहेत; त्यांचे कालाचा क्रम या अवतरणांत दिलेला आहे. हें अवतरण महत्त्वाचें असल्यामुळें येथें उद्धृत करितों.

**एतास्तिस्रः स्मृतास्तत्र दिव्याः संभूतयः शुभाः ।**
**मानुष्याः सप्त यास्तस्य शापजास्ता निबोधत ॥९८।८८॥**

त्रेतायुगे तु दशमे दत्तात्रेयो बभूव ह ।
नष्टे धर्मे चतुर्थश्च मार्कंडेयपुरःसरः ॥८९॥
पंचमः पंचदश्यां तु त्रेतायां संबभूव ह ।
मांधाता चक्रवर्ती तु तस्योतथ्यपुरःसरः ॥९०॥
एकोनविंशे त्रेतायां सर्वक्षत्रान्तकोऽभवत् ।
जामदग्न्यस्तथा षष्ठो विश्वामित्रपुरःसरः ॥९१॥
चतुर्विंशे युगे रामो वसिष्ठेन पुरोधसा ।
सप्तमो रावणस्यार्थे जज्ञे दशरथात्मजः ॥९२॥
अष्टमो द्वापरे विष्णुरष्टाविंशे पराशरात् ।
वेदव्यासस्ततो जज्ञे जातूकर्णपुरःसरः ॥९३॥

यांत १९ व्या महायुगांतील त्रेतायुगांत परशुराम व २४ व्या महायुगांतील त्रेतायुगांत राम आणि अठ्ठाविसाव्या महायुगांतील द्वापरांत व्यास झाल्याचें सांगितलें आहे. यांतील परशुराम व राम तर समकालीन होते; तेव्हां या दोहों-मध्यें जें पांच महायुगांचें अंतर सांगितलेलें आहे, त्यानें स्मृत्युक्त दीर्घकाल विवक्षित असणें संभवनीय नाहीं. अर्थात् येथें युगशब्दानें पूर्वी दाखविल्या-प्रमाणें चार वर्षांचा काल घेतला पाहिजे. म्हणजे या दोघां पुरुषांमध्यें अंतर पांच युगांचें–२० वर्षांचें होतें, असें दिसून येतें, व हा काल असंभवनीय नाहीं. स्वायंभुव मनूपासून भारतीय युद्धांत पतन पावलेल्या बृहद्बलापर्यंत ६५ पिढ्या सांगितलेल्या आहेत व पुढें चंद्रगुप्तापर्यंत ३९ पिढ्या होतात; मिळून पिढ्या १०४. प्रत्येक पिढी २२ वर्षांची या हिशेबानें हीं २२८८ वर्षें होतात. चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक श. पू. ३९० वर्षी झाला, म्हणून श. पू. २६७८ हा स्वायंभुव मनूचा काल येतो. ( पृ. २५ ) भारतीय युद्धानंतर कांहीं वर्षांनीं शौनकानें सहस्रवार्षिक सत्र केल्याचें महाभारताचे पहिल्या अध्यायांत सांगि-तलें आहे. भारतीय युद्धानंतर लवकरच जन्मास आलेला परीक्षिति ६० वर्षांचा असतां मरण पावला व त्याचे मृत्यूनिमित्त पुढें जनमेजयानें सर्पसत्र केलें. या सर्पसत्राचे वेळीं तेथें आलेला सूत शौनकाच्या द्वादशवार्षिक सत्रास गेल्याचें महाभारताचे प्रारंभीं लिहिलें आहे. अर्थात् भारतीय युद्धानंतर ६०

वर्षांनीं सहस्रसांवत्सरिक सत्र झालें. म्हणजे भारतीय युद्धापूर्वी निदान १९४० वर्षे ही पद्धति सुरू झाली असली पाहिजे. भारतीय युद्धाचा काल रा. दप्तरी यांनीं श. पू. १२७५ ठरविला आहे. व हे १२७५ व वरील १९४० मिळून ३२१५ वर्षे होतात. हीं वर्षे चालू शकवर्षांत मिळविलीं म्हणजे जी संख्या होते ती पंचांगांतील गतकलीचे संख्येशीं थोड्या फेरानें मिळते; व यावरून ज्याला कलियुगारंभ म्हणतात तो वास्तविक या पद्धतीचाच आरंभ नव्हेना, असा संशय येतो. रा. दप्तरी यांनीं याप्रमाणें विवेचन करून कलियुगारंभकाल हाच वराहकल्पाचा आरंभकाल असा सिद्धांत काढिला आहे. व पुढील कालनिर्णय कल्पादिकालावरच केले आहेत. वायुपुराणांतील वरील वचनास अनुसरून रामजन्माचा कल्पादिकाल १०००+४०० ( कृतयुगाचे ) +२३×४ ( २३ अल्पयुगांचे ) म्हणजे १४९२ पासून १४९६ पर्यंत येतो असें त्यांनीं ठरविलें आहे. कल्पकाल १४९२ म्हणजे ३१७९–१४९२= १६८७ श. पू. हा काल येतो. याप्रमाणें विवेचन केल्यावर रा दप्तरी यांनीं रामायणांतील कित्येक ज्योतिर्विषयक अवतरणें दिलीं असून आपल्या कल्पनेशीं तीं कशीं जमतात तें निरूपण केलें आहे.

युगशब्दानें किती काल घ्यावयाचा हें निश्चित ठरवितां येत नाहीं व कित्येक ऐतिहासिक व्यक्तींचा काल ठरवितांना मोठी अडचण युगकल्पनेची आहे, हें आम्हीं मागें दाखविलें आहे. वायुपुराणांत कित्येक व्यक्तींचे काल सांगतांना युगशब्द योजिलेला आहे; व तेथें युगशब्दानें चार वर्षे घ्यावीं अशी कल्पना रा. दप्तरी यांनीं सुचविली आहे. युगशब्दाचा हा अर्थ आहे हें आम्हांला मान्य आहे; परंतु येथें हा अर्थ विवक्षित आहे असें मानण्यास प्रमाण कोणतें? वायुपुराणांत अन्यत्र युगशब्दाचा प्रयोग या अर्थी केल्याचें आढळत नाहीं. परशुराम व राम हे समकालीन, यासाठीं येथें दीर्घकाळ संभयनीय नाहीं, असें रा. दप्तरी यांचें म्हणणें आहे. पण त्यांनीं पुढें आणिलेला कल्पकाल कितपत संभवनीय आहे याचा त्यांनीं विचार केलेला नाहीं. युगशब्दानें येथें दीर्घकाल विवक्षित नसावा अशी जी शंका त्यांना आली, तिचें कारण परशुराम व राम समकालीन होते हें असल्याचें त्यांनीं सांगितलें आहे. रामाचे विवाहानंतर धनुर्भंगा-

निमित्त परशुरामाशीं त्याचा सामना झाल्याची जी कथा आहे तीवरून त्यांचें समकालीनत्व आपणांस कळतें. वायुपुराणांतील कालनिर्देशावरून रा. दप्तरी यांनीं परशुराम व राम यांचे वयांतील अंतर २० वर्षांचें ठरविलें आहे. विवाहाचे वेळीं रामाचें वय सुमारें १६ वर्षांचें होतें. अर्थात् परशुरामाचें वय त्यावेळीं ३६ वर्षांचें असलें पाहिजे. या वेळीं परशुरामाचे चरित्रांतील सर्व पराक्रम आटोपले असून ते कृतकार्य होत्साते तपश्चर्या करण्यास गेले होते. परशुरामाचे चरित्रांतील महत्त्वाचीं कार्यें म्हणजे सहस्रार्जुनाचा वध व पृथ्वी निःक्षत्रिय करण्याचा २१ वेळां केलेला प्रयत्न हीं होत. हीं कार्यें झाल्यावर कश्यपाला पृथ्वीचें दान करून ते तपश्चर्येला गेले व तपश्चर्या करून त्यांनीं अनेक लोक या वेळीं संपादन केले होते. परशुरामाचे चरित्रांतील या गोष्टींचा स्थूलतः उल्लेख रामाशीं समागम झाल्या वेळीं त्यांचे स्वतःचे भाषणांत आलेला आहे. (१।७५।२३–२६) इतकीं सर्व कार्यें वयाचीं ३६ वर्षें होण्याचे पूर्वीं आटोपतां येतील काय, याचा वाचकांनीं विचार करावा. रामाचा पराक्रम या वेळीं प्रथम दिसला व या वेळीं त्याचें वय १६ वर्षांचें होतें; तथापि विश्वामित्र दशरथाकडे मखरक्षणासाठीं त्याची मागणी करण्यास आले असतां राजानें त्याला तो लहान म्हणून पाठविण्याचें नाकारिलें होतें; म्हणजे या वयांत रामाचे हातून झालेला हा पराक्रम त्या कालांत अलौकिकच होता. वर्णानें क्षत्रिय असलेल्या रामाची ही गोष्ट झाली. परशुराम तर वर्णानें ब्राह्मण; अर्थात् वयांत आल्यावर त्यांनीं शस्त्र ग्रहण केलें व त्यांत नैपुण्य संपादन केल्यावर क्षत्रियांचा निःपात केला. क्षत्रियांशीं परशुरामाचे संग्राम २१ वेळां झाले. यावरून दीर्घकाल सूचित होतो; व हे संग्राम एकामागून एक अव्याहत झालेले नसून मध्यंतरीं कांहीं काल जाण्याची संभवनीयता लक्षांत घेतली म्हणजे याला पुष्कळ काल लागणार हें स्पष्ट दिसूं लागतें. तपश्चर्येकरितां लागलेला काल याहून वेगळा. तेव्हां इतकीं कार्यें ३६ वर्षांचें वय होईपर्यंत कशीं आटोपतां येणार? रामाहून परशुराम २० वर्षांनीं मोठे, असें रा. दप्तरी यांनीं अनुमानिलें आहे. पण रामायणांतील दोघांचे समागमाचा प्रसंग वाचला तर दोहोंमध्यें वयाचे दृष्टीनें अंतर बरेंच असावें, असें वाटतें.

**ददर्श भीमसंकाशं जटामंडलधारिणम् ॥ १ ७४।१७ ॥**

" परशुरामाची मूर्ति भयंकर दिसत होती. त्यानें मस्तकावर अनेक जटा धारण केल्या होत्या." असें परशुरामाचें वर्णन आहे व प्रथम दशरथानें भिऊन व हात जोडून जी प्रार्थना केली, तींत पुढील श्लोक आहे:—

**क्षत्ररोषात् प्रशांतस्त्वं ब्राह्मणश्च महातपाः ।**
**बालानां मम पुत्राणामभयं दातुमर्हसि ॥ १।७६।६ ॥**

" आपण क्षत्रियांवर क्रुद्ध होऊन त्यांचा निःपात करण्याची जी प्रतिज्ञा केली ती तडीस नेऊन शांत झाला आहां; आपण ब्राह्मण, महातपस्वी; तेव्हां माझ्या या बालकांना आपण अभयदान द्यावें. "

दशरथाचें हें भाषण भीतीचें अतएव नम्रपणाचें असलें तरी त्यांत रामाविषयीं केलेल्या बालशब्दाचे प्रयोगावरून परशुराम वयानें रामाचे मानानें थोर असल्याचें स्पष्ट सूचित होतें. दुसरें असें कीं, परशुरामांनीं क्षत्रियांचा निःपात केल्या वेळीं कोणीहि क्षत्रिय राजा उरूं दिला नव्हता. परशुराम शांत झाल्यावर पूर्वीं लहान असलेलीं क्षत्रियांचीं मुलें मोठीं झालीं तीं व कित्येक क्षत्रिय स्त्रियांची मागाहून संतति झाली ती पुढें गादीवर आली. अर्थात् त्या वेळीं दशरथ लहान असावा. मोठा असता तर जिवंत राहिला नसता. म्हणजे दशरथाहून परशुरामाचें वय अधिक मानावें लागतें. दशरथ तर या वेळीं वृद्ध झालेला व परशुराम त्याहून मोठे म्हटले म्हणजे किती वृद्ध असतील ?

परशुराम व राम समकालीन यावरून रा. दप्तरी यांनीं मधील पांच युगांचीं वर्षें शंभराहून अधिक धरितां येत नाहींत असें अनुमान केलें आहे. पण परशुराम भारतीय युद्धाचे वेळींहि होते, याची वाट काय ?. भीष्माचार्यांचे ते गुरु होते व कर्णालाहि त्यांनीं विद्या शिकविली होती, हें प्रसिद्ध आहे. भारतीय युद्धाचे वेळीं रामापासून ३१ वा वंशज गादीवर होता असें त्यांनीं लिहिलें आहे व त्यावरून श्रीराम व पांडव यांमधील काल सुमारें ९०० वर्षांचा असावा असें अनुमानिलें आहे ( पृ. १८ ). म्हणजे इतका काल परशुराम जिवंत होते असें मानणें भाग आहे; मग राम व परशुराम यांच्या समकालीनत्वावरून

युगाचें मान चार वर्षांचें असावें अशी मर्यादा कशी ठरवितां येणार ? सात चिरंजीव पुरुषांमध्यें परशुरामांची गणना होते, ही गोष्ट तर वेगळीच आहे.

वायुपुराणांतील वरील अवतरणांत त्रेतायुगांतील २४ वे अल्पयुगांत राम जन्मल्याचें सांगितलेलें आहे. तेथेंच १५ व्या अल्पयुगांत मांधात्याचें जन्म सांगितलें आहे. म्हणजे दोघांमध्यें अंतर ९ अल्पयुगें अर्थात् ३६ वर्षें इतकें येतें. मांधात्यापासून रामाची पिढी तर रामायणांतील वंशावलिपाहतां चोविसावी दिसते. अशा रीतीनें ३६ वर्षांत २४ पिढ्या झाल्याचें विचित्र अनुमान रा. दप्तरी यांच्या युगकल्पनेमुळें निष्पन्न होऊं पहात आहे. युगशब्दाचे रा. दप्तरी यांनीं दिलेले सर्व अर्थ संभवनीय आहेत; पण त्यांतील चार वर्षें हा अर्थ येथें घ्यावा असें जें त्यांचें म्हणणें आहे, तें येथें जमत नाहीं, एवढें आह्मांला येथें दाखवावयाचें आहे. वायुपुराणांतील जें अवतरण रा. दप्तरी यांनीं घेतलें आहे, त्यांत विष्णूचे अवतारांविषयीं माहिती दिली असून त्याचा उपक्रम पुढील श्लोकानें केलेला आहे.

**जज्ञे पुनः पुनर्विष्णुर्यज्ञे च शिथिले प्रभुः ।**
**कर्तुं धर्मव्यवस्थानमधर्मस्य च शासनम् ॥ ६९ ॥**

"यज्ञसंस्था शिथिल झाली असतां धर्माची व्यवस्था करण्यासाठीं व अधर्माचें शासन करण्यासाठीं नारायणानें पुनःपुनः अवतार घेतले."

अवताराचें कारण येथें स्पष्ट सांगितलेलें आहे व त्यावरून अवतार झाले ते मध्यंतरीं कांहीं तरी काल गेल्यावरच झाले असावेत हें स्पष्ट होत आहे. हा काल किती असावा हें अनुमानितां येण्यासारखें नसलें तरी परशुराम व राम या दोन अवतारांमधील काल वीसच वर्षें असावा हें संभवनीय दिसत नाहीं. कारण धर्माची व्यवस्था परशुरामानें केली व पुनः अधर्माचें प्राबल्य होऊन धर्मरक्षणाकरितां रामाचा अवतार झाला. आणि इतकीं सर्व कार्यें वीस वर्षांत घडून आलीं असें येथें मानावें लागतें. परशुरामाचे कार्याला प्रारंभ केव्हां झाला व त्याची समाप्ति केव्हां झाली याविषयीं तर कल्पनाच चालत नाहीं ! व्यासांच्या अवताराचा कालनिर्देश वायुपुराणांत केलेला आहे, त्यावरून रा. दप्तरी यांनीं द्वापरांतील २८ व्या पोटविभागांत व्यास जन्मले असें ठरविलें आहे. वायुपुरा-

णांत व्यासांच्या अवतारानंतर नववा अवतार श्रीकृष्णांचा सांगतांना पुढील श्लोक दिलेला आहे:—

**अष्टाविंशतिमे तद्वद्द्वापरस्यांशसंक्षये ॥**
**नष्टे धर्मे तदा जज्ञे विष्णुर्वृष्णिकुले प्रभुः ॥ ९६ ॥**

"याप्रमाणें अठ्ठाविसाव्या महायुगांत द्वापराचे अंतीं धर्माचा नाश झाला असतां वृष्णिकुलांत विष्णूनें अवतार घेतला."

रा. दप्तरी यांच्या वरील कल्पनेप्रमाणें "द्वापरांतील अठ्ठाविसाव्या अल्पयुगांत" असा येथें अर्थ होतो. म्हणजे व्यास व श्रीकृष्ण यांचा जन्मकाल एक येतो. हा तर संभवनीयच नाहीं. कारण पांडवांतील अर्जुन श्रीकृष्णांचे बरोबरीचा व कौरवपांडवांचे वडील धृतराष्ट्र व पांडु हे व्यासांपासून झालेले; मग व्यास व श्रीकृष्ण समवयस्क कसे असणार? दुसरें असें कीं, या श्लोकांत युगाचा निर्देश २८ वें असा करून त्याबरोबर "द्वापराचा क्षय प्राप्त झाला असतां" असें सांगितलें आहे. अल्पयुगाची कल्पना येथें ग्रहण केली तर द्वापराचा क्षय २८ अल्पयुगांनीं व्हावयाचा म्हणजे द्वापराची मर्यादा अवघी ११२ वर्षांची होते. रा. दप्तरी यांनीं द्वापर २०० वर्षांचें ठरविलें आहे; तेव्हां ही मर्यादा येथें कशी सांभाळावयाची? श्लोकांतील निरूपणाकडे पाहिलें तर अठ्ठाविसाव्या युगांतील द्वापर हा एक भाग असावा अशी कल्पना होते व तीच पूर्वींहि विवक्षित दिसते. रा. दप्तरी यांनीं प्रारंभीं असाच अर्थ केला आहे; पण अल्पयुगाची कल्पना पुढें केल्यावर त्यांनीं उलट अर्थ करून संगति लावण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु या श्लोकांत आलेल्या द्वापराचे क्षयाचे निर्देशामुळें उलट अर्थ करितां येईल किंवा काय याविषयीं आतां शंका राहिलेली नाहीं.

सहस्रवार्षिक सत्राविषयींची त्यांची कल्पना कै. काळे यांच्या कल्पनेहून वेगळी नाहीं. मात्र वायुपुराणांतील एक महत्त्वाचें अवतरण त्यांनीं दिलें आहे व त्यावरून हें सत्र बारा वर्षें मुदतीचें होतें, असें दिसतें. वर्ष शब्दाचा अर्थ दिवस असा नसून सहस्रवार्षिक सत्राचे कल्पनेची संगति लावावी, असें जैमिनीनें सुचविलें आहे व जैमिनीचे कल्पनेनें समाधान होत नसलें तरी अगतिकत्वास्तव ती कल्पना ग्राह्य मानावी, असें आम्हीं एतद्विषयक विवेचनाचे प्रसंगीं

लिहिलें आहे; परंतु वायुपुराणांतील वरील अवतरण पाहिल्यावर त्याच्या कल्पनेच्या ग्राह्यतेविषयीं शंका वाटूं लागली आहे. तथापि सहस्रावे वर्षीं करावयाचें सत्र असा अर्थ करण्यास रा. दप्तरी यांनीं नवीन प्रमाण कोणतेंहि दिलेलें नाहीं व त्यामुळें ती कल्पना अद्यापि ग्राह्य आहे असें वाटत नाहीं. 'सहस्रावे वर्षीं' असा अर्थ येथें शब्दांतून निष्पन्न होत नाहीं, हें तर उघड आहे; तेव्हां अन्य रीतीनें येथें संगति लावितां आली पाहिजे हें विसरतां नये. सहस्रावे वर्षीं सत्र करावयाचें तर गणनेला प्रारंभ कधीं करावयाचा ? कालगणनेच्या कामीं आवश्यक असलेली शकपद्धति चालू नसतां ही गणना कोणीं करावयाची ? व त्या त्या वेळीं सत्र कोणीं करावयाचें ? पुरूरव्याचे वेळीं हें सत्र झाल्याची माहिती रा. दप्तरी यांनीं दिली आहे व पुरूरव्याचा पणतु ययाति यानें हें सत्र केल्याचें वर्णन पुराणांतरीं आलेलें आहे; पण मधील दोन पिढयांत एक सहस्र वर्षांची मर्यादा भरली, असें कसें म्हणावें ?

अशा रीतीनें युगशब्द व सहस्रवार्षिक सत्र यांविषयींच्या रा. दप्तरी यांच्या कल्पना निराधार असून त्यांची संगति लावितां येत नाहीं, यासाठीं त्या अग्राह्य आहेत व म्हणून त्यांवरून ठरविलेल्या रामजन्मकालाविषयीं अधिक विवेचन करण्याचें कारण नाहीं. तथापि रा. दप्तरी यांनीं आपण ठरविलेला काल रामायणवर्णित ग्रहस्थितीशीं जमत असल्याचें दाखविलें आहे, तेव्हां त्यांचें हें प्रतिपादन कितपत ग्राह्य आहे, हें आतां पाहूं. रामाचे जन्मकालासंबंधीं रामायणांत जीं वचनें आहेत तीं गौडी प्रतींत आढळत नसल्यामुळें प्रक्षिप्त आहेत व तीं गेल्यावर मूळ ग्रंथांत महत्त्वाचा निर्देश राहात नाहीं आणि हें रा. दप्तरी यांनीं स्वतां लिहून ठेविलें असल्यामुळें त्याविषयीं अधिक लिहावयास नको. यौवराज्याभिषेकाचे वेळीं रामाचें वय २५ वर्षांचें होतें, असें धरून त्या वेळची ग्रहस्थिति रा. दप्तरी यांनीं दाखविली आहे; परंतु यौवराज्याभिषेकाचे वेळीं रामाचें वय अवघें १८ वर्षांचें होतें व रामायणांतील इतर वचनांशीं हें सुसंगत दिसतें, हें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. रा. दप्तरी यांनीं अवतरिलेले श्लोक गॉरिशिओच्या प्रतींत नसल्यामुळें प्रक्षिप्त आहेत. तेव्हां याविषयींहि विचार करावयास नको. राम वनवासाला गेले, त्यानंतर कांहीं दिवसांनीं सूर्यग्रहण

झालें असावें असें रा. दप्तरी यांनीं रामायणांतील कांहीं वचनांवरून अनुमान केलें आहे. ( पृ. ३३ ) रामाचा जन्मकाल व वनवासाचे वेळीं रामाचें वय वरीलप्रमाणें गृहीत धरून त्यांनीं त्या वेळची ग्रहस्थिति दर्शविली आहे व त्यावरून ग्रहण संभवनीय असल्याचें सांगून रामायणांतील वचनाशीं त्याचा मेळ दाखविला आहे. जन्मकाल अनिर्णीत म्हणून बाजूला ठेविला तरी वनवासाला जाते वेळीं रामाचें वय किती होतें याविषयींचें त्यांचें अनुमान चुकलें असल्यामुळें त्या वेळीं ग्रहण संभवनीय असलें तरी त्याचें महत्त्व राहिलें नाहीं; पण रामायणांतील वचनावरून त्यांनीं ग्रहणाची केलेली कल्पनाच चुकलेली असल्यामुळें त्यांचा पुढील खटाटोप निरर्थक झाला आहे. रामायणांतील ज्या वचनावरून रा. दप्तरी यांनीं सूर्यग्रहण अनुमानिलें आहे तें वचन पुढें देतोः—

**तस्मिंस्तु पुरुषव्याघ्रे निष्क्रामति कृतांजलौ ॥ २।४१।१**
**नाग्निहोत्राण्यहूयन्त सूर्यश्चान्तरधीयत ॥ ९ ॥**

" तो पुरुषश्रेष्ठ राम हात जोडून बाहेर जाऊं लागला असतां .... .... अग्निहोत्राचें हवन कोणीं केलें नाहीं; सूर्यहि अंतर्धान पावला. "

सूर्य अंतर्धान पावल्याचें येथें सांगितलें आहे व त्यावरून सूर्यग्रहणाचें अनुमान रा. दप्तरी यांनीं केलें आहे. वास्तविक हें वर्णन अलंकारिक आहे व यासाठीं त्याचा शब्दशः अर्थ घेणें उचित नव्हे. सूर्य निस्तेज झाला, इतकेंच येथें विवक्षित आहे. या वर्णनांतील पुढील श्लोक पहाः—

**नक्षत्राणि गतार्चींषि ग्रहाश्च गततेजसः ॥२।४१।११॥**
**न ग्रहो नाऽपि नक्षत्रं प्रचकाशे न किंचन ॥ १३ ॥**
**न वाति पवनः शीतो न शशी सौम्यदर्शनः ।**
**न सूर्यस्तपते लोके सर्वं पर्याकुलं जगत् ॥१७॥**

" नक्षत्रें निस्तेज झालीं; ग्रहांची कांति नाहींशी झाली. ग्रह किंवा नक्षत्रें यांचा कांहीं प्रकाश पडेनासा झाला. थंड वारा वाहात नाहींसा झाला; चंद्र सौम्य दिसेनासा झाला; सूर्याचा प्रकाश पडेनासा झाला; ( अशा रीतीनें ) सर्व जग व्याकुल होऊन गेलें. "

येथें दिवसाचीं व रात्रीचीं दोनहि काळचीं वर्णनें असून, राम वनवासाला

गेले त्यानंतर कांहीं दिवसपर्यंतची स्थिति वर्णिलेली आहे, हें उघड आहे. नक्षत्रें निस्तेज झाल्याचें सांगून सूर्याचा प्रकाश पडेनासा झाल्याचें येथें सांगितलें आहे व पूर्वी सूर्य अंतर्धान पावल्याचें जें वर्णन येऊन गेलें आहे त्याचाच हा पर्याय आहे. अर्थात् येथें ग्रहणाची कल्पना संभवतच नाहीं. सूर्य अंतर्धान पावल्याच्या वर्णनावरून हें ग्रहण मोठें असावें असें रा. दप्तरी यांचें अनुमान आहे; पण सूर्यग्रहण मोठें अर्थात् खग्रास असेल तर नक्षत्रें प्रकाशूं लागावयाचीं. असें असतां नक्षत्रें निस्तेज झाल्याचें तेथेंच जें वर्णन आहे, तें ग्रहणाच्या कल्पनेला उलट बाधक आहे. रामाला यौवराज्याभिषेक पुष्यनक्षत्रावर व्हावयाचा होता व यावरून अभिषेकाची तिथि चैत्र शुद्ध १२ असावी असें रा. दप्तरी यांनीं अनुमानिलें आहे. राम वनवासाला गेल्यावर सहाव्या रात्रीं दशरथाला श्रावणवधाचें स्मरण होऊन तो शोक करूं लागला. (२।६३।४) व त्याच रात्रीं सूर्योदयापूर्वी तो मरण पावला. राम वनवासाला गेल्यानंतर व दशरथ मृत होण्यापूर्वी मधील पांचसहा दिवसांतील स्थिति वरील वर्णनांत आलेली आहे, हें उघड आहे. दशरथ मृत झाल्यावर भरत मातुलगृहाहून लवकरच अयोध्येला आला व त्याचे १४ व्या दिवशीं (२।७९।१) मंत्र्यांनीं त्याला गादीवर बसण्याची विनंति केली. याच वेळीं भरतानें रामाला परत आणण्याविषयींचा आपला निश्चय सर्वांस कळविला व त्याप्रमाणें सर्व मंडळींसह तो अरण्यांत रामाकडे गेला. मिळून हा सर्व कथाभाग राम वनवासाला गेल्यानंतर एका महिन्यांतच घडून आला. हा कथाभाग प्रायः अयोध्याकांडाचे समाप्तीपर्यंत (सर्ग ११५) सांगितलेला आहे. म्हणजे राम वनवासाला गेल्यावर प्रथमच येणाऱ्या अमावास्येला असो अथवा त्यापुढें चारपांच महिन्यांनीं येणाऱ्या अमावास्येला असो, सूर्यग्रहण असलें तरी त्याचा उल्लेख राम वनवासाला गेल्याचें ज्या सर्गांत प्रथमच सांगितलें (२।४०) आहे, त्यांतच येणें अगदीं संभवनीय नाहीं. मिळून दोनहि प्रकारें ग्रहणाविषयीं रा. दप्तरी यांचें अनुमान चिंत्य आहे. या ग्रहणानंतर १३५ चांद्रमासांनीं गोदावरीच्या कांठानें बरेंच मोठें सूर्यग्रहण झाल्याचें रा. दप्तरी यांनीं वर्तविलें असून त्याविषयींचा रामायणांतील उल्लेख प्रमाण म्हणून पुढें केला आहे. पहिल्या ग्रहणाविषयींचें

रा. दप्तरी यांचें अनुमान चुकलें असल्यामुळें त्यानंतरच्या ग्रहणाविषयींचें अनुमान बरोबर ठरणार नाहीं, हें तर उघडच आहे. पण ग्रहणाविषयीं रामायणांतील म्हणून त्यांनीं दिलेलें प्रमाणहि वरच्यासारखेंच आहे, हें विशेष आहे. खर व दूषण आपल्या १४ हजार सेनेसह रामावर चाल करण्यासाठीं निघाले असतां त्यांना उत्पात दिसूं लागल्याचें जें वर्णन रामायणांत आहे, त्यांतच रा. दप्तरी यांचें ग्रहणसूचक प्रमाण आलें आहे. पुढील श्लोक पहा:—

**जग्राह सूर्यं स्वर्भानुरपर्वणि महाग्रहः ।**
**प्रवाति मारुतः शीघ्रं निष्प्रभोऽभूद्दिवाकरः ॥३।२३।१२ ॥**

"पर्व नसतांहि महाग्रह राहूनें सूर्याला ग्रासलें; वारा वेगानें वाहूं लागला व सूर्य निस्तेज होऊन गेला." येथें ग्रहण लागल्याचा स्पष्ट निर्देश आहे. हें खरें; पण ग्रहणाची पर्वणी नव्हती, अर्थात् अमावास्या त्या दिवशीं नव्हती, असें तेथें सांगून ग्रहणाविषयीं येणारा संशय निरस्तच करून टाकिलेला आहे; आणि पूर्वी ग्रहणाचें वर्णन कां करण्यांत आलें असें कोणी म्हणेल तर त्याला जणूं काय उत्तर म्हणून पुढल्याच पंक्तींत सूर्य निस्तेज होऊन गेल्याचें सांगितलें आहे. अर्थात् ग्रहण लागल्याप्रमाणें सूर्याचें तेज दिसेनासें झालें इतकेंच येथें विवक्षित आहे. रा. दप्तरी यांनीं सूर्यग्रहण वर्तविलें आहे; पण तें अमावास्येच्या दिवशीं येत आहे. व रामायणांतील ग्रहण तर अमावास्या नसतां लागल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. तेव्हां रामायणांतील संगति राखावयाची तर अमावास्या नसतां येणाऱ्या सूर्यग्रहणाची तिथि व काल रा. दप्तरी यांनीं शोधून काढणें अवश्य आहे.

गोदावरीवरील सूर्यग्रहणानंतर १७१ चांद्रमासांनीं खग्रास चंद्रग्रहण रा. दप्तरी यांनीं वर्तविलें असून त्याचा उल्लेख रामायणांतील पुढील श्लोकांत असल्याचें त्यांचें म्हणणें आहे. (पृ. ३६)

**रजन्यामप्रकाशस्तु चंद्रमा न प्रकाशते । ***
**कृष्णरक्तांशुपर्यन्तो लोकक्षय इवोदितः ॥ ६।२३।८**

* येथें आमचे प्रतींत "रजन्यामप्रकाशस्तु संतापयति चंद्रमाः ॥" असा पाठ आहे. चंद्रापासून ताप होत आहे हें यांत विशेष आहे. प्रस्तुत मुद्याच्या दृष्टीनें त्याचें तादृश महत्व नाहीं.

"रात्रीं चंद्राचा प्रकाश पडत नाहीं; कृष्णवर्ण व आरक्तवर्ण किरणांनीं त्याचें मंडल परिवेष्टित झालें असून लोकांच्या नाशार्थच तो उदय पावला आहे कीं काय असा भास होत आहे."

सेतुबंधन झाल्यावर रामाच्या सैन्यानें प्रयाण केलें त्या वेळचें हें वर्णन असून त्यांत आणखीहि कित्येक दुश्चिन्हें होऊं लागल्याचें सांगितलें आहे. येथें चंद्रग्रहणाचा संशयहि येण्यासारखा नाहीं. चंद्राचें येथील वर्णन एकाद्या रात्रीचें नसून त्या वेळीं नित्य रात्रीं चंद्र निस्तेज दिसत असल्याचें सांगितलेलें आहे व हें सर्व सर्ग वाचूं लागलें असतां सहज लक्षांत येतें. सूर्यावर नीलवर्ण डाग दिसूं लागल्याचें याच सर्गांत सांगितलें असून (६।२३।९) तें पाहिलें म्हणजे येथील वर्णन एका रात्रीपुरतें नसून सामान्यपणें त्या कालीं दिसलेल्या दुश्चिन्हांचा त्यांत एकत्र समावेश केल्याचें जें अनुमान आम्हीं केलें आहे त्याची वाचकांस प्रचीति येईल.

हें चंद्रग्रहण खरदूषणादिकांशीं रामानें युद्ध केलें त्यानंतर १७½ चांद्रमासांनीं झाल्याचें रा. दप्तरी यांनीं ठरविलें आहे; पण रामाच्या वनवासाची समाप्ति त्यापूर्वीच झाली आहे व यामुळें चंद्रग्रहणाचा वाद आपोआप सुटण्यासारखा आहे. राम पंचवटींत राहिले असतां लक्ष्मणानें तेथील हेमंताचें वर्णन फार सुंदर केलें आहे; व त्यांतील कित्येक उल्लेखांवरून तें पौष शुद्ध १५ च्या रात्रीचें असावें असें आम्हीं पूर्वीं दाखविलें आहे. त्यानंतर लवकरच वरील युद्धाचा प्रसंग आला. याच युद्धांतील पराभवानिमित्त रावणानें सीतेचा अपहार केला. सीताशुद्ध्यर्थ गेलेल्या मारुतीशीं गांठ पडली असतां सीतेनें त्याला रावणानें येथें आपणाला एक वर्षाची मुदत दिली असून त्यापैकीं आतां दोन महिने अवशिष्ट राहिल्याचें सांगितलें आहे. (५।३७।८) त्यानंतर रामानें रावणाचा वध लवकरच केला व वनवासाची मुदत याच वेळीं समाप्त होत असल्यामुळें तो परत आला. राम अयोध्येला चैत्रमासीं परत आल्याचें रामायणांत स्पष्ट सांगितलें आहे. म्हणजे लक्ष्मणानें पंचवटींत असतां हेमंताचें जें वर्णन केलें त्यानंतर सुमारें १५ महिन्यांत वरील सर्व इतिहास झालेला आहे. खरदूषणादिकांचा वध हा या

इतिहासांतील एक भाग होय. अर्थात् त्यानंतर १७½ महिन्यांनीं राम वनांतच नव्हते तर ते हें चंद्रग्रहण कसे पाहाणार ?

वायुपुराणांतील कालनिर्देशावरून रामजन्मकाल रा. दप्तरी यांनीं ठरविला तो कसा चुकला आहे हें प्रारंभीं दाखविलें असून या कालांतील ग्रहस्थितीचा रामायणांतील वर्णनाशीं मेळ दाखविण्याचा त्यांनीं केलेला प्रयत्न तर मुळींच मिळत नाहीं हें येथपर्यंत दाखविलें. यापुढें त्यांच्या निबंधांतील विवेचन प्रायः कल्यारंभकाल किंवा कल्पारंभकाल याविषयीं आहे. या विवेचनाशीं रामजन्मकालाचा साक्षात् संबंध नसल्यामुळें त्यावर साधक किंवा बाधक कोणत्याच प्रकारची टीका आम्ही करीत नाहीं. त्यांनीं ठरविलेला रामजन्मकाल रामायणाशीं मिळत नाहीं व अन्य प्रकारेंहि त्यांत विसंगतता आहे, हें आम्हांला आमच्या वाचकांना दाखवावयाचें होतें, तें आम्हीं यथामति दाखविलें आहे.

## कांहीं शंका आणि त्यांचा परिहार.

रामायणाचा कालनिर्णय करण्यास अंतर्गत साधनें जवळजवळ नसल्यामुळें मिळेल त्या साधनाचा उपयोग करण्याकडे प्रवृत्ति होणें साहजिक आहे. प्राचीन ग्रंथांचा कालनिर्णय करावयाचा असतां प्रथम प्रमाणांची ग्राह्याग्राह्यता ठरविणें अवश्य असतें व ही एकदां ठरविल्यावर मग त्यांतील ग्राह्य अशा प्रमाणांवरून सिद्धांत बांधल्यास तो सहसा चुकावयाचा नाहीं; असो. रामायणाचा कालनिर्णय करितांना त्यांत सांगितलेल्या रामाच्या जन्मकालाकडे प्रथम लक्ष जातें. जन्मकाल सांगतांना सूर्य मेषास असल्याचा उल्लेख आहे. सबंध महाभारतांत राशींचे उल्लेख नाहींत. मेषादिराशींच्या संज्ञा मूळच्या आमच्या नसून ह्या परदेशांतून आल्या आहेत व इ.पू. ५०० च्या सुमारास त्या आमच्या देशांत आल्या असाव्या असा कै. दीक्षित यांचा* तर्क आहे. तथापि क्रांतिवृत्ताचे १२ विभाग करण्याची जी कल्पना प्राचीन ग्रंथांत आढळते त्यावरून मेषादि संज्ञा प्राचीन नसल्या तरी आमच्या नव्हत, असें निश्चयानें म्हणतां येत नाहीं अशी शंकाहि त्यांनीं प्रदर्शित केली आहे. * कित्येकांचें मतें हा काल इ. पू. पहिलें शतक हा आहे. कोणताहि काल ठरला तरी आमचेकडील प्राचीन ग्रंथांतून राशी-

* भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास. पृ. १४७. * कित्ता, पृ. १३८.

चक्राचा उल्लेख आढळत नाहीं, हें निर्विवाद आहे व यामुळें रामायणांतील राशींचे उल्लेखांवरून त्याचा काल शककालाचें पूर्वी जाणें शक्य नाहीं असें वाटणें साहजिक आहे. परंतु राशींचा उल्लेख असलेली ही जन्मपत्रिका बंगाली प्रतींत मुळींच मिळत नाहीं. इतकेंच नव्हे तर बर्लिन येथील रॉयल लायब्ररींत रामायणाच्या ज्या प्रती आहेत त्यांतील एकींतहि ती नाहीं, असें प्रो. वेबर यानें लिहिलें आहे. मुंबईकडील प्रतींतून ही पत्रिका आढळते. तेव्हां ही योजना मागाहून कोणी तरी केली असावी असें दिसतें. मूळांतील प्रमाण अशा प्रकारें ग्राह्य ठरत नसल्यामुळें त्यावरून सिद्धांत बांधतां येणार नाहीं हें उघड आहे. अयोध्याकांडांत एके स्थळीं राशीचा उल्लेख आहे. परंतु तो सर्ग प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं त्याविषयींच्या स्वतंत्र भागांत दाखविलें आहे. तेव्हां त्या आधाराची गति वरीलप्रमाणें समजावयाची आहे.

मेषादि राशींचा प्रचार होण्यापूर्वी वारांची कल्पना इकडे आली व तीहि परदेशांतून आली, असें कै. दीक्षित यांचें अनुमान आहे. हा काल त्यांनीं श.पू. १००० हा दिला आहे. श.पू. १५०० पूर्वींच्या ग्रंथांत वार आढळत नाहींत असें त्यांनीं येथें कारण दिलें आहे. रामायणांत एके स्थलीं वाराचा उल्लेख आहे. वनवासाची कैकेयीची योजना कळल्यावर राम सीतेला भेटावयास गेल्या वेळीं त्याचें म्लान मुख पाहून ती म्हणते :—

**अद्य बार्हस्पतः श्रीमान्युक्तः पुष्येण राघव ।**
**प्रोच्यते ब्राह्मणैः प्राज्ञैः केन त्वमसि दुर्मनाः ॥ २।२६।९॥**

" हे राघवा, आज मंगलकारक गुरुपुष्ययोग असल्याचें विद्वान् ब्राह्मण सांगतात, तर आपणांला खिन्न होण्याचें कारण काय ? "

रामाला राज्याभिषेक पुष्यनक्षत्रावर व्हावयाचा होता, हें आपणांस माहीत आहेच व सीतेच्या भाषणांत राज्याभिषेकाचा निर्देश नसला तरी ती कल्पना मनांत आणूनच तिनें हा प्रश्न केला आहे. " अद्य बार्हस्पतः पुष्येण युक्तः " असे मूळांत शब्द असून त्यांचा सरळ अर्थ 'आज पुष्यानें युक्त असा बृहस्पतीचा दिवस आहे' असा आहे. बृहस्पतीचा दिवस म्हणजे गुरुवार होय; याहून वेगळा अर्थ येथें संभवनीय नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि वाराचा उल्लेख रामाय-

णांत नाहीं, हें खरें; तथापि वर असलेला उल्लेख मूळ ग्रंथांतील आहे, प्रक्षिप्त नव्हे, यांत शंका नाहीं. महाभारतासारख्या ग्रंथांत वारांचा उल्लेख नाहीं, यामुळें मन साशंक होतें; परंतु दिननक्षत्रें सांगण्याची त्या वेळची पद्धति दोनहि ग्रंथांत प्रतिबिंबित झाली आहे. आणखी असें कीं, वारानें एका सप्ताहांतील दिवसाचा बोध होतो व यामुळें कालांतरानें करावयाच्या कालनिर्देशाचे प्रसंगीं त्याचा तादृश उपयोग नसतो, तेव्हां कालज्ञानाचे कामीं वारांचा उपयोग नाहीं असें समजून त्यांचा निर्देश केला नसावा असें वाटतें. वार सात असून त्यांचीं नांवें सात ग्रहांवरून पडलेलीं आहेत व तीं सर्व जगांत सारखीं आहेत; तेव्हां त्यांचा उगम कोठेंतरी एका देशांत असावा, असें दिसतें. नक्षत्रांपेक्षां ग्रह मोठे असल्यामुळें त्यांचें ज्ञान आधीं होणें संभवनीय आहे. ग्रहांची गति कळण्यास वेळ लागला तरी ग्रहांची ओळख आधीं होणारच. रामायणांत शनीवांचून सर्व ग्रहांचीं नांवें प्रसंगानुसार आलीं आहेत व मंगलकृत रोहिणीशकटभेदाचें जें अवतरण पूर्वीं दिलें आहे तेथें मंगळाला उद्देशून " ग्रह " असा स्पष्ट शब्द आहे. ग्रहांचें ज्ञान याप्रमाणें त्या वेळीं होतें व वारांचीं नांवें त्यांवरून पडलेलीं आहेत. तेव्हां वारांची पद्धति त्या वेळीं असणें असंभवनीय नाहीं. शनीचा उल्लेख रामायणांत नसला तरी त्याचें महत्त्व नाहीं. कारण इतर ग्रहांचें ज्ञान झाल्यावर शनीचें ज्ञान न होण्याचें कारण काय ? तेव्हां वाराविषयींच्या वरील निर्देशावरून रामायणकाल बदलण्याचें कारण दिसत नाहीं. वारांविषयीं प्राचीन ग्रंथांत कोठें उल्लेख नाहीं व यावरून तो उल्लेख प्रथम ज्या कालांतील ग्रंथांत आढळला त्यापूर्वीं वारांची पद्धति इकडे नव्हती, अशी आम्हीं आपली समजूत करून घेतली आहे. उल्लेखाचे अभावावांचून या कामीं दुसरें प्रमाण नाहीं. अर्थात् अशा प्रकारचा उल्लेख आढळला तर इतर प्रमाणांनीं निश्चित झालेला ग्रंथाचा काल बदलावयाचा,–कीं त्या कालीं तें ज्ञान इकडे असल्याचें तें गमक समजावयाचें ? याचा वाचकांनीं विचार करावा.

## मतांतरांचा परामर्श.

रामायणाचे कालनिर्णयाचे प्रयत्न यापूर्वीं कांहीं झाले आहेत; तथापि महाभारताइतके ते नव्हत, यांत शंका नाहीं. प्रमाणांची ग्राह्याग्राह्यता प्रथम ठरविणें

या कामीं आवश्यक असतें, हें आम्हीं वर सांगितलें आहे व या मुद्याकडे लक्ष न गेल्यामुळें कालनिर्णयाचे कामीं मतभेद फार झाले आहेत. म्हणजे शकापूर्वी ८॥ लक्ष वर्षांपासून इ. स. २९५ पर्यंत निरनिराळे काल, निरनिराळ्या विद्वानांनीं रामायणाचे ठरविले आहेत. श. पू. ८॥ लक्ष वर्षे हा काल राम त्रेतायुगांत झालेले व यावरून मधील द्वापरयुग व पुढील गतकलीचीं वर्षें धरून ठरविलेला आहे. युगकल्पनेविषयीं पूर्वीं जें विवेचन केलें आहे, त्यांतच या कल्पनेचें निराकरण येऊन गेलें आहे, तेव्हां त्यासाठीं येथें वेगळें लिहावयास नको. शोधक बुद्धीनें निरीक्षण करून ठरविलेल्या कालाविषयीं तेवढें विवेचन येथें आम्हांस करावयाचें आहे. अशा कालनिर्णयांतहि मतभेद फार आहेत. सर वुइल्यम जोन्स यानें इ. पू. २०२९ वे वर्षीं राम होता असें ठरविलें आहे. इ. पू. ९५० हा रामाचा काल हॅमिल्टन यानें ठरविला आहे. रामाचे जन्मपत्रिकेवरून रामजन्म इ. पू. ९४० वे वर्षी झाला असें वेंटले हा ज्योतिषी म्हणतो; पण रामायणरचनेचा काल मात्र त्यानें इ. स. २९५ ठरविला आहे. याच ज्योतिष्यानें दुसऱ्या स्थलीं रामाचा काल इ. पू. १२४९ असावा असें आपलें मत दिलें आहे. वुइल्फोर्ड याला राम इ. पू. १६०० ते १७०० च्या मधील कालांत झाला असें वाटतें. गॉरिशिओ यानें आपल्या रामायणावरील निबंधांत रामाचा काल इ. पू. १४ वे शतकाचा प्रारंभ इतका ठरविला आहे. प्रो. याकोबीचे मतें रामायणकाल इ. पू. ६०० वर्षें आहे, तर मॉनियर वुइल्यम्सचे मतें तो इ. पू. ५०० वर्षें आहे. टॉडचे मतें इ.पू. १०० हाच रामायणकाल होय. गेऱ्याम् नामक एका जर्मन ज्योतिष्यानें इ.पू. १०५ मध्यें रामायण झालें असावें, असें आपलें मत दिलें आहे. पाश्चात्य विद्वानांच्या मतांचें हें दिग्दर्शन झालें. आतां आमचेकडील शोधकांचीं मतें पाहूं. कै. न्या. तेलंग यांनीं होमरवरून रामायण घेतलेलें या प्रो. वेबर याचे मताचें खंडन करितांना कालनिर्णयाविषयीं लिहिलें आहे; पण त्यांनीं स्वतंत्रपणें विचार केलेला नसून, इ. स. पूर्वी कांहीं शतकें रामायणाची रचना झाली असावी, असें त्यांचें मत एकंदरींत दिसतें. रा. ब. वैद्य यांनीं रामायणाची पुनर्रचना होऊन बनलेली आवृत्ति इ. स. पू. १००च्या सुमारास झाली असावी, असें ठरविलें आहे व यावरून मूळ ग्रंथ त्यापूर्वी कित्येक वर्षें

झाला असला पाहिजे, असें त्यांचें मत अनुमानितां येतें. त्याविषयीं त्यांनीं स्पष्टपणें कांहीं सांगितलेलें नाहीं. कै. दीक्षित यांनीं रामायणांतील राशीचे उल्लेखांवरून त्याचा कांहींतरी भाग शकपूर्व १५०० नंतरचा व कांहीं भाग त्यापूर्वीचा असावा असें सांगितलें आहे व हे दोन भाग निवड करून वेगवेगळे करणें कठीण आहे, असें आपलें मत दिलें आहे. रा. रा. अभ्यंकर यांनीं रामायणकाल इ.पू. २५०० पासून इ.पू. ४००० पर्यंत केव्हां तरी असावा, असा तर्क केला आहे. ज्ञानकोशकारांनीं इ. पू. २३५० वर्षे हा रामायणकाल सांगितला आहे.

रामायणकालाविषयीं अशा रीतीनें मतभेद फार आहेत; तथापि एकंदरींत पाश्चात्यांपैकीं एकावांचून सर्वांचें धोरण रामायणकाल इ. पू. १००० चे आंत आणण्याकडे आहे व आमचेकडील विद्वानांचा कल तो काल इ. पू. २००० चे सुमारें असावा, असें दाखविण्याकडे आहे. आमच्या प्राचीन ग्रंथांवरून व्यक्त होणारी आमच्या पूर्वजांचे ज्ञानाची विशालता जितकी प्राचीन असेल तितकी आह्मांस भूषणावह वाटते. तर तीच जितकी अर्वाचीन व पाश्चात्यांकडून उसनी घेतलेली ठरले तितकी तिकडील विद्वानांना इष्ट असते. कालनिर्णय या गोष्टींवर अवलंबून नाहीं व त्यांवरून तो करितां येत नाहीं, हें खरें; तथापि परस्परविरुद्ध दोन दिशांकडे असलेल्या या धोरणांस अनुसरून निर्णायक प्रमाणें निवडून काढण्याचा प्रयत्न करण्यांत येतो व त्या प्रयत्नांवरून त्यांचें त्यांचें धोरण अनुमित होतें. वरील सर्व मतांचें निरीक्षण करून त्यांवर टीका करावयाची म्हणजे हा आधींच लांबलेला विषय आणखी लांबवावयाचा असें होणार आहे आणि तसें करण्याची तादृश आवश्यकताहि नाहीं. कालनिर्णयाचे कामीं कोणते मुद्दे प्राय: घेण्यांत आले आहेत तेवढे घेऊन त्यांवर विवेचन करावयाचें आह्मीं ठरविलें आहे. व तसें केल्यानें सर्व मुद्यांचें निरीक्षण केल्यासारखें होणार आहे. वर ज्यांचीं मतें दिलीं आहेत त्यांपैकीं बेंटले या ज्योतिष्याचा मुद्दा चैत्रादि संज्ञा व ऋतुमान यांवर अवलंबून आहे. चैत्रादि संज्ञांचा प्रारंभ त्यानें इ. पू. ११८१ वे वर्षीं ठरविला आहे. वसंतसंपातीं सूर्य कधीं येतो हें गणितानें काढितां येतें; परंतु तेथें सूर्य

येण्याचे पूर्वी वसंतऋतु लागल्याचीं लक्षणें कांहीं प्रांतीं एक महिना तर कांहीं प्रांतीं दीड महिना दिसूं लागतात. ग्रंथांतील निर्देश वसंतसंपातीं सूर्य येण्याच्या कालाचे नसून सृष्टींत दिसणाऱ्या लक्षणांवरून अनुमित होणाऱ्या ऋतुकालाचे असतात व यामुळें निश्चित अनुमान करणें केव्हांहि कठीण आहे. कृत्तिकादिगणनेचा काल कृत्तिकांत संपात कधीं यावयाचा हें पाहून त्यावरून कळतो व हा काल श. पू. २४०० असल्याचें पूर्वी सांगितलें आहे. याच वेळीं वर्षारंभ मार्गशीर्षांत होऊं लागला. अर्थात् चैत्रादि संज्ञांचा काल याहून अलीकडे आणितां येणार नाहीं व यासाठीं वरील कालनिर्णयाविषयीं विचार करण्याचें कारण नाहीं. वसंतारंभ जितका उशिरां होतो असें गृहीत धरावें, तितका हा काल अलीकडे येत जाईल व बेंटले यानें वरील कालनिर्णय असाच केला आहे. बेंटले याचें दुसरें प्रमाण रामायणकालीं श्रावणांत वर्षारंभ होत असे, हें आहे. त्याच्या कल्पनेचें आधारभूत वचन पुढीलप्रमाणें आहे:—

**पूर्वोऽयं वार्षिको मासः श्रावणः सलिलागमः ।**
**प्रवृत्ताः सौम्य चत्वारो मासा वार्षिकसंज्ञिताः ॥ ४।२६।१४ ॥**

"हे सौम्य, वर्षऋतूंतील हा श्रावण मास असून वृष्टीला प्रारंभ झाला आहे; हे पावसाळ्याचे चार महिने प्रवृत्त झाले आहेत."

वालिवधानंतर किष्किंधानगरींत प्रवेश न करितां पावसाळा असल्यामुळें राम एका गिरिगुहेंत वास करण्यास गेले, त्या वेळीं त्यांनीं हनुमंताला उद्देशून केलेल्या भाषणांतील वरील वाक्य आहे. रामायणकालीं अधिक मासाची व्यवस्था नीट बसत नव्हती हें आम्हीं पूर्वी दाखविलें आहे; व ऋतुमान बरोबर होणें तीवर अवलंबून आहे, तेव्हां येथील ऋतुमानावरून कोणतेंहि निश्चित अनुमान करितां येणार नाहीं, असें आमचें मत आहे. चैत्रादि संज्ञांना प्रारंभ झाला त्या वेळीं "चैत्रवैशाख वसंतऋतु" ही परिभाषा प्रवृत्त झाली व त्या परिभाषेला अनुसरून श्रावण व भाद्रपद हे दोन वर्षऋतूचे महिने होतात. ही परिभाषा रामायणकालीं दृढ झाली होती व वरील निर्देश तदनुरूप आहे अशी आमची समजूत आहे.

सध्यां आमचेकडे ज्येष्ठमासीं प्रायः वर्षारंभ होतो व आषाढमासीं वृष्टि मुस-

ळधार होत असली तरी आम्ही तो ग्रीष्मऋतुच म्हणत असतों. वरील निर्देश याच प्रकारचा आहे. येथील भाषणाप्रमाणें श्रावणापासून चातुर्मास पावसाळा असें धरावयाचें तर रामाच्या याच भाषणांतील पुढील वाक्य पहा:—

कार्तिके समनुप्राप्ते त्वं रावणवधे यत ॥ ४।२६।१७ ॥

" कार्तिकमास प्राप्त झाल्यावर तूं रावणाचे वधाविषयीं यत्न कर. " अर्थात् कार्तिकमास लागतांच पावसाळ्याचे चार महिने समाप्त होतात, असें दिसतें. म्हणजे पावसाळ्याचा प्रारंभ आषाढांत, एक मास पाठीमागें गेला, असें होतें. सीताशुद्ध्यर्थ दक्षिणेकडे गेलेले अंगदादि वानर एका गुहेंत अडकून पडलेले होते व तींतून बाहेर पडल्यावर अंगद इतर वानरांना उद्देशून म्हणतो:—

वयमाश्वयुजे मासि कालसंख्याव्यवस्थिताः ।
प्रस्थिताः सोऽपि चा तीतः किमतः कार्यमुत्तरम् ॥४।५३।९॥

" आम्ही जी मुदत घेऊन आश्विन मासीं बाहेर पडलों, ती तर टळून गेली आहे; तेव्हां आतां पुढें काय करावयाचें ? "

पावसाळ्याचे चार मास संपल्यावर आश्विन मासीं ते बाहेर पडले, असें म्हणावयाचें तर पावसाळ्याचा प्रारंभ ज्येष्ठमासीं धरिला पाहिजे; मग श्रावणांत वर्षारंभ मानून त्यावर कालनिर्णय कसा करितां येणार ? वास्तविक वर्षारंभ श्रावणमासीं झाला व जोराच्या वृष्टीचे दोन महिने गेल्यावर आश्विनमासीं वानर बाहेर पडले हें सरळ दिसतें. पावसाळ्याचे महिने चार म्हणण्याची जी रूढि पडली आहे, तीस अनुसरून रामाचें वरील भाषण आहे. प्रत्यक्ष चार महिने घेतल्यास कशीच संगति लावितां येणार नाहीं. श्रावणांतील वर्षारंभावर कालनिर्णय मात्र करितां येणार नाहीं, हें वर सकारण सांगितलें आहेच.

बालकांडांतील विश्वामित्रोपाख्यानांत शकयवनादिकांचा उल्लेख आहे व तेथील यवनशब्दानें ग्रीक लोक अभिप्रेत असावे, असें धरून त्यावरून कित्येकांनीं कालनिर्णय करण्याचा प्रयत्न केला आहे. ग्रीक लोकांशीं आमचा संबंध अलेक्झांडरचे स्वारीनंतर आला व यामुळें तदनुरोधानें हा काल पुष्कळ अलीकडे यावयाचा, हें उघड आहे. यवनशब्दानें ग्रीकलोक विवक्षित असावे का

नाहीं हा प्रश्न आधीं वादग्रस्त आहे, आणि हें सर्व आख्यान प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. तेव्हां या प्रमाणावरून निर्णय कसा करावयाचा? किष्किंधाकांडांतील भूगोलवर्णन तर प्रक्षिप्त असल्याचें कोणालाहि पटण्यासारखें आहे; पण त्यांतूनहि कित्येकांनीं कांहीं प्रमाणें निवडून काढून कालनिर्णयाची जुळवाजुळव केलेली आहे. अशा डटपटित पायावर मोठ्या मंदिराची उभारणी कशा व्हावी? आणि केल्यास कशी टिकावी? या भूगोलवर्णनांत चारी दिशांकडील जे लोक व देश यांचीं नांवें आलीं आहेत, तीं देऊन प्रो. वेबर यानें रामायणकाल शकारंभाच्या सुमारास आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला आहे; पण तो वरील कारणास्तव व्यर्थ गेला आहे. प्रक्षिप्तत्वाचा हा मुद्दा बाजूला ठेवून दुसऱ्या प्रमाणांनीं रामायणकालाची प्राचीनता दाखवितां येण्यासारखी आहे. कै. न्या. तेलंग यांनीं पाणिनीचे अष्टाध्यायींत रामायणांतील कांहीं व्यक्तींच्या नांवांविषयीं जे विशेष नियम आले आहेत, त्यांची माहिती दिली आहे. पाणिनीचा काल ख्रि. पू. आठव्या शतकाचे अलीकडे कोणी आणीत नाहीं व त्यानें उल्लेखिलेले शब्द रामायणांतील कथेंत येऊन गेले आहेत, हें पाहिलें म्हणजे रामायणकाल त्याहून अलीकडे आणण्याचें धाडस कोणी करील, असें वाटत नाहीं. " सौमित्रि " हा शब्द पाणिनीच्या बाह्वादि गणांत ( ४।१।९६ ) व गहादि गणांत ( ४।२।१३८ ) आला आहे. " रवण " आणि " ककुत्स्थ " हे शब्द शिवादि गणांत ( ४।१।११२ ) आले असून त्यांवरून " रावण " व " काकुत्स्थ " हे शब्द सिद्ध होतात. " रावणि " शब्द तौल्वल्यादि गणांत ( २।४।६१ ) आला असून "केकय" शब्द भर्गादि गणांत ( ४।१।१७८ ) आला आहे व त्यावरून 'कैकेयी' शब्द होतो. यांपैकीं सौमित्रि व रावण हे शब्द महत्त्वाचे आहेत व त्यांवरून रामायणांतील प्रसिद्ध व्यक्ति पाणिनीला विवक्षित आहेत, असें मानणें भाग आहे. कै. न्या. तेलंग यांनीं दिलेल्या प्रमाणांत आणखी एका प्रमाणाची भर टाकून आटोपतें घेऊं. " नखमुखात् संज्ञायाम् " ( ४।१।५८ ) या सूत्रानें नख किंवा मुख शब्द अंतीं असतां सर्व शब्द मिळून कोणाची संज्ञा असेल तर ङीप् हा स्त्रीप्रत्यय करूं नये, असा नियम सांगितला आहे. या नियमाप्रमाणें शूर्प-

णखा, गौरमुखा हे शब्द ङीप् ( ई ) प्रत्यय न होतां टाप् ( आ ) हा अकारान्त शब्दांवरून होणारा सामान्य प्रत्यय होऊन झाले आहेत. येथील संज्ञेसंबंधाची अट महत्त्वाची आहे. शूर्पाप्रमाणें नखें असलेली स्त्री या अर्थी हा शब्द योजिला असेल, तर 'शूर्पणखी स्त्री' असें म्हणावयाचें आणि तें कोणा एका स्त्रीचें नांव असेल, तर 'शूर्पणखा' असें म्हणावयाचें, असा येथें भेद आहे. शूर्पणखा हें उदाहरण परंपरेनें चालत आलेलें आहे व यावरून हाच शब्द येथें विवक्षित असावा, असें दिसतें. हा शब्द तर रामायणांत प्रसिद्ध आहे व यावरून तो ग्रंथ पाणिनीचे पूर्वीचा, इतकेंच नव्हे, तर त्याचे वेळीं तो सर्वमान्य झाला होता व यासाठीं त्यांतील कांहीं संज्ञांविषयीं विशेष नियम त्याला सांगावे लागले हें स्पष्ट होत आहे. ज्या प्रकारचीं प्रमाणें पुढें घेऊन कित्येक पाश्चात्य विद्वानांनीं रामायण अर्वाचीन कालांतील ठरविण्याचे प्रयत्न केले, त्याच प्रकारचीं हीं प्रमाणें आहेत व यावरून पाणिनीचे फार पूर्वी रामायणाची रचना झाल्याचें दिसून येतें. शककालानंतर किंवा शकापूर्वी पांचशें-सहाशें वर्षेपर्यंत रामायणकाल ठरवूं पाहाण्याचे प्रयत्न तरी यावरून निरर्थक ठरत आहेत.

## रामायणाच्या प्रती.

रामायणांतील प्रक्षिप्त भागाविषयीं विचार करितांना आमचेकडील रामायणाचे प्रतीविषयींची माहिती दिली आहे व तीविषयीं अधिक माहिती पाहिजे तर ती प्रत येथें मिळण्यासारखी आहे. इतर प्रांतांतील प्रतींविषयीं माहिती देणें अवश्य आहे. महाभारताप्रमाणें रामायणाच्या निरनिराळ्या प्रती ताडून पाहिल्या तर त्यांत विशेष भेद दिसून येत नाहीं. वायव्यप्रांताकडील प्रत मात्र अगदीं भिन्न आहे व याकरितां रामायणाच्या खऱ्या प्रती दोन आहेत, असें मानणें भाग आहे. तेव्हां आतां या दुसऱ्या प्रतीविषयीं येथें माहिती द्यावयाची आहे. या प्रतीला गौड प्रत असें म्हणतात. ही प्रत आम्हांला पाहावयास मिळालेली नाहीं. याकरितां तीविषयीं अन्य ग्रंथांत दिलेल्या माहितीचा येथें संग्रह करणें भाग आहे. या प्रतीविषयींची माहिती रा. रा. अभ्यंकर यांनीं आपल्या रामायणावरील निबंधांत दिली असून तीच येथें संक्षेपानें देत आहों. ही प्रत गॉरिशिओ साहेबानें पारिसमध्यें इटॅलियन् भाषेंत छापून

सन १८४३ ते १८५० पर्यंत प्रसिद्ध केली आहे. प्रकाशकाचे नांवावरून हिला गॉरिशिओची प्रत असेंहि कोणी म्हणतात. गॉरिशिओनें या प्रतीचे पांच भाग केले असून पहिल्या भागास मोठी व इतरांस लहान लहान प्रस्तावना आहेत. शेवटीं थोडथोड्या टीपा आहेत. या प्रतीचे पहिल्या कांडांत प्रारंभीं अनुक्रमणिका सांगितली असून तींत सर्व कांडांतील सर्ग व श्लोक यांचें परिगणन केलें आहे. या अनुक्रमणिकेंत सर्ग व श्लोक यांची संख्या किती दिली आहे व त्याच ग्रंथाचे छापील प्रतींत ती आतां किती आढळते, याचें कोष्टक पुढें देत आहों.—

| | अनुक्रमणिका. | | छापील प्रत. | |
|---|---|---|---|---|
| कांड | सर्ग | श्लोक | सर्ग | श्लोक |
| १ | ६४ | २८५० | ८० | २२९२ |
| २ | ८० | ४१७० | १२७ | ४१२१ |
| ३ | ११४ | ४१५० | ७९ | २८४२ |
| ४ | ६४ | २९२५ | ६३ | २३०२ |
| ५ | ४३ | २०४५ | ९५ | ३३०० |
| ६ | १०५ | ४५०० | ११३ | ४९३६ |
| ७ | ९० | ३३६० | ० | ० |
| एकूण | ५६० | २४००० | ५५७ | १९७९३ |

या प्रतींत मुंबईप्रतीपेक्षां खालील सर्ग अधिक आहेत.

| | | |
|---|---|---|
| कांड | १ | सर्ग ४, १८, ७९, ८० |
| ,, | २ | ,, २१ ते २४, ३४, ५०, ६१, ६४, ७८ ते ८१, ८३ ते ८५, ८९, ९३, ९८ |
| ,, | ३ | ,, ४६, ४७ |
| ,, | ४ | ,, १०, २०, ६२, ६३ |
| ,, | ५ | ,, ३०, ५०, ७६, ८१ ते ८७ |
| ,, | ६ | ,, ३३, ३४, ४१, ८४, ९६ |

या प्रतींत मुंबईप्रतींतील पुढील सर्ग सांपडत नाहींत:—

| | | |
|---|---|---|
| कांड | १ | सर्ग ० |
| ,, | २ | ,, ३५, ४४, ४७, ७६, ७७, ९८ |
| ,, | ३ | ,, ३१, ६०, ६२, ६३ |
| ,, | ४ | ,, १३, २४, ५९ |
| ,, | ५ | ,, ३, ७, ८, २३, ३१, ३२, ३९, ४३, ५४ |
| ,, | ६ | ,, १० ते १५, २०, २३, २४, ४०, ५३, ५४, ७२, ८०, १०५ |
| ,, | ७ | ,, (सर्वच कांड) |

रामायणाची ही प्रत मुंबईचे प्रतीशीं कथेच्या दृष्टीनें भिन्न नसून श्लोक मात्र एकमेकांशीं मिळत नाहींत. रा. अभ्यंकर यांनीं दोन प्रतींतील बालकांड ताडून पाहिलें, तेव्हां दोन प्रतींत अगदीं एक असलेले श्लोक अवघे ४७ मिळाले. सर्गांचे आद्यंतहि कथेच्या दृष्टीनें दोहोंकडे एक नाहींत. मुंबईप्रतींत जी कथा दोन सर्गांत आली आहे, तेथें गौड प्रतींत कोठें एक सर्ग आहे; कोठें मुंबईप्रतींत एका सर्गांत सांगितलेली कथा गौडप्रतींत दोन सर्गांत विभागलेली आहे. गौडप्रतींतील अयोध्याकांड मुंबईप्रतींतील अयोध्याकांडाचे ११५ वे सर्गाचे शेवटीं संपतें, अरण्यकांड मुंबईचे किष्किंधाकाण्डाचे १ ल्या सर्गाचे शेवटीं संपतें, किष्किंधाकांड मुंबईच्या किष्किंधाकांडाचे ६३ वे सर्गाचे शेवटीं संपतें व सुंदरकांड मुंबईच्या युद्धकांडाच्या २२ वे सर्गाचे शेवटीं संपतें.

रा. रा. अभ्यंकर यांना ही प्रत मूळची असून तीवरून मुंबईप्रत झाली असें वाटत आहे; परंतु ही प्रत त्यांना वाटते इतकी प्राचीन नाहीं. कारण रामायणावरील प्राचीन टीकांमध्यें टीका केलेली नसल्यामुळें प्रक्षिप्त ठरलेले कित्येक सर्ग या प्रतींत आढळतात. अयोध्याकांडांतील सीतास्तनविदारणाची कथा, तसेंच अरण्यकांडांतील इंद्रानें भोजन पाठविल्याची कथा मुंबईप्रतीप्रमाणें या प्रतींतहि आहे व या कथांचे दोनहि सर्ग त्यांवर प्राचीन टीका नसल्यामुळें प्रक्षिप्त आहेत, हें उघड आहे; आणि यासाठीं ही प्रत प्राचीन आहे, असें म्हणतां येणार नाहीं.

या गौड प्रतीवरून लाहोर येथील दयानंदविद्यालयामार्फत रामायण प्रसिद्ध

होत असून तें अद्यापि पूर्ण झालेलें नाहीं; यामुळें दोन प्रतींची तुलना करून अधिक माहिती देतां येत नाहीं.

## कुशलवांना पढविलेलें रामायण.

वाल्मीकींनीं कुशलवांना ज्या वेळीं रामायण पढविलें, त्या वेळीं तें कोठपर्यंत रचिलें होतें, हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. यासंबंधीं स्पष्ट असा उल्लेख रामायणांत केलेला नाहीं. याकरितां रामायणांतील कांहीं उल्लेखांवरून या प्रश्नाचा अनुमानानें उलगडा केला पाहिजे. रामायणाचे प्रारंभीचे सर्ग वाचतांना वरील शंका उत्पन्न होते. प्रारंभींचे सर्ग प्रस्तावनेदाखल असून ते वाल्मीकींनीं मागून रचिले असले पाहिजेत, हें उघड आहे. हे सर्ग जरी प्रथम रचिलेले नसले तरी मागून सबंध काव्य म्हणतांना ते शिष्यांच्या तोंडीं घातल्यास अस्थानीं दिसत नाहींत. ज्याप्रमाणें हल्लींच्या पुस्तकांतून प्रस्तावना किंवा त्यांवरील अभिप्राय मागून लिहिले असले तरी प्रारंभीं दिलेले असतात व ते तशाच क्रमानें वाचणें सयुक्तिक असतें, त्याप्रमाणेंच रामायणाच्या प्रारंभींच्या सर्गांची गोष्ट आहे. अश्वमेधयज्ञाचे वेळीं जेव्हां कुशलवांनीं रामायण गायिलें, तेव्हां त्यांनीं प्रारंभींचे हे सर्ग म्हटले होते, असा उत्तरकांडांत स्पष्ट उल्लेख केलेला आहे:——

**एवं प्रभाषमाणेषु पौरजानपदेषु च ।**
**प्रवृत्तमादितः पूर्वसर्गं नारददर्शितम् ॥ ७।९४।१५ ॥**

"नगरांतील व राष्ट्रांतील लोक याप्रमाणें आपापसांत बोलत असतां नारदांनीं सांगितलेली कथा ज्यांत आहे त्या पहिल्या सर्गाला प्रथम प्रारंभ झाला."

या उल्लेखावरून हे सर्ग मागून कोणातरी प्रक्षेपकानें रचिले आहेत, असें म्हणतां येणार नाहीं. कुशलवांचें रामाशीं असलेलें नातें ज्यापक्षीं त्यांना अखेर सीतेचें दिव्य होईपर्यंत कळलें नव्हतें, त्यापक्षीं त्या नात्याचा द्योतक भाग तेव्हां रचिलेला नसावा, असें वाटतें. कारण हें नातें समजून त्यांनीं त्यासंबंधीं कोणताहि प्रयत्न केल्याचें रामायणांत लिहिलेलें नाहीं. सबंध रामायणाचें अध्ययन केल्यावर "रामाची सीता कोण व आपण तिचे कोण" हें न कळण्याइतके ते मूर्ख दिसत नाहींत; कळलें असूनहि प्रयत्न करावयाचा नाहीं इतके ते मनोविकारशून्य खास नव्हते; किंवा वाल्मीकींनीं त्यांना तशी इशारत दिल्याचें

रामायणांत कोठेंहि लिहिलेलें नाहीं. यावरून हें नातें कुशलवांना न कळविण्याची खबरदारी घेतली असली पाहिजे, हें उघड आहे. अश्वमेधाचे वेळीं रामायणकाव्य निरनिराळ्या स्थलीं म्हणण्याची वाल्मीकींनीं कुशलवांना आज्ञा केली, तेव्हां त्यांनीं त्यांना अशी सूचना केली कीं :—

आदिप्रभृति गेयं स्यान्न चावज्ञाय पार्थिवम् ।
पिता हि सर्वभूतानां राजा भवति धर्मतः ॥ ७।९३।१४ ॥

" हे लवकुशहो, तुम्ही रामायणाचें गायन प्रारंभापासून करा. राजाचा अनादर मुळींच करूं नका. कारण राजा हा धर्मदृष्ट्या पाहिलें तर सर्व प्राण्यांचा पिता आहे. "

राम हा खरोखर कुशलवांचा पिता असतां ज्यापक्षीं महर्षींनीं एवढा द्राविडी प्राणायाम करून त्याजकडे पितृत्व आणण्याचा प्रयत्न केला आहे, त्यापक्षीं कुशलवांना त्यांचा रामाशीं असलेला संबंध माहीत नव्हता व तो त्यांना स्पष्टपणें कळविण्याचा हा वेळपर्यंत तरी महर्षींचा इरादा नव्हता, असें उघड दिसून येतें. हा संबंध उत्तरकांडांत आलेला आहे. बालकांडांतील प्रारंभींच्या सर्गांत आलेला नाहीं. सीतात्यागाच्या कथेपासून हा संबंध कळूं लागतो. अर्थात् यापूर्वींच्या तेवढ्या कथा म्हणजे युद्धकांडाच्या समाप्तीपर्यंतचें रामायण वाल्मीकींनीं रचून कुशलवांना पढविलें होतें, असें दिसतें. रामायणांत जेथें कांडांच्या संख्येचा उल्लेख आलेला आहे, तेथें तो एकदम न करितां " षट्कांडानि तथोत्तरम् " असा वेगळा करून उत्तरकांडाची रचना मागून केल्याबद्दल अप्रत्यक्ष पुरावा दिलेला आहे. युद्धकांडाच्या शेवटीं जें गद्य* आहे, त्यांतील उल्लेखावरूनहि आमच्या म्हणण्यास पुष्टि येते. या गद्यांत " राजाधिराजस्य लोकाभिरामस्य निकटोक्तयोः श्रीरामात्मजयोरादिकविशिष्ययोः कुशलवयोराख्याने । " असे शब्द आहेत. यावरून वाल्मीकींनीं कुशलवांना शिकविलेला व त्यांनीं रामापुढें गायिलेला रामायणाचा भाग एवढाच होता, असें वाटतें. जर त्यांनीं उत्तरकांडासहित रामायणाचें अध्ययन केलें असतें, तर तसा उल्लेख शेवटीं दिला असता. रामायणाच्या रचनेसंबंधीं बालकांडांत जो कथाभाग आला आहे, त्यांतील उल्ले-

१ हें गद्य गॉरिशिओनें प्रसिद्ध केलेल्या रामायणाच्या प्रतींत नाहीं.

खावरून कुशलवांना पढविण्यापूर्वी वाल्मीकींनीं जें रामायण रचिलें, त्यांत रावणाचा वध करून राम सिंहासनावर बसेपर्यंत कथाभाग आला होता, असें दिसतें. ब्रह्मदेवांनीं वाल्मीकींला दिलेला वर असा होताः--

**धर्मात्मनो भगवतो लोके रामस्य धीमतः ।**
**वृत्तं कथय धीरस्य यथा ते नारदाच्छ्रुतम् ॥ १।२।३२ ॥**

" धर्मात्मा, बुद्धिमान् व धैर्यशील अशा त्या भगवान् रामचंद्राचें चरित्र नारदाच्या तोंडून तूं जसें ऐकिलें आहेस, त्याप्रमाणें कथन कर. "

नारदांनीं वाल्मीकींना जें रामचरित्र सांगितलें तें राज्याभिषेकापर्यंतच होतें. नारदांच्या भाषणांतील शेवटचा चरित्रविषयक श्लोकः--

**रामः सीतामनुप्राप्य राज्यं पुनरवाप्तवान् ॥ १।१।८९ ॥**

"रामाची व सीतेची भेट झाली आणि नंतर रामाला पुनः राज्य प्राप्त झालें."

हा असून त्यापुढें रामराज्यांत लोकस्थिति कशी राहील, तें वर्णन करण्यास प्रारंभ केला आहे. या सर्व गोष्टींवरून वर दिलेलें अनुमान सत्य आहे, असें दिसून येईल.

## वाल्मीकि रामानंतर कां बरोबर ?

" राम व वाल्मीकि समकालीन नसून रामानंतर हजारों वर्षांनीं वाल्मीकि झाला असावा असें दिसतें. " असें विधान रा. रा. अभ्यंकर यांनीं आपल्या रामायणावरील निबंधांत केलें आहे. ( पृष्ठ १७३ पहा ) वाल्मीकींनीं रामाचा जन्म होण्यापूर्वीं रामायण रचिलें होतें, या दंतकथेला तोडीस तोड म्हणून जर हें विधान केलें नसेल, तर सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें या विधानाची किंमत काय आहे तें ठरविणें अवश्य आहे. कांहींतरी प्रामाणिक आधार असल्याशिवाय कोणतेंहि विधान करणें आमच्या मतें अयोग्य आहे. दंतकथेला आधार नाहीं म्हणून ती सोडून दिली व दोघेहि एकाच काळीं होते येथपर्यंत आम्हीं आलों आहों. यापुढें एकदम उडी मारण्यास आम्हांला आधार सांपडत नाहीं व अभ्यंकर यांनींहि आपल्या पुस्तकांत दिलेला नाहीं. या विधानाच्या पुष्टयर्थ म्हणून 'वाल्मीकि महर्षि एक नसून अनेक होते' असाहि मजकूर आम्हीं एके स्थलीं वाचला आहे. मागें ज्याप्रमाणें एका ज्ञानेश्वराचे दोन ज्ञानेश्वर करण्याचा प्रयत्न

झाला व तो शेवटीं व्यर्थ झाला, त्याप्रमाणेंच एका वाल्मीकीचे अनेक वाल्मीकि करण्याचा हा प्रयत्न आहे, असें आह्मांस वाटतें. वाल्मीकि व रामचरित्र यांचा संबंध परस्परांत इतका गुंतलेला आहे कीं, वाल्मीकींना रामाच्या पुढें हजारों वर्षें ओढावयाचें असल्यास रामाच्यापुढें एक तरी वाल्मीकि उभा केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ही अडचण लक्षांत आणून वरील तोड सुचविलेली असावी. दोन वाल्मीकि मानिले तरी संगति कशी लावावयाची, तें कळत नाहीं. रामायणकार वाल्मीकि रामाच्या मागून झाले तर सीतेला आपल्या आश्रमांत आश्रय देणारे वाल्मीकि कोणते, असा प्रश्न येणार! म्हणून वरील तोड काढून हीं कार्यें दोहोंकडे विभागून दिलीं आहेत. रामायणकार वाल्मीकि व सीतेला आश्रय देणारे वाल्मीकि हे जर दोन वेगळे पुरुष मानिले तर त्याच कथेच्या अनुषंगानें वाल्मीकींनीं सीतेकडून रामाच्या दरबारांत दिव्य करविलें ही कथा ओघानें पुढें येणार आहे. मग या वेळीं कुशलवांनीं कोणतें रामायण गायिलें हा प्रश्न पुढें उभा राहतो. रामाच्या वेळीं जर रामायणकार वाल्मीकि नव्हते म्हणजे रामायणहि रचिलेलें नव्हतें, तर कुशलवांनीं रामाच्या दरबारांत रामायण गायिलें व सीतेनें दिव्य केलें या कथा प्रक्षिप्त मानावयाच्या कीं काय? वाल्मीकि हे एकच होते असें मानून जर त्यांना रामाच्या पुढें हजारों वर्षें आणून सोडिलें, तरीहि हा प्रश्न तसाच राहणार. कुशलवांनीं रामाच्या दरबारांत रामायणाचें गायन केलें व नंतर सीतेनें दिव्य केलें या कथा अत्यंत महत्त्वाच्या आहेत; आणि त्या नसल्या तर रामायणाची पूर्तता व्हावयाची नाहीं, अशी आमची समजूत आहे. नाहीं तर बालकांडाच्या प्रारंभीं असलेले प्रस्तावनेदाखल सर्ग व संबंध उत्तरकांड प्रक्षिप्त मानावें लागेल. हे भाग प्रक्षिप्त नसून खुद्द वाल्मीकींनीं लिहिले असले पाहिजेत, असें या पुस्तकांत दाखविलेलें आहे. यांतील जेवढा भाग प्रक्षिप्त आहे त्यास हा नियम लागू नाहीं हें सांगावयास नकोच. तेव्हां या महत्त्वाच्या कथा प्रक्षिप्त मानावयाचें धाडस जर करावयाचें नसेल तर वाल्मीकि महर्षि एकच असून ते रामाच्या वेळीं होते व त्यांनीं रामायण रचिलें असें मानणें अवश्य आहे.

## मेघनादवध आणि सीतेवरील आक्षेप.

रामचरित्रावर निरनिराळ्या भाषेंत पुष्कळ ग्रंथ आहेत. सर्व ग्रंथांना वाल्मीकि-

रामायणाचाच आधार नसून पुराणांतरीं सांगितलेल्या रामचरित्रांतील कथांचा त्यांत अनुवाद केलेला असतो. यामुळें हीं चरित्रें वाल्मीकिरामायणाहून पुष्कळ स्थलीं वेगळ्या रीतीनें सांगितलेलीं असतात. रामचरित्रावर विचार करून त्यांतील पात्रांच्या स्वभावांचें यथोचित चित्र रेखाटण्याचें काम फार थोड्या चरित्रकारांनीं केलें आहे. बंगाल्यांतील प्रसिद्ध कवि माइकेल मधुसूदन दत्त यांनीं रामायणांतील कथाभाग घेऊन " मेघनादवध " नांवाचें एक काव्य बंगाली भाषेंत केलें आहे. हें काव्य आह्मांला वाचावयास मिळालेलें नाहीं; तथापि त्यांतील विषयासंबंधी आह्मांला एके ठिकाणीं जी माहिती मिळाली आहे तीवरून या कवीच्या वाल्मीकिरामायणासंबंधींच्या मताची वाचकांस ओळख करून देऊन त्यावरील आमचे विचार येथें सादर करणार आहों. इतर कवींहून या कवीचा विशेष हा आहे कीं, त्यानें वाल्मीकिरामायणांतील दोष काढून टाकावयाचा प्रयत्न केला आहे. हा दोष स्वभावाचें चित्र रेखाटतांना झाला आहे, असें सदर कवि म्हणतात. वाल्मीकिरामायणांत कोणताहि दोष असणें शक्य नाहीं, असें आम्हीं म्हणत नाहीं; तरी स्वभावचित्र रेखाटणाऱ्या कुशल कारागिरांत महर्षींची प्रमुखत्वानें गणना केली पाहिजे, असें आमचें ठाम मत आहे. सदर कवींचे वाल्मीकींवर दोन आरोप आहेत, ते हे:-( १ ) मारीचानें सुवर्णमृग होऊन रामाला अरण्यांत लांब नेल्यावर रामबाणानें विव्हळ होऊन त्यानें रामासारखा स्वर काढिला व लक्ष्मणाच्या नांवानें हांका मारिल्या तेव्हां रामाच्या साह्याकरितां लक्ष्मण जात नाहीं असें पाहून सीतेनें त्याची जी अगदीं कटुशब्दांनीं निर्भर्त्सना केली आहे ती तिच्यासारख्या स्त्रीला शोभत नाहीं; व ( २ ) राक्षसांचा वध झाल्याचें ऐकून सीतेनें जो हर्ष दाखविला आहे तोहि तिला शोभत नाहीं.

दोनहि प्रश्नांसंबंधानें जो विचार करावयाचा आहे तो केवळ त्या ठिकाणीं स्वाभावचित्र रेखाटतांना दोष दिसतो कीं काय, याबद्दलचा होय. ऐतिहासिक दृष्टया हे दोनहि प्रश्न कुचकामाचे आहेत. रामायण ही कादंबरी नसून इतिहास आहे; व तो लिहितांना झालेल्या गोष्टींचें वर्णन करण्यापलिकडे लेखकाचें काम नाहीं, हें मनांत आणिलें म्हणजे वाल्मीकींवर कोणताहि दोष लादतां

येणार नाहीं. एक सर्वोत्कृष्ट चरित्र म्हणून रामायण महर्षींनीं लिहिलें असें जरी असलें तरी ज्या गोष्टी होऊन गेल्या त्याला त्यांचा काय उपाय ? वालीचा कपटानें वध केल्याबद्दल रामचरित्रावर अक्षय्य कलंक लागून राहिला आहे. श्रीयुत दत्त यांच्या दृष्टीनें पाहतां, वालिवधाचें वर्णन अन्य तऱ्हेनें-रामावर दोष न येईल अशा रीतीनें-करणें आवश्यक होतें असें म्हणावें लागेल. चरित्रनायकाचे गुणांवर मात्र प्रकाश पाडून त्याचे दोष झांकून ठेविण्याची लपंडावी महर्षींच्या हातून कशी होणार ? आतां ऐतिहासिक दृष्ट्या विचार केल्यामुळें कवीवरील आरोप नाहींसा झाला तरी त्या व्यक्तीवर तो शिल्लक राहातो. याकरितां झालेली गोष्ट मनुष्यस्वभावास अनुसरून झाली आहे किंवा नाहीं याचा आतां विचार करूं.

सीतेवरील पहिला आरोप असा आहे कीं, तिनें लक्ष्मणाची इतक्या कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना करणें योग्य नव्हतें. कारण आपली माता व पत्नी यांचा त्याग करून तो केवळ बंधुप्रेमामुळें त्यांचेबरोबर अरण्यांत आला होता. असें असतां सीता त्याला अगदीं टाकून बोलली व त्याचेबद्दल भलताच संशय तिनें प्रदर्शित केला. सीतेचें हें भाषण खालीं देत आहों:—

**सौमित्रे मित्ररूपेण भ्रातुस्त्वमसि शत्रुवत् ।**
**यस्त्वमस्यामवस्थायां भ्रातरं नाभिपद्यसे ॥३।४५।६॥**
**अनार्य करुणारंभ नृशंस कुलपांसन ।**
**अहं तव प्रियं मन्ये रामस्य व्यसनं महत् ॥ २२ ॥**
**रामस्य व्यसनं दृष्ट्वा तेनैतानि प्रभाषसे ।**
**नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण यद्भवेत् ॥ २३ ॥**
**त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिषु ।**
**सुदुष्टस्त्वं वने राममेकमेकोऽनुगच्छसि ॥ २४ ॥**
**मम हेतोः प्रतिच्छन्नः प्रयुक्तो भरतेन वा**
**तन्न सिध्यति सौमित्रे तवापि भरतस्य वा ॥ २५ ॥**
**कथमिन्दीवरश्यामं रामं पद्मनिभेक्षणम् ।**
**उपसंश्रित्य भर्तारं कामयेयं पृथग्जनम् ॥ २६ ॥**

"हे लक्ष्मणा, तूं आपल्या भ्रात्याशीं मित्रत्वानें वागतोस, परंतु खरोखर तूं त्याचा शत्रु आहेस. कारण त्याजवर असला प्रसंग आला असतांहि तूं त्याजकडे जात नाहींस! हे अनार्या, तूं आमच्यापाशीं दरेनें वागत होतास; परंतु तूं दुष्ट आहेस; ( आणि अशा वर्तनानें ) तूं आपल्या कुलाला कलंक लावीत आहेस. मला वाटतें, रामावर संकट येणेंच तुला इष्ट आहे. रामावर संकट आलेलें पाहून तूं अशीं भाषणें करूं लागला आहेस ! हे लक्ष्मणा, तुझ्यासारख्या शत्रूनें अशा रीतीनें वागणें यांत कांहीं खरोखर आश्चर्य नाहीं. कारण तुझ्यासारखे दुष्ट शत्रु आपला हेतु गुप्त ठेवूनच नेहमीं व्यवहार करितात. तूं तर अत्यंत दुष्ट आहेस; आणि माझी इच्छा धरून अथवा भरताच्या सांगण्यावरून तूं आपलें स्वरूप गुप्त ठेवून राम वनांत एकटा जात असलेला पाहून त्याच्या मागोमाग आला आहेस; परंतु हे लक्ष्मणा, ( मी तुला बजावून ठेवित्यें कीं, ) तुझा किंवा भरताचा हा हेतु सिद्धीस जाणार नाहीं. माझा पति राम कमलाप्रमाणें श्यामवर्ण असून त्याचे डोळे कमलाच्या पानांप्रमाणें सुंदर आहेत. अशा पुरुषाचा आश्रय केल्यावर ( तुझ्यासारख्या ) क्षुद्र पुरुषाची मी कशी बरें इच्छा करीन ? "

सीतेचे हे उद्गार तिच्या नेहमींच्या स्वभावाविरुद्ध दिसतात, हें आम्हांलाहि मान्य आहे. आतां ज्या वेळीं तिनें हें भाषण केलें आहे, त्या वेळीं तें अशा रीतीनें होणें शक्य आहे किंवा नाहीं, हें पाहिलें पाहिजे. या वेळीं आपल्या भर्त्याचे आसन्नमरण स्थितींत उच्चारिलेले शब्द तिच्या कानीं आले होते. पतीवर अकृत्रिम प्रेम करणाऱ्या सीतेसारख्या स्त्रीला त्याच्या रक्षणाचा यत्न करण्यापलीकडे कांहीं सुचणें अशा वेळीं शक्य नाहीं. शिवाय लक्ष्मणाला तिनें एकदां जा म्हटलें तरी तो न गेल्यामुळें ती अत्यंत उद्विग्न होऊन सारासारविचारशून्य झाली होती. अगदीं आपत्कालीं देखील हातीं घेतलेलें कार्य शांतचित्तानें करीत राहणें हें थोर मनुष्याचें लक्षण आम्ही अमान्य करीत नाहीं; तथापि जगांत कधींकधीं प्रसंगच असे येतात कीं, त्या वेळीं मनुष्य कितीहि खंबीर असला तरी कांहीं वेळ त्याचें चित्त अस्थिर होणें अपरिहार्य असतें. सीतेवरील हा प्रसंग या प्रकारचा होता. लोकानुरंजनाकरितां रामानें तिचा

त्याग केला, त्या वेळीं तिचें मन स्वतांच्या पावित्र्याबद्दल ग्वाही देत असल्यामुळें तिचें धैर्य गळालें नाहीं. शारीरिक छलासारख्या आपदांस थोर पुरुष कधींच भीक घालीत नाहींत. सीता या नियमास अपवाद नव्हती; परंतु हा प्रसंग धैर्याचा नसून प्रेमाचा होता. आपला पति आसन्नमरणस्थितींत आक्रोश करीत असतां सीतेनें स्वस्थ राहणें शक्य आहे काय ? लक्ष्मण जात नाहीं, म्हणून स्वतः तिनें पुढें जाणें शक्य नव्हतें व गेल्यास इष्टकार्य करण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं नव्हतें. लक्ष्मणाच्या मनांत रामाच्या सामर्थ्याविषयीं पूर्ण खात्री असल्यामुळें व सीतेच्या रक्षणार्थ आश्रमांत रहाण्याची त्याची आज्ञा असल्यामुळें त्याला सीतेला एकटी अरण्यांत टाकून जातां येईना. अशा स्थितींत सीतेनें करावयाचें तरी काय ? कसेंहि करून लक्ष्मणाला बाहेर काढणें तिला आवश्यक होतें. निर्वाणीचा म्हणून तिनें हा निर्भर्त्सनेचा मार्ग स्वीकारिला होता. जर ती या वेळीं निरुपाय होऊन स्वस्थ बसली असती तर पतीवरील तिच्या प्रेमाची उत्कटता दिसून आली नसती; आणि तिच्या सौम्य शब्दांनीं जर लक्ष्मण निघून गेला असता, तर त्याच्यावर आज्ञाभंगाचा दोष आला असता. इतक्या मर्मभेदक शब्दांनीं सीतेनें त्याची निर्भर्त्सना केल्यामुळें तो निरुपाय होऊन वनांत गेला; तरी रामानें सर्व दोष त्याच्यावर ठेविण्यास कमी केलें नाहीं. राम परत येत असतां वाटेंत त्याला लक्ष्मण भेटला. तेव्हां त्यानें हा सर्व वृत्तांत ऐकून स्पष्ट सांगितलें कीं:--

**न हि ते परितुष्यामि त्यक्त्वा यदसि मैथिलीम् ।**
**क्रुद्धायाः परुषं श्रुत्वा स्त्रिया यत्त्वमिहागतः ॥ ३।५९।२३ ॥**
**सर्वथा ह्यपनीतं ते सीतया यत्प्रचोदितः ।**
**क्रोधस्य वशमागम्य नाकरोः शासनं मम ॥ २४ ॥**

" सीता अत्यंत क्रुद्ध होऊन तुला फार कठोर बोलली ( ही गोष्ट खरी आहे ), परंतु तें ऐकून तिला तूं ( अरण्यांत एकटी ) टाकून आलास, हें कांहीं मला बरें वाटत नाहीं. सीतेच्या सांगण्यावरून तूं जरी येथें आला आहेस, तरी ( तिच्या भाषणानें ) राग येऊन तूं रागाच्या स्वाधीन झालास व माझ्या आज्ञेचें उल्लंघन केलेंस, हा सर्वथा तुझा अपराध आहे. "

एकंदरींत वाल्मीकिरामायणांत असलेलें सीतेचें भाषण आहे त्याच पद्धतीनें असणें श्रेयस्कर आहे. त्यांत फेरफार केल्यास या दोन प्रमुख पात्रांस कमी-पणाच येईल.

आतां दुसऱ्या आरोपाचा विचार करूं. हा आरोप पहिल्यापेक्षां कमी प्रतीचा आहे. राक्षसांचा वध झाल्याबद्दल तिला कांहींतरी खेद झाला पाहिजे होता, असें आक्षेपकांचें म्हणणें आहे. स्त्रीजातीचा स्वभाव कोमल असतो, हें आम्हीहि कबूल करितों; परंतु भयंकर रीतीनें आपला छल करणारास योग्य शासन झालें असतां त्याच्या दुःखानें आपण पोळून जाणें ही दयेची कल्पना सर्वत्र शोभत नाहीं. मनुष्याच्या सहनशीलतेसहि कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं? केवळ सीतेचा छल झाला असता तर वरील कल्पनेला कदाचित् अयोग्य म्हणतां आलें नसतें; परंतु राक्षसांच्या छलाचा परिणाम सर्व प्राण्यांवर होत असल्यामुळें त्यांविषयीं अल्पहि करुणा प्रदर्शित करणें अन्यायाचें आहे. सीतेनें आनंद प्रदर्शित केला, यांत आमच्या मतें कांहीं गैर नाहीं. सीतेच्या व सर्व प्राण्यांच्या त्या वेळीं होत असलेल्या छलाकडे दृष्टि दिली तर अजूनहि तिच्या अंतःकरणांत दया उत्पन्न व्हावी, अशी तिची मनःस्थिति असणेंच शक्य नाहीं. दयेची कल्पना जर अशा रीतीनें वाहवूं दिली तर साधूंच्या परि-त्राणाकरितां दुष्टांचा नाश करणाऱ्या परमेश्वरालाहि दोष द्यावा लागेल! या-करितां सीतेवरील हा आरोप वृथा आहे, असें आम्ही स्पष्ट म्हणतों.

## उत्तरकांडांतील प्रक्षिप्तभागाचा काल.

मागील भागांत आम्हीं लिहिलेंच आहे कीं, उत्तरकांडाइतका घोंटाळा रामायणांत कोठेंहि नाहीं. रामायणांतील निरनिराळ्या पात्रांविषयींच्या पुराणां-तरीं सांगितलेल्या कथा या कांडांत एकत्र केल्या आहेत. या कथा लिहितांना प्रक्षेपकानें कोणत्या कालांतील कथा आपण लिहीत आहों, याचा विचार न करितां कांहीं गोष्टींचा संबंध अलीकडील गोष्टींशीं आणून जोडिला आहे. उत्तर-कांडांतील ३६ व्या सर्गांत मारुतीविषयीं खालील माहिती दिली आहे:—

**स सूत्रवृत्त्यर्थपदं महार्थं । ससंग्रहं सिध्यति वै कपीन्द्रः ॥**
**न ह्यस्य कश्चित्सदृशोऽस्ति शास्त्रे । वैशारदे छंदगतौ तथैव ॥४५॥**

" सूत्रें ( पाणिनीची अष्टाध्यायी ) , त्यांवरील ( कात्यायनाचें ) वार्तिक, ( पतंजलीचें ) महाभाष्य, ( व्याडीचा ) संग्रह यांचें त्या मारुतीनें अध्ययन केलें असून तो त्यांत निष्णात आहे. शास्त्र, विद्वत्ता व वेदांचें ज्ञान यांमध्यें याच्या-बरोबरीचा जगांत कोणी नाहीं. "

यांत सांगितलेले कांहीं ग्रंथ शककालापूर्वी दोनतीनशें वर्षें रचिलेले आहेत. मग ते अध्ययन करण्यास मारुती कोठें येणार ? अशा तऱ्हेचा घोंटाळा असल्यामुळें सर्व उत्तरकांड वाल्मीकींनीं लिहिलें नसून मागून कोणीं तरी लिहिलें व पूर्वीच्या षट्कांडांस जोडिलें, अशी कांहींची कल्पना आहे. या कल्पनेला, गॉरिशिओच्या प्रतींत उत्तरकांड छापिलेलें नाहीं, याशिवाय कोणताहि आधार नाहीं. प्रक्षिप्त भागाविषयीं विचार करितांना जवळजवळ निम्मा भाग आम्हीं प्रक्षिप्त ठरविलेला आहे. असें असलें तरी सबंध उत्तरकांड प्रक्षिप्त ठरविण्यास आमची मनोदेवता सांगत नाहीं. गॉरिशिओची प्रत फार प्राचीन असती तर तिच्याविरुद्ध लेखणी उचलणें आम्हांला जड वाटलें असतें; पण ही प्रत इतकी प्राचीन नाहीं. उघडपणें प्रक्षिप्त दिसणारे पुष्कळ सर्ग गॉरिशिओच्या प्रतींत आहेत. शिवाय उत्तरकांडाशिवाय रामायणाची पूर्तता होत नाहीं. सीतेचा त्याग व तिचें दिव्य या कथांचा रामचरित्राशीं अगदीं निकट संबंध आहे. हा संबंध तोडल्यास रामचरित्रांतील महत्त्वाच्या भागास आम्ही आंचवणार आहों. गॉरिशिओच्या प्रतींत उत्तरकांड नसलें तरी तें ज्या प्रतीवरून त्यानें आपलें रायायण छापिलें त्या प्रतींत होतें, हें आम्हीं पूर्वीं दाखविलें आहे. याविषयीं त्याच प्रतींत एक अंतःप्रमाण आढळलें आहे, तें आतां येथें सादर करितों. बालकांडांतील ४ था सर्ग प्रक्षिप्त मानिला पाहिजे, असें आम्हीं पूर्वीं प्रतिपादन केलें आहे. या सर्गांतील प्रसिद्ध वादविषयक श्लोक गॉरिशिओच्या प्रतींतहि छापिलेला* आहे. हा श्लोक पुढें देत आहों:—

१ पुणें डेक्कन कॉलेजांत गॉरिशिओनें प्रसिद्ध केलेल्या रामायणाची एक प्रत आहे, तींत हा श्लोक आहे काय तें पाहण्यास आम्हीं रा. रा. वासुदेव गोविंद आपटे यांस लिहिलें होतें; त्यांनीं दिलेल्या माहितीवरूनच वरील विधान केलें आहे.

चतुर्विंशत्सहस्राणि श्लोकानामुक्तवानृषिः ।
तथा सर्गशतान्पंच षट्कांडानि तथोत्तरम् ॥ ३ ॥

" महर्षि वाल्मीकींच्या या काव्यांत चोवीस हजार श्लोक, पांचशें सर्ग, सहा कांडें, तसेंच उत्तरकांड हीं आहेत. "

या श्लोकांत वाल्मीकींनीं उत्तरकांड रचिलें असल्याबद्दल स्पष्ट लिहिलेलें आहे. या श्लोकावर रा. रा. अभ्यंकर यांची दृष्टि गेली असती तर गॉरिशिओच्या प्रतींत उत्तरकांड कां छापिलेलें नाहीं हें त्यांच्या लक्षांत आलें असतें व अशा डळमळित पायावर त्यांनीं वरील विधान केलें नसतें. उत्तरकांड छापिलें नाहीं ही गॉरिशिओची चूक होती व त्याकरितां उत्तरकांडाला उगाच शिक्षा भोगावी लागत होती.

आतां अर्वाचीन कालांतील ज्या गोष्टींचे उल्लेख पाहून उत्तरकांडाविषयीं शोधकाचें मन साशंक होतें त्यांची काय वाट लावावयाची हा प्रश्न शिल्लक राहिला आहे, त्याचा विचार करूं. मागें विवेचन करून जे सर्ग आम्हीं प्रक्षिप्त ठरविले आहेत ते सोडून देतां, उत्तरकांडांत जो भाग उरतो त्यांत आह्मांला एकहि शंकास्पद स्थल आढळत नाहीं. ज्या सर्गांत अर्वाचीन कालांतील गोष्टींचा उल्लेख आलेला आहे ते सर्व आम्हीं प्रक्षिप्त ठरविलेल्या भागांत अनायासें येऊन गेले आहेत. असल्या उल्लेखांवरून ते प्रक्षिप्त आहेत असें ठरविण्याची आह्मांला जरूर लागली नाहीं. ज्या कथा असल्याशिवाय रामायणाची पूर्तता व्हावयाची नाहीं असें आह्मीं वर लिहिलें आहे, तेवढाच भाग आतां उत्तरकांडांत शिल्लक राहिला आहे. तेव्हां वरील प्रश्नास अवकाश उरत नाहीं, हें वेगळें सांगावयास नको.

रामायणांतील मूळच्या उत्तरकांडाला हा भाग कधीं जोडण्यांत आला हें सांगणें कठीण आहे. तथापि ज्यापक्षीं अर्वाचीन कालांतील कांहीं गोष्टींचे उल्लेख त्यांत येऊन गेले आहेत त्यापक्षीं त्या गोष्टी घडल्यानंतर वरील भाग उत्तरकांडाला जोडिला असावा, असें म्हणणें भाग आहे. या उल्लेखांशीं संबंध नसलेला भाग कदाचित् त्याहून प्राचीन असेल. आह्मांला कोणतेंहि विधान निश्चयानें करितां येणें अशक्य आहे; तथापि एकंदरींत तो फार प्राचीन नव्हे.

महाभारतकाळींहि हा भाग रामायणांत होता असें दिसत नाहीं. रा. रा. अभ्यंकर यांच्या "रामायणानंतरचें भारत" या निबंधांत रामायणांतील ज्या कथांचे भारतांत उल्लेख आहेत त्यांची माहिती दिली आहे. तीवरून पाहतां उत्तरकांडांतील मागील भागांत आम्हीं प्रक्षिप्त ठरविलेल्या सर्गांत आलेल्या एकाहि कथेचा महाभारतांत उल्लेख नाहीं, असें दिसतें. ज्या कथांचा उल्लेख आहे त्या प्राक्षिप्त भागांतील नाहींत. समग्र रामायण भारतरचनाकालीं तयार झालें होतें असें या बाबीविषयीं विचार करितांना रा. रा. अभ्यंकर यांनीं वरील निबंधांत आपलें मत दिलें आहे. अर्थात् प्रक्षिप्त ठरविलेला उत्तरकांडांतील भाग भारतकालीं रामायणांत येणार. ते लिहितात—

"पांच, अकरा, बारा, एकतीस व चाळीस या उताऱ्यांतील कथा उत्तरकांडांत आल्या आहेत. यावरून भारताचे वेळीं उत्तरकांड होतें यांत संशय नाहीं. उत्तरकांडांत पुष्कळ कथा अशा आहेत कीं, त्यांचा रामायणाशीं फारसा संबंध नाहीं व मागील सहा कांडांशीं तुलना केली असतां हें मागून झालें असावें असें वाटतें. असें जरी असलें तरी भारताचे वेळीं समग्र रामायण तयार झालें होतें, एवढेंच नव्हे तर राम ज्या स्थानीं राहिले होते त्यांस तीर्थत्व प्राप्त झालें होतें, हें सहा, सात व आठ या उताऱ्यांवरून दिसून येईल."

—रामायणानंतरचें भारत.

आमच्या मतें उत्तरकांडांतील प्राक्षिप्त भाग सोडून देतां, राहिलेला सर्व भाग भारताचे वेळीं होता. सध्यां उपलब्ध असलेल्या रामायणाच्या प्रतींत जें उत्तरकांड आहे, तें सर्व भारताचे वेळीं होतें असें जें अभ्यंकर लिहितात तें मात्र आम्हांस मान्य नाहीं. रामायणांतील ज्या कथांचा उल्लेख भारतांत असल्याबद्दल त्यांनीं आपल्या निबंधांत उतारे दिले आहेत, त्यांवरून आमचें असें मत झालें आहे. सहा, सात व आठ या उताऱ्यांत राम ज्या स्थानीं राहिले होते त्यांस तीर्थत्व प्राप्त झाल्याचें वर्णन आहे; परंतु हीं स्थलें उत्तरकांडांतील आम्हीं प्रक्षिप्त ठरविलेल्या भागांत येत नाहींत. तसेंच उत्तरकांडांतील कथांचे उल्लेख असलेले म्हणून जे त्यांनीं पांच, अकरा, बारा, एकतीस व चाळीस हे उतारे घेतले आहेत, त्यांतील एकीशिवाय सर्व कथा आम्हीं मूळ म्हणून ठरविलेल्या उत्तरकां-

डांतच येतात. एकतिसाव्या उताऱ्यांत ब्राह्मणाचा मृत पुत्र उठविल्याच्या कथेचा उल्लेख आहे. भारतांत आलेल्या उल्लेखावरून तेवढीच कथा भारताचे वेळीं होती असें म्हणावें लागेल. तथापि ही कथा मूळ रामायणांत नसून प्रक्षिप्त असली पाहिजे हें व ती कोणत्या पुराणांतून रामायणांत आली आहे. हें आह्मीं मागें दाखविलेंच आहे. ऋषींनीं रामाला कथा सांगितल्याचा जो बराच भाग उत्तरकांडांत प्रक्षिप्त ठरविलेला आहे त्यासंबंधीं भारतांत मुळींच उल्लेख नाहीं. भारतांत ज्या ठिकाणीं समग्र रामचरित्रें सांगितलीं आहेत त्यांत रामाच्या राज्याभिषेकापर्यंत कथा सांगून पुढें त्यानें अश्वमेधादि यज्ञ केल्याचें सांगितलें आहे. ऋषींनीं सांगितलेल्या कथांतील एकाद्या कथेचा उल्लेख यदाकदाचित् कोठें आढळला तरी त्यास महत्त्व नाहीं. अध्यात्मरामायणांत ज्याप्रमाणें त्या कथा न सांगतां 'ऋषींनीं कथा सांगितल्या,' एवढ्या गोष्टीचा उल्लेख आला आहे, त्याप्रमाणें भारतांत उल्लेख असता तर त्याला महत्त्व होतें. त्यांतील एकाद्या कथेचा उल्लेख आढळला तर तो रामायणांतीलच आहे, असें म्हणतां येणार नाहीं. त्या कथा पुराणांतरीं आढळत असल्यामुळें असा उल्लेख त्या त्या ग्रंथांवरून केला नसेल कशावरून? शिवाय या कथांचा उल्लेख भारतांत आला नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. कदाचित् एकादा सांपडल्यास त्याबद्दल वर लिहिल्याप्रमाणें समाधान करून घेतलें पाहिजे. तेवढयावरून रा. अभ्यंकरांचें अनुमान कसें मान्य करावें? एवंच भारताचे वेळीं उत्तरकांडांतील प्रक्षिप्त भाग रामायणांत नव्हता, हें निर्विवाद आहे. तो शककालापूर्वीं केव्हांतरी रामायणास जोडण्यांत आला असावा.

## रामाचे एकपत्नीव्रतावरील आक्षेप.

रामाचें एकपत्नीव्रत फार क्वचित् आढळणाऱ्या अमूल्य गुणांपैकीं एक आहे. या एका गुणामुळें रामचरित्राची पायरी बरीच वर चढली आहे, यांत शंका नाहीं व यामुळें 'रामाला सीतेशिवाय आणखी स्त्रिया होत्या' आणि 'असें रामायणांतच लिहिलें आहे' असें कोणीं म्हटलें तर तें संभवनीय तरी वाटेल काय? पण अशी गोष्ट घडून आली आहे खरी. रा. ब. वैद्य यांनीं आपल्या ग्रंथांत असा आक्षेप घेतला आहे. मात्र आक्षेप घेतांना तो त्यांनीं

रामचरित्रावर उघडपणें न घेतां प्रक्षेपक कवीवर घेतला आहे, हें खरें आहे; परंतु अन्य प्रमाणांनीं त्यांची शंका निरसन होणें शक्य असतां ती त्यांनीं करून घेतली नाहीं व दुसरी बाजू न देतां ती तशीच लोकांपुढें मांडिली, हें योग्य नव्हतें. ज्या श्लोकावरून ही शंका उद्भवली, तो श्लोक खालीं दिल्याप्रमाणें आहे:—

**हृष्टाः खलु भविष्यन्ति रामस्य परमाः स्त्रियः ।**
**अप्रहृष्टा भविष्यन्ति स्नुषास्ते भरतक्षये ॥ २।८।१२ ॥**

" रामाच्या दासींनाहि ( त्याला अभिषेक झाला म्हणजे ) आनंद होईल, आणि ( त्याला अभिषेक झाला म्हणजे ) भरताला कांहींच अधिकार असणार नाहीं; यासाठीं तुझ्या सुनांना दुःख होईल. "

हा श्लोक मंथरेनें कैकेयीला उद्देशून म्हटलेला आहे. ज्या शब्दावर हा वाद उपस्थित झाला आहे तो शब्द " स्त्रियः " हा होय. टीकाकारांनीं या शब्दाचा अर्थ दासी असा देऊन श्लोक लाविला आहे, पण अर्थ रा. ब. वैद्य यांना मान्य नसून त्यांच्या मतें याचा अर्थ स्त्रिया असाच आहे व याचा प्रतिपक्षी शब्द स्नुषा असा असल्यामुळें हाच अर्थ योग्य आहे, असें त्यांचें म्हणणें आहे.* वस्तुतः त्यांनीं दाखविलेलें कारण सबळ आहे, असें म्हणतां येत नाहीं. रामाला राज्य मिळून भरताला तें मिळालें नाहीं तर रामाच्या स्त्रिया आनंद पावतील व कैकेयीच्या सुनांना दुःख होईल असा या श्लोकाचा भावार्थ आहे, असें मानण्यापेक्षां रामाच्या दासींनाहि आनंद होईल व कैकेयीच्या सुना तर दुःख पावतील, असा अर्थ केल्यास त्यांत अधिक स्वारस्य येईल, असें वाटतें.

---

* The present रामायण seems to represent that राम had one महिषी or crowned queen, but had many other wives ( not concubines ) as was usual with क्षत्रिय princes in his days. ... . In fact it is impossible to suggest that स्त्रियः simply means the handmaids and attendants of सीता, for that word is evidently in contrast with स्नुषाः or daughters-in-law. —Riddle of the रामायण, Page 15.

शिवाय येथें दासी अर्थ घेणेंच योग्य आहे, असें या श्लोकापूर्वींचे कांहीं श्लोक संदर्भाकरितां वाचल्यास कळून येणार आहे. कारण यापूर्वींच्या भाषणांत दासी या अर्थाचे शब्द दोनतीनदां आले असून त्या भाषणाचा ओघ या श्लोकांत समाप्त झाला आहे. अर्थात् त्या ओघाबरोबर वाहत आलेला अर्थ येथें घेणें योग्य होणार आहे. पूर्वींचे श्लोक येणेंप्रमाणें आहेत:—

**प्राप्तां वसुमतीं प्रीतिं प्रतीतां हतविद्विषाम् ।**
**उपस्थास्यसि कौसल्यां दासीवत्त्वं कृतांजलिः ॥ २।८।१० ॥**
**एवं च त्वं सहास्माभिस्तस्याः प्रेष्या भविष्यसि ।**
**पुत्रश्च तव रामस्य प्रेष्यत्वं हि गमिष्यति ॥ ११ ॥**

" कौसल्येला शत्रुरहित असें सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त होऊन तिला आनंद होईल व ती प्रसिद्धीला येईल. मग दासीप्रमाणें हात जोडून तुला तिच्यापुढें उभें राहावें लागेल. अशा रीतीनें आमच्याप्रमाणें तूंहि तिची दासी होशील व तुझा पुत्र भरत रामाचा दास होऊन राहील. "

या श्लोकापुढें वरील वादविषयक श्लोक वाचल्यास " स्त्रियः " या शब्दानें दासी या अर्थाचाच बोध होतो, असें वाचकांस कळून येईल. दशरथाला ज्याप्रमाणें साडेतीनशें स्त्रिया असल्याचें रामायणांत सांगितलें आहे, त्याप्रमाणें रामालाहि जर अनेक स्त्रिया असत्या, तर रामायणांत तसा स्पष्ट उल्लेख आला असता. असा अस्पष्ट निर्देश करून ठेवण्याचें काय प्रयोजन होतें ? याबद्दल इतरांच्या तोंडचीं वचनें देण्यापेक्षां खुद्द रामाचे उद्गार देणें अधिक श्रेयस्कर आहे. रावणानें सीतेला नेल्यावर रामानें तिचा शोध करितांना खालील महत्त्वाचे उद्गार काढिले आहेत:—

**सीतया सह निर्यातो विना सीतामुपागतः ॥३।६२।१०॥**
**कथं नाम प्रवेक्ष्यामि शून्यमंतःपुरं मम ॥**

" मी सीतेसहवर्तमान ( अरण्यांत ) बाहेर पडलों आहें; तो मी तिच्याशिवाय एकटा परत जाऊन माझ्या शून्य अंतःपुरांत कसा प्रवेश करूं ? "

यांत सीता नाहींशी झाल्यामुळें आपलें अंतःपुर शून्य झाल्याचें रामाचें म्हणणें आहे. जर सीतेशिवाय रामाला आणखी स्त्रिया असत्या तर सीतेच्या

अभावीं त्याचें अंतःपुर शून्य होणें शक्य नाहीं. हे उद्गार त्यानें दुःखातिरेकानें काढिले असल्यामुळें त्याचा अर्थ शब्दशः घेणें बरोबर नाहीं अशी शंका कदाचित् कोणी घेईल, तर वरील श्लोकापूर्वींच्या एका श्लोकांत त्यानें सीता नाहींशी झाल्यामुळें पर्णकुटिका शून्य झाल्याचे उद्गार काढिले आहेत.—

**आगच्छ त्वं विशालाक्षि शून्योऽयमुटजस्तव ॥ ३।६६।७ ॥**

" हे विशालनयने जानकि, तूं ये; तुझी ही पर्णकुटिका तूं आंत नाहींस यामुळें शून्य झाली आहे. "

सीता गेल्यावर पर्णकुटिकेंत कोणी नसणार हें निर्विवाद आहे; आणि यापुढें अंतःपुर शून्य झाल्याबद्दलचे रामाचे उद्गार आहेत. यावरून रामाच्या पर्णकुटिकेंत व अंतःपुरांत सीतेशिवाय दुसरी स्त्री नव्हती, हें उघड होतें. कारण सीतेला नेल्यावर तीं दोनहि शून्य पडल्याचें रामानें सांगितलें असल्यामुळें त्यांची पूर्वावस्था एक असली पाहिजे, हें स्पष्ट करून सांगण्याची जरूर नाहीं. या बाबतींत रामापेक्षां सीतेचे उद्गार अधिक महत्त्वाचे आहेत. दंडकारण्यांत प्रवेश करीत असतांना एका भाषणांत तिनें रामाचें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहेः——

**स्वदारनिरतश्चैव नित्यमेव नृपात्मज ॥३।९।६॥**

" हे राजपुत्रा रामा, आपण नेहमीं आपल्या स्त्रीशींच रत होत असतां. "

जर रामाला अनेक स्त्रिया असत्या तर इतक्या प्रेमानें व अभिमानानें सीतेचें भाषण खास झालें नसतें. अनेक स्त्रिया असल्यावर कोणती स्त्री आपल्या पतीची स्वदारनिरत असल्याबद्दल प्रशंसा करीत राहील? युद्धाचे वेळीं रामाचें कृत्रिम शिर सीतेपुढें टाकिलें असतां तिनें काढिलेले उद्गार सर्वांहून महत्त्वाचे आहेत. वादविषयक गोष्टीचा त्यांत स्पष्ट निकाल केलेला आहे.

**कल्याणै रुचिरं गात्रं परिष्वक्तं मयैव तु ।**
**क्रव्यादैस्तच्छरीरं ते नूनं विपरिकृष्यते ॥६।३२।२३॥**

" हे रामा, आपल्या शरीरावर मंगलचिन्हें असून त्या योगानें आपलें शरीर सुंदर दिसत होतें. त्या आपल्या शरीराला मींच आलिंगन दिलेलें असून आतां राक्षस त्याची विदारणा करून टाकितील ! "

यावरून रामाची सीता ही एकच स्त्री होती, हें उघड होतें. रामाच्या एकपत्नीव्रताला याहून अधिक महत्त्वाचा पुरावा शोधण्याची आतां जरूर आहे काय ?

रा. ब. वैद्य यांच्या वरील विधानाचें खंडन रा.ब. आगाशे यांनीं यापूर्वींच केलें होतें; परंतु हे दोनहि लेख इंग्रजींत आहेत. तेव्हां या प्रकरणाची महाराष्ट्र-वाचकांस ओळख करून देण्याकरितां आम्हांला आढळलेलीं कांहीं प्रमाणें देऊन वरील लेख लिहिला आहे. रा. ब. वैद्य यांच्या मताचें खंडन करितांना रा.ब. आगाशे यांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ खालील श्लोक दिला आहेः—

**मोघं हि धर्मश्चरितो ममायम् । तथैकपत्नीत्वमिदं निरर्थकम् ।**
**या त्वां न पश्यामि कृशा विवर्णा । हीना त्वया संगमने निराशा ॥**

" खरोखर मीं केलेलें धर्माचरण फुकट गेलें असून माझ्या एकपत्नीत्वाचा उपयोग कांहीं झाला नाहीं. कारण मला आपला वियोग झाल्यामुळें मीं कृश व निस्तेज झालें आहें. आणि आपल्या भेटीविषयीं माझी आशा नाहींशी झाली आहे. "

हा श्लोक सुंदरकांडांतील २८ व्या सर्गांत आहे. सीतेला राक्षसींनीं भिवविल्या-नंतर तिनें केलेला शोक या सर्गांत वर्णिलेला असून वर घेतलेला श्लोक त्यां-तील एक आहे. या श्लोकांतील " एकपत्नीत्वम् " हा शब्द महत्त्वाचा आहे व त्यावर रा. ब. आगाशे यांची भिस्त आहे. परंतु या शब्दाचा अर्थ करितांना ते चकले आहेत. " एकपत्नीत्वम् " हा मुद्याचा शब्द पाहिल्याबरोबर त्यांनीं हा श्लोक उतरून घेतला असावा. हा शब्द रामाच्या तोंडीं असता तर अनुकूल अर्थ निघाला असता. " एक एव पतिर्यस्याः सा एकपत्नी " असा या शब्दाचा विग्रह असून त्याचा अर्थ पतिव्रता असा आहे. अर्थात् तिचा भाव तें पातिव्रत्य. हा शब्द सीतेच्या तोंडीं असल्यामुळें इष्ट अर्थ यांतून निघणें शक्य नाहीं. या श्लोकानें जर रामाचें एकपत्नीव्रत सिद्ध होईल तर त्याच्या विरुद्ध श्लोक त्याच्यापुढें आहेच.

**पितुर्निदेशं नियमेन कृत्वा । नान्निवृत्तश्चरितव्रतश्च ।**
**स्त्रीभिस्तु मन्ये विपुलेक्षणाभिः । संरस्यसे वीतभयः कृतार्थः ॥१४॥**

"आपण नियमानें व व्रतस्थ राहून पित्याची आज्ञा शेवटास न्याल व अरण्यांतून परत घरीं जाल; मग निर्भय व कृतार्थ होऊन मला वाटतें आपण अनेक विशालनयना स्त्रियांशीं रममाण व्हाल."

या श्लोकांतील सीतेचे उद्गार रामाच्या एकपत्नीव्रताविषयींच्या लौकिकाला बाधक आहेत. रा. ब. आगाशे यांनीं हा श्लोक कसा पाहिला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. वास्तविक यांतील एकहि श्लोक प्रमाण म्हणून पुढें आणण्याच्या लायकीचा नाहीं. जो श्लोक रा. ब. आगाशे यांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ पुढें केला आहे त्यांतील उद्गार सीतेच्या तोंडीं खास शोभत नाहींत. "दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः" असे ज्या साध्वीनें निकराचे उद्गार काढिले आहेत त्या सीतादेवीनें "मोघं हि धर्मश्चरितो ममायम्" अशा रीतीनें आपल्या सत्कर्माबद्दल पश्चात्तापपर उद्गार काढणें कधीं तरी शक्य दिसतें काय? वनवासास निघण्यापूर्वीं रामाबरोबर जाण्याकरितां सीतेनें धरिलेला हट्ट, अशोकवनिकेंत रावणानें तिला अपशब्दांनीं टोंचल्यावेळीं तिनें दिलेलीं मर्दानी उत्तरें व रामानें त्याग केल्यानंतर लक्ष्मणाबरोबर तिनें पाठविलेला हृदयद्रावक निरोप हे प्रसंग ज्यांच्या अंतश्चक्षूंसमोर नेहमीं गोचर होत असतील त्यांना सीतेचें वरील वाक्य दाखविल्यास खरेंदेखील वाटणार नाहीं. दुसरा श्लोक तर अगदीं गचाळ आहे. हा सर्ग प्रक्षिप्त असल्याचें रा. ब. वैद्य यांनीं ठरविलेंच होतें व आणखी प्रमाणें देऊन त्यांच्या मतास आम्हीं पुष्टिच दिलेली आहे. याकरितां अशा सर्गांतील श्लोक प्रमाण म्हणून पुढें आणितां येणार नाहीं. इतर प्रमाणें देऊन त्यांनीं आपलें मत सिद्ध केलें असल्यामुळें हें प्रमाण गौण धरून त्यांस आम्हीं दोष दिला नसता; पण हें प्रमाणहि चुकीचें असून तो श्लोक मूळांत पाहूं गेल्यास त्याच्यापुढील श्लोक साहजिक दृष्टीस पडतो व निर्मल झालेली मनोवृत्ति पुनः गढूळ होऊं लागते. तेव्हां अशा संशयासहि जागा राहूं नये या हेतूनें या चार ओळी लिहिल्या आहेत.

## रामायणांत मंदोदरीचें नांव नव्हतें.

युद्धकांडांतील एक सर्ग प्रक्षिप्त ठरवितांना रा. ब. वैद्य यांनीं असें विधान

केलें आहे* कीं, रावणाची पत्नी मंदोदरी हिचें नांव संबंध रामायणांत याच सर्गांत प्रथमत: आलें असून अन्यत्र त्याचा मुळींच उल्लेख नाहीं. रावणवधानंतर मंदोदरीनें केलेला विलाप या सर्गांत वर्णिलेला आहे. हा सर्ग प्रक्षिप्त आहे किंवा नाहीं याचा तूर्त विचार न करितां रा. ब. वैद्य यांनीं केलेलें वरील विधान बरोबर आहे काय तें प्रथम पाहूं. मंदोदरीच्या नांवाचा उल्लेख याच सर्गांत प्रथमत: आला असें नसून तो यापूर्वीं व पुढेंहि आलेला आहे. खालीं दिलेल्या उताऱ्यांवरून हें कळून येईल.

वरा मंदोदरी नाम तया स प्रतिषेधितः ॥५।५८।७७॥
बहुभी राक्षसैः सार्धं प्रेषयामास संयुगे ।
तं तु मंदोदरीपुत्रं कुमारं रणपंडितम् ॥ ५।५८।२५ ॥
स्वयं सारथ्यमकरोत् ॥
स यंतरि महातेजा हते मंदोदरीसुतः ॥ ६।८९।४३ ॥
स राक्षसगणैर्मुख्यैर्वृतो मंदोदरीसुतः ॥ ६।९०।११ ॥

" तेव्हां मंदोदरी नामक श्रेष्ठ स्त्रीनें त्याचा निषेध केला. " " नंतर पुष्कळ राक्षस बरोबर देऊन त्या युद्धविशारद कुमारनामक मंदोदरीपुत्राला युद्धार्थ पाठविलें " " सारथि मृत झाला असतां त्या मंदोदरीपुत्रानें स्वतः सारथ्य केलें " " त्या मंदोदरीपुत्रानें पुष्कळ मोठेमोठे राक्षस बरोबर घेतले होते. "

या उताऱ्यांत मंदोदरीच्या नांवाचा उल्लेख चार वेळां आलेला आहे. वादविषयक सर्गांतील उल्लेख पांचवा होय. तेव्हां हा उल्लेख या सर्गांत प्रथम

---

१ It seems clear that this सर्ग is an interpolation wherein मंदोदरी is mentioned for *the first and last time* in the रामायण. The original poem of वाल्मीकि, it appears probable, made no mention of मंदोदरी, रावण's wife, nor of सुलोचना, the wife of इंद्रजित् as we have shown elsewhere, in the same way and with the same poetical beauty as the महाभारत which nowhere makes a mention of दुर्योधन's wife.

—Riddle of the रामायण, Page 35.

आला असून, तो अन्यत्र आला नाहीं एवढयाकरितां प्रक्षिप्त ठरविणें धाडसाचें होईल. शिवाय त्यांनीं दिलेलें कारणहि आतां उरलेलें नाहीं. या सर्गांत मंदोदरीचा विलाप हा मुख्य विषय आहे. नंतर रामानें बिभीषणाला रावणाचें उत्तरकार्य करावयास सांगितलें असतां त्यानें प्रथम रावण दुष्ट असल्यामुळें तें करण्याचें कबूल केलें नाहीं. परंतु रामाच्या आग्रहावरून त्यानें सर्व तयारी करविली. यापुढें रावणाच्या दहनविधीचें वर्णन करून हा सर्ग संपविला आहे. रा. ब. वैद्य यांची येथें अशी शंका आहे कीं, १०९ व्या सर्गांत बिभीषणानें रावणाचें उत्तरकार्य करण्यास रामाजवळ आपण होऊन अनुज्ञा मागितली होती व या सर्गांत रामानें सांगितलें असतां तो नाकबुली देत आहे. ही शंका योग्य आहे. परंतु हा सर्ग जर काढून टाकिला तर त्याबरोबर रावणाच्या दहनविधीचेंहि वर्णन जाईल व तें तर प्रक्षिप्त ठरविणें अशक्य आहे. यापेक्षां १०९ व्या सर्गांतील बिभिषणानें रामाला केलेल्या विनंतीचे श्लोक प्रक्षिप्त ठरविणें अधिक योग्य होईल. यांतील मुद्याचे श्लोक चार असून त्यांतील तीन दीर्घच्छंदांत आहेत. अशा रीतीनें या शंकेचें समाधान करितां येईल व पुढील सर्गांत विरोध दिसून येणार नाहीं. वादविषयक सर्ग प्रक्षिप्त म्हणतां येणार नाहीं, असें आम्ही म्हणतों, यास आणखी एक कारण आहे. या सर्गांतील मुख्य विषय जो मंदोदरीविलाप त्याचा उल्लेख याच कांडांत पुढें आलेला आहे. अयोध्येकडे परत येतांना रामानें सीतेला वाटेंतील विशेष स्थळें दाखविलीं. या वर्णनांत रामाचे तोंडीं खालील वाक्य आहे—

**अत्र मंदोदरी नाम भार्या तं पर्यदेवयत्** ॥६।१२३।१४॥
**सपत्नीनां सहस्रेण साग्रेण परिवारिता** ॥

" येथें मंदोदरीनें त्या (रावणा) करितां शोक केला. तिजबरोबर हजारापेक्षां अधिक इतक्या तिच्या सवती होत्या. "

मंदोदरीविषयींचा रामायणांतील हा सहावा उल्लेख होय. १११ वा सर्ग जर प्रक्षिप्त असता तर त्यांतील कथाभागाचा उल्लेख पुढें येणें शक्य नव्हतें.

## मायामृग.

रामायणांतील मायामृगाची कथा फार प्रसिद्ध आहे. रावणाचा मामा मारीच

रामाचे पंचवटींतील आश्रमाजवळ मृगरूपानें फिरत राहिला व त्याला पाहून सीता मोहित झाली आणि तिच्या आग्रहास्तव राम त्याला धरण्याकरितां अथवा न सांपडल्यास मारण्याकरितां त्याचे मागोमाग गेला. मृगाला विद्ध केलें असतां मारीचानें आपलें रूप प्रकट केलें व मृत्यूपूर्वी रामाप्रमाणें लक्ष्मण व सीता यांना मोठमोठ्यानें हांका मारूं लागला. तो शब्द ऐकून आपला पति संकटांत सांपडला अशी कल्पना होऊन सीतेनें लक्ष्मणाला आग्रह करून रामाचे साहाय्यार्थ पाठविलें आणि ती आश्रमांत एकटी पाहून रावणानें तिला पळवून नेलें, अशी ही कथा आहे. रा. ब. वैद्य यांचे मतें ही कथा मूळ रामायणांतील नसून प्रक्षिप्त आहे. त्यांचे मतें राम व लक्ष्मण दोघेहि मृगयेकरितां गेले असतां रावणानें ही संधि साधून सीतेचें हरण केलें असलें पाहिजे. जटायूची व रामाची प्रथम भेट झाली तेव्हां त्यानें दोघेहि वनांत गेले असतां सीतेचें रक्षण करण्याविषयीं त्यांना वचन दिलें होतें ( ३।१४।३४ ) व त्यास अनुसरून त्याला सीतेचे रक्षणार्थ ठेवून ते दोघे मृगयेकरितां या वेळीं गेले असणें संभवनीय आहे. रावण आश्रमांत आला असतां त्यानें विचारिल्यावरून सीतेनें आपला वृत्तांत सांगितला व शेवटीं राम लवकर परत येईल असें सांगतांना ती स्पष्टपणें म्हणते—

**आगमिष्यति मे भर्ता वन्यमादाय पुष्कलम् ।**
**रुरून् गोधान् वराहांश्च हत्वाऽऽदायाऽऽमिषं बहु॥३।४७।१३**

" माझा पति अरण्यांतील पुष्कळ पदार्थ ( फळें वगैरे ) घेऊन व रुरु, गोधा व वराह यांना मारून त्यांचें पुष्कळ मांस घेऊन लवकर परत येईल. " या वेळीं तिनें केलेलें भाषण अगदीं साधें आहे. मायामृगाला आणण्याकरितां राम खरोखर गेला असता तर तसें स्पष्टपणें सांगण्यास तिला कांहीं अडचण नव्हती. तसेंच रामाचा शब्द ऐकून ती भिऊन गेली आणि बोलूं नये तसे कठोर शब्द बोलून लक्ष्मणाला तिनें अरण्यांत रामाकडे पाठविलें, तेव्हां अशा व्यग्र मनःस्थितींत असतां तिनें रावणाशीं स्वस्थपणें बोलत रहावें हें तर अस्वाभाविक आहे. मायामृगाची कथा मूळांतील कां नसावी याविषयीं रा. ब. वैद्य यांनीं जीं कारणें दिलीं आहेत तीं बहुतेक त्यांच्या शब्दांत येथें सांगितली

आहेत.* सीतेनें रावणाला उद्देशून जें भाषण केलें त्यांतील वर उद्धृत केलेलें वाक्य वाचून रा. ब. वैद्यांना या कथेच्या सत्यतेविषयीं शंका आली व ती बरोबरहि आहे. परंतु विरुद्ध वचनांकडे लक्ष न देतां त्यांनीं संबंध कथेवर आघात करण्यांत घाई केली, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. जटायूनें सीतेच्या रक्षणाविषयीं रामाला आश्वासन दिलें होतें आणि पंचवटींत पर्णशाले-करितां स्थान निश्चित केल्यावर " जटायूसह आपण येथें राहूं " असें रामानें लक्ष्मणाला उद्देशून म्हटलेंहि आहे. ( ३।१५।१९ ) तथापि सीतेला रावण नेऊं लागला, त्या वेळीं काय तो हा पुढें आला आहे. शूर्पणखेला विरूप केल्यावर खरानें रामावर प्रथम चौदा राक्षस पाठविले, त्या वेळीं राम त्यांवर चालून जाऊं लागला असतां त्यानें सीतेच्या रक्षणाकरितां लक्ष्मणालाच तिचे-जवळ राहण्यास सांगितलें ( ३।२०।४ ) आणि यानंतर आपल्या चौदा हजार राक्षससैनिकांसह स्वतां खर युद्धार्थ आला त्या वेळीं तर रामानें लक्ष्मणाला पर्वतावरील वृक्षांची दाटी असलेल्या दुर्गम गुहेमध्यें सीतेला घेऊन जाण्याची आज्ञा केली. (३।२४।१२) यावरून जटायूनें पूर्वीं आश्वासन दिलें असलें तरी तो रामाजवळ नेहमीं आश्रमांत पडून असे, असें म्हणवत नाहीं. उलट वरील दोन संग्रामांचे प्रसंगीं तो येथें आल्याचेंहि रामायणांत सांगितलेलें नाहीं. रावण सीतेला घेऊन जाऊं लागला असतां त्याला विघ्न करून त्यानें आपला शब्द, आपला देह समर्पण करून खरा केला, यांत शंका नाहीं; तथापि त्याचे पूर्वींचे आश्वासनाप्रमाणें व रामाचे प्रारंभींच्या कल्पनेप्रमाणें तो त्याचे आश्रमांत नित्य असे, असें पूर्वापर ग्रंथ पाहतां दिसून येत नाहीं. रा. ब. वैद्य यांनीं जटायूचे आश्वासनावरून त्याला सीतेच्या रक्षणार्थ ठेवून रामलक्ष्मण मृगयेला गेले असावे असा तर्क केला आहे. श्रीमंत किबे साहेबांनीं तर या तर्काचे भानगडींत न पडतां इतिहासच तसा घडला असें लिहून टाकिलें × आहे. सुवर्णमृगाकरितां राम निघून गेला त्या वेळीं जातांना लक्ष्मणाला सीतेच्या रक्षणार्थ सिद्ध राहण्या-विषयीं जी आज्ञा केली ( ३।४३।४६ ), त्यावरून तेथें तिच्या रक्षणाकरितां

---

* Riddle of the रामायण, p. 42.

× Ravana's Lanka discovered, page 9.

जटायू किंवा दुसरा कोणी होता, असें दिसत नाहीं. याचे पुढील श्लोकांत (३।४३।५१) रामाचे तोंडीं जटायूचा उल्लेख आहे, परंतु तो श्लोक सर्गाचे अंतीं दीर्घच्छंदांत असल्यामुळें प्रक्षिप्त आहे, हें रा. ब. वैद्य यांनाहि मान्य होण्यासारखें आहे. सीतेनें कठोर भाषण केल्यावर तें ऐकून उद्वेगानें लक्ष्मण निघाला; तेव्हां त्यानें " संपूर्ण वनदेवता तुझें रक्षण करोत " ( ३।४५।३४ ) असे जे उद्गार काढिले आहेत त्यांवरूनहि तेथें लक्ष्मणावांचून तिचें रक्षण करण्यास कोणीहि समर्थ नव्हता, असें सूचित होत आहे. आतां याहूनहि प्रत्यक्ष प्रमाण पाहिजे असेल तर रावण व जटायू यांचें जें पुढें युद्ध झालें तो प्रसंग पहावा. सीतेला घेऊन रावण आकाशमार्गानें जात असतां एका वृक्षावर जटायू असलेला तिचे दृष्टीस पडला व त्याला पाहून सीतेनें रक्षणार्थ त्याचें नांव घेऊन मोठ्यानें हांका मारिल्या. या वेळीं जटायू तर एका झाडावर स्वस्थपणें बसून पेंगत होता; सीतेचा शब्द ऐकून त्यानें वर पाहिलें. तेव्हां सीतेला रावण घेऊन जात असल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. (३।५०।१) जटायू युद्धांत घायाळ होऊन पडला असतां त्याला उद्देशून सीतेनें—

**अयं हि कृपया राम मां त्रातुमिह संगतः ॥३।५२।४॥**

"हे रामा, हा पक्षी माझें रक्षण करण्याकरितां कृपा करून येथें मजकडे आला." असें म्हटलें आहे व रावणानें तिला आश्रमांतून पळविते वेळीं तो तेथें नसल्याचें अगदीं स्पष्ट करून टाकिलें आहे. तसेंच राम सीतेचा शोध करण्याकरितां आश्रमांतून बाहेर पडून बराच दूर गेल्यावर जटायूला त्यानें पाहिलें; या वेळीं तो अगदीं आसन्नमरण झाला होता. त्याला पाहून रामानें लक्ष्मणाला म्हटलें:——

**अनेन सीता वैदेही भक्षिता नात्र संशयः ।**
**गृध्ररूपमिदं व्यक्तं रक्षो भ्रमति काननम् ॥३।६७।११॥**

" यानेंच सीता भक्षण करून टाकिली, यांत संशय नाहीं. गृध्ररूप धारण करून हा कोणी तरी राक्षस या वनांत संचार करीत असतो असें वाटतें " रामानें असें म्हणून खरोखरच त्याचा वध करण्याकरितां धनुष्यास बाण जोडिला; परंतु तें पाहून जटायूनें थोडक्यांत सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हां पुढील प्रसंग

टळला. या प्रसंगावरून जटायू त्यानें दिलेल्या आश्वासनाप्रमाणें आश्रमांत नित्य रहात असे किंवा नाहीं याविषयीं अधिकच शंका येऊं लागते.

(१) जटायूला आश्रमांत सीतेच्या रक्षणार्थ ठेवून (२) रामलक्ष्मण मृगयेला गेले असावे, या रा. ब. वैद्य यांच्या कल्पनेपैकीं पहिल्या भागाला रामायणांत आधार नसून उलट तें त्याला बाधक आहे हें वर दाखविलें आहे. आतां दुसऱ्या भागाकडे वळूं. सीतेनें रावणाला उद्देशून जें भाषण केलें त्यांत तिनें राम मृगयेला गेल्याचें सांगितलें असून सुवर्णमृगाचा त्यांत उल्लेख नाहीं. राम वनवासांतून परत आल्यावर पुढें भरताकडे मारुती गेला व तेथें भरताला मारुतीनें वनांतील सर्व वृत्तांत निवेदन केला; त्यांत पुढील श्लोक आहे:—

**अथ सौम्य दशग्रीवो मृगयां याति राघवे ॥**
**लक्ष्मणे चाऽपि निष्क्रान्ते प्रविवेशाऽऽश्रमं तदा ॥६।१२६।२४॥**

" नंतर हे सौम्य, राम मृगयेला गेला असतां आणि लक्ष्मणहि बाहेर पडला असतां दशग्रीव रावणानें आश्रमांत प्रवेश केला. "

यांत सीतेच्या भाषणाप्रमाणें मृगया अनुमानानें गृहीत धरावी न लागतां तिचा स्पष्ट निर्देश आहे. तेव्हां जटायू रक्षणार्थ राहिल्याची कल्पना बाजूला ठेविली तरी तो नित्याप्रमाणें मृगयेला गेल्याचें रामायणांतील प्रमाणांवरून दिसत असल्यामुळें सुवर्णमृगाची कथा कल्पितच ठरते. रामायणांतील प्रमाणांवरून तसें ठरल्यास त्यावर कोणास बोलतां येणार नाहीं; परंतु रा. ब. वैद्य यांनीं प्रमाणांची एकच बाजू दाखविली आहे, व दुसरी बाजू पाहिल्यास ते म्हणतात त्याप्रमाणें या कथेविषयीं शंका येत नाहीं, इतकें आमचें म्हणणें आहे. सुवर्णमृग व मारीचानें त्याचें रूप धारण करणें या दोनहि गोष्टी अद्भुत आहेत, याविषयीं वाद नाहीं; तथापि या कारणांसाठीं त्या कल्पित कथा ठरवूं लागल्यास जगांत अद्भुत गोष्टी कधीं घडत नाहींत, असा सिद्धांत मानावा लागेल. इतिहास कोणत्याहि देशाचा घेतला तरी त्यांत अद्भुत गोष्टी कांहीं तरी पहावयास मिळतात. रामायणांतहि सुवर्णमृग हा नित्यापैकीं मानिला नसून अद्भुत मानिलेला आहे व यामुळें अद्भुत गोष्टीला सामान्य स्वरूप दिल्यामुळें ग्रंथावर येणारा कल्पितत्वाचा दोष कमी झाला आहे. सुवर्णमृग म्हणजे सुव-

र्णाप्रमाणें कांति असलेला मृग हा अर्थ लक्षांत घेतला म्हणजे त्यांतील अद्भुतता अधिक कमी होते. आतां मारीचानें सुवर्णमृगाचें रूप घेण्याचा चमत्कार उरतो, पण त्याला उपाय नाहीं. मृगाचें सुंदर रूप पाहून सीता मोहित झाली व तिनें तो जिवंत धरून अयोध्येंत परत जाते वेळीं न्यावा व तसा न सांपडल्यास मारून आणावा असें रामाला सुचविलें. ( ३।४३।१८–२० ) लक्ष्मणानें अद्भुत रूप पाहून मारीचाविषयीं शंका प्रदर्शित केली व त्यावर रामानें तो मारीच असल्यास त्यापासून लोकांना होणारा त्रास दूर व्हावा म्हणून व खरा मृग असल्यास सीतेचा मनोरथ पूर्ण व्हावा म्हणून आपण त्याचे मागें जाणार असें सांगितलें ( ३।४३।४६–४९ ) व त्याप्रमाणें तो निघून गेला. रावणाचा प्रवेश तेथें सुखानें व्हावयास ते दोघेहि आश्रमांतून बाहेर जाणें आवश्यक होतें. सीतेच्या रक्षणार्थ कोणीतरी सिद्ध राहण्याची योजना रामानें वनवासाला प्रारंभ केल्यापासून दक्षतेनें केल्याची दिसते व तीस अनुसरून लक्ष्मणाला या वेळीं बाहेर पडतांना रामानें सावधानतेची सूचना दिली आहे. रामाच्या या व्यवस्थितपणाकडे पाहिलें म्हणजे मारीचानें लक्ष्मणाचे नांवानें हांका मारणें व त्यामुळें घाबरून जाऊन सीतेनें लक्ष्मणाला रामाचे रक्षणार्थ दवडणें या रामायणांतील कथा घडल्यावांचून पुढील कथेची संगति लावितां येण्यासारखी नाहीं. कारण सीतेला एकटी आश्रमांत ठेवून दोघांनीं मृगयेला जाणें संभवनीय नाहीं व हें रा. ब. वैद्य यांनींहि जटायूची कल्पना पुढें करून मान्य केल्यासारखें आहे. तेव्हां आतां सीतेनें रावणाला आपला वृत्तांत सांगतांना राम वन्यपशु मारून लवकर परत येईल असें सांगून मृगयेचा मोघम निर्देश कां केला ही शंका राहते. येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सीतेला तो मृग अद्भुत वाटला तरी तो राक्षस असल्याविषयीं शंका नव्हती; लक्ष्मणाला ती शंका येऊन त्यानें रामाला कळविली तरी रामाचें त्याविषयीं निश्चित मत झालें नव्हतें. म्हणजे मृग समजूनच त्यांचा व्यवहार चालला होता. मृगया हा तर रामलक्ष्मणांचा आवडता व नित्याचा व्यवसाय होता. या वेळीं राम सीतेच्या आग्रहानें मृगामागें गेला तरी तो त्यांचा नित्यक्रम होता हें विसरतां नये, आणि या नित्यक्रमास अनुसरून सीतेनें वरील भाषण केलें आहे. रामानेंहि सुवर्णमृग मारिल्यावर दुसरा एक

पृषत मृग मारून त्याचें मांस घेतल्यावर तो परत फिरला, असें सांगितलें आहे. ( ३।४८।२७ ) व हें सीतेच्या भाषणाला अनुसरून झालें आहे. तेव्हां सीतेच्या भाषणांत मृगयेचा सामान्य निर्देश आहे. याकरितां मूळ कथेविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. पतीचा आर्त शब्द ऐकून सीता घाबरून गेलेली व तिनें लक्ष्मणाला तिकडे पाठविलेला, अशा मनःस्थितींत तिनें रावणाशीं स्वस्थपणें बोलत रहावें हें अस्वभाविक दिसतें, असा सीतेच्या भाषणावर रा. ब. वैद्य यांचा आणखी एक आक्षेप आहे. परंतु हा आक्षेप येऊं नये यासाठीं तशी व्यवस्था काव्यांत महर्षींनीं स्वतः केली आहे, तिकडे रा. ब. वैद्य यांचें लक्ष कसें गेलें नाहीं हें कळत नाहीं. सीता चिंताग्रस्त स्थितींत असतां रावण यतिवेषानें आश्रमांत आला. अतिथिसत्काराविषयीं स्मृतींतील नियम व रामायणकालची सामाजिक पद्धति यांकडे पाहिलें म्हणजे सीतेनें अतिथि या नात्यानें रावणाचें खरें स्वरूप न समजल्यामुळें सत्कार करणें साहजिकच दिसतें. रावणानें तिला "तूं एकटी अरण्यांत कां व कशी राहतेस? कोणाची कोण?" असे सामान्य प्रश्न केले व सीतेनें:—

**ब्राह्मणश्चातिथिश्चैव अनुक्तो हि शपेत माम् ।**
**इति ध्यात्वा मुहूर्तं तु सीता वचनमब्रवीत् ॥३।४७।२॥**

"हा ब्राह्मण असून अतिथि आहे; तेव्हां याला उत्तर दिलें नाहीं तर हा शाप देईल असा कांहीं वेळ विचार केला व मग ती बोलूं लागली."

सीतेनें रावणाशीं केलेलें भाषण कां केलें याचें कारण येथें स्पष्ट सांगितलें आहे. अर्थात् तिचें भाषण स्पष्टपणाचें दिसलें तरी व्यग्र मनःस्थितींत पण निरुपायानें केलेलें आहे.

मारुतीच्या भाषणांतील वरील अवतरणावरून नित्यक्रमाप्रमाणें ते दोघेहि मृगयेला गेले असतां रावण आश्रमांत शिरला ही कल्पना सिद्ध होते, असें रा. ब. वैद्य यांचें म्हणणें आहे. परंतु त्याचे मागील भाषणाकडे त्यांनीं पाहिलें नाहीं, असें दिसतें. त्यांत त्यानें, मारीचानें मृगाचें रूप धारण करून सीतेला मोहित केलें व तिचे सांगण्यावरून राम त्याचे मागें गेला व त्यानें त्याचा वध केला असें स्पष्ट वर्णन केलें आहे. ( ६।१२६।२१--२४ ) लक्ष्मण रामाचे मागून कां

बाहेर पडला हें येथें सांगितलेलें नाहीं. तथापि प्रथम राम एकटा गेला, हें त्यांत सांगितलें आहे आणि मागाहून लक्ष्मण कां गेला याचें कारण मात्र मुग्ध आहे. तथापि त्याची आवश्यकता पूर्वीं दाखविली आहे. पुढील भाषणांत मृगयेचा मोघम निर्देश असला तरी केवळ त्यावरून रा. ब. वैद्य यांच्याप्रमाणें अनुमान करणें युक्त होणार नाहीं. पूर्वीचे भाषण झाल्यावर मृगयेचा निर्देश वाचला म्हणजे तो सुसंगत दिसतो. आणि सुवर्णमग असला तरी त्याची पारध करावयाची म्हणजे ती मृगयाच होय. मग सामान्य निर्देशाला महत्त्व कसलें द्यावयाचें ?

मायामृगाचे निर्देश रामायणांत भाषणाचे ओघाबरोबर अन्यत्र आले आहेत, तिकडेहि लक्ष देणें अवश्य आहे. कारण प्रक्षेपकाला कथेचा प्रक्षेप करणें सुलभ असतें, पण तिशीं संबंध असलेल्या कथेचा निर्देश अन्यत्र केलेला असतो, तेथें प्रत्येक स्थळीं संगति राखण्याचा प्रयत्न करणें शक्य असत नाहीं व हें एक प्रक्षिप्त भाग ओळखण्याचें साधन आहे. या दृष्टीनें पाहिलें तरी मायामृगाची कथा अन्यत्र संबद्ध असून तेथें त्यामुळें विसंगतता आलेली नाहीं. मारुती अशोकवनांत गेल्यावर शिंशपावृक्षावर बसून त्यानें सीतेचें लक्ष आपल्याकडे लागावें म्हणून तिला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें पण आपल्याशीं रामचरित्राचें गायन केलें. त्यांत तो म्हणतो:—

ततः स्वमर्षापहृता जानकी रावणे तु ।
वंचयित्वा वने राम मृगरूपेण मायया ॥५।३१।९॥

" ( खरादींचा वध झाल्याचें कळलें ) तेव्हां रावणाला क्रोध आला व त्यानें अरण्यामध्यें मायामृगाचे योगानें रामाला मोहित करविलें व ( त्याला दूर दवडून ) सीतेचा अपहार केला. "

मारुतीचें भाषण ऐकून सीतेला तो कोणी राक्षस असावा असा साहजिकच संशय आला व ती कांहीं बोलली नाहीं. तेव्हां तिचा हा संशय लक्षांत घेऊन मारुती म्हणतो:—

अपक्रम्याश्रमपदान्मृगरूपेण राघवम् ।
शून्ये येनापनीताऽसि तस्य द्रक्ष्यसि तत्फलम् ॥५।३४।२१॥

" राघवाला मृगरूपानें ( मोहित करून ) आश्रमांतून दूर दवडल्यानंतर आश्रमांत दुसरें कोणी नसतां ज्यानें तुझा अपहार केला त्याला त्याच्या कर्माचें फळ मिळालेलें तुझ्या दृष्टीस पडेल.

यापेक्षां महत्त्वाचा उल्लेख मंदोदरीच्या भाषणांत आहे. रावण मृत झाल्यावर विलाप करितांना ती म्हणते:—

कथं च नाम ते राजन् लोकानाक्रम्य तेजसा ॥६।१११।६७॥
नारीचौर्यमिदं क्षुद्रं कृतं शौटीर्यमानिना।
अपनीयाश्रमाद्रामं यन्मृगच्छद्मना त्वया ॥६८॥
आनीता रामपत्नी सा अपनीय च लक्ष्मणम् ॥

" हे राजा, तेजाच्या योगानें सर्व लोकांचें तूं आक्रमण करणारा; आपल्याला वीर म्हणवितोस; आणि स्त्रीचौर्यासारखें हें क्षूद्र कृत्य तुझ्या हातून कसें बरें झालें ? मायावी मृगाचे योगानें रामाला आणि लक्ष्मणाला आश्रमांतून दूर नेऊन तूं रामपत्नी पळवून आणिलीस."

वरील सर्व अवतरणांतून मायामृगाचा उल्लेख स्पष्ट आहे. यांत मारीचाचा निर्देश केलेला नसला तरी सीतेचा अपहार व रामलक्ष्मणांला आश्रमांतून दूर दवडणें हीं कार्यें एका कालीं व एका व्यक्तीचे हातून होण्यासारखीं नव्हत, हें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे. रावण हा मुख्य नायक म्हणून मारीचानें त्याचेकरितां केलेलें कार्य त्यानें केलें असें मानणें अयुक्त नव्हे व या दृष्टीनें वरील प्रयोग केलेले आहेत. तेव्हां मारीचाचा निर्देश नसला तरी त्याचें तादृश महत्त्व नाहीं. नाहीं तर कार्यें भिन्न म्हणून तेथें दुसरा कोणी तरी कर्ता कल्पावा लागेल.

मायामृगाविषयींचे हे निर्देश लक्षांत घेतल्यास त्या कथेच्या सत्यासत्यतेविषयीं कोणाला शंका राहील असें वाटत नाहीं.

## प्रो. परांजपे आणि उत्तरकांड.

पूर्वींचे काळकर्ते व नव्या काळांतील स्वराज्यकर्ते प्रो. शिवराम महादेव परांजपे यांनीं पुणें येथील वसंतव्याख्यानमालेंत शके १८३२ मे मधील वसंतामध्यें " रामायणाविषयीं कांहीं विचार " या विषयावर व्याख्यान दिलें होतें.

विषयाचा निर्देश " रामायणाविषयीं कांहीं विचार " असा जरी सामान्यरीतीनें केला होता तरी रामायणाची समाप्ति कांहीं कालपर्यंत मध्येंच एका स्थळीं झाली होती या मुद्यावर त्यांनीं प्रतिपादन केलें होतें. हें व्याख्यान झालें त्या वेळीं रामायणांतील उत्तरकांड प्रक्षिप्त आहे असें प्रो. परांजपे यांचें मत असल्याचा भास पुष्कळ लोकांस झाला आणि त्याविरुद्ध " केसरींत " एक पत्रहि प्रसिद्ध झालें होतें. आह्मांलाहि त्यांचे मताविषयीं शंका येऊन त्यांना पत्र पाठवून खुलासा विचारला व तो त्यांनीं पत्र पाठवून कळविला. यानंतर सुमारें दोन वर्षांनीं त्यांनीं आपलें हें व्याख्यान पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. पुस्तक वाचून पाहतां आमचा पूर्वीचा ग्रह दृढ होऊन त्याविरुद्ध खंडनात्मक लेख केसरीकडे पाठविला व तो तारीख २४।९।१९१२ व तारीख १।१०।१९१२ चे केसरीचे पुरवणींतून प्रसिद्ध झाला. हाच लेख थोडा फेरफार करून येथें देत आहों. केसरींतील लेख:—

## रायसाहेब दिनेशचंद्र सेन आणि आदिकांड व उत्तरकांड.

कलकत्ता विश्वविद्यालयाचे एक व्याख्याते रायसाहेब दिनेशचंद्र सेन यांची वंगभाषेंतील रामायणावरील व्याख्यानमाला " बंगाली रामायणें " या नांवानें प्रसिद्ध झाली आहे. मूळ रामायणाचा अनुवाद करितांना वंगकवींनीं आणखी भर कसकशी घातली याविषयीं त्यांच्या व्याख्यानांत विस्तृत विवेचन असून त्याबरोबर मूळ रामायणाविषयीं त्यांनीं आपले विचार प्रदर्शित केले आहेत. वाल्मीकिरामायणांतील मूळ भाग कोणता व प्रक्षिप्त भाग कोणता याविषयीं विवेचन करितांना त्यांतील आदिकांड व उत्तरकांड हीं दोनहि प्रक्षिप्त असल्याचें त्यांनीं सांगितलें आहे. रामायणांत प्रक्षिप्त भाग आहे, याविषयीं वाद नाहीं. व त्याप्रमाणें आमचे मतें कोणता भाग प्रक्षिप्त आहे याविषयीं आह्मीं आपलें ह्मणणें स्वतंत्र प्रकरणांत सांगितलें आहे. संबंध उत्तरकांड प्रक्षिप्त आहे असें प्रतिपादन प्रो. परांजपे यांनीं केलें आहे. त्यांचे मताचें खंडन यापूर्वीं केलें आहेच रायसाहेब यांच्या प्रतिपादनांत त्याहून वेगळीं प्रमाणें आहेत, तेव्हां त्याविषयीं स्वतंत्र विवेचन करणें अवश्य आहे. प्रथम आदिकांडाविषयीं त्यांचे

विचार काय आहेत हें सांगून त्यांच्या युक्तायुक्ततेविषयीं विवेचन करावयाचें योजिलें आहे. उत्तरकांडाकडे मागाहून वळूं.

वंगभाषेंतील रामायणांत तसेंच तुलसीदासकृत हिंदी रामायणांत वाल्मीकि-रामायणाप्रमाणें सर्व कांडांचीं नांवें योजिलेलीं नसून त्यांनीं बालकांडाला आदिकांड व युद्धकांडाला लंकाकांड अशा संज्ञा दिल्या आहेत. रायसाहेबांनीं वाल्मीकिरामायणाविषयींच्या विवेचनांत याच संज्ञा योजिल्या आहेत. आदिकांड प्रक्षिप्त आहे असें सांगतांना त्यांनीं पुढील प्रमाणें दिलीं आहेत. *

( १ ) नंतरच्या कालांतील पौराणिक कथेचें त्यांत प्राबल्य आहे.

( २ ) प्रक्षेपकानें मूळ रामायणांत मागाहून केलेली वाढ आंत गोंवण्यासाठीं दुसरी अनुक्रमणिका घुसडली आहे. या दुसऱ्या अनुक्रमणिकेंत पूर्वींच्या अनुक्रमणिकेंतील व प्रक्षिप्त अशा दोनहि कथा गोंविल्या आहेत.

रायसाहेबांचे वरील आक्षेप बरोबर आहेत असें आम्हीहि म्हणतों; परंतु त्यांनीं घेतलेले आक्षेप व त्यांवरून केलेला निर्णय हीं स्वभावत: विसंगत आहेत; असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. सोयीसाठीं आम्हीं जरी आक्षेपाचे दोन भाग केले आहेत, तरी तत्त्वत: ते एकरूप आहेत; आणि खरोखरच या कांडांत पुष्कळ पौराणिक कथा संवादरूपानें सांगितल्या आहेत, तथापि रामचरित्रां-संबंधीं कोणताहि भाग या कांडांत नाहीं असें रायसाहेबांना म्हणतां येणार नाहीं. रामचरित्राला पूर्णता आली पाहिजे, या दृष्टीनें हे भाग आवश्यक आहेत. या कांडांत पौराणिक कथा फार आहेत असा त्यांचा आक्षेप आहे व आक्षे-पाचे निमित्तानें त्यांत अल्प कां होईना रामचरित्र आहे, हें त्यांना मान्य अस-ल्याचें उघड होत आहे. तेव्हां पौराणिक कथांचे प्रक्षेपाकरितां समग्र कांड प्रक्षिप्त ठरविल्यास या अल्पशा रामचरित्राला तरी आपणांस मुकावें लागेल, याचा रायसाहेबांनीं विचार केला आहे काय ? हाच न्याय इतर कांडांना लाविल्यास, त्यांत पौराणिक कथांचें प्राबल्य नसलें तरी प्रक्षिप्त भाग आहे व त्यानिमित्त सर्व कांडें प्रक्षिप्त ठरविण्याचा अनवस्था प्रसंग येईल. त्यांनीं बालकांडांतील पहिली अनुक्रमणिका मूळची ठरविली आहे व दुसरी

* Bengli Ramayanas, page 55-56.

प्रक्षिप्त ठरविली आहे. आणि त्यांशीं या मुद्यापुरतें आमचें एकमत आहे; पण हा अनुक्रमणिकासर्ग व तदनुषंगानें असलेली क्रौंच-वधाची कथा ते कोणत्या कांडांतील म्हणणार? आणि अयोध्याकांडाचा प्रारंभ "भरतानें मातुलगृहीं जातांना बरोबर शत्रुघ्नाला नेलें" या वाक्यानें झाला आहे. हा प्रारंभ पाहून वाचकांनीं भरत आणि शत्रुघ्न कोण आणि कसे ओळखावयाचे? अलीकडील कित्येक कादंबऱ्यांचा उपक्रम संवादरूपानें होतो व मग तो संवाद कोणकोणत्या पात्रांमध्यें आहे याचें निरूपण केलेलें असतें; तशा पद्धतीनें रामायणाचा उपक्रम केला असेल हें संभवनीय दिसत नाहीं; आणि तसा केला असेल अशी कल्पना केली तरी आंतील पात्रांची माहिती मागाहून मुळींच दिलेली नाहीं. तेव्हां अयोध्याकांडापासून रामायणाला खरा प्रारंभ होतो अशी त्यांनीं केलेली कल्पनाच चिंत्य आहे.

ज्या पौराणिक कथांचें बालकांडांतील प्राबल्य पाहून रायसाहेबांनीं समग्र-कांडावर हल्ला केला, त्यांतील बहुतेक कथा आम्हीं प्रक्षिप्त म्हणून ठरविलेल्या भागांत आपोआप येत आहेत. कांडाविषयीं संशय प्रदर्शित करितांना ज्या कथेचा उल्लेख रायसाहेबांनीं केला आहे, त्यांत रामाचे चरित्राशीं संबंध असलेली कथा एकहि नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आमच्या म्हणण्याप्रमाणें प्रक्षिप्त भाग गाळून मूळचें म्हणून राहणारें बालकांड वेगळें काढिल्यास रायसाहेबांचा त्यावर आक्षेप येईल असें वाटत नाहीं आणि तसा आक्षेप घेण्यास त्यांस सवडहि नाहीं. ब्राह्मणी वर्चस्व स्थापित करण्यासाठीं या कथा प्रक्षेपकानें बालकांडांत घुसडल्या अशी त्यांनीं त्याची उपपत्ति सुचविली आहे. वसिष्ठ-विश्वामित्रांतील कलहाची कथा बालकांडांत असून तीवर रायसाहेबांचा कटाक्ष आहे. या कथेंत विश्वामित्राचे तोंडीं--

**धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलं बलम् ॥**

असें जें वाक्य आहे, तें त्यांनीं आपल्या प्रतिपादनांत अवतरिलेलें असून तें वाचून, आगबोटींत प्रथमच बसणाऱ्या नवख्या प्रवाशाचें मस्तक जसें भोंवूं लागतें, तशी त्यांची अवस्था झाल्याचें दिसून येतें. ही कथा आमचे मतें प्रक्षिप्तच आहे व ती गळल्यावर ब्राह्मणी वर्चस्वाची रायसाहेबांना शिसारी आणण्या-

सारखी कथा त्यांत राहील, असें वाटत नाहीं. ब्राह्मणी वर्चस्वाच्या निदर्शक म्हणून, वामनावतार व सगरपुत्रांचें दहन, या कथांचा उल्लेख रायसाहेबांनीं केला आहे; परंतु या कथांतील पात्रें ब्राह्मणवर्णाचीं आहेत, याहून यांत ब्राह्मणी-वर्चस्वाचा संबंध दिसत नाहीं. वसिष्ठ-विश्वामित्रांच्या कथेंत असा आक्षेप घेण्यास वाव तरी आहे; आणि ही कथा गळल्यावर त्यांच्या दृष्टीनेंहि राहिलेलें आदिकांड प्रक्षिप्त ठरवितां येत नाहीं.

आमचे मतें आदिकांडांत जो प्रक्षिप्त भाग आहे, तो गळल्यावर राहिलेलें कांड मूळचें म्हणून मान्य करणें भाग आहे. आधीं हें कांड लहान, व प्रक्षिप्त भाग गळल्यावर अधिक आकुंचित होणार; तथापि यांत आलेलें रामचरित्र पुढील कांडाशीं संबद्ध झालेलें आहे व तें लक्षांत न आल्यामुळें रायसाहेबांनीं समग्र कांड प्रक्षिप्त ठरविण्याचें धाडस केलें, अशी आमची कल्पना आहे. यांतील रामचरित्र संक्षेपतः सांगावयाचें म्हणजे रामजन्म, विश्वामित्राच्या मखाचें रक्षण, व सीताविवाह, इतका भाग त्यांत येतो. रामजन्म व सीताविवाह या कथा पुढील कांडाशीं संबद्ध आहेत, हें कोणालाहि न सांगतां पटण्यासारखें आहे. सीताविवाह व मखरक्षण या दोन कथा परस्परसंबद्ध आहेत. मग प्रक्षिप्त ठरविण्यासारखा भाग बालकांडांत कोणता राहिला? सीताविवाहाची कथा पुढील भागांत 'रामपत्नी सीतेला रावणानें पळवून नेली,' असें सांगितलें आहे म्हणून त्यानिमित्त संबद्ध आहे, असें येथें आम्ही अनुमान करीत आहों असें मात्र कोणीं समजूं नये. या कथांचे उल्लेख पुढील भागांत स्पष्टपणें आले आहेत. सीतेनें आपल्या विवाहाची कथा लोपामुद्रेजवळ सांगितलेली राय-साहेबांनीं मूळचें म्हणून मान्य केलेल्या अयोध्याकांडाचे अंतीं आली आहे. विश्वामित्राचे मखरक्षणार्थ राम येऊन तेथून मिथिलेला आल्याचें त्यांत स्पष्ट सांगितलें आहे. ती म्हणते:—

**सुदीर्घस्य तु कालस्य राघवोऽयं महाद्युतिः।**
**विश्वामित्रेण सहितो यज्ञं द्रष्टुं समागतः॥२।११९।४४॥**

"( स्वयंवराकरितां आलेले राजे, धनुष्याला प्रत्यंचा चढवितां येईना असें

होऊन परत गेले ) याला बराच काल लोटल्यावर हा महातेजस्वी राम विश्वामित्रांसहवर्तमान यज्ञ पाहण्याकरितां आला. ''

अशा रीतीनें सीताविवाह आणि मखरक्षण या दोनहि कथा अयोध्याकांडानें मान्य केल्या आहेत. पूर्वीं सविस्तर निरूपिलेल्या कथेचा हा संक्षिप्त अनुवाद आहे, आणि सीतेचा विवाह होण्यापूर्वीं जनकानें सीतेचें स्वयंवर मांडल्याची कथा पूर्वीं आली नाहीं, ती येथें निर्देशिली आहे.

मखरक्षणार्थ राम आल्याचा निर्देश अरण्यकांडांत आला आहे. सीतेचा अपहार करावयाचा ठरवून मारीचाकडे रावण आला असतां मारीचाला रामाचे पूर्वींचे पराक्रमाचें स्मरण होऊन त्यानें, राम मखरक्षणार्थ आला व त्यानें आपण वेदीकडे धांवत जात असतां आपणास एका बाणानें दूरवर कसें उडवून दिलें, तें सर्व वृत्त रावणाला सांगितलें. ( ३।३८ ) अशा रीतीनें आदिकांडांतील या दोन मुख्य कथा पुढील भागांत निरूपिल्या आहेत व त्यांची सत्यता मानिल्यावर—आणि ती मान्य करणें भाग आहे,—आदिकांड मूळचें नव्हे असा आग्रह धरण्यांत अर्थ काय ?

रामायणाचे लाहोर प्रतींत गुजराथेंतील एका प्रतीविषयीं जी माहिती दिली आहे, तीवरून बालकांडांतील कथा बालचरित या नांवानें अयोध्याकांडांत दिली आहे. या रामायणाचा प्रारंभ अशा रीतीनें खरोखरच अयोध्याकांडानें झाला आहे. रायसाहेबांचें प्रतिपादन या दृष्टीनें खरें झालें, तरी त्यांतच त्यांना अनिष्ट असलेल्या बालकांडांतील कथा आल्या आहेत, त्यांचें ते काय करणार ? ही प्रत तर चारशें वर्षांपूर्वींची आहे.

उत्तरकांड प्रक्षिप्त ठरविण्याचें मुख्य कारण रायसाहेबांनीं, लंकाकांडाचे अंतींचे समाप्तिपर श्लोक व फलश्रुति हें असल्याचें सांगितलें आहे.* आदिकांडांतील पौराणिक कथा वाचून रायसाहेब ज्याप्रमाणें त्यावर संतप्त झाले, तीच स्थिति उत्तरकांडांतील विविध कथा पाहून त्यांची झाली आहे.त्या त्या कथांच्या ग्राह्याग्राह्यतेकडे न पाहतां त्यांनीं एकदम झटपट कायद्याचा निर्णय दिला आहे. या समाप्तिपर श्लोकांचें स्वरूपच असें आहे कीं,तें पाहिलें असतां ते श्लोक काव्यांत मूळचे असावेत

* Bengali Ramayanas, Page 57—58.

असें वाटत नाहीं. " महर्षि वाल्मीकींनीं पूर्वी केलेलें हें आदिकाव्य " (आदिकाव्यमिदं चार्षं पुरा वाल्मीकिना कृतम् ) असा या समाप्तीचा उपक्रम आहे व पुढें फलश्रुति सांगितली आहे. येथें सविस्तर श्लोक पाहतांच उत्तरकांड प्रक्षिप्त ठरविण्यास आतां अधिक प्रमाणें शोधण्याचें कारण नाहीं, असें रायसाहेबांना वाटलें व तसें त्यांनीं लिहिलेंहि; परंतु कोणताहि कवि स्वतांचे काव्याची समाप्ति करितांना " हें पूर्वी केलेलें काव्य " असें लिहून ठेवील किंवा नाहीं याची रायसाहेबांना येथें शंका कशी आली नाहीं ? वास्तविक ही समाप्ति व फलश्रुति सर्व प्रक्षिप्त असून, प्रक्षेपकाचे कालास अनुसरून व आदरपूर्वक त्यानें " महर्षींनीं पूर्वी केलेलें काव्य " असा येथें निर्देश केला आहे. लंकाकांडाचे अंतींचे हे प्रक्षिप्त श्लोक गाळल्यावर त्यानिमित्तानें केलेलें अनुमान आपोआप निरस्त होतें, हें सांगावयास नको.

जावा बेटामध्यें कविभाषेंत असलेल्या रामायणाचें जें प्रमाण रायसाहेबांनीं येथें दिलें आहे, त्याचें स्वरूप याहून वेगळें आहे. हें रामायण ख्रिस्ती शकाचे प्रारंभीं कोणत्या तरी शतकांत (Early centuries) झालें असावें असें त्यांनीं लिहिलें आहे. यांत आमचेकडील प्रतीप्रमाणें लंकाकांडाचे अंतीं समाप्ति व फलश्रुति आहे व उत्तरकांड वेगळें आहे. आमचेकडील प्रतींत रामायणाचा एक भाग म्हणून ज्याप्रमाणें उत्तरकांड मिळतें त्याप्रमाणें जावा बेटांतील प्रतींचें नसून तेथें तें एक स्वतंत्र काव्य आहे व हा या दोन प्रतींमध्यें विशेष आहे.* लंकाकांडांतापर्यंतचें रामायणाचें भाषांतर म्पोए राजकुसुम योगीश्वर यानें केलें व उत्तरकांडाचें म्पु दर्मय यानें केलें. षट्कांडात्मक रामायणाचें कविभाषेंतील भाषांतर करितांना कवीनें त्याची कांडांत व सर्गांत अशी दुहेरी विभागणी न करितां सर्व ग्रंथाचे केवळ २५ सर्ग केले आहेत. कविभाषेंतील रामायणासंबंधीं जी माहिती फ्रेडरिक यानें दिली आहे ती आमचेकडील रामायणाशीं बहुतेक जुळती आहे. भेद फार थोडा आहे. रामाचें वर्णन विष्णूचा अवतार म्हणूनच या भाषांतरांत अथपासून इतिपर्यंत केलेलें आहे. सुमित्रेचा दुसरा पुत्र शत्रुघ्न

* कविभाषेंतील रामायणासंबंधीं सर्व माहिती ज्ञानकोशाचे प्रस्तावनाखंडावरून दिली आहे. विभाग १ ला, पृ २१२.

याचें नांव यांत नाहीं. मात्र तें मूळांतच नाहीं, का माहिती देणाऱ्या फ्रेडरिकचे ग्रंथांत तें देण्याचें चुकीनें राहिलें, हें कळत नाहीं. यांत कैकेयीचीं आपल्या मुलास गादीवर बसविण्याचीं कारस्थानें वर्णन केलीं आहेत, परंतु तिनें पतीशीं त्यानें पूर्वी देऊं केलेले वर मागून घेऊन रामाला वनांत पाठविलें वगैरे न सांगतां राम आपण होऊन वनांत गेल्याचें वर्णन आहे. रावणवधानंतर सीता अग्निशुद्ध झाल्याची कथा यांत आहे व त्याबरोबर ती भूमातेच्या पोटांत गेल्याचें अधिक सांगितलें आहे. यानंतर रामानें एकट्यानें अयोध्येंत जाऊन राज्य केलें व वृद्धपणीं अरण्यांत जाऊन मग तो निजधामास गेला अशी आमचेकडील रामायणाहून अगदीं भिन्न अशी कथा यांत आहे. उत्तरकांड म्हणून जो स्वतंत्र ग्रंथ आहे त्यांत रामाचे बंधूंविषयीं कांहीं कथा आहेत व रामाचे घराण्याशीं ज्यांचा कांहीं संबंध नाहीं अशा इतर अनेक कथा आहेत. रायसाहेबांचें यासंबंधीं प्रतिपादन दोन शब्दांत असून मुख्य मुद्याशीं वरील माहितीचा कांहीं संबंध दिसत नाहीं, हें खरें; तथापि रायसाहेबांचे विरुद्ध आमचें म्हणणें काय आहे, हें आमच्या वाचकांचे लक्षांत यावें, याकरितां येथें ही माहिती दिली आहे. रायसाहेबांचें हें अनुमान नवें आहे, असें नाहीं. पाश्चात्य पंडित वेबर यानेंहि उत्तरकांड प्रक्षिप्त आहे, असें दाखवितांना कविभाषेंतील रामायणाचें हें प्रमाण पुढें केलें आहे.

कविभाषेंतील रामायणाचें वरील स्वरूप पाहिलें म्हणजे तें वाल्मीकिरामायण हा ग्रंथ प्रमाण म्हणून पुढें ठेवून त्याचे आधारें केलें आहे, असें दिसत नाहीं. आपल्याकडे रामायणावर देशी भाषेंत जे ग्रंथ आहेत, त्यांत ज्याप्रमाणें मूळ रामायणाचा मुख्य कथेपुरता आधार घेऊन इतर आनुषंगिक कथा व माहिती विस्तृतपणें दिलेली असते, त्याप्रमाणें या रामायणांतील कथा निरूपण केल्या आहेत, असें दिसतें. मूळ ग्रंथ पुढें ठेवून त्यावरून अनुवाद करणाऱ्याला त्याचा संक्षेप अथवा विस्तार कथासंदर्भ राखून करितां येतो व तशी पद्धति आहेहि. परंतु कथेची फिरवाफिरव त्याला करितां येत नाहीं. कविभाषेंतील रामायणांत आमचेकडील कथेशीं जी भिन्नता दिसते, ती पाहतां कवीनें आमचेकडील रामायणाचा केवळ अनुवाद केलेला नाहीं, हें निर्विवाद आहे. मूळ रामायण व इतर ग्रंथ वाचून त्यावरून त्यानें हें कोडबोळें बनविलेलें आहे. विष्णूनें

अवतार धारण केल्याची कथा मूळची नसून प्रक्षिप्त आहे व तिचा अनुवाद यांत केलेला आहे. राम आपण होऊन वनांत गेल्याच्या कथेंत जातकांचें प्रतिबिंब पडलें आहे आणि सीतेचा भूमींत प्रवेश झाल्याचें शेवटीं जें वर्णन आहे त्याचा उगम खुद्द उत्तरकांडांत आहे, अशी आमची समजूत आहे. कविभाषेंतील रामायणाची जरा अधिक विस्तृत माहिती या कामीं मिळणें अवश्य आहे. ती तशी मिळाली असती तर आमची समजूत कल्पनेच्या आधारावर न ठेवितां तिला प्रमाणांचा आधार देतां आला असता; परंतु ती मिळणें तूर्त शक्य नाहीं. तेव्हां मिळालेल्या माहितीवर निर्वाह करणें भाग आहे. कविभाषेंतील रामायण लिहिणारानें आपल्या ग्रंथांत उत्तरकांडांतील कोणत्याहि कथेचा स्पष्ट निर्देश केलेला नाहीं व आक्षेपकांचा मुख्य आधार हा आहे; परंतु वर उल्लेखिलेली कथा उत्तरकांडाची सूचक आहे, अशी आमची कल्पना आहे.

आमच्या कल्पनेला कविभाषेंतील रामायणांत अधिक आधार मिळण्यासारखा नाहीं, हें उघड आहे. तेव्हां आतां या रामायणाचा जो काल वर स्वतः रायसाहेबांनीं दिलेला अनुवादिला आहे, त्यापूर्वीं आमचेकडील रामायणांत उत्तरकांड होतें किंवा नाहीं, हें पाहूं. उत्तरकांडांतील प्रक्षिप्त भागाविषयींचें विवेचन आम्हीं अन्यत्र केलें आहे व तो भाग वगळून राहिलेलें अर्थात् आमच्या समजीप्रमाणें मूळचें असलेलें* जें उत्तरकांड तेवढ्यापुरती चर्चा येथें आम्हांला करावयाची आहे, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. मूळ भारतांत भर पडून त्याची शेवटची सध्यां उपलब्ध असलेली आवृत्ति खिस्तपूर्व २५० च्या सुमाराची आहे. त्याच्यापुढें ती आणितां येत नाहीं, हें रा. ब. वैद्य यांनीं महाभारताच्या उपसंहारांत सिद्ध केलें आहे. महाभारतांतील वनपर्वांत तीर्थयात्रानिरूपणाचे निमित्तानें गोप्रतार तीर्थाचा उल्लेख आलेला आहे. हें तीर्थ सरयूमध्यें असून येथून राम आपल्या सेवकादिकांसह स्वर्गांत गेला असें येथें त्याचें वर्णन केलें आहे. ही कथा उत्तरकांडाच्या १०९ वे सर्गांत आली आहे. याच पर्वांत भीम व मारुती यांचा संवाद आहे, त्यांत मारुतीनें रामाजवळ भूतलावर रामकथा प्रचलित असेपर्यंत आपण जिवंत राहावें असा जो वर मागितला, त्याचा उल्लेख

---

* प्रकरण २, पृ. ७२ पाहा.

आहे. ही कथा उत्तरकांडाचे १०८ व्या सर्गांत आहे. प्रत्यक्ष उत्तरकांडाचा उल्लेख महाभारतांत नाहीं, हें खरें; तथापि या दोनहि कथा रामायणावांचून अन्य प्राचीन ग्रंथांत आलेल्या नाहींत व या दृष्टीनें महाभारतांत असलेला त्यांचा उल्लेख उत्तरकांडाचें अस्तित्व सूचित करणारा आहे व यासाठीं येथें त्यांची माहिती दिली आहे. भीम व मारुती यांच्या संवादांत तर मारुतीचे तोंडचा वर-याचनेचा श्लोक रामायणावरून अवतरिलेला दिसतो. महाभारताची शेवटची प्रत होण्यापूर्वीं रामायणांतील उत्तरकांडांत वरील कथा होत्या, हें निर्विवाद सिद्ध झाल्यावर कविभाषेंतील रामायणांत उत्तरकांड नाहीं म्हणून तोंपर्यंत रामायणांत उत्तरकांडच नव्हतें असें अनुमान कसें करितां येईल? कविभाषेंतील रामायणाचें स्वरूप आपणांस साकल्यानें समजलें नाहीं तरी वाल्मीकींचे मूळ रामायणांत कांहींतरी प्रक्षिप्त भागाची भर पडल्यावर सुधारून वाढलेली प्रत त्या लेखका-पुढें होती, हें मिळालेल्या त्रोटक माहितीवरून सहज कळण्यासारखें आहे. राय-साहेबांनीं हें लक्षांत घेतलें असतें तर पुढील अनुमान त्यांनीं केलें नसतें. वेबरनें केलेलें अनुमान त्यांचेपुढें होतें व त्यास पुष्टि देण्याचे तीव्र दृष्टीनें त्यांना पछाडल्यामुळें त्यांनीं तें अनुमान केलें असावें, यांत शंका नाहीं.

## जातककथा आणि रामायण.

वाल्मीकिरामायणाचे रचनेसंबंधानें अनेकांनीं अनेक उपपत्ति सुचविल्या आहेत. काव्यरचनेसंबंधाचा स्वतां वाल्मीकींनीं दिलेला इतिहास रामायणाचे प्रारंभीं आला आहे; तो वाचून ज्यांचें समाधान झालें नाहीं, अशा पंडितांनीं उपपत्ति लावण्याचा स्वतंत्र यत्न केला आहे. रामायणाची रचना महर्षि वाल्मीकींनीं केली, याविषयीं कोणाचा मतभेद नाहीं. मतभेद काय तो त्यांनीं ही रचना कोणत्या आधारानें केली, याविषयीं आहे. रायसाहेब दिनेशचंद्र सेन यांनीं रामायणाची रचना वाल्मीकींनीं जातककथांचे आधारावर केली अशी कल्पना सुच-विली आहे. ही कल्पना नवी आहे असें नाहीं; दशरथजातकावरून रामायण वाल्मीकींनीं लिहिलें, अशी कल्पना यापूर्वींच पुढें आली आहे. इतर जातकांचा संबंध रामायणाचे उत्पत्तीशीं यापूर्वीं कोणीं जोडिला नव्हता तो रायसाहेबांनीं जोडिला व ही बाब मात्र नवीन आहे. दशरथजातकाशीं तुलना करून पाहतां त्याचें रामायणाशीं

सादृश्य थोडें आहे आणि जातकाहून रामायणांत कथाभाग अधिक आहे. याकरितां प्रो. वेबर यांना रामायणाची रचना होमरचे इलियडवरून केलेली असावी, अशी कल्पना करावी लागली. रायसाहेबांनीं आपल्या कल्पनेंत वाल्मीकीवर परदेशांत उसनवारी करण्याचा प्रसंग न आणितां ती देशांतच भागविली आहे. निरनिराळ्या जातकांतील कथांचें सादृश्य दाखवून त्यांनीं रामायणाची रचना अनेक जातकांचे आधारें केलेली असावी, अशी कल्पना सुचविली आहे. निरनिराळ्या जातककथांचें वाल्मीकींनीं रामायण हें कडबोळें बनविलें आहे, असें रायसाहेबांचें म्हणणें आहे. जातककथेंतील कोणत्या कथाभागाचें रामायणाशीं सादृश्य आहे, हें रायसाहेबांनीं सांगितलें असून तें प्रथम त्यांच्या शब्दांत सांगून त्यावर त्यांनीं आपलें अनुमान कसें उभारलें आहे तें सांगूं, म्हणजे त्याविषयीं विवेचन करण्यास व तें वाचकांस समजण्यास ठीक पडेल. तुलनेसाठीं त्यांनीं

## दशरथजातक

प्रथम घेतलें आहे. काशीचा राजा दशरथ याला १६००० स्त्रिया असून त्यांपैकीं मुख्य राणीला राम, लक्ष्मणकुमार हे दोन पुत्र व सीता या नांवाची एक कन्या होती. ही राणी मरण पावल्यावर बाकीच्या स्त्रियांतील एकीला राजानें पट्टराणी केलें. हिला एक पुत्र झाला. याचें नांव भरत. राजानें राणीला एक वर देऊं केला असतां तिनें तो त्या वेळीं न घेतां मागाहून मागून घेईन, असें सांगितलें. भरत सहा वर्षांचा झाला असतां तिनें राजाजवळ पूर्वीं त्यानें देऊं केलेल्या वरास अनुसरून आपल्या पुत्राला राज्य देण्याची गोष्ट काढिली. राजानें पूर्वींच्या राणीपासून आपल्याला झालेल्या दोन पुत्रांना चुकवून भरताला राज्य देण्याचें नाकारलें. या वेळीं ती थांबली, तरी या वराविषयीं तिनें राजाला पुनः विचारिलें. तेव्हां ही दुष्ट स्त्री आपल्या पूर्वींच्या दोन पुत्रांचा घात करील, अशी राजाला भीति वाटून राजानें त्यांना बोलावून आणून, आपण मरेपर्यंत अरण्यांत राहण्याचा अथवा दुसऱ्या एखाद्या बलाढ्य राजाचें साहाय्य मिळविण्याचा उपदेश केला. राजानें कित्येक ज्योतिष्यांना बोलावून आणून आपलें आयुष्य किती राहिलें आहे याचा शोध केला; व तें १२ वर्षें राहिलें असल्याचें कळल्यावर राजानें पुत्रांना या मुदतीनंतर परत येऊन राज्य घेण्या-

विषयीं आज्ञा केली. राजपुत्रांबरोबर त्यांची बहीण सीता ही अरण्यांत गेली. त्यांजबरोबर पुष्कळ नागरिक अरण्यांत जाण्यास निघाले असतां राजपुत्र रामानें गोड शब्दांनीं त्यांचें सांत्वन करून परतविलें. दोघे राजपुत्र व सीता यांनीं हिमालयापर्यंत प्रवास केला व तेथें तीं आश्रम करून राहिलीं. लक्ष्मण आणि सीता यांनीं रामाला पित्याचे ठिकाणीं मानून आश्रमांत राहण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो आश्रमांत राहत असे व तीं दोघें अरण्यांतून कंद, मूळें व फळें आणीत. इकडे राजा पुत्रशोकानें नऊ वर्षांनीं मरण पावला. राणीनें भरताला गादीवर बसविण्याचा खटाटोप केला; परंतु राज्यावर अधिकार ज्येष्ठपुत्राचा, याकरितां मंत्र्यांनीं त्याला गादीवर बसविण्याचें नाकारलें. भरतानें मंत्र्यांचें म्हणणें बरोबर असल्याचें सांगून रामाला आणण्याकरितां तो सेना आणि नागरिक यांसह अरण्यांत गेला. आश्रमांत भरत रामाला भेटला. त्याला त्यानें पिता मृत झाल्याचें निवेदन केलें. पित्याचा मृत्यु ऐकून त्याला खेद वाटला नाहीं. सायंकाळीं सीता व लक्ष्मण कंदमुळें घेऊन परत आल्यावर त्यांना खेद होईल म्हणून मात्र रामानें त्यांना उदकांत उभीं करवून मग पित्याचा मृत्यु कळविला. रामाच्या कल्पनेप्रमाणें त्यांनीं पित्यासाठीं फार शोक केला व रामानें त्यांना वेदांतपर उपदेश केला. रामाचे भाषणांत पुढील श्लोक आहे.

**फलानां इव पक्वानां निच्चं पपतान् भयम् ।**
**एवं जातं न मच्चानं निच्चं मरणतो भयम् ॥ ***

रामाच्या उपदेशाप्रमाणें भरतानें शोकाचा त्याग केला. नंतर भरतानें रामाला राज्याचा स्वीकार करण्याची विनंति केली असतां पित्यानें सांगितलेली मुदत (बारा वर्षें) पूर्ण होईपर्यंत परत येण्याचें त्यानें नाकारलें. भरतानें तोंपर्यंत राज्यव्यवस्था कशी ठेवावयाची असें विचारिल्यावरून रामानें आपल्या पादुका सिंहासनावर ठेवण्यासाठीं त्याजकडे दिल्या व त्या घेऊन भरत परत वाराणसीला गेला. रामानें लक्ष्मण व सीता यांना त्याजबरोबर परत पाठविलें. रामाच्या पादुका

---

* हा श्लोक अयोध्याकांडांत पुढीलप्रमाणें आहे:—

**यथा फलानां पक्वानां नान्यत्र पतनाद्भयम् ।**
**एवं नरस्य जातस्य नान्यत्र मरणाद्भयम् ॥**

सिंहासनावर ठेवून अमात्य कारभार पहात असत. त्यांचे कामीं चूक झाल्यास पादुका एकमेकांवर आपटत व बरोबर असल्यास त्या ठेविलेल्या स्थितींत रहात असत. तीन वर्षांनंतर राम परत वाराणसीला आला असतां भरत, लक्ष्मण व सीता सर्व नागरिकांसह त्याला आणण्याकरितां नगरीबाहेर आले. येथें रामाला राज्याभिषेक होऊन त्याचा सीतेशीं विवाह झाला. नंतर त्यांनीं नगरींत प्रवेश केला. रामानें यानंतर सोळा हजार वर्षें न्यायानें राज्य केलें. याविषयीं जातकामध्यें पुढील श्लोक आहे:—

दस वस्स सहस्सानि सट्ठिं वस्स सतानि च ।
कम्बुगिय महाबाहु रामोज्जं अकारयि ॥

शुद्धोदन हा पूर्वींच्या जन्मीं दशरथ राजा झाला होता. महामाया ही रामाची माता; सीता ही राहुलाची माता; आनंद हा भरत व सारिपुत्त हा लक्ष्मण झाला असून स्वतां गौतम हा राम झाला होता. गौतमाचे या जन्मीं जे अनुयायी झाले तेच पूर्वजन्मीं रामाचे उपासक होते.

याप्रमाणें दशरथजातकांतील कथा संक्षेपानें देऊन रायसाहेबांनीं तिची रामायणाशीं तुलना केली आहे. या कथेंत सीताहरण नाहीं व त्यानिमित्त झालेलें रामरावणांचें युद्ध नाहीं. राम स्वतांचे संरक्षणाकरितां अरण्यांत गेला असून त्याचा स्वार्थत्याग पिता मृत झाल्यानंतरहि तो परत आला नाहीं यांतच काय तो आहे. राम व सीता हीं यांत बहीणभावंडें सांगितलीं असून आमचेकडे शाक्यांच्या राजघराण्यांत राजवंश शुद्ध रहावा म्हणून अशा प्रकारें भाऊ व बहीण यांमध्यें विवाहसंबंध करण्याची पद्धति होती. दशरथाचें राज्य वाराणसींत आणि रामाचा वनवास हिमालयांत सांगितला आहे. यावरून या कथेचा प्रसार उत्तरहिंदुस्थानांत असावा, हें उघड आहे. या साध्या कथेवरून सीताहरणादि कथाभागांचा उद्भव कसा झाला याविषयीं अद्यापि निश्चित शोध लागला नाहीं तथापि बुद्धधर्माचे भरभराटीचे वेळीं, अर्थात् अजातशत्रु चंद्रगुप्त व अशोक यांचे राजवटींत ही कथा लोक विश्वसनीय मानीत असत, याविषयीं शंका नको.

## सामजातक.

रामायणाला केवल दशरथजातकाचा आधार नसून इतर जातकांतील कथाहि त्यांत आल्या आहेत. या कामीं सामजातकाचा उल्लेख येथें करणें अवश्य आहे. यांत साम याला वाराणसीचा राजा पिलियक्ख याचा बाण लागून मृत्यु आल्याचें सांगितलें आहे. साम याचे आईबाप अंध असून त्यांचा तो एकुलता एक पुत्र होता. आईबापांकरितां पाणी आणण्यासाठीं तो मिगसम्मती नदीवर गेला असतां तेथें त्याला वर लिहिल्याप्रमाणें मृत्यु आला. ही कथा पाहून रामायणांतील श्रावण-वधाच्या कथेचें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं. पुत्राचे मृत्यूची वार्ता दोनहि कथांमध्यें राजानें त्याचे मातापित्यांस कळविली असून त्यानिमित्त त्यांनीं केलेला शोक दोहोंकडे सारखा आहे. सामाचा पिता शोक करीत असतां त्याचे तोंडीं पुढील अर्थाचें वचन आहे.—"आतां आमचेकरितां जागा कोण बरें स्वच्छ करून देईल? आम्हांला ऊन अथवा थंड पाणी कोण बरें आणून देईल? आमचेकरितां अरण्यांतील कंदमुळें कोण बरें आणील? आम्ही तर वृद्ध असून अंध व अनाथ आहोंत!"× याच अर्थाचा पुढील श्लोक रामायणांत आढळतो:—

**कंदमूलफलं हृत्वा को मां प्रियमिवातिथिम्।**
**भोजयिष्यत्यकर्मण्यमप्रग्रहमनायकम्॥२।६४।३४॥**

## वेस्संतरजातक.

या जातकांत वेस्संतर याला हद्दपार करण्यांत आलें असतां त्याबरोबर जाण्या-साठीं त्याची स्त्री मद्दी हिनें आग्रह धरून ती अरण्यांत गेली, अशी कथा आहे. या वेळीं तिनें केलेलें भाषण आणि रामायणांतील राम वनवासास निघाला असतां सीतेनें केलेलें भाषण ही अगदीं एक आहेत. रामाप्रमाणेंच वेस्संतरानें अरण्यांत जाते वेळीं पुष्कळ दानधर्म केला. वेस्संतराची माता फुसति हिनें त्याचेकरितां केलेला शोक आणि रामायणांत रामाकरितां कौसल्या आणि भरत यांनीं केलेला शोक यांमध्यें पुष्कळ सादृश्य आहे. येथें फुसतीच्या आणि मद्दीच्या भाषणांतील

× येथें रायसाहेबांनीं मूळ वचन दिलें नसून कॉवेलच्या जातककथांचे भाषांतरांतील अवतरण दिलें आहे. ( Cowells jatak Book no. 22, p. 50. ) त्याचें मराठी भाषांतर वर दिलें आहे.

अवतरणें रायसाहेबांनीं जातककथांच्या इंग्रजी भाषांतरांतून घेतलीं असून तुलनेसाठीं अयोध्याकांडांतील भरताचें भाषण अवतरिलें आहे.

## संभुलजातक.

संभुल ही काशीचा राजा सोत्थिसेन याची स्त्री. हिला राक्षसानें पळविली व तिला वश करण्याचा तो प्रयत्न करूं लागला असतां ती त्याला वश होईना. तेव्हां तो तिजवर क्रुद्ध झाला व त्यानें, तूं वश न झाल्यास आपल्या न्याहारीसाठीं तुकडेतुकडे करीन, अशी तिला भीति घातली. अशोकवनिकेंत सीतेला रावणानें जो धाक दाखविला तो आणि संभुलजातकांतील राक्षसाचें भाषण हीं अगदीं सारखीं आहेत.

पुष्कळ जातककथांशीं रामायणाचें सादृश्य दाखवितां येण्यासारखें आहे. तथापि तादृश आवश्यकता नसल्यामुळें तें रायसाहेबांनीं दाखविलेलें नाहीं. जातककथा आणि रामायण यांमध्यें याप्रमाणें सादृश्य दिसलें तरी आधींचा ग्रंथ कोणता असा संशय येथें कोणी घेईल. तथापि निःपक्षपातपणें बोलावयाचें तर रायसाहेब म्हणतात कीं, मूळ रामायण पूर्वीं असतां जातकांतील लहानलहान कथांची रचना करण्यांत लेखकाचा हेतु कोणता समजावयाचा? यापेक्षां जातकांतील साध्या व छोट्या कथांवरून वाल्मीकींनीं रामायण हें काव्य व्यवस्थितपणें ग्रथित केलें असें मानणें अधिक सयुक्तिक नव्हे काय? बुद्धाच्या संन्यासपर शिकवणीचा परिणाम हिंदुस्थानावर फार होऊन मोठमोठ्या घराण्यांतील तरुण निर्वाणाकरितां संसाराचा त्याग करून अरण्यांत जाऊं लागले व याप्रमाणें हिंदु धर्मावर मोठें संकट कोसळलें. त्या वेळीं गृहस्थाश्रमांत राहूनहि मोक्षप्राप्ति होऊं शकते हें तत्त्व रामायणानें सर्वांस पटवून दिलें. रामयणांत रामानें अरण्यवास पत्करिला असला तरी तो बुद्धाप्रमाणें आपल्या पित्याच्या इच्छेविरुद्ध नसून पित्याला वचनमुक्त करण्याकरितां होता. आपल्या सद्गुणी पत्नीकरितां रामानें राक्षसांसीं प्रचंड युद्ध केलें आहे. गृहस्थाश्रमांतील कर्तव्याची शिकवण रामायणानें सर्व लोकांस सोदाहरण शिकविली. उत्तरेकडे प्रचलित असलेल्या जातककथांत रावणादिकांच्या चरित्राचा मागमूस नाहीं, परंतु दक्षिणेकडील हेमचंद्राचे (स.१०८९–११७२) जैन रामायणांत रावणादिकांची तप-

श्वर्या वगैरे यांचें विस्तृत वर्णन आहे. यांत रामाचें चरित्र अल्प असून रावणाचे गुण अधिक उच्च दर्शविले आहेत. बुद्धाचे महायान पंथाचा लंकावतारसुत्त म्हणून ग्रंथ आहे, त्यांत रावणाचा थोर स्वभाव वर्णिला असून त्यांत रामरावणयुद्ध मुळींच सांगितलेलें नाहीं. सहाव्या शतकांतील धर्मकीर्ति या ग्रंथकारानें तर रामायणांतील रावणाचें वर्णन मिथ्या असल्याचें लिहिलें आहे. यावरून दक्षिणेकडे कांहीं कथा प्रचलित होत्या व त्यांवरून दक्षिणेकडील ग्रंथांत माहिती आलेली आहे. या सर्व कथांचा प्रसार वाल्मीकींचे पूर्वीं झालेला होता व त्या दोनहि भागांकडील कथांची वाल्मीकींनीं व्यवस्थित मांडणी केली. जातकांतील कथाहि अशा प्रचलित दंतकथांवरून रचण्यांत आल्या असतील असें येथें कां म्हणूं नये, अशी शंका येथें कोणीं घेतली, तर त्यावर रायसाहेबांचें उत्तर आहे कीं, जातकांचें मूळ अशा प्रकारें दंथकथांमध्यें मानिलें तरी त्यामुळें, दंतकथांत जातकें व रामायण यांचा उगम मानावा लागेल आणि त्यांमध्यें जातकें हीं अधिक प्राचीन होत. रामायणाचा काल कीथ यानें खि. पू. ४०० ठरविला असून प्रो. वेबर तर तो खि. पू. २०० म्हणतो. जातककथा तर खि. पू. ६०० च्या वेळीं फार प्राचीन म्हणून प्रसिद्ध होत्या. बौद्धधर्मानुयायांची पहिली परिषद खि. पू. ५४३ या वर्षीं भरली त्या वेळीं त्यांचें गायन झाल्याचें वर्णन आहे. तेव्हां जातककथा प्राचीन असून त्यांवरून रामायणरचना करण्यांत आली, हें उघड आहे. रायसाहेबांचे प्रतिपादनाचा याप्रमाणें सारांश प्रायः त्यांच्या शब्दांत दिला आहे. आतां त्याविषयीं क्रमशः विचार करून त्याच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं निश्चय करूं.

रायसाहेबांच्या प्रतिपादनांतील निर्विवाद भाग म्हटला म्हणजे जातककथा आणि रामायण यांमधील सादृश्य होय. परस्पर विचारविनिमय होण्याचा संभव नसेल तेथें असें सादृश्य आढळल्यास त्याचें कौतुक वाटतें; परंतु येथें कौतुक करावयाचें नसून कोणीं कोणाचा अनुवाद केला हें पहावयाचें आहे. जातकामध्यें रामायणाचा अथवा रामायणांत कोणत्याहि जातकाचा स्पष्ट निर्देश नाहीं. यामुळें हें सर्व अनुमानानें ठरवावयाचें आहे. कालनिर्णयाविषयीं आह्मांला स्वतंत्र विचार करावयाचा असल्यामुळें जातकांचे अपेक्षेनें रामायण प्राचीन

घा अर्वाचीन एवढ्या प्रश्नाकडे तूर्त पहावयाचें योजिलें आहे. जातकांतील कथा साधी आणि रामायणाची रचना ठाकठिकीची आहे व यावरून जातकें प्राचीन असें रायसाहेब म्हणतात. पण कथेच्या साधेपणावरून कालनिर्णय करण्यास प्रमाण काय ? दशरथजातकांतील कथेचा साधेपणा पुढें करून ते ती कथा प्राचीन ठरवितात; पण रामायणांत इतर जातकांतील कथांचाहि अनुवाद केला आहे असें त्यांचें मत असून त्याचे पुष्ट्यर्थ त्यांनीं इतर जातकांतील कथांचे सारांश देऊन त्यांचे रामायणांतील कथांशीं साम्य दाखविलें आहे. त्या वेळीं ते त्या कथांच्या साधेपणाचें नांव घेत नाहींत, याचा अर्थ काय ? साधेपणाची ही कसोटी लावून जर जातकांचा प्राचीनपणा ठरवावयाचा तर ती दशरथजातकापुरतीच कां लावावयाची ? रामायणांतील कथांशीं तुलना करून दाखवितांना ज्या जातककथांचा रायसाहेबांनीं उल्लेख केला आहे, त्यांतील वर्णनें रामायणाशीं कथेपुरतीं नव्हे, तर काव्यदृष्ट्याहि सारखीं आहेत व साधेपणाची कसोटी पुढें न करण्याचें कारण हेंच आहे. बरें, दशरथजातकामध्यें साधेपणा आहे, असें ते म्हणतात, त्या साधेपणाचें स्वरूप तरी काय आहे ? दशरथजातकांतील कथा स्पष्ट बोलावयाचें म्हणजे खुळचट असून तिला साधी म्हणणें हें श्रीमंताच्या पोरास भोळा म्हणण्यासारखें आहे. रामायणाशीं तुलना करण्याइतकी त्या कथेची पात्रता नाहीं. रामादिकांचीं कांहीं नांवें आणि वनवासाचा प्रसंग हीं दोहोंकडे सारखीं आहेत आणि या सादृश्यास्तव त्याकडे शोधकांचें लक्ष वेधलें आहे. रामायणाशीं तुलना करूं लागल्यास त्यांत किती विसंगत कल्पना भरल्या आहेत, हें लक्षांत येईल.

१ कथेंतील प्रतिपाद्य विषय रामाचें चरित्र हा असतां त्याचे बापाचें—दशरथाचें— नांव जातकाला दिलें आहे.

२ जातकांतील राम, लक्ष्मण हे वडील बंधु असून भरत फार लहान आहे व तो सहा वर्षांचा असतां राजपत्नी त्याला राज्य मिळावें, म्हणून राजाकडे त्यानें पूर्वीं देऊं केलेल्या वराप्रमाणें यत्न करिते व तिच्या दुष्ट बुद्धीला भिऊन राजा आपल्या वडील मुलांना आपण मरेपर्यंत वनांत पाठवितो. जवळ असलेल्या पुत्रांचें राजाला रक्षण करितां येत नाहीं; तेथें त्यांना आपल्या पत्नी-

पासून अपाय होईल, अशी त्याला भीति वाटते आणि त्यांना अरण्यांत पाठविणें सोयीचें वाटतें ! स्वतांचे संरक्षणाकरितां आपणास राजा अरण्यांत पाठवीत असल्याचें कळत असूनहि जातकांतील रामाला स्वतांचे सामर्थ्यावर भरंवसा ठेवून राजधानींत राहण्याचें धैर्य होत नाहीं.

३ वनवासाची मुदत ज्योतिषी लोकांचे विचार घेऊन राजा बारा वर्षांची ठरवितो; ही मुदत स्वतांचे मृत्यूपर्यंतची म्हणून राजा सांगतो, आणि यानंतर रामानें येऊन राज्य करावें, असें त्याला सुचवितो; पण राजाला असें समजत नाहीं कीं, स्वतांचें संरक्षण ज्याला आतां करितां येत नाहीं, त्याला मागाहून राज्य कसें बळकावितां येणार ? रामानें आपल्यामागें राज्य चालवावें अशी खरोखर राजाची इच्छा होती, तर याच वेळीं स्वतांला अडकवून टाकून राज्य हातांत घेण्याची सूचना रामायणांतील दशरथाप्रमाणें या राजानें त्या रामाला कां केली नाहीं ?

४ जातकांतील सीता रामलक्ष्मणांची बहीण म्हणून सांगितली आहे व ती बंधुप्रेमामुळें अरण्यांत त्यांचेबरोबर गेली आहे; पण हिला वनांत जाण्यास राजानें संमति कां दिली ? रामाशीं विवाह होण्यापूर्वीं तिचा राज्यावर अधिकार नव्हता व म्हणून सापत्न मातेपासून तिला अपाय होण्याची भीति तर नव्हती ना ?

५ रामायणांतील रामाला पोंचविण्यास पुष्कळ नागरिक गेल्याचें वर्णन आहे, तसें जातकांतील रामाबरोबरहि पुष्कळ लोक गेले आहेत; पण त्यांचें रामावरील प्रेम जातकांत कोठें वर्णिलेलें नाहीं. मग याच वेळीं त्यांना असा पान्हा कसा फुटला ?

६ अरण्यांत गेल्यावर लक्ष्मण व सीता वन्य आहार आणण्यासाठीं बाहेर जात व जातकांतील राम आश्रमांत स्वस्थ बसलेला असे.

७ ज्योतिष्यांनीं सांगितलेल्या मुदतीपूर्वीं राजा–नऊ वर्षांनीं–मरण पावतो व राजपत्नी आपल्या मुलाचे राज्याभिषेकाची सिद्धता करूं लागते. इतक्यांत राजमंत्री ज्येष्ठ पुत्राचा राज्यावर अधिकार असल्याचें तिला सांगतात व भरत त्यांचे

म्हणण्यास संमति देतो. पण या ज्येष्ठ पुत्राला राजानें अरण्यांत पाठविला त्या-वेळीं हे मंत्री झोंपीं गेले होते काय ?

८ जातकांतील दशरथ पुत्रशोकानें मरण पावला आहे आणि पुत्रवियोग व राजाचा मृत्यु यांमध्यें काल किती ? फार थोडा, अवघीं नऊ वर्षें !

९ राजाला तरी इतका पुत्रशोक होण्याचें कारण काय ? पुत्रांचे संरक्षणा-करितां त्यानें स्वतः ही योजना केलेली, तेव्हां ती तडीस गेलेली पाहून त्याला आनंद वाटणेंच युक्त होतें.

१० रामायणांतील भरत राम वनांत गेल्या वेळीं मातुलगृहीं होता, तर जातकांतील भरत लहान होता; म्हणून त्याला त्या वेळीं रामाला परतवितां आलें नाहीं. येथपर्यंत संविधानक ठीक आहे; पण रामायणांतील भरत घरीं येतांच रामाला परत आणण्याकरितां अरण्यांत गेला आहे आणि जातकांतील भरताला पिता मरेपर्यंत वाट पहावी लागली आहे. तोंपर्यंत त्यानें भावांचा शोध मुळींच न करण्याचें कारण काय ? निघते वेळीं तो लहान होता, हें खरें; पण पित्याला मृत्यु येतांच त्याला प्रौढपणा आला असें तर म्हणतां येत नाहीं ना ?

११ भरत रामाला आणण्याकरितां सैन्यासह रामाचे आश्रमांत जातो. पित्याचा मृत्यु ऐकून रामाला दुःख होत नाहीं; पण लक्ष्मण व सीता फार विलाप करितात; आणि त्यांना शोक होईल हें जाणून राम त्यांना पाण्यांत उभें करवून मग त्यांना पित्याचे मृत्यूची वार्ता कळविण्याची व्यवस्था करितो. या योजनेंतील रहस्य काय ?

१२ जातकांतील राम रामायणांतील रामाप्रमाणें परत येत नाहीं; पण रामा-यणांतील रामाला पित्राज्ञापालन हें कारण तरी प्रबल आहे. जातकांतील रामानें हेंच कारण पुढें केलें आहे; पण त्याला पित्यानें स्वतःला मृत्यु येईपर्यंत अर-ण्यांत पाठविलेला, आणि बारा वर्षांचा काल केवळ ज्योतिष्यांचे भविष्याचे आधारें ठरविलेला, असें असतां मुदतीचें हें खुळचट कारण राम पुढें करितो याला काय म्हणावयाचें ?

१३ या वेळीं भरताला रामानें केलेला उपदेश जातक व रामायण यांमध्यें सारखा आहे व त्यांतील दोहोंकडे अगदीं एक असलेला श्लोक रायसाहेबांनीं

दिलेला आहे. हें साम्य आहे याविषयीं वाद नाहीं; परंतु जातकांतील हा प्रसंग अस्थानीं आहे. पित्याचा मृत्यु ऐकून रामाला दुःख झालें नाहीं असें पाहून जातकांतील भरतानें रामाला अशा प्रकारें इंद्रियांवर जय कसा मिळवितां आला असा प्रश्न विचारिला आहे व त्यानें दिलेल्या उत्तरांत वरील वचन आलेलें आहे; आणि रामायणांतील रामाचें भाषण भरत पित्याचे मृत्यूकरितां व रामाचे वनवासाकरितां शोक करूं लागला असतां त्याचे सांत्वनाकरितां केलेलें आहे. रामायणांतील प्रसंग सहज आलेला असून जातकांतील प्रसंग बुद्ध्या उपस्थित केलेला आहे.

१४ भरत रामाच्या पादुका घेऊन परत गेल्यानें व त्या सिंहासनावर ठेवून कारभार पाहूं लागल्याचें वर्णन दोहोंकडे सारखें आहे; पण त्याचे हातून अन्याय झाल्यास पादुका एकमेकांवर आपटून कौल देत हा जातकांतील प्रयोग तर अपूर्व आहे!

१५ भरताबरोबर सीता व लक्ष्मण परत वाराणसीला गेलीं आहेत व नऊ वर्षे रामाबरोबर अरण्यांत प्रेमानें येऊन राहिलेल्या या भावंडांना केवळ तीन वर्षांकरितां परत येण्याचें कांहीं वाटलें नाहीं.

१६ राम परत आल्यावर त्याचा सीतेशीं—स्वतःचे बहिणीशीं—विवाह झाला आहे.

जातकांतील विसंगत व विलक्षण वर्णनांचें विवेचन करण्याच्या निमित्तानें पूर्वींची संक्षिप्त कथा पुनः अनुवादावी लागली आहे व यावरून असा विलक्षणपणा या कथेंत कसा ओतप्रोत भरला आहे, हें कळून येईल. रामायणांतील कथेमध्यें राक्षस व वानर यांच्या निमित्तानें अलौकिकता आली आहे. या कथांपैकीं एकहि कथा जातकांत आली नाहीं आणि तुलनेकरितां पुढें आलेला भाग पाहिला तर रामायणांतील कथेमध्यें मात्र अलौकिकता मुळींच नसून ती जातककथेमध्यें भरपूर आहे. तेव्हां रायसाहेबांची साधेपणाची कसोटी लावावयाची तर ती रामायणाला उलट अनुकूल होणार नाहीं काय? दोन कथा जवळजवळ ठेवून तुलना केली तर रामायणांतील कथा जातकामध्यें अनुवादाचा दोष टाळण्यासाठीं कांहीं खुळचट फेरफार करून अनुवादिली आहे असें निः-

संशय वाटूं लागतें. रामचरित्र सांगावयाचें असतां जातकाला दशरथाचें नांव बुद्धया दिलेलें आहे आणि अशा प्रकारें अनुवादकानें, नांव देण्यापासून खुळचटपणाला—त्याच्या मतें सावधपणाला—प्रारंभ केला आहे.

रायसाहेबांची येथें एक शंका आहे कीं, रामायणांतील कथांचा जातकामध्यें अनुवाद करण्याचें प्रयोजन काय मानावयाचें ? उलट बुद्धधर्माच्या संन्यासपर मार्गाचें वर्चस्व झालेलें पाहून जातकांतील कथांचा अनुवाद रामायणांत केलेला आहे व त्यांत गृहस्थधर्माचें प्राबल्य राखिलेलें आहे, असें मानणें सयुक्तिक नव्हे काय ? रायसाहेबांचे कोटिक्रम ठीक आहेत; पण त्यांचें उत्तर जातकांतच आलेलें आहे. दशरथजातकाचे शेवटीं ' शुद्धोदन हा दशरथ होता ' वगैरे जें निरूपण केलें आहे, त्यांत हें प्रयोजन गर्भित आहे. जातककथांमध्यें अशा प्रकारें गौतमबुद्धाचे पूर्व जन्मांतील म्हणून पुष्कळ कथा आल्या आहेत तशीच ही एक कथा आहे; आणि भविष्यपुराणांत विकटावती राणीचा उल्लेख पाहून त्याविषयीं आपण जो निर्णय करितों तोच येथें करावयाचा आहे. रामायणांतील कथेचा सर्वत्र असलेला प्रसार व रामाविषयींचा समाजांतील आदर पाहून रामाशीं गौतमबुद्धाचा पूर्वजन्मीं संबंध जोडण्याचा हा प्रयत्न आहे व यावरून कोणती कथा प्राचीन, हें सहज कळण्यासारखें आहे.

## सामजातकाशीं तुलना.

रायसाहेबांनीं ज्या तीन जातकांचे उल्लेख आपल्या प्रतिपादनांत केले आहेत त्यांतहि हाच प्रकार दिसून येतो. सामजातकावरून रामायणांत श्रावणवधाची कथा आली आहे असें त्यांनीं ध्वनित केलें आहे, परंतु श्रावणवधाची कथा रामायणांत आली आहे, तींत अद्भुतपणा नसून उलट जातककथेमध्यें मात्र तो आहे. याविषयीं रायसाहेबांनीं कांहीं लिहिलें नाहीं व याकरितां चार शब्द येथें लिहिणें भाग आहे. वाराणसीचे राजानें सामाचा वध केल्यावर राजा त्याजवळ गेला असतां तेथें एक वनदेवता प्रकट होऊन तिनें राजाला मृत सामाचे मातापित्यांची पुत्राप्रमाणें सेवा केल्यास त्या घोर पातकापासून मुक्तता होईल असें आश्वासन दिलें आहे. यानंतर तो राजा सामाचे मातापित्यांकडे तीं आपल्या पुत्राची वाट पहात असतां गेला आहे व राजानें आपण कोण हें

सांगितल्यावर त्यांनीं राजाला फळें व पाणी देऊन स्वागत केलें आहे. राजानें 'फळें कोठून आणि कोणीं आणिलीं' असें विचारिल्यावर तीं आपल्या पुत्राचें नांव घेतात व मग राजा त्याचा आपल्या हातून घात झाल्याचा वृत्तांत सांगत आहे. श्रावणवध होतांच रामायणांतील दशरथ भिऊन गेलेला असून त्यानें श्रावणाचे सांगण्याप्रमाणें त्याचे मातापित्यांकडे जाऊन नम्रपणानें आपला अपराध निवेदन केला आहे; तर जातकांतील राजा सामाचे मातापित्यांकडे जाऊन स्वस्थपणें बोलतो आहे व त्यांनीं विचारिल्यावर मग त्यांला पुत्राचा घात आपल्या हातून झाल्याचें सांगत आहे व येथें असलेला हा फेरफार श्रावणवधाची कथा सामजातकांत अनुवादिली असल्याची साक्ष देण्यास कारण झाला आहे. पुढील कथा तर याहून विलक्षण आहे. आईबाप शोक करूं लागले असतां त्यांचे शोकाचा मंत्राप्रमाणें परिणाम होऊन तो साम जिवंत झाला असून त्याला राजा शरण गेला आहे व त्यानें राजाला सदाचरणाचा उपदेश केला आहे. हा फेरफार उघडउघड बुद्ध्या केलेला दिसतो. आतां साधी कथा कोणती व कृत्रिम कोणती हें वाचकांनीं आपल्या मनाशीं ठरवावें.

## वेस्संतर जातकाशीं तुलना.

वेस्संतरजातकांत वेस्संतर या राजपुत्राच्या अरण्यवासाचें वर्णन आलें असून त्यांत रामायणाशीं सदृश असलेल्या भागाविषयीं रायसाहेबांनीं ऊहापोह केल्याचें पूर्वीं सांगितलें आहे. पण या जातकांतहि वरीलप्रमाणें कृत्रिमता आहे. वेस्संतर हा राजपुत्र असून तो त्याजवळ येऊन कोणी जें मागेल तें त्याला देत असे व या त्याच्या उदार स्वभावाप्रमाणें त्यानें एक अद्‌भुत हत्ती देऊन टाकल्यामुळें त्याला राजानें हद्दपार केला आहे. त्याचेबरोबर त्याची स्त्री मद्दी व दोन मुलें अरण्यांत गेलीं असून जाते वेळीं त्यांना चार घोड्यांचा रथ देण्यांत आला आहे. राजपुत्रानें हा रथहि एकाला दिला व पुढें आपलीं मुलें देऊन टाकून प्रत्यक्ष आपल्या स्त्रीचें दान करण्यास तो सिद्ध झाला. तेव्हां मागणारा सक्क यानें आपलें खरें रूप प्रकट केलें व सर्वांस आनंद झाला. अशी ही कथा आहे. ह्मणजे या जातकांतील भाषणें रामायणाशीं सदृश आहेत तर कथानक अगदीं भिन्न आहे. हरिश्चंद्राचे चरित्राची त्यावर छाया पडली आहे.

पण यांतील वेस्संतराच्या औदार्याला स्वरूप नाहीं. वेस्संतराचे मातेचें भाषण कौसल्येसारखें आहे. पण राजानें त्याला हद्दपार करावयाचा आणि त्याचे पत्नीनें शोक करावयाचा हें विचित्र दिसतें. तेव्हां हरिश्चंद्राची कथा पुढें घेऊन रामायणांतील भाषणांचे साहाय्यानें या जातकाची कथारचना करण्यांत आली आहे, असें मानणें भाग आहे.

## तुलनेकरितां इतर जातकें.

जातककथांमध्यें याप्रमाणें रामायणांतील कथांचा अनुवाद केला असून त्यांविषयीं रायसाहेबांनीं सादृश्याचा मोघम निर्देश केला आहे; परंतु कांहीं जातकांतील सादृश्य पाहून आमचे म्हणण्याची—जातकांचा अनुवाद रामायणानें केला नसून जातकांत रामायणाचा अनुवाद असल्याची—सत्यता वाचकांस पटणारी आहे व याकरितां त्यांविषयीं माहिती येथें देणें अवश्य आहे.

अयोध्याकांडांत सुमंत्रानें कैकेयीची जी निर्भर्त्सना केली आहे, (२।३५) तींत त्यानें तिच्या मातेची कथा निरूपण केली असून तींत कैकेयी आपल्या आईच्या वळणावर गेली, असें सांगितलें आहे. तिचे पित्याला एका ऋषीनें वर दिला होता व त्याचेयोगानें त्याला पशुपक्ष्यांच्या भाषणाचें ज्ञान होत असे. मात्र हें ज्ञान त्याला झालें, तरी तें त्यानें दुसऱ्याला सांगावयाचें नाहीं आणि सांगितल्यास मृत्यु यावयाचा, अशी अट होती. एकदां जृंभ पक्ष्याचें भाषण ऐकून तो हंसूं लागला असतां त्याची स्त्री—कैकेयीची माता—त्याला हंसण्याचें कारण विचारूं लागली. राजानें तिला तें सांगितल्यास आपणास मृत्यु येईल, असें सांगून पाहिलें, तरी ती हट्ट सोडीना. ती म्हणाली, तूं जग अथवा मर, मला तें सांगितलें पाहिजे ! असें झालें म्हणजे तूं मला पुनः हंसणार नाहींस. शेवटीं राजानें वर देणाऱ्या ऋषींचा विचार घेऊन तिचा त्याग केला. ही कथा जातकामध्यें थोड्या फेरफेरानें आली आहे. जातकांतील राजा मुंग्या आणि डांस यांतील संवाद ऐकून हंसला असून राजाची मुक्तता, इंद्र बोकडाचे रूपानें येऊन त्यानें सुचविल्याप्रमाणें राजानें राणीला सडकून चोप दिल्यावर झाली आहे. दुसऱ्या दोन जातकांमध्यें ऋष्यश्रृंगाची कथा आली आहे. ऋष्यश्रृंगाकडे गणिका पाठवून त्याला मोहित करून आणविलें आणि रोमपाद राजानें आपली कन्या

शांता त्याला दिली अशी कथा रामायणांत आहे, तर एका जातकांत त्याला शांतेनें व दुसऱ्यांत एका अप्सरेनें मोहित केल्याचें सांगितलें आहे. म्हणजे रामायणांतील कथेचे हे दोन स्वतंत्र भाग झाले आहेत. पण मौज ही आहे कीं, रामायणांतील ही कथा मूळची नसून प्रक्षिप्त आहे; आणि जातककथांमध्यें या कथेची केलेली विभागणी पाहिली पाहिजे रामायणांत या कथेचा प्रक्षेप झाल्यानंतर जातकामध्यें तिचा अशा रीतीनें अनुवाद केला असावा, असें वाटतें. रायसाहेबांनीं कल्पना केल्याप्रमाणें जातकाचा अनुवाद या कथेमध्यें केला आहे, असें मानिलें तरी मूळ रामायणांत ही कथा नसल्यामुळें हा प्रक्षिप्त भाग जातकानंतरचा असें म्हणतां येईल व त्यावरून मूळ रामायण जातककालीं अस्तित्वांत होतें असें उलट सिद्ध होईल. अशा प्रकारें रामायणाचे जातकपूर्वकालीन अस्तित्वाची एकदां सिद्धता झाल्यावर इतर जातकांतील कथा रामायणांत अनुवादिल्या आहेत कीं काय अशी शंका घेण्याचें प्रयोजन राहणार नाहीं. बाकी आमचे मतें जातकांतील कथेच्या विभागणीवरून प्रक्षिप्त भागाचा अनुवाद तींत केलेला आहे व तें आम्हीं प्रथमच सांगितलें आहे.

जातकांमध्यें सांगितलेल्या कथा जातकांची रचना झाली त्या वेळीं त्या नवीन लिहिलेल्या नसून त्या वेळीं त्या प्रचलित होत्या आणि फार प्राचीन काळापासून त्यांचा प्रसार लोकांत झाला होता, अशी रायसाहेबांनीं जी कल्पना केली आहे, ती मात्र बरोबर आहे; परंतु त्यावरून अशा प्रचलित कथांवरून जातकांची रचना झाली व त्यावरून पुढें रामायण निर्माण झालें असा त्यांनीं जो क्रम लाविला आहे, तो धाडसाचा आहे. जातककथा म्हणजे स्फुट कथांचा एक संग्रह आहे आणि बौद्धधर्माचा उदय याच देशांत झाला असल्यामुळें त्या धर्माचे अनुयायांनीं केलेल्या या संग्रहांत वैदिक धर्मानुयायांमध्यें प्रचलित असलेल्या कथा अनुवादिल्या असणें साहजिक आहे. भारतांतील कथांचा उपक्रम " अत्राप्युदाहरन्तीममितिहासं पुरातनम् " ( याविषयीं एक पुरातन इतिहास उदाहरणार्थ सांगत असतात ) असा केलेला असतो व यावरून त्या कथा त्या वेळीं प्रचलित असल्याचें उघड होतें. तेव्हां जातकांत प्राचीन काळापासून प्रचलित असलेल्या कथांचा संग्रह केलेला आहे, हें खरें असलें तरी

त्या पूर्वीपासून येथें प्रचलित असल्यामुळें जातककथा व आमचे ग्रंथ यांमध्यें सादृश्य दिसल्यास तेथें जातकांवरून आमचे ग्रंथांत त्यांचा अनुवाद केलेला आहे असें मानण्याचें कारण नाहीं. उलट जातकांनीं आमचे ग्रंथांचा अनुवाद केला, असें मानणें सयुक्तिक होणार आहे. महाजनकजातकामध्यें जनकराजाची कथा सांगितलेली आहे. जनकाची कथा उपनिषदें व महाभारत यांमध्यें आलेली असून त्याचें

**मिथिलायां प्रदग्धायां न मे दह्यति किंचन।**

" सर्व मिथिला दग्ध झाली तरी माझें कांहीं एक जळून जात नाहीं. " हें वचन सर्वप्रसिद्ध आहे व तें जशाचें तसें या जातकांत अनुवादिलेलें आहे. उपनिषदें व महाभारत यांतील कथांचा कालनिर्णय या कामीं करण्याचें अथवा लक्षांत घेण्याचें येथें प्रयोजन नाहीं. कारण जनकराजा फार प्राचीनकालीं—रायसाहेबांनीं जातकांतील कथा फार प्राचीन काळापासून प्रचलित असल्याचें सांगितलें आहे, त्याच्याहि पूर्वीं—होऊन गेला, हें निर्विवाद आहे. कारण तो वेदान्ती आणि कर्मयोगी म्हणून प्रसिद्ध होता व कर्मयोग्याचें उदाहरण म्हणून भारतीय युद्धाचे वेळीं श्रीकृष्णांनीं अर्जुनाला उपदेशिलेल्या गीतेमध्यें त्याचें नांव आलेलें आहे आणि जनकाचें चरित्र पाहिलें तर त्याविषयीं प्रसिद्ध असलेल्या आख्यायिका हेंच आहे. तेव्हां जनकाची ही प्रचलित कथा जातकांनीं अनुवादिलेली असून त्यावरून जातककथांचा* उगम आमचे प्राचीन ग्रंथ व प्रचलित कथा यांत आहे, याविषयीं आतां शंका घेण्याचें कारण नाहीं.

आतां बौद्धांच्या संन्यासपर उपदेशाचा अनिष्ट परिणाम होत असलेला पाहून रामायणाची रचना गृहस्थाश्रमीं राहून मोक्ष मिळूं शकतो हें शिकविण्यासाठीं करण्यांत आली, असा जो रायसाहेबांचा एक आक्षेप आहे, तिकडे वळूं. वास्तविक संसार असार असल्याचा उपदेश गौतमानें नवीन शोध लावून केला, असें नाहीं. हा उपदेश गौतमाचे पूर्वीं आमचे प्राचीन ग्रंथांतून केलेला आहे. मात्र त्यांतील तत्त्व लक्षांत घेऊन आमच्या

---

* जातककथांविषयींची येथे दिलेली सर्व माहिती ज्ञानकोश–प्रस्तावनाखंड–विभाग चाथा–यांतील ११ वें प्रकरण–तिपिटक अथवा पाली धर्मशास्त्र, यावरून दिलेली आहे.

धर्मशास्त्रकारांनीं आश्रमांची जी व्यवस्था लाविली होती, तिला गौतमाचे उपदेशाचा प्रसार झाल्यानें अडथळा आला; पण हा अडथळा दूर करण्याचें कार्य रामायणाचे योगानें झालें असें जें रायसाहेब अनुमान करितात तें कसें हें आम्हांला समजत नाहीं. पति, पत्नी, पुत्र व मित्र या नात्यानें मनुष्यानें करावयाचें कर्तव्य रामायणांत रामचरित्राचे रूपानें सांगितलेलें आहे व हें गौतमाच्या सर्वसंगत्यागाच्या तत्त्वाचे विरुद्ध आहे हें खरें, तथापि रामचरित्रानें गौतमाचे तत्त्वाला विरोध केला नसून धर्मशास्त्रानुरूप आचरणाचा त्यानें स्वतंत्र धडा घालून दिला आहे. सर्वसंगत्यागाचे उपदेशाचा विजय होऊन त्याचा प्रसार झाल्यानें समाजाला भोगाव्या लागणाऱ्या हानीचें चित्र त्यांत मुळींच रेखाटलेलें नाहीं आणि तें नसल्यामुळें गौतमाचे विरुद्ध प्रयत्नाचें श्रेय रामायणाला देतां येत नाहीं. खि. पू. ४०० हा रामायणरचनेचा काल प्रो. वेबर यांनीं ठरविला आहे व रायसाहेबांनीं त्याचा अनुवाद करून त्याला आपली संमति दर्शविली आहे; परंतु या कालाच्या इतिहासाकडे पाहिलें तर बौद्धधर्माच्या भरभराटीचे ते दिवस असून त्याला उतरती कळा लागण्याला मध्यंतरीं पुष्कळ काल जावा लागला आहे असें दिसून येईल. दुसरें असें कीं, रामायणांत निवृत्तमांस असा मनुष्यांतील एकहि वर्ग वर्णिलेला नसून यज्ञयागाचें आणि मांसाशनाचें वर्णन त्यांत भरपूर आहे. बौद्ध व जैन यांतील अहिंसेच्या उपदेशाचा परिणाम वैदिक धर्मावर होऊन त्याचें पर्यवसान त्यांतील एक वर्ग निवृत्तमांस बनण्यांत झालें आहे. या फेरफारावर रामायणाचा परिणाम कोणताहि झाल्याचें दिसत नाहीं. रामानें अरण्यांत प्रवेश केल्यावर सीतेनें त्याला एकदां शस्त्रसंन्यासाचा उपदेश केल्याचा रामायणांत उल्लेख असून बौद्ध धर्माच्या अहिंसा तत्त्वाचा हा सूचक असल्याचें पुष्कळ विद्वानांचें मत आहे; परंतु सीतेनें त्या वेळीं उपदेश केला त्याचें कारण मात्र वेगळें आहे. व तें लक्षांत घेतलें ह्मणजे वरील अनुमान कोणी करणार नाहीं. दंडकांतील मुनींनीं राक्षसांचे उपद्रवापासून आपलें रक्षण करण्याविषयीं रामाला विनंति केली व त्यानें ती मान्य केली आणि हीं तिघें पुढें गेलीं असतां पहिला प्रसंग विराध राक्षसाशीं आला आणि त्यानें तर सीतेला उचलून पळविण्याचा प्रयत्न केला. याचा परिणाम सीतेवर झाला आणि

तिनें रामाला " आर्तांचें रक्षण हा क्षत्रियांचा धर्म आहे, तथापि शस्त्र हातांत घेऊन फिरल्यामुळें अपराधावांचून राक्षसांचा वध करण्याकडे प्रवृत्ति होईल व ती अनिष्ट आहे; आपण राज्याचा त्याग केला आहे, तेव्हां अयोध्येंत परत गेल्यावर मग शस्त्रग्रहण करून क्षात्रधर्माचें आचरण यथेच्छ करावें." (३।९) असें सुचविलें आहे. यावर रामानें अरण्यवासाचे प्रतिज्ञेप्रमाणें ऋषींना आपण दिलेलें आश्वासन पाळणें हें आपलें कर्तव्य असल्याचें सांगून तिचें समाधान केलें आहे. राज्याचा त्याग करावयाचा आणि प्रजांच्या रक्षणाचा भार अंगावर घ्यावयाचा असा विरोध दाखविण्याचा सीतेच्या भाषणाचा उद्देश आहे. अर्थात् येथें अहिंसेच्या उपदेशाचा कांहीं संबंध नाहीं.

पण जातकांवरून रामायणाची रचना करण्यांत आली असें विधान करण्यांत एक मोठा प्रमाद होत असतो व तो हा कीं, तसें अनुमान करितांना रामायण हा इतिहास आहे का कल्पित कथा आहे इकडे लक्ष देण्यांत येत नाहीं. जातकांवरून रामायणाची रचना झाली असें म्हटलें तर आमचेकडे त्यापूर्वी रामायणकथा मुळींच नव्हती असें होतें व ती जर त्यानंतर रचण्यांत आली तर रामलक्ष्मणादि सर्व व्यक्ति जगांत कधीं झाल्या नसून केवळ कल्पित आहेत असें होणार नाहीं काय? आणि या व्यक्ति झाल्या नसतील तर कालनिर्णय तरी कसला करावयाचा? जातकांतील दशरथाला पाठीं पूर्वज नाहींत पुढें वंशज नाहींत आणि रामायणांतील रामाची पूर्वीची वंशपरंपरा त्यांत आहे व पुढील परंपरा अन्य ग्रंथांत आहे. वंशावलि सांगतांना कोठें भूल झाला असेल अथवा विसंगतता दिसत असेल, तथापि त्यावरून तिचे अस्तित्वावर गदा आणितां येत नाहीं. जातकांतील पुष्कळ कथांचें स्थान काशी हें आहे; व त्यांतील पात्रांचा एकमेकांशीं संबंध तर कांहीं नाहीं; तेव्हां या कथा मात्र कल्पित आहेत, हें उघड आहे. जातकांतील रचना प्रचलित कथांवरून झाली असली व त्यांतील कांहीं ऐतिहासिक असल्या तरी जातकांत गोंवते वेळीं संग्राहकानें त्यांमध्यें आपणाला इष्ट वाटणारे जे फेरफार केले आहेत त्यांचे योगानें त्यांना कल्पित कथांचें स्वरूप प्राप्त झालें आहे. रामायणांत प्राक्षिप्त भागाची भर पडून जरी कांहीं स्थानीं विसंगतता आली आहे तरी त्याचें ऐति-

हासिक स्वरूप लुप्त झालेलें नाहीं, हें विसरतां नये. रामायण हा इतिहास आहे व तो स्वतां राम सिंहासनाधिष्ठित असतां लिहिलेला आहे आणि भारतीय युद्धाचे वेळीं तो विद्यमान होता हें कळलें ह्मणजे जातकांवरून रामायण झाल्याची कल्पनासुद्धां मनांत येणार नाहीं.

हेमचंद्रादिकांच्या रामायणांवरून दक्षिणेकडील प्रचलित कथांची कल्पना करून उत्तरेकडील व दक्षिणेकडील प्रचलित कथांना वाल्मीकींनीं संघटित स्वरूप दिल्याची जी कल्पना रायसाहेबांनीं पुढें मांडली आहे ती तर निव्वळ हास्यास्पद आहे. रामायणाचा काल त्यांचे मताप्रमाणें खि. पू. ४०० हा धरिला तरी हेमचंद्र त्यानंतर सुमारें पंधराशें वर्षांनीं झाला व त्याच्या ग्रंथांतील कथांवरून इतक्या प्राचीन कालीं प्रचलित असलेल्या कथांविषयीं रायसाहेब अनुमान करितात याला काय म्हणावयाचें ? हेमचंद्रानंतर आतांपर्यंतचा काल त्याहून कमी आहे, मग त्याचे कालांतील कोणत्या प्रचलित कथा स्वतः रायसाहेबांना माहीत आहेत ? स्वतांच्या अनुभवाकडे जर या वेळीं रायसाहेबांनीं लक्ष दिलें असतें तर एवढा अनुमानाचा डोलारा त्यांनीं उभारला नसता. स्वतः हेमचंद्र हा जैन होता व जातकें तर बौद्ध धर्मानुयायांचीं. जातककालीं बौद्धधर्माचा उदय होता होता व यासाठीं वैदिकधर्मांतील प्रचलित कथा व इतर वाङ्मय यांचें अनुकरण करण्याचा त्यांनीं जातकें लिहून प्रयत्न केला. प्रसिद्ध व्यक्तींशीं गौतमाचा या नाहीं तर पूर्वजन्मीं संबंध आणावयाचा किंवा इतर कथा थोड्या फेरानें ग्रथित करावयाच्या, अशी त्यांच्या प्रयत्नांची दिशा होती व ती त्या कालाला अनुरूप होती. पण हेमचंद्राला त्याचे कालीं अशा प्रयत्नांची आवश्यकता नसून उलट वैदिकधर्माविषयींचा तिरस्कार वाटत चालला होता. अर्थात् त्याच्या या भावनेला अनुसरून त्यानें स्वतःचे रामायणांतील रामचरित्रांत रामचरित्राचें अधिक उज्ज्वलतेनें ग्रथन केलें. एका ग्रंथकारानें तर वाल्मीकिरामायणांतील रामचरित्र चुकलें असून रावण फार थोर असल्याचें जें विधान केलें आहे त्यांतील रहस्य हें आहे. नाहींतर वाल्मीकींच्या ग्रंथांतील भूल त्यांचे मागून कित्येक शतकांनंतर झालेल्या या लेखकास अचूक कशी कळणार ? तेव्हां असलीं प्रमाणें पुढें करून रायसाहेबांनीं स्वतःचें हंसें मात्र करून घेतलें आहे.

वंगकाव्यांत कोणकोणत्या ग्रंथांतील कथा कसकशा आल्या आहेत, हें सांगण्याचा वास्तविक रायसाहेबांचा उद्देश असतां वाल्मीकिरामायणाची उत्पत्ति कशी झाली हें दाखविण्याचा यत्न त्यांनीं निष्कारण केला व त्यांत ते भलतीकडे वाहात गेले आहेत. आपल्या शोधांत कांहीं तरी अपूर्वता असली पाहिजे या भावनेनें अलीकडील कित्येक लेखक प्रयत्न करीत असतात व या भावनेच्या भरांत त्यांचा विवेक लोपून जातो; आणि रायसाहेबांचा वरील शोध हें अशा अविवेकतेचें उत्कृष्ट उदाहरण आहे. नाहींतर दशरथजातकाची जी बाजू यापूर्वी पुढें आली होती तिच्यासंबंधानें दुसरी बाजू पुढें आणून त्या कल्पनेचें खंडन रा. ब. वैद्य यांनीं आपल्या ( Riddle of the रामायण ) ग्रंथांत यापूर्वींच केलें आहे. आम्हांला तरी, अन्य जातकांचीं नांवें घेऊन रायसाहेबांनीं त्यांची रामायणाशीं तुलना केली व पूर्वीच्या कल्पनेला नवीन स्वरूप दिलें, यामुळें हा विषय पुनः हातांत घ्यावा लागला!

## होमरचें इलियड आणि रामायण.

रामायणाच्या रचनेसंबंधानें ज्या कित्येक कल्पना पुढें आल्या त्यांपैकीं इलियडवरून तें रचण्यांत आलें ही एक आहे. प्रो. वेबर यानें ही प्रथम सुचविली, त्याचे पूर्वी दअलविस या ग्रंथकारानें रामायणाची कल्पना 'रामासागा' या बौद्धग्रंथावरून कवीनें घेतली, असें सुचविलें होतें. परंतु या ग्रंथांतून, तसेंच बौद्धांच्या दशरथजातकादि ग्रंथांतून रामाची अरण्यवासाची कल्पना होण्यासारखी असली तरी सीताहरणादि कथांसारख्या कथा त्यांत नाहींत; व याकरितां या कथांची कल्पना कवीला कशी आली याविषयीं विचार करून प्रो. वेबर यानें वरील कल्पना पुढें आणिली आहे. होमरच्या इलियड या प्रसिद्ध काव्यामध्यें हेलेनचें हरण व ट्राय शहराचा वेढा यांविषयींचीं वर्णनें आहेत व त्यांवरून रामायणरचनेची कल्पना वाल्मीकीला आली असावी, असा त्यानें तर्क केला आहे ही कल्पना सिद्ध करण्याकरितां त्यानें ग्रीसशीं हिंदुस्थानचा परिचय झाल्यानंतर रामायणाची रचना झाली असावी असें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. शबरी व शंबूक यांच्या कथांवरून कांहीं ख्रिस्ती दंतकथांचाहि अनुवाद रामायणांत केलेला असावा, अशी एक कल्पना त्यानें सुचविली आहे,

प्रो. वेबर याच्या कल्पनेचें खंडन प्रो. लासेन व कै. न्या. तेलंग यांनीं केलें आहे. दशरथजातक व रामायण यांतील सादृश्यासंबंधानें प्रो. लासेन यानें बौद्धांचा रामायणाविषयीं गैरसमज झाला असावा किंवा बौद्धांनीं रामायणांतील कथेला बुद्ध्या विचित्र रूप दिलें असावें असा तर्क केला आहे. होमरचे इलियडशीं रामायणाचें साम्य प्रो. वेबर यानें दाखविलें आहे, परंतु तें तो मानतो इतकें खरोखर नाहीं आणि इलियडवरून रामायणाची कल्पना होण्यास ग्रीसशीं हिंदुस्थानचा परिचय, त्यानें जो रामायणकाल ठरविला आहे त्यापूर्वीं होता असें त्यानें सिद्ध केलेलें नाहीं; यामुळें प्रो. वेबरची ही कल्पना निराधार आहे, असें त्यानें प्रतिपादन केलें आहे.

कै. न्या. तेलंग यांची प्रो. वेबर याचे लेखावरील टीका याहून विस्तृत आहे. दशरथजातक आणि रामायण यांतील सादृश्यासंबंधानें प्रो. वेबर याचें प्रतिपादन सयुक्तिक नाहीं असें त्यांनीं दाखविलें आहे. जातकावरून रामायण झालें असें म्हणण्यापेक्षां रामायणावरून जातकरचना होणें अधिक संभवनीय आहे. कारण ब्राह्मणांची बौद्धांविरुद्ध चळवळ होती असें प्रो. वेबर म्हणतो व त्या दृष्टीनें तर ब्राह्मणांनीं बौद्ध कथेवरून काव्यरचना करणें शक्य नाहीं, आणि ग्रीक लोकांशीं हिंदुस्थानचा परिचय झाला त्यापूर्वीं रामायणरचना व्हावयाची होती हें प्रो. वेबर यानें सिद्ध केलेलें नाहीं. उलट महाभारतांतील रामायणाचे उल्लेखावरून त्या कालापूर्वीं रामायण होतें असें सिद्ध होत आहे. कालासंबंधानें न्या. तेलंग यांनीं आणखीहि कित्येक प्रमाणें देऊन आपला मुद्दा सिद्ध केला आहे.

प्रो. वेबर यांची कल्पना आतां शिळी झाली असून तिला तादृश महत्त्व राहिलेलें नाहीं. हिंदुस्थानचें प्राचीन वाङ्मय हेंच त्याचें एक भूषण त्याचे अंगावर राहिलेलें आहे आणि गतकालचे वैभवाच्या कांहीं खुणा त्यानें राखून ठेविल्या आहेत. या राहिलेल्या भूषणांवर हल्ला करून परक्यांनीं तीं आपलीं म्हणून काढून घेतलीं म्हणजे मग हिंदुस्थानाजवळ एकहि भूषण राहणार नाहीं. प्रो. वेबर याचा हा प्रयत्न म्हणजे असाच एक हल्ला आहे आणि न्या. तेलंग यांनीं तो वेळींच परतविला आहे. अशा कल्पना प्रायः आपली तिरस्कार-

बुद्धि आडून व्यक्त करण्याकरितां किंवा अपूर्वतेच्या दृष्टीनें उपजत असतात. प्रो. वेबर हा एक जर्मन पंडित होता व संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास सर्व पाश्चात्य राष्ट्रांमध्यें जर्मनींत अधिक व पद्धतशीर होता. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे त्याचे मनांत हिंदुस्थानाविषयीं तिरस्कार उत्पन्न होण्याचें कारण नाहीं, हें खरें; तथापि त्याला आमच्या वाङ्मयाविषयीं आप्तपणाचा आदर वाटणें संभवनीय नाहीं व यामुळें त्यानें ही कल्पना पुढें आणिली, यांत संशय नाहीं. नाहीं तर दोन काव्यांमध्यें सादृश्य वाटलें, तरी इलियडचा अनुवाद रामायणानें केला, अशी कल्पना करण्याचें कारण काय ? वास्तविक अशा सादृश्यास्तव एकानें दुसऱ्याचा अनुवाद केला, असें म्हणणें अयुक्त होय; आणि म्हणावयाचें तर त्यानें याचे उलट कल्पना केली असती तर ती असंभवनीय तरी नव्हती. वेबर यानें सादृश्य दाखवितांना दशरथजातकाचें नांव घेतलें आहे व तें जातक आणि इलियड या दोहोंचें रामायणांत मिश्रण झाल्याची कल्पना सुचविली आहे. कारण कोणत्याहि एका ग्रंथाशीं रामायणाचें सर्व बाजूंनीं सादृश्य दाखवितां येत नाहीं. अशा रीतीनें रामायणरचनेंत जातकाचें साहाय्य झाल्याचें त्यानें लिहिलें आहे व जातककालाकडे पाहिलें तर त्या वेळीं बौद्धांची भरभराट होती, असें दिसतें. ग्रीसशीं हिंदुस्थानाचा परिचय झाला त्या वेळीं ही भरभराट होती; व हिंदुस्थानांतील आचारविचार वगैरे यांचें अनुकरण करण्याची बाह्यांची एकंदरींत प्रवृत्ति होती. त्या कालांत इकडील कित्येक ग्रंथांचीं बाह्यांनींच भाषांतरें केल्याविषयीं इतिहासांत प्रमाणें मिळतात. तेव्हां रामायणरचना करितांना कवीला इलियडवरून कल्पना घ्यावी लागली, हें म्हणणें त्या कालांतील प्रवृत्तीला विरुद्ध आहे. तसेंच ग्रीक ग्रंथांत लंकेचें ताप्रोब्रेन असें नांव आढळतें, तें रामायणांत मुळींच नसून रामायणांतील लंका ग्रीक ग्रंथांत उल्लेखिलेली नाहीं. रामायणांतील लंकेला ताम्रपर्ण हें नांव पुढें मिळालें आहे. अर्थात् हें नांव मिळाल्यानंतर ग्रीकांचा आमच्याशीं परिचय झाला, हें उघड आहे. या परिचयानंतर ग्रीकांतील होमरचें इलियड आमचेकडे येणार व त्याची आवड वाटून त्याचें अनुकरण करावें असें वाटणार, म्हणजे कल्पनेची व कालाची किती ओढाताण करावयाची, हें

कळत नाहीं. रामायणकालाकडे पाहिलें, तर तो ग्रीकांशीं आमचा परिचय होण्यापूर्वीं फार पाठीं जात असून त्याचें विवेचन अन्यत्र केलें आहे व तो लक्षांत घेतल्यास वेबर यानें घेतलेली शंका आपोआप गळून पडणार आहे. ही अनवस्था टाळण्यासाठीं त्यानें रामायणकाल अलीकडे ओढण्याचा प्रयत्न केला आहे व त्यांत रामायणांतील प्रक्षिप्त भागाविषयीं विचार करून तो न वगळतां, त्याचेंहि साहाय्य त्यानें घेतलें आहे. किष्किंधा कांडांतील सुग्रीवाचे तोंडीं असलेलें भूगोलवर्णन प्रक्षिप्त असल्याचें उघड दिसत असून तिकडे त्यानें लक्ष दिलेलें नाहीं, आणि त्यांत उल्लेखिलेल्या देशांचे नांवांवरून रामायणकाल ठरविण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे व अर्थात् तो चुकला आहे. सत्यान्वेषणाचे दृष्टीनें रामायणांतील मूळ व प्रक्षिप्त भाग कोणता, याचा विवेक त्यानें मुळींच केलेला नाहीं; केवळ स्वतः पुढें आणिलेला मुद्दा सिद्ध करण्याचे हेतूनें त्यानें प्रयत्न केले, हा त्यांत दोष आहे. दोन ग्रंथांतील सादृश्याविषयींचा त्याचा मुख्य मुद्दाहि लटपटित असल्याचें न्या. तेलंग यांनीं आपल्या निबंधांत चांगलें सिद्ध केलें आहे. आमचेकडे अशी कल्पना कोणी करणार नाहीं व ती कोणाला रुचणारहि नाहीं.

## सर्ग का अध्याय ?

रामायण हें मूळचें सर्गबद्ध काव्य नसून ह्यांत पुराणांप्रमाणें अध्याय होते अशी एक कल्पना रामायण हें आदिकाव्य कसें याविषयींच्या चर्चेच्या निमित्तानें पुढें आली आहे. संस्कृत भाषेंत रामायणापूर्वीं काव्य नसून वाल्मीकि हेच आदिकवि होत, अशी आख्यायिका आहे; परंतु रामायणांत उद्धृत केलेल्या कांहीं श्लोकांवरून छंदोबद्ध वाणी पूर्वीं मुळींच नव्हती असें म्हणतां येत नाहीं; व स्वतः वाल्मीकींना तें संमत नाहीं, असें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. अर्थात् वाल्मीकींना आदिकवि म्हणत आले व रामायणाला आदिकाव्य म्हणतात, याचें कारण काय ? आमचे मतें भाषेंत पूर्वीं छंदोबद्ध वाणी असली तरी काव्यसंज्ञेला पात्र असा ग्रंथ नव्हता आणि अशा दृष्टीनें लिहिलेल्या संस्कृत वाङ्मयांत रामायण हा पहिला ग्रंथ असल्यामुळें ग्रंथाला आदिकाव्य व तदनुरोधानें ग्रंथकाराला आदिकवि या पदव्या लोकांनीं

अर्पण केल्या असाव्यात. आम्ही म्हणतों याला रामायणाचा अथवा अन्य ग्रंथाचा आधार आहे असें नाहीं. आदिकाव्यसंज्ञेची संगति लावण्याची ही एक कल्पना आहे. संगति लावण्याच्या या हेतूनेंच वरील कल्पना पुढें आली आहे. कल्पना प्रथम प्रो० वेबर यानें पुढें आणिली व रा. ब. वैद्य यांनीं तिला संमति दिली आहे. ( Riddle of the रामायण, पृ. ५.)

भवभूतीनें आपल्या उत्तररामचरितांत रामायणांतील अवतरण घेतलें असून त्यांत रामायणांतील सर्गाचा निर्देश करितांना तेथें अध्याय हा शब्द योजिला आहे. भवभूतीचे शब्द लवाच्या भाषणांत पुढीलप्रमाणें आहेत:—

" बालकाण्डस्याऽन्तिमेऽध्यायेऽयं श्लोकः—

**प्रकृत्यैव प्रिया सीता रामस्यासीन्महात्मनः ।**
**प्रियभावः स तु तया स्वगुणैरेव वर्धितः ॥**

येथें सर्गाच्या स्थानीं अध्याय असा शब्द स्पष्ट आहे आणि कवीनें म्हटल्याप्रमाणें हा श्लोक बालकांडाच्या अंत्य सर्गांत थोड्या फेरानें मिळतो:—

**प्रिया तु सीता रामस्य दाराः पितृकृता इति ।**
**गुणाद्रूपगुणाच्चापि प्रीतिर्भूयोऽभिवर्धते ॥१।७७।२६॥**

श्लोकांत फेर असला तरी तो शाब्दिक आहे तेव्हां भवभूतीला अभिप्रेत असलेला श्लोक हा याविषयीं संशय रहात नाहीं. अर्थात् भवभूतीच्या कालापर्यंत रामायणाची विभागणी अध्यायांत होती व अध्यायांचे सर्ग त्यानंतर झाले. प्रत्येक सर्गाचे अंतीं असलेले दीर्घच्छंदांतील श्लोक प्रक्षिप्त असून हें कार्य अध्यायांचे सर्ग करणारानें—भवभूतीच्या नंतर केलें असलें पाहिजे असें रा. ब. वैद्य यांचें म्हणणें आहे.

वास्तविक, सर्ग व अध्याय हे प्रतिशब्द आहेत व यामुळें तत्त्वदृष्ट्या त्यांत महत्त्व नाहीं; तथापि सांप्रत रामायणांत सर्वत्र सर्ग दिसत असून भवभूतीसारख्या मान्य ग्रंथकारानें सर्गाचा अध्याय म्हणून निर्देश केला असल्यामुळें खरोखर त्या वेळीं अध्याय असावे असें साहजिक वाटतें; परंतु भवभूतीच्या या निर्देशाबरोबर त्याच्या इतर निर्देशांकडे तितक्याच सूक्ष्मदृष्टीनें पाहणें आवश्यक आहे. भवभूतीनें 'महावीरचरित' व 'उत्तररामचरित' अशीं रामचरितावर दोन

नाटकें लिहिलीं आहेत. यांपैकीं युद्धकांडांतापर्यंतची कथा पहिल्या नाटकांत आणून उत्तरकांडांतील कथा दुसऱ्या नाटकांत गोंविली आहे. 'उत्तररामचरित' हें नांव देण्यांतहि उत्तरकांडांतील कथा त्यांत गोंवण्याचा कवीचा उद्देश दिसून येतो. पण ही उत्तरकांडांतील सर्व कथा भवभूतीनें रामायणांतली घेतली काय, हा येथें महत्वाचा प्रश्न आहे; आणि त्याचें जें उत्तर मिळेल त्यावर सर्व अनुमान अवलंबून आहे. उत्तररामचरिताचें वरवर अवलोकन केलें तरी या प्रश्नाचें उत्तर विरुद्ध द्यावें लागेल असें वाटतें. रामायणांतील रामाचे पुत्र लव आणि कुश हे गवयी म्हणून पुढें आले आहेत, तर उत्तररामचरितांत तेच योद्धे ह्मणून पुढें आले आहेत. रामायणांत अश्वरक्षणार्थ भरत गेला आहे, तर उत्तररामचरितांत लक्ष्मणाचा पुत्र चंद्रकेतु गेला आहे. हे फेरफार कोणालाहि सहज दिसून येतात. नाटकाच्या सोयीसाठीं व कथेंतील पात्रांच्या स्वभावानुरूप फेरफार करणें आणि मूळ कथेंतच फेरफार करणें यांत अंतर आहे. हे फेरफार पाहिले म्हणजे भवभूतीनें हें नाटक कोणत्या ग्रंथाच्या आधारानें रचिलें हें पाहण्याकडे प्रवृत्ति होते व शोधूं लागल्यास पद्मपुराणांतील रामाश्वमेधाची कथा दृष्टीपुढें उभी राहते. कारण रामायणांत अश्वमेधानंतर सीतेचा रामानें स्वीकार केल्याचें कथानक नसून ती गुप्त होऊन तिचा रामाला अक्षय्य वियोग झाल्याचें लिहिलें असल्यामुळें काव्याचें पर्यवसान दुःखांत झालें आहे आणि रामाश्वमेधामध्यें सीतेचा स्वीकार केल्याचें वर्णन देऊन कथेचा शेवट गोड केला आहे. उत्तररामचरिताची समाप्ति अशीच आनंदमय केलेली आहे व हें सादृश्य पाहिलें म्हणजे भवभूतीनें या नाटकांतील कथेला आधार म्हणून रामाश्वमेध हा ग्रंथ पुढें ठेविला होता, याविषयीं शंका रहात नाहीं. उत्तरकांडांतील कथा आणि रामाश्वमेध यांची तुलना केली तर त्यांमध्यें अंतर फार दिसून येतें आणि हे फेरफार दृष्टीपुढें ठेवून रामाश्वमेधांतील कोणत्या कथा उत्तररामचरितात आल्या आहेत हे पाहूं गेले तर त्याला कांहीं लाभ होईल, असें नाहीं. कारण रामाश्वमेधांतील समग्र कथा त्यानें आपल्या नाटकांत आणिली नसून मुख्य आधार रामायणाचा आहे. रामाश्वमेधांतील कांहीं कथा घेऊन व रामायणांतील मुख्य कथेचा आधार धरून भवभूतीनें आपल्या नाटकांत त्यांचा सुंदर संगम केला आहे. रणभूमीची

आणि सीतारामाच्या भेटीची कथा भवभूतीनें स्वतां नाटकाच्या सोयीसाठीं कल्पिलेली नसून रामाश्वमेधांतून घेतली आहे, हें त्यावरून उघड दिसतें. रणभूमीवर एकट्या लवाला ठेवण्याचें सादृश्य तर दोहोंकडे अगदीं एक आहे. भवभूतीच्या कल्पनेला आधारभूत असलेल्या रामाश्वमेधामध्यें वाल्मीकिरामायणासंबंधीं माहिती आली आहे. यांतील रामचरिताची वाल्मीकिरामायणाशीं तुलना करून त्यांत भेद कोठें आहे, तें स्वतंत्र प्रकरणांत वेगळें दाखविलें असल्यामुळें प्रस्तुत मुद्यापुरतें आपणांस आतां पहावयाचें आहे. ब्रह्मदेवाकडून वर मिळाल्यानंतर रामायणरचनेविषयीं वाल्मीकींनीं जो निश्चय केला, त्याविषयीं रामायणांत पुढील श्लोक आहे:—

**तस्य बुद्धिरियं जाता महर्षेर्भावितात्मनः ।**
**कृत्स्नं रामायणं काव्यमीदृशैः करवाण्यहम् ॥ १।२।४१॥**

" अशा प्रकारच्या श्लोकांनीं आपण संपूर्ण रामायण काव्य ग्रथित करावें, अशी त्या शुद्धान्तःकरण असलेल्या महर्षींना इच्छा उत्पन्न झाली. "

रामायणांतील क्रौन्चवधाची कथा रामाश्वमेधांत समग्र आली असून वरील श्लोकाच्या स्थानीं तेथें पुढील श्लोक आहे:—

**तदाऽत्यंतं मुदं प्राप्तो रामायणमथाऽसृजत् ।**
**मनोरमपदैर्युक्तं वृत्तैर्बहुविधैरपि ॥ ६६।६१ ॥**

" नंतर ( त्यांना ) अत्यंत आनंद होऊन त्यांनीं सुंदर शब्दांनीं युक्त अशा प्रकारचें रामायण काव्य बहुविध छंदांमध्यें निर्माण केलें. "

रामायणामध्यें अनुष्टुपछंदावांचून अन्य छंद असणें शक्य नाहीं, असें रामायणांतील पूर्वी उद्धृत केलेल्या अवतरणांवरून वाटतें आणि दीर्घच्छंदांतील श्लोक प्रक्षिप्त मानण्यास हा एक प्रबल आधार आहे. रामाश्वमेधांतील वरील अवतरणांत बहुविध छंदांमध्यें महर्षींनीं रामायणाची रचना केल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. अर्थात् रामाश्वमेधकर्त्यापुढें बहुविध छंदांमध्यें असलेलें रामायण होतें, हें उघड आहे. म्हणजे भवभूतीचे कल्पनेला आधारभूत असलेल्या रामाश्वमेधांत रामायणांतील दीर्घच्छंदांचा निर्देश आहे आणि यासाठीं प्रत्येक सर्गाचे अंतीं असणारे दीर्घच्छंदांतील श्लोक भवभूतीनंतर घुसडण्यांत आले, हें

रा. ब. वैद्य यांचें अनुमान सयुक्तिक नाहीं. रामायणांत पूर्वी अध्याय असून भवभूतीनंतर सर्गरचना झाली व याबरोबर प्रतिसर्गाचे अंतीं दीर्घच्छंदांतील श्लोक देण्यांत आले, असें जें रा. ब. वैद्य यांनीं प्रो. वेबरच्या कल्पनेला मान्यता देतांना लिहिलें आहे, तेंहि याबरोबर निरस्त होतें.

याशिवाय रामायणांतील सर्गांविषयींचा निर्देश त्या काव्यांत कथाप्रवाहाबरोबर आलेला आहे. उत्तरकांडामध्यें वाल्मीकींनीं रामपुत्र कुशलवांना अश्वमेधाचे वेळीं रामायणाचें गायन करण्याकरितां पाठविलें तेव्हां प्रत्यहीं वीस सर्गांचें गायन करावें अशी आज्ञा केली होती. (७।९३।१०) व त्याप्रमाणें त्यांनीं गायनास प्रारंभ केला तेव्हां प्रथम नारदांशीं संवाद असलेला पहिला सर्ग त्यांनीं म्हटला असें लिहिलें आहे. (७।९४।१५) अशा प्रकारें सर्गाचा उल्लेख कथेच्या निमित्तानें रामायणांत दोनदां आलेला आहे.

शिवाय भवभूतीनें रामायणांतील म्हणून उद्धृत केलेला हा श्लोक आमचे मतें प्रक्षिप्त श्लोकांपैकीं एक आहे. बालकांडाच्या अंतीं असलेल्या कांहीं श्लोकांमुळें पूर्वापर विरोध कसा उत्पन्न होत आहे हें प्रक्षिप्त भागाविषयीं विवेचन करितांना दाखविलें आहे व तें पाहिलें म्हणजे याच्या प्रक्षिप्तत्वाविषयीं संशय रहात नाहीं. अर्थात् प्रक्षिप्तभागासुद्धां रामायणाची सांप्रत उपलब्ध असलेली प्रत निर्माण झाल्यानंतर भवभूतीचा हा प्रयत्न आहे आणि म्हणून भवभूतीपुढें सर्गबद्ध रामायण होतें असें मानणें भाग आहे. रामायणाची अन्यप्रांतांतील प्रत भवभूतीनें घेतली होती असेंहि समाधान येथें मानण्यासारखें नाहीं. रामायणाच्या लाहोर प्रतींत अयोध्याकांडाचा प्रारंभ ' युधाजिताबरोबर जाण्यास दशरथानें भरताला सांगितलें ' येथून झाला आहे आणि ही कथा आमचेकडील प्रतींत बालकांडाचे अंतीं आहे व त्यापुढें वरील श्लोक आहेत. अर्थात् हे श्लोक त्या प्रतींत बालकांडाचे अंतीं असण्याचा संभव नाहीं. कथाप्रवाहाबरोबर अयोध्याकांडाचे प्रारंभीं ते असावयाचे तर तेथेंहि नाहींत. गॉरिशिओनें प्रसिद्ध केलेली प्रत ( गौडप्रत ) घेतली तरी तिचें या कामीं महत्त्व नाहीं. त्या प्रतींतील बालकांड रा. रा. अभ्यंकर यांनीं आमचेकडील मुंबई प्रतीशीं ताडून पाहिलें असून दोन प्रतींत श्लोक भिन्न असले तरी कथाभाग अगदीं एक असल्याचें

त्यांनीं लिहिलें आहे. * याहून रामायणाची वेगळी प्रत उपलब्ध नाहीं व पूर्वी होती असें मानण्यास आधार नाही. तेव्हां भवभूतीनें आधारभूत घेतलेली प्रत परप्रांतीय नव्हे हें उघड आहे.

तर मग असा प्रश्न उद्भवतो कीं, भवभूतीनें येथें अध्याय असा निर्देश कां केला ? स्पष्ट बोलावयाचें म्हणजे त्याचे हातून अजाणतां झालेला हा प्रमाद आहे. पुराणें अध्यायांतून विभागलेलीं असतात; महाभारताची विभागणी अध्यायांत आहे; आणि असे ग्रंथ भवभूतीच्या नित्य वाचनांत असणें साहजिक आहे. तेव्हां रामायणांतील विभागणी सर्गांत असूनहि त्याच्या लक्षांत न राहतां नित्याभ्यासानुसार त्यानें येथें अध्याय असा निर्देश केला असावा. असा प्रमाद होणें मनुष्यस्वभावाला धरून आहे व तसें उदाहरण अगदीं अलीकडचें आम्हांला सध्यां मिळालें आहे. प्रो. मॅकडोनेल यांनीं जो "संस्कृत वाङ्मयाचा इतिहास" लिहिला आहे त्यांत रामायणासंबंधीं लिहितांना सर्गाचे स्थानीं अध्यायाचा× निर्देश केला आहे. अध्यायाच्या या निर्देशावरून वरीलप्रमाणें अनुमान करूं लागल्यास प्रो. मॅकडोनेल यांचे कालापर्यंत रामायण सर्गबद्ध काव्य नव्हतें असें मानावें लागेल. कारण दोहोंकडील प्रमाण एकाच जातीचें आहे. प्रो. रायसाहेब दिनेशचंद्र सेन यांच्या "बंगाली रामायणा वरील व्याख्यानांत" कांडाच्या स्थानीं सर्ग हा शब्द योजिलेला आहे* अर्थात् त्यावरून कांडांची उचलबांगडी करावयाची पाळी येईल. डॉ. बेलवलकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या उत्तररामचरिताच्या प्रतींत

* रा. रा. अभ्यंकर यांचें वाल्मीकिरामायण, पृष्ठ १६९.

× रा. रा. सी. वा. पेंडसेकृत मराठी भाषांतर, पृष्ठ ३१९

* Bengali Ramayanas, पृ. ५५ व ५७.

१ डॉ. बेलवलकर संपादित उत्तररामचरित पाहा. रामायणाचे लाहोर प्रतींत प्रारंभीं निरनिराळ्या प्रांतांतील ज्या प्रती संपादकांनीं गोळा केल्या त्यांची माहिती दिली आहे. यांत पुणें येथील भांडारकर स्मारकमंदिरांतील एक प्रत ( नं. १२३।१८८२।८७) विक्रमसंवत् १ १२ मध्यें लिहिलेली निर्देशिली आहे. या प्रतींत 'बालकांडाचे'च स्थानीं 'बालचरित' अशी संज्ञा योजिलेली असून अयोध्याकांडांत त्याचा अंतर्भाव केलेला आहे. भवभूतींच्या वरील पाठ दाला हा एक आधार आहे, यांत शंका नाहीं तथापि या प्रतींत

वादविषयक अवतरण देतांना 'बालकांडा'च्या स्थानीं 'बालचरित' असा पाठ लिहिलेला आहे. कांडांची हाकालपट्टी करण्यास हें दुसरें प्रमाण सांपडलें म्हणावयाचें. वास्तविक गवताच्या काडीवर मोठमोठीं मंदिरें उभारण्यासारखे हे प्रयत्न आहेत. अशा बाबीला महत्त्व देण्याचें कांहीं कारण नाहीं. भलतींच अनुमानें करूं लागल्यास कशीं हास्यास्पद होतात हें पटण्यासाठीं अन्य ग्रंथांतील हीं उदाहरणें दिलीं आहेत. प्रो. मॅक्डोनेल काय किंवा रायसाहेब दिनेशचंद्र सेन काय, दोघे जाडे विद्वान् व म्हणून असे प्रामादिक उल्लेख त्यांच्या ग्रंथांत येऊं नयेत हें खरें; तथापि हीं विधानें त्यांनीं अजाणतां केलीं असें म्हणून समाधान मानणें उचित होय. भवभूतीचें वरील विधानहि अशांपैकीं आहे. रामायणाची प्रत पुढें ठेवून हें अवतरण त्यानें घेतलेलें नाहीं आणि म्हणून रामायणाच्या कोणत्याहि प्रतींतील पाठाशीं त्याचा पाठ मिळत नाहीं. मूळ श्लोक भवभूतीनें बुद्धिपुरःसर बदलला असावा असा तर्क डॉ. बेलवलकर यांनीं येथें केला आहे.* कांहीं मानिलें तरी त्याला अनुमानच म्हणावयाचें आहे. पाठ भिन्न आहेत हें तर स्पष्ट आहे. मात्र या पाठभेदांवरून अथवा तेथील कांडविषयक किंवा अध्यायविषयक विधानावरून मूळ ग्रंथासंबंधीं अनुमान करणें उचित नव्हे.

सर्ग व अध्याय हे शब्द भिन्न असले तरी दोहोंचा अर्थ एक असल्यामुळें प्रतिशब्द या नात्यानेंच कित्येक वेळां त्यांचा व्यवहार होतो व भवभूतीनें आपल्या नाटकांत रामायणांतील अवतरण घेतांना पुढें सर्गबद्ध रामायणाची प्रत असूनहि सर्गाचे स्थानीं अध्यायाचा जो निर्देश केला आहे, तो याच भावनेनें केला असावा, अशी आमची कल्पना आहे. 'आनंदरामायण' याची विभागणी वाल्मीकिरामायणाप्रमाणें कांड व सर्ग यांत केलेली आहे. यांतील प्रथम—सार—कांडाचे तृतीय सर्गाची समाप्ति करितांना त्याची फलश्रुति पुढीलप्रमाणें दिली आहे.—

**एवं गिरींद्रजे प्रोक्तं सीतायाश्च स्वयंवरम् ।**
**अस्याध्यायस्य श्रवणान् मंगलं लभ्यते नरैः ॥१।३।३९४॥**

सर्गांचाच निर्देश असल्यामुळें अध्यायाविषयींच्या भवभूतीच्या निर्देशाला तिचा कांहीं उपयोग होण्यासारखा नाहीं.

* भवभूतीचे उत्तररामचरित—मराठी भाषांतर, पृ. २४४.

"हे पार्वती, याप्रमाणें सीतेच्या स्वयंवराची कथा तुला सांगितली. या अध्यायाचें श्रवण केलें असतां श्रोत्यांना मंगलप्राप्ति होते."

येथें सर्गाचा निर्देश स्पष्टपणें अध्याय या शब्दानें त्याच ग्रंथांत केला आहे. मग भवभूतीनें याहून अधिक काय केलें ?

## जटायूचा वर्ग कोणता ?

रामायणांतील कथा साधी आहे, पण राक्षस आणि वानर यांच्या कृतींचे योगानें तिला अद्भुतपणा आला आहे व यासाठीं त्यांचा वर्ग कोणता समजावयाचा, हें कळण्याकरितां त्यांविषयीं स्वतंत्रपणें विचार करावा लागला आहे. रामायणांत जटायू व त्याचा बंधु संपाति यांचें कार्य फार थोडें आहे; तथापि तेवढ्यानेंहि रामायणाला अद्भुतपणा आणण्याचें कार्य केलें आहे, हें नाकारितां यावयाचें नाहीं. रामायणांत हे दोघेहि पक्ष्यांचे अधिपति असल्याचें सांगितलें आहे. रामायणांत अन्य पक्ष्यांविषयीं आलेली माहिती अन्यत्र संकलित केली आहे व ती पाहिली असतां पक्ष्यांविषयीं सध्यांच्या व त्या कालच्या समजुतींत भेद आहे असें म्हणवत नाहीं. रामाची व जटायूची गांठ प्रथम पडली त्या प्रसंगीं एक महाबलाढ्य गृध्र रामानें अवलोकन केला असें लिहिलें आहे. त्याला पाहिल्याबरोबर गृध्ररूप धारण करून हा कोणी राक्षस बसला असावा असा संशय रामाला आला आणि त्यानें त्याला "तूं कोण ?" असा प्रश्न केला. या वेळीं त्यानें आपण दशरथाचा मित्र व अरुणाचा पुत्र असल्याचें सांगितलें आहे. ( ३।१४।३ व ३३ ) गृध्र बोलूं लागला तेथेंच अद्भुततेला प्रारंभ झाला आहे. मनुष्यरूप धारण करून तो बोलूं लागल्याचें येथें त्याविषयीं किंवा पुढें संपातीविषयीं सांगितलेलें नाहीं. रामाला जटायु प्रथम दिसला व तो त्याला गृध्र वाटला असें प्रथम म्हटलें आहे व त्याला अनुसरून त्याविषयीं शेवटपर्यंत उल्लेख आहेत. रावण सीतेला घेऊन जात असतां तिनें त्याला वृक्षावर बसलेला पाहिला ( ३।५०।२ ) येथें त्याचें वर्णन "तीक्ष्णतुंड" असें केलें आहे व हें त्याच्या चोचीचें वर्णन आहे. रावणाशीं त्यानें युद्ध केलें त्यांत त्यानें राक्षसाला पायांच्या तीक्ष्ण नखांनीं व्रण केले आहेत. ( ३।५१।६ ) रावणानें त्याजवर सोडलेले असंख्य बाण त्यानें आपले पंख

फडफडावून उडवून दिले आहेत. ( ३।५१।१४ ) त्यानें रावणाचे पाठीवर उडी मारून नखें, पंख व चोंच यांचे योगानें त्याला बोंचून काढिलें आहे. ( ३।५१।३५ ) व शेवटीं रावणानें त्याचे पंख व पाय तलवारीनें तोडून टाकिले आहेत. ( ३।५१।४२ ) संपातीविषयीं पुढें जें वर्णन आहे, त्यांत त्याची चोंच तीक्ष्ण ( ४।५६।१९ ) असून त्याचे पंख सूर्यकिरणांचे योगानें जळून गेल्याचें ( ४।५६।२५ ) सांगितलें आहे. हें वर्णन प्रारंभीं त्यांना पक्षी म्हटलें आहे त्याला धरून आहे आणि त्यांचा इतर सर्व व्यवहार मनुष्यांप्रमाणें सांगितला आहे. व यामुळें त्यांचा वर्ग खरोखर कोणता हें ठरविणें अवश्य आहे.

जटायु रामाशीं बोलूं लागला व रामाला त्यांत अद्‌भुतता वाटली नाहीं. असें पाहिलें म्हणजे पक्षित्वाविषयीं त्याचें वर्णन गौण आहे किंवा काय असा संशय येऊं लागतो व पुढें पुढें तर त्याला दृढता येते. जटायूनें आपण दशरथाचा मित्र असल्याचें सांगितलें आहे व रामाला तो लक्ष्मणासह बाहेर गेला असतां आपण सीतेचें रक्षण करूं असें आश्वासन देऊन ( ३।१४।३४ ) त्यानें त्याचें सख्य संपादिलें आहे. जटायु केवळ बोलत होता असें नव्हे, तर त्यानें विद्या संपादन केली होती. रावण सीतेला घेऊन जात असतां त्यानें पाहिलें व त्यानें त्याला जो प्रतिबंध केला त्यांत तो म्हणतो, " सनातन वेदश्रुतीला हेत्वाभासांच्या योगानें भलतीकडे नेण्यास ज्याप्रमाणें कोणी समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें सीतेला माझ्यासमक्ष बलात्कारानें हरण करून नेण्यास तूं समर्थ नाहींस. " ( ३।५०।२२ ) येथें श्रुतींचा स्पष्ट उल्लेख आहे व त्यावरून त्याचा वेदाभ्यास अनुमानितां आला नाहीं तरी वेदांशीं त्याचा परिचय व त्याविषयींचा त्याचा आदर सहज दिसून येतो. परस्त्रीहरणासाठीं रावणाची त्यानें निर्भर्त्सना केली असून, राजास्त्रियांचें रक्षण करणें हें आपलें कर्तव्य आहे व दुसरा ज्याला नांव ठेवील असें कार्य विचारी पुरुषानें कधीं करूं नये वगैरे नीति सांगितली आहे. ( ३।५०।७, १८ ) धर्म, अर्थ व काम यांविषयीं संशय पडला असतां शास्त्रावरून नीट बोध होत नसेल तर राजाचें आचरण पाहून त्यावरून शिष्ट लोक निश्चय करीत असतात, ( ३।५०।९ ) असें त्यानें म्हटलें असून त्यांत शास्त्राचा

निर्देश स्पष्ट आहे व त्यावरून त्याचें शास्त्राध्ययन सूचित होत आहे. रावणानें पक्षच्छेदन करून टाकिल्यावर तो विव्हळत पडला असतां रामाची व त्याची गांट पडली. या वेळीं त्यानें रामाला सीताहरणाचा सर्व वृत्तांत सांगितला व रावणानें ज्या मुहूर्तावर सीतेचें हरण केलें तो विन्दनामक मुहूर्त असून त्यावर नष्ट झालेलें धन यजमानाला लवकर प्राप्त होतें, (३।६८।१२) असें त्यानें रामाला सुचविलें आहे. रावणाशीं झालेल्या त्याच्या भाषणांत त्यानें, आपलें राज्य असून त्याचें आपण यथान्याय पालन करितों असें वर्णन केलें आहे. (३।५० २०) संपातीला जटायूचे मृत्यूची वार्ता समजल्यावर त्याचे पंख दग्ध झाले असल्यामुळें त्यानें अंगदादि वानरांना आपणास समुद्रावर उचलून घेऊन जाण्याची विनंति केली व त्यांनीं त्याला त्याप्रमाणें समुद्रावर नेल्यावर त्यानें आपल्या भ्रात्याला उद्देशून तर्पण केलें. (४।५८।३३-४५) रामायणांतील या त्रोटक निर्देशांवरून त्यांची प्रारंभीं पक्ष्यांमध्यें गणना केली असली तरी मनुष्यांहून ते भिन्न आहेत असें वाटत नाहीं. त्यांची विद्या व व्यवहार हीं अगदीं मनुष्यांप्रमाणें असल्याचें दिसून येतें. स्वरूपवर्णनाची काय ती त्यांत अडचण आहे. तथापि रामादिकांचा त्यांशीं झालेला व्यवहार पाहिला म्हणजे त्याला तादृश्य महत्त्व द्यावें असें वाटत नाहीं. सीताहरणाचा वृत्तांत जटायूचे तोंडून श्रवण केल्यावर रामानें आपलें धनुष्य टाकून त्याला आलिंगन दिलें असें (३।६७।२३) वर्णन आहे व यावरून स्वतः रामाची त्याविषयींची भावना काय होती हें सहज अनुमानण्याजोगें आहे.

रामानें जटायूला आलिंगन देऊन त्याला आपल्या बरोबरीचा मानिला, इतकेंच नव्हे तर आपल्या पित्याप्रमाणें तो आपणाला पूज्य असल्याचें (३।६८-२६--३६) सांगून खरोखरच त्याप्रमाणें त्याचें उत्तरकार्य केलें. लक्ष्मणाकडून काष्ठें आणवून त्यानें चिता रचिली व त्याला मंत्राग्नि दिला; मृगादिकांचें मांस आणून त्याला पिंडदान केलें आणि यज्ञशील, आहिताग्नि व भूमिदान करणारे यांना जी गति प्राप्त होते ती तुला प्राप्त होवो अशी प्रार्थना केली. यापुढें त्यांनीं त्याला उद्देशून तर्पण केलें त्याविषयीं पुढील श्लोक आहे:—

शास्त्रदृष्टेन विधिना जलं गृध्राय राघवौ ।
स्नात्वा तौ गृध्रराजाय उदकं चक्रतुस्तदा ॥ ३।६८।३६ ॥

"शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें त्या रघुवंशज रामलक्ष्मणांनीं त्या गृध्रराजाचे उद्देशानें ( नदीतीरीं जाऊन ) स्नान केलें व त्याला जलांजलि दिली."

येथें गृध्रराजाची उदकक्रिया शास्त्रोक्त विधीनें केल्याचें स्पष्ट म्हटलें आहे. आणि शास्त्रांत तर पशुपक्ष्यांचें उत्तरकार्य करावयास कोठेंहि सांगितलेलें नाहीं. तेव्हां रामानें त्याला आपल्या पित्याचा मित्र व आपल्यावर उपकार करणारा एक पुरुष या नात्यानें त्याचें और्ध्वदेहिक केलें असें होत नाहीं काय ?

स्वतां जटायु किंवा संपाति यांची भावना आपण मनुष्यांहून भिन्न आहों, अशी दिसत नाहीं. अंगदादि वानर सीतेचा शोध लागत नाहीं, असें पाहून निराशेनें प्रायोपवेशनार्थ बसले असतां तेथें संपाति विंध्याच्या गुहेंतून बाहेर पडून पाहूं लागला व अंगदादि वानर त्याच्या दृष्टीस पडल्यावर त्याला आपलें भक्ष्य पाहून आनंद झाला. या वेळीं त्याचे तोंडीं पुढील वाक्य आहे—

विधिः किल नरं लोके विधानेनानुवर्तते ।
यथाऽयं विहितो भक्ष्यश्चिरान्मह्यमुपागतः ॥ ४।५६।४॥

"खरोखर या जगामध्यें मनुष्याला प्राक्तनकर्मास अनुसरून फल प्राप्त होत असतें असें म्हणतात, तें अगदीं खरें आहे. कारण प्राक्तनानें विहित केलेलें हें माझें भक्ष्य पुष्कळ दिवसांनीं मला प्राप्त झालें आहे."

येथें त्यानें आपण मनुष्य आहों, या भावनेनें आपले विचार व्यक्त केले आहेत. म्हणजे रामाला त्यांविषयीं मनुष्यभाव वाटला व स्वतां त्यांनाहि तसा वाटत होता, मग त्यांना आपण तरी पक्षी कसें म्हणावें ?

## विमानकला.

रामायणांत रावणाचे पुष्पकविमानाचा उल्लेख आला आहे व तेथेंहि तो अलौकिक म्हणून आला आहे. आतां विमानकला पूर्णावस्थेस पोंचली असून कालांतरानें विमान हें राजसत्तेंतून सुटून सर्वसाधारण वाहन होऊन राहील, अशीं लक्षणें दिसत आहेत; आणि यामुळें रामायणांतील विमान हीं केवळ कविकल्पना असें म्हणावयाचें कारण नाहीं. विमानकला अस्तित्वांत येण्यापूर्वीं आ-

मच्या प्राचीन ग्रंथांतील उल्लेखांवरून विमान म्हणजे मृत्यूनंतर स्वर्गीं जाण्याचें साधन अशी कल्पना रूढ होती व त्याबरोबर ही कला देवांमध्यें आहे अशी समजूत होती. रामायणांतील वर्णन या कलेला पोषक आहे; कारण त्यांत हें विमान कसें चालत असे, हें सांगतांना 'कामग'–इच्छेप्रमाणें चालणारें, असा निर्देश आहे. अर्थात् तपःप्रभावानें प्राप्त होणारें अलौकिक बल हेंच विमान चालविण्याचें साधन अशी कल्पना याचे मूळाशीं दिसते. विमानाचे वर्णनावरून मात्र हें संभवनीय दिसत नाहीं. एक तर तें विश्वकर्म्यानें निर्माण केल्याचें स्पष्ट सांगितलें आहे (६।१२१।२७). दुसरें असें कीं, कुबेराला जिंकून रावणानें तें संपदन केलें आहे. ( ६।१२१।९ ) केवळ अलौकिक बलाचे आश्रयानें तें चालावयाचें असतें तर त्याची रचना करण्याला विश्वकर्मा लागला नसता, व तें कुबेराकडून रावणाकडे आल्यावर त्याच्या संग्रहांत केवळ प्रदर्शनीय वस्तु म्हणून पडलें असतें. परंतु तसें न होतां तो त्याचा यथेच्छ उपयोग करीत असे. बिभीषणाची आज्ञा होतांच तें पुढें आलें, वगैरे रामायणांतील व्यवहारांवरून तें चालविणारा कोणी तरी निपुण चालक त्याजकडे असावा असें दिसतें. मात्र हें चालविण्याचें साधन काय होतें याविषयीं रामायणावरून कांहीं कल्पना होत नाहीं. वाल्मीकींनीं अलौकिक म्हणूनच येथील वर्णन लिहिलें आहे आणि त्या कलेची माहिती मनुष्यांत नसल्यामुळें तें शब्दशः खरें आहे. साधन कोणतेंहि असो; रामायणांतील पुष्पक विमान ही कांहीं काल्पनिक कथा नव्हे हें निश्चित होय. हें विमान ताशीं किती मैल जात असे हें जरी सांगतां आलें नाहीं तरी त्याचा वेग मोठा होता, यांत शंका नाहीं. रावण युद्धार्थ बाहेर पडला तो कृष्ण १४ चे दिवशीं असें लिहिलें आहे. (६।९२।६४) व पुढील चैत्र मासाचे उल्लेखावरून हा फाल्गुन मास असला पाहिजे. त्याचे दुसरे दिवशीं अर्थात् फाल्गुन वा। ३० ला रावण मरण पावला. यानंतर बिभीषणाचा अभिषेक, सीतेचें दिव्य हीं झाल्यावर राम पुष्पक विमानांत बसून निघाल्याचें वर्णन आहे. या दोन कार्यांस काल किती लागला हें स्पष्ट सांगितलेलें नाहीं. अंदाजानें दोन दिवस धरिले तर चैत्र शु. २ ला ते निघाले असें होईल. विमान मार्गांत किष्किंधा येथें व पुढें भरद्वाजाश्रमीं उतरल्याचें लिहिलें

आहे. चैत्र शु. ५ ला त्यांचा भरद्वाजाश्रमीं मुक्काम होता. ( ६।१२५।२४ ) व तो वरील कालाशीं जुळत आहे. अर्थात् लंकेपासून अयोध्येपर्यंतचा रामाचा प्रवास मध्यें मुक्काम केल्यामुळें दोन दिवसांचा झाला. विमानाच्या वेगाचें प्रमाण कळलें नाहीं, तरी एकंदरींत वरील प्रवासावरून तो मोठा होता, यांत शंका नाहीं. पुष्पकावांचून आणखी एकादें विमान राक्षसांपाशीं होतें अशाविषयीं रामायणांत वर्णन नाहीं. तथापि बिभीषण आपल्या अमात्यांसह एकदम समुद्र ओलांडून आल्याचें जें वर्णन केलें आहे तें (६।१७) वाचलें म्हणजे बिभीषणा-जवळहि असें एखादें विमान नसेल ना, असा संशय येतो. रावणवधानंतर पुष्पक विमानांतून राम अयोध्येंत आले त्या वेळीं इकडील मनुष्यांचें लक्ष त्याकडे जाऊन त्यांनीं ही कला संपादिली असल्यास कळत नाहीं.



*

# भाग १ वा.

## रामायणांतील स्थलनिर्णय.

रामायणांतील कथा काल्पनिक नसून तो इतिहास असल्याविषयीं मागील प्रकरणांतून विवेचन केलें आहे. रामायण ऐतिहासिकदृष्ट्या वाचूं लागलें असतां त्यांत वर्णन केलेलीं स्थलें-नद्या, देश, पर्वत वगैरे-सध्यां कोठें आहेत, त्यांना आतां तींच नांवें आहेत कां दुसरीं आहेत, वगैरे प्रश्न मार्मिक वाचकांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाल्यावांचून राहात नाहींत. हिंदुस्थानचें सांप्रतचें भूगोलवर्णन आपल्या लक्षांत असतें व त्यांतील कित्येक नांवें आपणांला चिरपरिचित झालेलीं असतात; रामायणांतील कित्येक स्थलादिकांचीं नांवें वाचून व त्यांचें सध्यांचे नांवांशीं असलेलें सादृश्य पाहून ही जिज्ञासा अधिक वाढूं लागते. अशा जिज्ञासु जनांची सर्वथा तृप्ति करण्यासारखें साधन वा सामर्थ्य आमचेपाशीं नाहीं. तथापि त्या दिशेनें कांहींतरी प्रयत्न या प्रकरणांत करावयाचा विचार आहे. कित्येक नांवें कालांतरानें लुप्त झालीं आहेत. कित्येक अपभ्रष्ट झालीं आहेत व कित्येक संशयित स्थितींत आहेत. यामुळें हें कार्य मार्मिक व चिकित्सक अशा विद्वान् पुरुषांनीं करावयाचें आहे. रामायणकालचीं जीं कित्येक नांवें कालाशीं टक्कर देऊन अद्यापि जिवंत राहिलीं आहेत त्यांचे आधारावर इतरांचा शोध आपणांस करावयाचा आहे, हें सांगावयास नको. रामायणांत जे स्थलांचे निर्देश आले आहेत त्यांविषयीं प्रायः त्याच क्रमानें आतां विचार करूं.

### १ अयोध्या.

ज्या नगरींत रामानें राज्य केलें ती ही नगरी सांप्रतही याच नांवानें प्रसिद्ध आहे. रामायणांत या नगरीची जी लांबीरुंदी सांगितली आहे ती सध्यांच्या अयोध्या नगरीचे विस्ताराशीं मिळत नाहीं. सध्यांची अयोध्या अवघी दोन मैल लांब व पाऊण मैल रुंद आहे. रामायणांत वर्णिलेली सरयू नदी येथें जवळच आहे व तीवरून

आणि लौकिक परंपरेनें अबाधित राहिलेल्या नांवावरून हीच रामाची अयोध्या असें निश्चित म्हणतां येतें. रामायणांत ही कोसल देशाची राजधानी असल्याचें सांगितलें आहे. तिची स्थापना कोणीं केली वगैरे माहिती दिलेली नाहीं. तथापि हरिवंशांत यासंबंधी थोडी माहिती मिळते. मूळ पुरुष मनु, याचा पुत्र इक्ष्वाकु; याला शंभर पुत्र होते. त्यांतील ज्येष्ठ पुत्र विकुक्षि म्हणून होता. अष्टका श्राद्धाकरितां पित्यानें मांस आणण्यास सांगितलें असतां यानें मारून आणिलेला शश वाटेंत भक्षण केला. याकरितां पुरोहित वसिष्ठांचे आज्ञेवरून पित्यानें त्याचा त्याग केला. त्याला यानिमित्त शशाद हें नांव मिळालें. पित्यानें त्याग केला तरी तो मरण पावल्यावर यानें त्याचे मागें राज्य केलें. हा फार बलाढ्य असल्यामुळें याला अयोधत्व प्राप्त झालें व तो अयोध्येचा अधिपति झाला.

तेषां विकुक्षिर्ज्येष्ठस्तु विकुक्षित्वादयोधताम् ।
प्राप्तः परमधर्मज्ञः सोऽयोध्याधिपतिः प्रभुः ॥१।११।१३॥

हरिवंशांतील या श्लोकांत विकुक्षीनें अयोध्येची स्थापना केली, असें स्पष्ट म्हटलेलें नाहीं; तथापि राजाला अयोधत्व प्राप्त झालें असें सांगण्याच्या या पद्धतीवरून अयोध्या शब्दाची व्युत्पत्ति सांगण्याचा उद्देश अनुमित होतो आणि पुढें तो अयोध्याधिपति झाला असें अयोध्येचें नांव पूर्वी आलें नसतां सांगितलें आहे, यावरून हाच अयोध्येचा पहिला अधिपति होय व यानेंच या नगरीची स्थापना केली, असें वाटतें. विकुक्षीपासून रामापर्यंत अनेक पराक्रमी राजे झाले व त्यांची अयोध्या हीच राजधानी असल्यामुळें तोंपर्यंत या नगरीची अखंड भरभराट होत होती. एका सार्वभौम अधिपतीचें निवासस्थान या नात्यानें तिचा विस्तार—रामायणांतील उल्लेख अत्युक्तिपूर्ण म्हणून सोडून दिला पाहिजे, व त्याप्रमाणें सोडून दिला तरी—बराच मोठा असणें असंभाव्य नव्हे. रामाबरोबर अयोध्येंतील प्रजाजनांनीं सरयूप्रवेश केला आणि तेव्हां ही नगरी ओस पडली. तेव्हांपासून पुष्कळ काल ती तशीच ओस असावी असें वाटतें. यानंतर ऋषभनामक एका राजानें तेथें वसाहत केली, असें रामायणांतच सांगितलें आहे. (७।१११।१०) व तेव्हांपासून आतां तेथें मनुष्याची वस्ती आहे. हा ऋषभराजा कोण आणि कधीं झाला याविषयीं इतिहास

उपलब्ध नाहीं. राजा विक्रमादित्य यानें प्राचीन अयोध्या नगरीचा शोध केला आणि रामकालांतील महत्त्वाचीं स्थळें निश्चित करून तेथें स्मरणार्थ म्हणून एकंदर ३६० देवालयें बांधिलीं अशी एक दंतकथा आहे. पण तिची सत्यता दाखविण्यास ऐतिहासिक आधार नाहीं व तत्कालिन देवालय नाहीं. तथापि "बुडाला औरंग्या पापी" असें म्हणतां येईपर्यंत किती भ्रष्टाकार झाला याचा तरी पत्ता कोणास आहे ? मध्यंतरीं कालहि मोठा गेला आहे. तेव्हां अनुमान तरी कसें करावें ? प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संगनें दिलेली माहिती व वरील दंतकथा यावरून अयोध्येचा जीर्णोद्धार विक्रमादित्यानें केला असला पाहिजे असें डॉ. कनिंगहॅम यानें आपलें मत दिलें आहे. ह्युएनत्संग येथें आला त्या वेळींच तेथें २० बुद्धमंदिरें असून मठवासी तीन हजारांवर होते, असें त्यानें लिहिलें आहे. सध्यां अयोध्येंत असलेल्या देवालयांत नागेश्वर महादेवाचें देवालय मात्र प्राचीन असावें असें शोधकांचें मत आहे. इतर सर्व देवालयें अर्वाचीन कालांतील आहेत.

अत्यंत खेदाची आणि लाजिरवाणी गोष्ट ही कीं, रामजन्माचें म्हणून जें स्थान दाखविण्यांत येतें तेथें मुसलमानांची मशीद आहे !

## २ सरयू.

सरयू नदी अयोध्येच्या जवळ असून नदीला मोठमोठे घांट बांधिलेले आहेत व त्यांना निरनिराळीं नांवें दिलेलीं आहेत. हिला सांप्रत घोग्रा असेंहि म्हणतात. दशरथाचे हातून श्रावणाचा वध झाला तो याच नदीचे तीरावर होय. दशरथानें अश्वमेध या नदीचे उत्तरतीरावर केला असें रामायणांत वर्णन आहे. हिचे तीरावर रामायणांत प्रसिद्ध असलेलें ताटकावन होतें व तेथें जाऊन रामानें ताटकेचा वध केला. पूर्वीं तेथें मनुष्यवस्ती असून ताटकेच्या उपद्रवामुळें ती नष्ट झाली होती. (१।२४।१७) कैलासपर्वतावरील मानससरोवरापासून हिची उत्पत्ति झाली असून त्यानिमित्त तिला हें नांव ( सरःप्रवृत्ता सरयूः, १।२४।९ ) प्राप्त झालें, अशी रामाला विश्वामित्रांनीं तिचे नांवाची व्युत्पत्ति सांगितली आहे. सरयूनदी भागीरथीला जेथें मिळते तेथें उदकाचे घर्षणानें मोठा शब्द होतो; व तो ऐकून हा शब्द कसला, असें रामानें विश्वामित्रांना विचारिल्यावरून वरील निरूपण त्यांनीं केलें आहे; आणि संगमावरील उदकांचे घर्षणाचा तो ध्वनि

असल्याचें सांगितलें आहे. या ध्वनिनिमित्त तिला घर्घर नाम प्राप्त होऊन त्याचाच घोग्रा हा अपभ्रंश झाला असें वाटतें.

### ३ तमसा.

सरयूचे जवळ उजव्या बाजूनें सुमारें दहापंधरा मैलांवर एक नदी आहे. राम वनवासाला गेला तेव्हां त्यानें पहिला मुक्काम या नदीचे तीरावर केला होता. रामाला वनांत न जातां परत फिरविण्याकरितां प्रजाजन येथपर्यंत रामाबरोबर आले होते आणि रामानें पुढें जाऊं नये म्हणून सांगण्याकरितांच जणूं-काय ती नदी आडवी दिसूं लागली अशी मार्मिक उपमा येथें दिलेली आहे. ( २।४५।३२ ) येथें रात्रभर राहून प्रजाजन निजले असतां रथांतून रामानें मुकाट्यानें पुढील मार्ग सुधारला.

### ४ दुसरी तमसा व वाल्मीकींचा आश्रम.

दुसरी तमसा नदी भागीरथीच्या जवळ असल्याचें रामायणांत सांगितलें आहे. ( १।२।४ ) महर्षि वाल्मीकींचा आश्रम या तमसा नदीचे तीरावर होता. सीतेला, गंगातीरीं असलेल्या ऋषींच्या तपोवनामध्यें एक रात्र तरी रहावें, असे डोहाळे लागले होते ( ७।४२।३३ ) व पौरांचा अपवाद टाळण्यासाठीं तिचा त्याग करण्याचें रामानें ठरविल्यावर लक्ष्मणानें रामाज्ञेप्रमाणें तिला गंगेच्या तीरीं आणून सोडिलें व तेथें आल्यावर रामाची ती घोर आज्ञा तिला कळविली. जवळ असलेल्या वाल्मीकींच्या आश्रमांत त्यांचे आश्रयानें राहण्याची लक्ष्मणानें तिला सूचना केली. गंगेच्या पलीकडे गेल्यावर हा आश्रम लागल्याचें वर्णन आहे व यावरून ती गंगेच्या दक्षिणेकडे असल्याचें उघड दिसतें. सांप्रत प्रयागाचे दक्षिणेस सुमारें वीस मैलांवर तमसा नामक नदी असून ती दक्षिणेकडून गंगेस मिळते. हीच पूर्वीची तमसा होय. वायव्य प्रांतांत कानपुरावरून फरुकाबादकडे आगगाडी जाते, तिचें विठूर म्हणून जें एक स्टेशन आहे त्याजवळ वाल्मीकींचा आश्रम होता, असें कित्येकांचें* मत असून तदनुरूप त्या स्थानीं वाल्मी-

---

* प्रो. सतीशचंद्र विद्याभूषण यांचा भवभूति–रा. रा. वा. गो. आपटेकृत मराठी भाषांतर, पृष्ठ १८.

कींचें एक मंदिरहि आहे. हें* मंदिर गंगेच्या तीरावर आहे. कानपुरांतील सती-घाटावर लक्ष्मणानें सीतेला आणून सोडिली, अशी दंतकथा आहे. विठूरपासून थोड्या अंतरावर एक मंदिर असून वर हिरवा रंग आहे. अश्वमेधाचे निमित्तानें लवाचें रामाबरोबर जें युद्ध झालें, त्यांत लवानें रामाला मारलेल्या बाणाचे स्मरणार्थ हें मंदिर बांधिलेलें आहे, असें म्हणतात. गंगेच्या तीरावर कांहीं वर्षांपूर्वीं एके स्थानीं खरोखरच एक बाणाचें अग्र मिळालें, अशी लोकवार्ता आहे; परंतु रामायणांतील वर्णनाकडे पाहिलें, तर येथें वाल्मीकींचा आश्रम असणें संभवनीय दिसत नाहीं. अश्वमेधाचे निमित्त रामाचें लवाबरोबर युद्ध झालें, याला रामायणांत आधार नाहीं. इतकेंच नव्हे, तर दुसराहि प्रामाणिक इतिहासाचा आधार नाहीं; आणि त्यावर तर वरील दोनी मंदिरें उभारलेलीं आहेत. वाल्मीकींच्या आश्रमापासून गंगा दूर नव्हती, पण त्यापेक्षां तमसा अधिक जवळ होती. हा वाल्मीकींचा आश्रम गंगातीरीं असून तेथें जवळ कोणतीच तमसा नदी नाहीं. सीतेला वाल्मीकींच्या आश्रमाजवळ सोडण्यास लक्ष्मणाला सांगतांना रामानें "गंगेच्या पलीकडे गेल्यावर तमसातीरीं वाल्मीकींचा आश्रम असल्याचें" (७।४५।१७) स्पष्ट म्हटलें आहे. तेव्हां विठूर येथें सध्यां वाल्मीकींचें मंदिर म्हणून जें दाखविण्यांत येतें, तेथें त्यांचा आश्रम होता असें वाटत नाहीं.

## ५ कोसल.

रामाची राजधानी अयोध्या ज्या देशांत होती, तो कोसल देश होय. सध्यां याचें नांव लुप्त होऊन त्याला अयोध्या हेंच राजधानीचें नांव पडलें आहे. सध्यांचा अयोध्या प्रांत हिमालय आणि गंगा यांचेमध्यें आहे. राम वनवासासाठीं दक्षिणेकडे जात असतां कोसलदेशाची सीमा ओलांडून पलीकडे गेला व त्यानें थोड्या वेळानें गंगानदी अवलोकन केली ( २।५०।१०–१२ ) असें वर्णन आहे व त्यावरून गंगानदी ही प्राचीन कोसलाची दक्षिणेकडील सीमा असें दिसतें. पूर्वेकडे विदेहाधिपति जनकाचें राज्य होतें व त्याचें राज्य ही कोसलदेशाची पूर्वेकडील सीमा होय. पश्चिमेकडीस सीमा रामायणावरून कळत नाहीं.

* The Geographical Dictionary of ancient and mediaeval India by Nundoo Lal Dey, page 101.

या भागांतून गंगा, सरयू, तमसा इत्यादि नद्या वहात असल्यामुळें हा देश रामायणकालीं ज्याप्रमाणें सुपीक व समृद्ध होता, त्याप्रमाणें तो अद्यापि असून तसाच निसर्गसुंदर आहे. " हृष्टपुष्टजनाकीर्ण " असें लोकांविषयींचें वर्णन आतां रामायणांत केवळ वाचावयाचें आहे; तथापि

**उद्यानाम्रवणोपेतान् संपन्नसलिलाशयान् ॥ २।५०।९ ॥**

" उपवनें, आंबराया आणि विपुल जलाशय " त्यांत जागोजाग असल्याविषयीं जें सांगितलें आहे, तें त्याचें वैभव प्राचीन कालची साक्ष देत आजहि तसेंच उभें राहिलें आहे व यासाठीं पाश्चात्य लोकांनीं या प्रदेशाला " हिंदुस्थानची उद्यानभूमि " ( Garden of India ) असें अन्वर्थक नांव दिलें आहे. या देशाला हें नांव कसें मिळालें याविषयीं रामायणांत कांहीं माहिती मिळत नाहीं. पाली भाषेंतील अनेक बौद्ध ग्रंथांवर टीका करणारा बुद्धघोष यानें " दीघ निकायसुत्त " वरील ' सुमंगलविलासिनी ' नामक टीकेंत या देशाला हें नांव कसें प्राप्त झालें याविषयीं एक गमतीची कथा दिलेली आहे. या देशाचा कोणी राजा होता; त्याला महापनाद नांवाचा पुत्र होता. हा राजपुत्र अगदीं उदासीन असून कधीं हंसत नसे. त्याला हंसविण्यासाठीं राजानें पुष्कळ बक्षिसें लाविलीं होतीं; व त्याप्रमाणें तीं मिळविण्याकरितां लांबलांबचे कुशल लोक तेथें आले होते. परंतु तें बक्षीस कोणालाहि मिळालें नाहीं. शेवटीं इंद्रानें आपल्याकडील एक नाटकमंडळी राजाकडे पाठविली व या मंडळीला आपल्या प्रयत्नांत यश आलें. तेव्हां राजधानींत जमलेली दूरदूरची मंडळी परत गेली. ही फार दिवशीं परत आलेली मंडळी वाटेंत भेटली असतां त्यांचे इष्टमित्र त्यांना " कच्चित् भो कुशलम् ? " असें विचारूं लागले. आणि त्यांच्या प्रश्नांतील " कुशलम् " या शब्दावरून या देशाला ' कोसल ' हें नांव पडलें.* कोसल देशाचे दोन भाग होते. १ उत्तरकोसल व २ दक्षिणकोसल. उत्तरकोसलाचा उल्लेख कुश आणि लव यांना रामानें राज्याभिषेक करविले त्या निमित्तानें आला आहे. त्यांतील कुशाची नगरी कुशावती विंध्याचे समीप असल्याचें सांगून ( ७।१०८।४ ) लवाची श्रावस्ती ( ७।१०८।५ ) ही

---

* सुमंगलविलासिनी १।२३९

उत्तरकोसलांत असल्याचें सांगितलें आहे. ( ७।१०७।७; १७ ) व यावरून त्याचे अपेक्षेनें दक्षिणकोसल नामक भाग असल्याची कल्पना होते. रामायणांत सर्वत्र कोसल असा सामान्य प्रयोग आढळतो आणि कदाचित् कुश आणि लव यांची राज्याचे विभाग करून तेथें स्थापना करावयाचे निमित्तानें त्या वेळीं हीं दोन अन्वर्थक नांवें दोन प्रदेशांना दिलीं असतील. तथापि याविषयीं निश्चित विधान कोणतेंहि करितां येत नाहीं. रामायणाच्या आधारावरच बोलावयाचें तर उत्तरकोसलांत रामानें लवाची स्थापना केली असें सांगतां येतें आणि कुशाकडे असलेला प्रदेश कोसल एवढयाच नांवानें मोडत होता, असें दिसतें. दशरथानें अश्वमेधाचे वेळीं ज्या राजांना समारंभाला येण्याकरितां निमंत्रणें पाठविलीं त्यांत कोसलाधिपति भानुमान् नामक राजाचा उल्लेख आहे. ( १।१३।२६ ) यावरून उत्तरकोसलावर स्वतां राजा दशरथ राज्य करीत होता व कोसलाधिपति भानुमान हा त्याचा मांडलिक होता असें दिसतें. उत्तरकोसलाचे अपेक्षेनें भानुमानाचे सत्तेखालचा देश दक्षिणकोसल असावा असें जरी आपण म्हटलें तरी त्याला त्या वेळीं दक्षिणकोसल न म्हणतां कोसल एवढेंच नांव होतें असें अनुमान यावरून उघड होतें. महाभारतावरूनहि या दुसऱ्या कल्पनेला पुष्टि मिळते. पांडवांचे राजसूयाचे निमित्तानें भीमसेन पूर्वेकडे गेला, त्यांत त्यानें अयोध्येंत बृहद्बल राजाला जिंकिलें असें सांगून नंतर त्यानें उत्तरकोसल जिंकला असें वर्णन आहे. ( २।३१ ) बृहद्बल हा कुशाचे वंशांतील पुरुष होता. अर्थात् रामायणांतील कोसलभागाचा हा अधिपति होय. याला जिंकल्यामुळें कोसल देश पांडवांचे सत्तेखालीं आला. उत्तरकोसल हा लवाकडे होता व यासाठीं त्याजबरोबर भीमसेनाला वेगळें युद्ध करावें लागलें. या वेळीं लवाचे वंशांतील कितवा पुरुष गादीवर होता व त्याचें नांव काय तें भारतांत सांगितलेलें नाहीं. रामाचे मागें अयोध्या ओस पडल्याचें वर्णन रामायणांत आहे व भीमसेनानें बृहद्बलाशीं केलेलें युद्ध अयोध्येंत केल्याचें लिहिलें आहे. तेव्हां अयोध्येंत मध्यंतरीं वस्ती झाली असावी असें वाटतें. महाभारतांत दक्षिणेकडे सहदेव गेल्याचें सांगितलें असून तिकडील प्रदेशांत एक कोसल देश सांगितला आहे. रामायणांतील व भारतांतील हे कोसल एक नव्हत असें

वाटतें. भारतांतील कोसल हा सध्यां ज्याला गोंडवण म्हणतात तो प्रांत होय, असें पूर्वापरसंदर्भावरून दिसतें. आणि ह्युएनत्संग यानें या कोसलाचें जें वर्णन दिलें आहे त्याशीं तें सुसंगत आहे. हा प्रदेश विंध्याद्रीचें दाक्षिणेस दूर अंतरावर आहे. रामायणांतील या कोसलाची राजधानीं विंध्याद्रीचें पठारावर असल्याचें त्यांत सांगितलें आहे व यावरून हे प्रदेश पृथक् दिसतात.

कोसल देशाचा उल्लेख शतपथ ब्राह्मण आणि कल्पसूत्र यांत आला आहे. पाणिनीचे अष्टाध्यायींत कोसलशब्दावरून अपत्यार्थी 'ञ्यङ्' प्रत्यय सांगितला आहे (४।१।१६५) आणि त्याप्रमाणें कोसलपुत्र या अर्थी 'कौसल्य' हा शब्द सिद्ध होतो. याचें स्त्रीलिंगी रूप 'कौसल्या.' रामाचे मातेचें नांव कौसल्या होतें व यावरून भाषेंत हें नांव रूढ झालें असावें असें वाटतें. कारण ती कोसलाधिपतीची पत्नी असल्यामुळें त्याचे वंशांत झालेली असणें संभवनीय नाहीं. पांडवांच्या पूर्वजांत जनमेजय म्हणून एक राजा आला आहे. तो पुरूचा पुत्र व त्याच्या मातेचें नांव कौसल्या. ही कौसल्या कोसलाधिपतीची कन्या असण्याचा संभव आहे. असो. वरील ग्रंथांत किंवा रामायणांत या देशाचें नांव प्राचीन म्हणूनच सांगितलेलें आढळतें व यावरून तें रामायणांतहि फार प्राचीन कालापासून चालत आलें आहे, असें अनुमान होतें.

पाली भाषेंतील वाङ्मयांत गौतमबुद्धाचे वेळीं सर्व जंबूद्वीपांत सोळा महाजनपद सांगितले आहेत. त्यांत कोसलाचें नांव आहे व यावरून गौतमबुद्धाचे वेळीं याची चांगली भरभराट होती, असें दिसतें. त्या वेळीं तेथें प्रसेनजित् नामक राजा होता व त्यानें बौद्ध धर्माची दीक्षा घेतली होती.

## ६ शृंगवेरपुर.

निषादाधिपति गुहाची ही राजधानी. हें गांव सध्यां गंगातीरीं असून प्रयागाचे नैर्ऋत्येला सुमारें अठरा मैलांवर आहे. येथें राम व मागाहून भरत आला असतां गुहानें त्यांचें चांगलें आदरातिथ्य केलें असें रामायणांत वर्णन आहे. (२।५०।३४–५१ व २।८४।१०).

## ७ नन्दिग्राम.

राम वनवासाला गेल्यावर भरत त्याला परत आणण्याकरितां चित्रकूटापर्यंत

गेला होता; परंतु तो परत आला नाहीं. तेव्हां त्याच्या पादुका घेऊन भरत नगरींत आला आणि मग तेथें न राहतां अयोध्यानगरीचे बाहेर नन्दिग्रामीं तापसवेषानें राहिला. (२।११५।१२) राम परत येत असतां त्यानें मारुतीला पुढें भरताकडे पाठविलें. तेव्हां अयोध्येचे पाठीं सुमारें एक कोसावर भरत असल्याचें त्यानें अवलोकन केलें असें वर्णन आहे. ( ६।१२५।२९ ) सांप्रत त्याला नंदगांव असें म्हणतात.

## ८ विदेहाधिपतींची मिथिला, सिद्धाश्रम, गौतमाश्रम व विशालानगरी.

सीतेचा पिता राजा जनक याच्या देशाचें नांव विदेह व राजधानीचें नांव मिथिला. पूर्वीं या नगरीचें नांव वैजयंत नगर असें होतें. इक्ष्वाकूचा पुत्र निमि यानें एका यज्ञांत पौरोहित्य करावयास वसिष्ठांस सांगितलें; परंतु त्यांनीं त्यापूर्वीं दुसरीकडचें निमंत्रण स्वीकारलें असल्यामुळें तें पत्करिलें नाहीं. तेव्हां राजानें भृग्वादि ऋषींना बोलावून त्यांच्या द्वारा यज्ञाला प्रारंभ केला. राजाचे यज्ञाला प्रारंभ झाल्यावर वसिष्ठ आले व त्यांना यज्ञाला प्रारंभ झालेला पाहून क्रोध आला. दोघांनीं एकमेकांस शाप दिले. वसिष्ठांनीं राजाला अचेतन होशील, असा शाप दिला; जेव्हां राजा मरण पावला. तेव्हां राजाचे देहाचें ऋषींनीं मंथन केलें, त्यापासून मिथि झाला. यानें नगरीची स्थापना केली, म्हणून ती मिथिला. मंथनापासून याचें जनन, म्हणून याला जनक म्हणत; तसेंच विदेहाचे ठायीं याची उत्पत्ति म्हणून त्याला विदेह असें आणखी नांव मिळालें(७।५४-५७).

विश्वामित्राचे मखरक्षणार्थ राम-लक्ष्मण गेले व तेथून शिवधनुष्य पाहण्याकरितां ते निघाले, ते सरयूचे दक्षिणतीरीं दीड योजनावर गेले असतां विश्वामित्रांनीं रामाला बला व अतिबला या विद्या सांगितल्या (१।२२।११). रात्रीं ते सरयूचे तीरीं राहून दुसरे दिवशीं निघाले. सरयू व गंगा यांचे संगमावरील अनंगाश्रम त्यांना लागला. (१।२३।५,६). येथें त्यांनीं रात्रौ मुक्काम केला (१।२३।१६). सकाळीं नौकेंतून ते गंगानदी उतरून पलीकडे दक्षिणतीरीं गेले (१।२४।११). येथें जवळच ताटकावन होतें. तेथें पूर्वीं मलंदव करूष नामक देश असून त्यांत पूर्वीं वस्ती होती. ताटकेच्या उपद्रवामुळें तें ओस झालें होतें. ताटकेचा

वध केल्यावर रात्रौ त्यांनीं तेथें मुक्काम केला ( १।२६।३४ ). दुसरे दिवशीं कांहीं चालून गेल्यावर ते विश्वामित्रांच्या सिद्धाश्रमीं पोंचले. यज्ञ समाप्त झाल्यावर मिथिलेकडे ते चालले. ते प्रथम सायंकाळीं शोणातीरीं उतरले ( १।३१। २० ). दुसरे दिवशीं गंगातीरीं राहिले. ( १।३५।८ ). तिसरे दिवशीं गंगा उतरून उत्तरतीरीं गेले ( १।४५।९ ). पुढें गेल्यावर त्यांना विशाला नगरी लागली. तेथें ते रात्रीं राहिले ( १।४७।१९ ). चौथे दिवशीं ते निघाले, त्यांना गौतमाश्रम लागला ( १।४८।११ ) व पुढें ईशान्येला जाऊन ते मिथिलेला पोंचले ( १।५०।१ ). रामलक्ष्मणांचा रामायणांतील प्रवासक्रम असा आहे. विश्वामित्रांचे सिद्धाश्रमाकडे यावयाचें असल्यामुळें हा रामाचा प्रवास जरा लांबला आहे. मिथिलेहून जनकाकडून राजा दशरथाकडे बोलावण्याकरितां म्हणून दूत गेले, ते वाटेंत तीन दिवस मुक्काम करून चौथे दिवशीं पोंचले ( १।६८। ११ ). ते दूत पायीं गेले नसून वाहनांवरून गेले आणि रामाचा सर्व प्रवास पायीं होता.

यांतील गंगा, सरयू व शोण या नद्यांचीं स्थानें निश्चित आहेत. मात्र या शोण व गंगा यांचा संगम सांप्रत जेथें होतो तेथें पूर्वी नसून तो त्याचे पुढें पाटणाजवळ होता. मिथिलेकडे जातेवेळीं शोण त्यांना वाटेंत लागला. प्रथमचा प्रवास दक्षिणेकडे व नंतरचा उत्तरेकडे होता. प्रथम शोण लागल्याचें रामायणांत लिहिलें नाहीं, मिथिलेकडे जातांना तो लागल्याचें लिहिलें आहे. यावरून संगमाचे पुढें ते गंगापार झाले असावे. गंगेच्या दक्षिणेकडे ताटकावन व थोड्या अंतरावर विश्वामित्रांचा सिद्धाश्रम हीं दोन्ही वरील वर्णनांत स्पष्ट आहेत. या आश्रमांत पूर्वी विष्णूनें तपश्चर्या केली व त्याला सिद्धता प्राप्त झाली आणि म्हणून याला सिद्धाश्रम म्हणत असल्याचें विश्वामित्रांनीं रामाला सांगितलें आहे. (१।२९।४) विष्णु तप करीत असतां बलीनें सर्व देवांना जिंकून आपली सत्ता स्थापित केली व म्हणून विष्णूनें वामनावतार घेतला व बलीजवळ त्रिपाद भूमि मागून सर्व पृथ्वी पादाक्रांत केली. सध्यां शहाबाद जिल्ह्यांत बक्सार येथें वामनाची जन्मभूमि दाखवितात व तेथें मोठी यात्रा प्रतिवर्षी भाद्रपद मासीं भरते. बक्सारचे पश्चिमेला पूर्वीचा सिद्धाश्रम म्हणून दाखवितात

व हें वरील वर्णनाशीं जुळत आहे. मिथिलेकडे जातेवेळीं गंगापार झाल्यावर त्यांना विशाला नगरी लागल्याचें लिहिलें आहे. ह्युएन् यानें पाटणाचे उत्तरेला वीस मैलांवर वैशाली नगरी सांगितली आहे. विशाला याचा वैशाली हा अपभ्रंश होय. सध्यां येथें एक पडका किल्ला असून त्याला राजा विशालका कोट असें म्हणतात. मुजफरपूर जिल्ह्यांत हाजीपुरापासून सुमारें अठरा मैलांवर वेसार म्हणून एक गांव आहे. हीच पूर्वींची विशाला नगरी असें वरील अंतरें पाहतां दिसून येतें. विशालानगरीहून रामलक्ष्मण दुसरे दिवशीं गौतमाश्रमीं गेले. व तेथून मिथिला ईशान्येला होती. सांप्रत मिथारी प्रांतांत जनकपूर म्हणून गांव आहे, ही पूर्वींची मिथिला असें तेथील लोक सांगतात. सध्यां ज्याला तिरहूत म्हणतात तो पूर्वींचा विदेह होय. हा देश हिमालय व गंगा यांमध्यें असून त्याचे पूर्वेला कौशिकी (कुशी) नदी व पश्चिमेला गंडकी नदी येते. जनकपुरापासून सुमारें सहा मैलांवर धेनुका म्हणून एक स्थान असून येथें रामानें शिवधनुष्याचा भंग केला असें सांगतात. सध्यां येथें जंगल आहे. जनकपुराचे नैर्ऋत्येला अहिरी म्हणून एक खेडें आहे. त्यांत अहल्यास्थान दाखवितात व तेथें अहल्येचा उद्धार झाला असें सांगतात. हा पूर्वींचा गौतमाश्रम होय.

## ९. गिरिव्रज अथवा राजगृह.

भरताचा मातामह राजा अश्वपति याची ही राजधानी. भरताचा मातुल युधाजित् दशरथादि मंडळी रामादिकांचे विवाहाकरितां मिथिलेला गेल्यावर भेटण्याकरितां म्हणून अयोध्येला आला व तेथें हा वृत्तांत कळल्यावर मिथिलेकडे परभारें गेला. विवाहानंतर तो अयोध्येंत कांहीं काल होता व मग भरताला घेऊन तो आपल्या पित्याकडे गेला. दशरथ मरण पावल्यावर भरताला आणण्याकरितां अयोध्येंतून दूत गेले ते गिरिव्रजाला जाऊन पोंचले. (२।६८।२१) असें प्रथम लिहिलें असून पुढील सर्गांत ( २।७०।१ ) राजगृहपुरीं प्रवेश केल्याचें वर्णन आहे. यावरून या दोन नांवांनीं हें एकच नगर विवक्षित असल्याचें दिसतें. दूत पश्चिमाभिमुख गेल्याचें ( २।६८।११ ) लिहिलें असून भरत अयोध्येला निघाला त्याच्या प्रवासवर्णनांत तो पराङ्मुख होऊन निघाल्याचें वर्णन आहे. ( २।७१।१ ) एतावता दोनहि सुसंगत आहेत. भरताला

मार्गांत सुदामा, ल्हादिनी, शतद्रू या नद्या; ऐलधान, अमरपर्वत, शिलानदी; आग्नेयीला शल्यकर्षण, शिलावहा नदी, चैत्ररथ वन, सरस्वती, गंगा, वीरमत्स्य; उत्तरेस भारुंडवन, कुलिंगा, यमुना, अंशुधान, गंगा, प्राग्वट, गंगा, कुटिकोष्टिका, धर्मवर्धन, तोरण; दक्षिणेला जंबूप्रस्थ, वरूथ; पूर्वेकडे उज्जिहान, सर्वतीर्थ, उत्तरगा नदी, हस्तिपृष्ठक, कुटिका नदी, कपीवती–स्थानुमती–गोमती या नद्या; कलिंग नगरींतील सालवन इतकीं स्थलें, वगैरे लागल्याचें वर्णन आहे. ( २।७१ ) रथांत बसून त्यानें हा प्रवास केला व त्याला दिवस सात लागले. ( २।७२।८ ) मार्गांतील कित्येक गांव व नद्या यांचीं सध्यांचीं नांवें कळण्यास मार्ग नाहीं. अयोध्येजवळ गोमती व राजगृहाजवळ शतद्रू या दोन नद्या सांगितल्या आहेत व त्या नांवांवरून ओळखितां येतात. मध्यंतरीं सरस्वती आणि गंगा ( युग्मेन प्रतिपद्य, २।७१।५ ) एकदम उतरून गेल्याचें लिहिलें आहे, त्याची संगति लागत नाहीं. दोनहि नद्या हिमालयांतून निघून एक पूर्वेकडे व दुसरी पश्चिमेकडे अशा दोन भिन्न बाजूंनीं दक्षिणेस गेल्या आहेत. येथें टीकाकारांनीं दोन नद्यांचा संगम असा अर्थ केला आहे. पण तो तर संभवनीय नाहीं. असो. शतद्रूजवळ राजगृह असल्याचें रामायणावरून आपणांस कळलें आहे व त्या धोरणानें शोध करणें अवश्य आहे. पंजाबांत विपाशा ( बिआस ) नदीचे उत्तरतीरावर राजगिरी म्हणून गांव असून तेंच पूर्वींचें राजगृह होय, असें यावरून वाटतें. सेंट मार्टिन यानें कैकयाधिपतीची राजधानी हीच ठरविली आहे.

## १० भरद्वाजाश्रम.

राम वनवासाकरितां गंगायमुनासंगमा–प्रयागा–जवळ भरद्वाजाश्रमीं गेल्याचें रामायणांत वर्णन आहे. सध्यां कलोनलगंज येथें भरद्वाजाश्रम म्हणून एक स्थान असून तेथें एका मंदिरांत ऋषींची मूर्ति आहे.

## ११ द्रविड.

दशरथाचे मांडलिक म्हणून जे देश सांगितले आहेत त्यांत द्रविड देशाचें नांव आहे. ह्युएन हा येथें आला त्या वेळीं तो याच नांवानें प्रसिद्ध होता. त्यानें या प्रांताचा घेर १००० मैल असल्याचें लिहिलें आहे. कावेरी व कृष्णा

या दोन नद्यांमधील प्रदेश हा द्रविड देश होय. विंध्याचे दक्षिणेकडे हिंदुस्थानचे पश्चिम बाजूनें वस्ती नसून मधूनमधून ऋषींचे आश्रम असत; तथापि पूर्वेच्या बाजूनें वस्ती असल्याचें रामायणावरून दिसून येत असल्याचें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. तेव्हां विंध्याद्रीचे दक्षिणेला मुळींच वस्ती नव्हती अशी समजूत करून घेऊन वरील द्रविड देश ज्यांत सांगितला आहे तो श्लोक प्रक्षिप्त मानण्याचें अथवा तो देश अन्यत्र शोधण्याचें कारण नाहीं. या देशाच्या वरील सीमा रामायणकालीं भिन्न असूं शकतील, तथापि या देशाचें स्थूलदृष्ट्या स्थान अन्यत्र नाहीं, एवढें ह्युएननें दिलेल्या माहितीवरून अनुमानितां येतें भारत व बृहत्संहिता यांत या देशाचा उल्लेख आहे.

## १२ सिंधु.

सिंधुनदाचे जवळचा प्रदेश त्याच नांवानें प्रसिद्ध होता. सध्यां त्याला आपण सिंधप्रांत म्हणतों. सिंध हा सिंधूचा अपभ्रंश होय. रामायणकालच्या या प्रांताच्या सीमा कळण्यास मार्ग नाहीं. ह्युएननें वर्णन दिलें आहे त्यावरून त्यांत राजपुताना, काठेवाड, कच्छसुद्धां सर्व प्रदेशाचा समावेश होतो असें दिसतें. रामायणकालचा प्रांत मात्र एवढा नसावा असें वाटतें. येथील अधिपति दशरथाचा मांडलिक होता.

## १३ सौवीर.

डॉ. कनिंगहॅम यानें गुजराथेंतील ईदर हें पूर्वीच्या सौवीर प्रांतांतील असें ठरविलें आहे. बुद्धाचे वेळीं याला वडारी असें नांव होतें. सिंधु व वितस्ता यांमधील प्रदेश हा पूर्वीचा सौवीर असावा असें कित्येकांचें मत आहे. रामायण-कालचा सौवीर दशरथाचे सार्वभौमसत्तेखालीं होता, एवढें रामायणावरून कळतें. त्याच्या सीमा कळण्यास मार्ग नाहीं.

## १४ सुराष्ट्र.

सध्यांचें काठेवाड हें पूर्वीचें सुराष्ट्र होय. ह्युएन यानें त्याचें नांव सुराट असें दिलें आहे; अर्थात् हा सुराष्ट्र याचा अपभ्रंश होय.

## १५ दक्षिणापथ.

रामायणकालीं दाक्षिणापथांत केवढा प्रदेश येत होता, हें कळण्यास कांहीं

साधन नाहीं. नर्मदेपासून दक्षिणेकडील सर्व प्रदेश दक्षिणापथ या नांवानें ओळखिला जात असे, असें कित्येकांचें मत आहे. दंडकारण्य हाच दक्षिणापथ असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु हीं सर्व मतें रामायणकालाशीं जुळणारीं नाहींत. महाभारतांत सहदेवाचे दिग्विजयांत पांड्यराजाला जिंकून तो दक्षिणपथाला गेल्याचें सांगितलें आहे; यावरून भारतकालीं दक्षिणापथ म्हणून कोणता तरी मर्यादित प्रदेश होता, हें निर्विवाद आहे. द्रविड देशाविषयीं वर अनुमानानें मर्यादा सांगितल्या आहेत व त्या धोरणानें दक्षिणपथाची दक्षिणेकडील मर्यादा कृष्णा नदी असावी अशी कल्पना होते. इतर मर्यादा अनुमानितां येण्यासारख्या नाहींत; तथापि स्थूलमानानें दक्षिणापथ म्हणजे नर्मदा व कृष्णा या दोन नद्यांमधील पण अगदीं पूर्वेकडील भाग असावा, असें सांगतां येतें.

### १६ वंग.

सध्यां ज्याला आपण बंगाल म्हणतों तो पूर्वींचा वंग होय. मात्र सांप्रत बंगाल प्रांताचा जो विस्तार मानितात, तो रामायणकालीं नसून त्याहून मर्यादित असावा, असें वाटतें.

### १७ अंग.

बालकांडांत अंगदेशाधिपति रोमपादाचा उल्लेख आला आहे (हा भाग प्रक्षिप्त आहे.) व तेथील वर्णनावरून कोसलप्रांतापासून हा प्रांत जवळ असावा, असें वाटतें. चंपा ही या प्रांताची राजधानी असून तिचेंच सध्यां भागलपूर असें नांव आहे. ही कौशिकी व गंगा यांचे संगमावर आहे. विश्वामित्राबरोबर मखरक्षणार्थ रामलक्ष्मण गेले ते या संगमाजवळून गेले. येथें मदनाचा कामाश्रम होता व त्यानिमित्त विश्वामित्रांनीं रामाला त्याची कथा सांगितली. त्यांत मदनानें येथें अंगाचा त्याग केला म्हणून याला अंग असें नांव पडल्याचें वर्णन आहे. (१।२३।१४) येथून उत्तरेकडे गेल्यावर ते मिथिलेला पोंचले. यावरून विदेहाचे दक्षिणेकडे भागीरथीला लागून असलेला कौशिकी व भागीरथी यांचे संगमाजवळचा प्रदेश हा अंगदेश होय, असें दिसतें.

### १८ मगध.

सध्यांचे बहार प्रांताला पूर्वीं मगध हें नांव होतें, हें प्रसिद्ध आहे. गौतम-

बुद्धाचा प्रथमचा काल या प्रांतांत फार गेल्यामुळें तेथें बौद्धधर्माचीं पवित्र स्थानें फार असून बौद्धवाङ्मयांत त्यांविषयीं वर्णनें आहेत. भारतकालीं जरासंधाचें राज्य तेथें होतें म्हणून प्रसिद्ध आहे. ग्रीक ग्रंथकारांनीं यांतील मोठें नगर पाटलिपुत्र ( सध्यांचें पाटणा ) याचे वैभवाचें वर्णन फार केलें आहे.

## १९. मत्स्य.

पांडव अज्ञातवासाचे वेळीं या देशांत राजा विराटाकडे होते हें प्रसिद्ध आहे. या देशाची जुनी राजधानी मथुरेच्या पश्चिमेला ८३॥ मैलांवर असल्याचें ह्युएननें लिहिलें आहे. सध्यां तेथें वैराट म्हणून गांव आहे. हीच पूर्वीची राजधानी असावी. विराटाची नगरी म्हणून वैराट नांव पडलें. हें गांव अलवार संस्थानांत आहे. यावरून जयपुराजवळचा प्रदेश म्हणजे पूर्वीचा मत्स्यदेश होय. मच्छेरी म्हणून गांव सध्यां अलवार संस्थानांत आहे. हा मत्स्य शब्दाचा अपभ्रंश होय.

## २० काशिकोसल.

या नांवाचा स्वतंत्र देश कोठें सांगितलेला नाहीं. रामायणांतील उल्लेखावरून काशीक्षेत्राजवळचा कोसल देश या नांवानें मोडत असावा अशी कल्पना आहे व ती या संयुक्तनांवावरून झाली आहे.

## २१ कांनोज.

कांनोज म्हणजे सध्यांचें अफगाणिस्थान होय. हा देश घोड्यांकरितां प्रसिद्ध होता, असें दिसतें. येथील उत्तम घोड्यांचा संग्रह दशरथाकडे होता असें रामायणांत सांगितलें आहे. ह्युएन यानें याचें नांव कौफू असें दिलें आहे.

## २२ बाल्हीक.

केकयाचे उत्तरेकडील देशास पूर्वी बाल्हीक म्हणत असत. येथील घोडे फार प्रसिद्ध होते. रामायणांत दशरथाकडे किती जातीचे घोडे होते हें सांगण्याचे निमित्तानें याचा उल्लेख आला आहे.

## २३ पंचवटी.

पंचवटी म्हणजे रावणानें जेथून सीतेचा अपहार केला तें स्थान. येथें राम, लक्ष्मण व सीता हीं पर्णकुटी बांधून राहिलीं होतीं. याच स्थलीं शूर्पणखेनें

येऊन रामाशीं विवाह करण्याची आपली इच्छा प्रकट केली व त्यानिमित्त लक्ष्मणानें तिचें नाक व कान कापले; यामुळें पुढें खरादिकांशीं रामाचें युद्ध झालें. या युद्धांत खरादींचा विध्वंस होऊन शूर्पणखेनें रावणाकडून सीतेचा अपहार करविला. अशा प्रकारें रामायणांतील मुख्य कथा येथें घडली असल्यामुळें या स्थानाला महत्त्व आलें आहे. गोदातटीं नाशिकजवळ हें स्थान असल्याचा लोकप्रवाद आहे. शूर्पणखेचा नासिकाच्छेद ज्या स्थानीं झाला त्याला त्यानिमित्त नाशिक असें नांव पडलें अशी लोकांत समजूत आहे. लोकांतील ही समजूत खरी आहे का खोटी आहे, हें ठरविण्याचें काम थोडें कठिण आहे. लौकिकपरंपरेवर विश्वास ठेवून चालावयाचें तर ती अविच्छिन्न चालत आली आहे किंवा कसें, हें प्रथम निश्चित करणें अवश्य आहे. पण हा निश्चय करण्यासारखें ऐतिहासिक साधन नाहीं. रामाची वंशपरंपरा भारतीय युद्धापर्यंत चालू होती; व यापुढें रामायणांतील कथा, त्यांतील कित्येक भाग अलौकिक वाटला तरी, तो इतिहास आहे हें आपणांस ठरवितां आलें. रामवंशांतील पुरुष तोंपर्यंत अयोध्येच्या सिंहासनावर बसून राज्यकारभार पाहात असत; व यामुळें अयोध्या हें स्थान तोंपर्यंत लोकांना माहीत होतें; व पुढील इतिहास त्रुटित असला तरी लौकिक परंपरेची सत्यता सिद्ध करण्यापुरता उपलब्ध आहे. यासाठीं त्या स्थानाविषयीं निश्चय करण्यास अडचण वाटत नाहीं. पंचवटीचा रामकथेशीं संबंध पाहिला तर राम कांहीं काल तेथें होते व तेथून रावणानें सीतेचा अपहार केला एवढयापुरता आहे. अशा रीतीनें या स्थानाविषयीं लौकिक प्रवाद अविच्छिन्न चालत आला आहे असें निश्चयानें सांगण्यास ऐतिहासिक साधन नाहीं. या कामीं रामायणांतील वर्णन हें काय तें मुख्य साधन आहे. रामायणानंतरचे ग्रंथांतील उल्लेख हे त्याहून गौण होत. कारण ते लेखकानें शोधपूर्वक केले आहेत का लौकिक परंपरेला धरून केले आहेत, हें कळण्यास मार्ग नाहीं. कित्येक वेळां असे उल्लेख निर्णयाचे कामीं उपयुक्त न होतां घोंटाळा मात्र करितात. तेव्हां रामायणांतील वर्णनाकडे प्रथम वळूं.

कोणत्याहि प्राचीन वर्णनाविषयीं निर्णय करावयाचा म्हणजे कांहीं निरपवाद निश्चित स्थानें शोधून त्यांचा आश्रय करावा लागतो; आणि तदनुरोधानें

पुढील मार्ग आंखावयाचा असतो. गांवें आणि नगरें यांचीं नांवें व सीमा कालांतरानें बदलतात, तथापि नदी, पर्वत व समुद्र यांना कधीं फारसा बाध येत नाहीं. यासाठीं इष्टस्थानांचे निर्णयाचे कामीं उपयुक्त अशा नद्यादींचा निश्चय करणें अवश्य आहे. रामानें अरण्यांत आल्यावर प्रयागाजवळ भरद्वाज मुनींचे आश्रमीं राहून पुढें चित्रकूट पर्वतावर कांहीं काल मुक्काम केला. हीं दोन स्थानें अद्यापि आहेत व तीं त्याच नांवांनीं प्रसिद्ध आहेत. भरद्वाजाश्रमीं उतरल्यावर अयोध्येंतील प्रजानन, तेथून आश्रम जवळ ( २।५४।२४ ) असल्यामुळें वारंवार आपल्या दर्शनाकरितां येतील, यासाठीं रामानें तेथें राहण्याचें नाकारिलें व भरद्वाज ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें तेथून दहा कोसांवर ( २।५४।२८ ) असलेल्या चित्रकूटावर तो राहण्यास गेला. रामाला परत नेण्याकरितां म्हणून भरत आपल्या परिवारासह अरण्यांत आला. त्याची व रामाची गांठ या पर्वतावर पडली. हा पर्वत याच नांवानें अद्यापि प्रसिद्ध आहे व तो प्रयागापासून दक्षिणेकडे आहे. येथें कांहीं काल राहिल्यावर राम अत्रि ऋषींच्या आश्रमीं गेला व तेथून पुढें त्यानें दण्डकारण्यांत प्रवेश केला. ( ३।१।१ ) मध्यंतरीं एके स्थलीं कित्येक ऋषींची वसाहत होती तेथें एक दिवस राहून, पुढें निघाल्यावर वाटेंत त्यानें विराधाचा वध केला. नंतर शरभंग व सुतीक्ष्ण यांच्या आश्रमीं जाऊन त्यांच्या स्वागताचा स्वीकार केला व तेथून पुढें दण्डकारण्यांतील निरनिराळ्या ऋषींच्या आश्रमांत त्यानें दहा वर्षे काढिलीं व पुनः तो सुतीक्ष्ण ऋषींचे आश्रमीं आला. तेथून तो अगस्त्य ऋषींचे आश्रमीं गेला व त्यांनीं सांगितल्याप्रमाणें तेथून पुढें जाऊन पंचवटींत पर्णकुटिका बांधून तेथें राहिला. चित्रकूटापासून सुतीक्ष्णाश्रम कोठें होता व तेथून पंचवटी किती अंतरावर होती हें आपणांस पहावयाचें आहे. मधील अंतराविषयीं स्पष्ट उल्लेख रामायणांत नाहीं. विराध राक्षसाचा वध रामानें जेथें केला, तेथून शरभंगऋषींचा आश्रम दीड योजनावर असल्याचें विराधानें मरणापूर्वी केलेल्या भाषणांत सांगितलें आहे. ( ३।४।२१ ) पुढें सुतीक्ष्णऋषींचे आश्रमीं जातांना मार्गांत मंदाकिनी नदी असल्याचें शरभंगाचें भाषणांत आलें आहे. ( ३।५।३६ ) ही मंदाकिनी नदी कोणती हें कळत नाहीं. सांप्रत चित्रकूटा-

जवळ मंदाकिनी म्हणून नदी आहे ती फार लहान आहे. शिवाय शरभंगऋषि दिवंगत झाल्यावर तेथील सर्व ऋषींचें एक मंडळ रामाकडे राक्षसांपासून होणाऱ्या पीडेपासून आपलें रक्षण करण्याची विनंति करण्याकरितां आलें. ( ३।६।१ ) या वेळीं ऋषींनीं " राक्षसांपासून ऋषींना किती पीडा होत आहे, हें प्रत्यक्ष पहावयाचें असेल तर अरण्यांत निरनिराळ्या आश्रमांतून ऋषींचीं पडलेलीं शरीरें अवलोकन करण्यास चल" असें सांगितलें. ऋषींचीं आश्रममंडलें त्या वेळीं कोठेंकोठें होतीं हें सांगतांना त्यांचे तोंडीं पुढील श्लोक आहे—

**पंपानदीनिवासानामनुमंदाकिनीमपि ।**
**चित्रकूटालयानां च क्रियते कदनं महत् ॥३।६।१७॥**

" पंपानदी, मंदाकिनी व चित्रकूट येथें वास करणाऱ्या ऋषींची या राक्षसांनीं कत्तल चालविली आहे."

मंदाकिनी व चित्रकूट यांचा येथें पृथक् निर्देश आहे. तेव्हां सांप्रत चित्रकूटाजवळ असलेली मंदाकिनी त्या वेळीं मोठी होती असें मानिलें तरी शरभंग व सुतीक्ष्ण या दोन ऋषींच्या आश्रमांचे मध्यें मार्गांत लागणारी म्हणून जिचें वर्णन वर आलें आहे ती ही नव्हे, हें उघड आहे. ही नदी सांप्रत कोठें आहे? व असल्यास तिला आतां नांव काय हें कळण्यास मार्ग* नाहीं. चित्रकूटापासून अत्रि

* सुतीक्ष्णाश्रमाजवळची मंदाकिनी कोणती हें न कळलें तरी येथें उल्लेखिलेली मंदाकिनी म्हणजे गोदावरी नदी असावी असा आमचा तर्क आहे. सीतेला रावणानें पळविल्यानंतर रामानें सीता दिसेना असें पाहिलें, व ती गोदावरीवर गेली नसेल ना, अशी शंका येऊन त्यानें स्वतः नदीवर जाऊन तिचा शोध केला व परत आल्यावर तो लक्ष्मणाला म्हणतोः—

**एषा गोदावरी सौम्य किंचिन्न प्रतिभाषते ।**
**किन्तु लक्ष्मण वक्ष्यामि समेत्य जनकं वचः ॥३।९४।११॥**
**मन्ये दीर्घा भविष्यन्ति रात्रयो मम जाग्रतः ।**
**मंदाकिनीं जनस्थानमिमं प्रस्रवणं गिरिम् ॥१४॥**
**सर्वाण्यनुचरिष्यामि यदि सीता हि लक्ष्यते ॥**

" हे सौम्य लक्ष्मणा, ही गोदावरी कांहीं बोलत नाहीं. जनकराजाची गांठ पडल्यावर त्याला मी काय सांगूं बरें? आतां नीज न येतां रात्री मोठ्या होतील असें वाटतें. सीता

ऋषींचा आश्रम किती दूर होता अथवा किती वेळानें तो त्या आश्रमीं जाऊन पोंचला हें रामायणांत सांगितलेलें नाहीं. ( २।११७।५ ) तेथें तो एक दिवस राहिला, हें मात्र स्पष्ट लिहिलें आहे. (२।११९) येथून पुढें गेल्यावर त्यानें दंडकारण्यांत प्रवेश केला असें लिहिलें आहे. दंडकारण्यांत प्रवेश केल्यावर प्रथमच ऋषींचें एक आश्रममंडळ लागलें. तेथें एक दिवस राहून तो अरण्यांत पुढें गेला. हें आश्रममंडल दंडकारण्याचे प्रारंभींच होतें; (३।१।१) व येथून पुढें ऋषिजनांचीं आश्रममंडलें मधूनमधून असावींत असें दिसतें. शरभंगाकडून सुतीक्ष्णाकडे जाण्याचा मार्ग फार दूर होता व वाटेंत पुष्कळ उदक असलेल्या कित्येक नद्या उतरून गेल्यावर राम आश्रमीं पोंचला. (३।७।२) येथें मूळांत 'नदीस्तीर्त्वा बहूदकाः' असे शब्द आहेत. नद्या किती उतराव्या लागल्या याची संख्या येथें सांगितलेली नाहीं. तथापि बहुवचनावरून त्या तिहींपेक्षां कमी असणें संभवनीय नाहीं. अशा रीतीनें चित्रकूटापासून आश्रमापर्यंत मध्यंतरीं प्रदेश केवढा होता, हें कळण्यास मार्ग नाहीं. मध्यंतरीं रामानें तीन आश्रमांत मुक्काम केले आहेत. तथापि हे मुक्काम एक एक दिवसांचे मार्ग चालून क्रमानें करण्यांत आले, असें म्हणवत नाहीं. आश्रम आढळला तेव्हां रामानें तेथें मुक्काम केला असावा. मधील मुक्काम अरण्यांत आश्रमावांचून कोठेंतरी केले असल्यामुळें त्यांची नोंद रामायणांत केली नसावी असें वाटतें×

---

सांपडेल तर मंदाकिनी, जनस्थान व प्रस्रवण गिरि हीं सर्व मी हिंडून पाहीन." पंचवटीजवळ गोदावरी असून तिचा उल्लेख रामानें प्रथम केला आहे. त्यानें पुढील भाषणांत जनस्थान व प्रस्रवण गिरि यांबरोबर मंदाकिनीचा उल्लेख आहे. जनस्थानांत गोदावरी हीच प्रसिद्ध नदी दिसते; व येथील सहेव निर्देशावरून मंदाकिनीशब्दानें रामाला गोदावरीच अभिप्रेत असावी असें दिसतें.

× मिथिला व विशाला या नगरींचे स्थलनिर्णय करितांना कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपलें असेंच मत दिलें आहे. ते लिहितात "विशालनगर गंगेच्या उत्तरेस २० मैल व तेथून ८३ मैल जनकपूर.... . इतकी मजल दोन दिवसांत गेले कसे ही शंका येते. परंतु तिचें समाधान दोन रीतींनीं करितां येतें. अयोध्येहून शरयू व गंगा यांच्या संगमाचें अंतर १७० मैलांहून कमी नाहीं; आणि वाटेंत फक्त एक रात्र मुक्काम केल्याचा उल्लेख

अरण्यांत रहावयाचें व तेंहि आश्रमावांचून कोणत्या तरी वृक्षाच्या छायेंत रहावयाचें ही कल्पना चमत्कारिक वाटण्याचा संभव आहे; परंतु अरण्यवास त्यांनीं पत्करिला याहून यांत अधिक चमत्कार कोणता आहे? सुमंत्र परत गेल्यावर गंगानदी उतरून राम पलीकडे गेला तेव्हां त्या तिघांनीं एक रात्र एका वृक्षाखालीं काढिल्याचें रामायणांत स्पष्ट लिहिलें आहे. (२।५३।१)

या वेळीं रामानें लक्ष्मणाला "आजपासून आपल्याला सावध राहून रात्रीं जागलें पाहिजे; कारण हे लक्ष्मणा, सीतेचा योगक्षेम आम्हांवर अवलंबून आहे" (२।५३।३) असें सांगितलें. वनवासांतील असल्या पुढील प्रसंगांविषयींची लक्ष्मणाला व त्याबरोबर रामायणाचे वाचकांना ही सूचनाच आहे. हा प्रसंग प्रथमचा म्हणून तो येथें सांगितला आहे व पुढील प्रसंग त्यावरून अनुमानावयाचे आहेत.

सुतीक्ष्णाश्रमापासून अगस्त्याश्रम किती दूर अंतरावर होता हें रामायणांत स्पष्ट सांगितलें आहे. अगस्त्य ऋषींचा आश्रम कोठें आहे असें विचारल्यावरून सुतीक्ष्णानें रामाला तिकडे जाण्याचा मार्ग सांगितला. त्यांत तेथून चार योजनांवर अगस्त्यऋषींचे बंधूचा आश्रम असून त्यापुढें एक योजनावर अगस्त्यांचा आश्रम असल्याचें वर्णन केलें आहे. अर्थात् या दोन आश्रमांमधील अंतर पांच योजनें इतकें आहे. अगस्त्याश्रमापासून दोन योजनांवर पंचवटी असल्याचें अगस्त्यांनीं रामाला पुढील माग सांगतांना म्हटलें आहे. पंचवटी कोठें होती हें ठरविण्यास तेथें गोदावरी नदीचा उल्लेख आहे, तो महत्त्वाचा आहे. ही नदी म्हणजे नाशिकाजवळ असलेली प्रसिद्ध गोदावरी नदी होय, हें उघड आहे. अगस्त्यऋषींनीं आपल्या आश्रमापासून पुढें दक्षिणेकडे गोदावरी नदी सांगितली आहे. त्यापक्षीं त्यांचा आश्रम नदीशीं नव्हे—नदीचे उत्तरतीरीं—असला पाहिजे. अगस्त्यऋषींनीं महत्त्वाचीं कार्यें त्या वेळीं दोन केलीं, व या निमित्त त्यांचा लौकिक पसरला होता. विंध्यपर्वत वाढूं लागला तो इतका

---

आहे. तेव्हा कांहीं मुक्काम सांगितले नाहींत असें दिसतें. सरयूसंगमापासून आश्रमास जातांना शोण उतरल्याचा उल्लेख नाहीं......यांहि गोष्टीवरून कांहीं मुक्काम सांगितले नाहींत या म्हणण्यास बळकटी येते." भारतवर्षीय भूवर्णन-पृष्ठ २१०-११.

वादळा कीं, सूर्याचा मार्ग त्यानें बंद केला. अगस्त्यऋषि त्या वेळीं सर्व देवांच्या प्रार्थनेवरून तेथें आले व त्यांचें स्वागत करण्याकरितां विंध्यपर्वतानें त्यांना नमस्कार घातला. त्याच्या प्रणामाचा स्वीकार करून अगस्त्यऋषि पुढें गेले व जातांना त्यांनीं विंध्याला आपण परत येईपर्यंत तसाच पडून राहण्यास सांगितलें. अगस्त्यऋषि दाक्षिणेकडे गेले ते तेथेंच आश्रम बांधून राहिले व त्यांची वाट पहात विंध्य तसाच पडून राहिला. ऋषि मागाहून परत आले नाहींत व विंध्यानें वर डोकें केलें नाहीं. अगस्त्यऋषींचा आश्रम कोठें होता हें आतां आम्ही शोधीत आहों. पण विंध्याचल त्यांच्या कथेची साक्ष देत तसाच पडून राहिला आहे. या पौराणिक कथेचा अर्थ विंध्याचल ओलांडून अगस्त्यऋषि दाक्षिणेकडे गेले व तेथें त्यांनीं वसाहत केली असा आहे. तोंपर्यंत दाक्षिणेकडील प्रदेश सर्वथा अज्ञात होता असें नव्हे, पण तेथें वस्ती नव्हती. सुतीक्ष्णाश्रमापासून राम निघाला तो दोन दिवशीं अगस्त्याश्रमीं गेला. परंतु दण्डकारण्यांतील आश्रममंडलांत दहा वर्षे प्रवास करूनहि रामाला दोन दिवसांच्या वाटेवर असलेल्या अगस्त्याश्रमाकडे कोणत्या मार्गानें जावें हें सुतीक्ष्णमुनींना विचारावें लागलें. दाक्षिणेकडील वस्ती त्या वेळीं किती विरल व परस्परांशीं विलग होती, हें यावरून उघड होतें. दाक्षिणेकडे येण्याला मुख्य अडचण विंध्याचलाची होती. आर्यावर्ताची स्थलसीमा अमरसिंहानें विंध्य व हिमालय यांमधील प्रदेश अशी दिली आहे.

आर्यावर्तः पुण्यभूमिर्मध्यं विंध्यहिमालयोः ।

ही व्याख्या प्राचीनकाळीं प्रचलित असलेली त्यानें कोशांत संगृहीत केली आहे. आर्यांची वस्ती या प्रदेशांत मात्र प्राचीन काळीं होती, हें या व्याख्येंत ध्वनित होत आहे. विंध्याच्या समीपभागीं रामानें आपला पुत्र कुश याकरितां कुशावती नगरीची स्थापना केली असें रामायणांत सांगितलें आहे. (७।१०८।४) नगरीची स्थापना केली ह्मणजे कोणत्या तरी प्रदेशांत असलेली वस्ती मुळशी पेट्यांतल्या प्रमाणें उडवून तेथें आणिली असें नव्हे, तर आपल्या मागें राज्याची व्यवस्था चांगली रहावी या हेतूनें त्यानें त्याचे दोन विभाग केले व त्यांवर दोघां राजपुत्रांची योजना केली. त्यांपैकीं एका विभागाचें

आधिपत्य कुशाकडे दिलें व राजधानीला त्याचें नांव दिलें. म्हणजे विंध्याचलाचे उत्तरभागीं वस्ती होती, हें उघड आहे. विंध्याचलाचे दक्षिणेकडे वस्ती नव्हती व येथूनच दंडकारण्याला प्रारंभ झाला आह. उत्तरकांडांत दंडकारण्यासंबंधानें एक कथा असून तींत इक्ष्वाकूचा पुत्र दंड तेथें राज्य करीत होता व यानें आपले गुरु भृगु यांची कन्या अरजा हिजवर बलात्कार केल्यामुळें त्या ऋषींनीं तो सर्व प्रदेश भस्मसात होईल व त्यांत कोणी वस्ती करणार नाहीं, असा शाप दिला असें सांगितलें आहे. (७।८० व ८१) हा प्रदेश विंध्य व शैवल यांचे मध्यभागीं असून तोच पुढें दंडकारण्य म्हणून प्रसिद्ध झाला असें तेथें वर्णन केलें आहे. ही सर्व कथा इतर आनुषंगिक आख्यानांसह प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. मूळ रामायणांतील प्रमाणाइतकें या भागाचें महत्त्व नाहीं, हें खरें; तथापि प्राचीन कथा लौकिक परंपरेनें प्रचलित असलेली तींत ग्रथित केली आहे व या दृष्टीनें तिचा येथें निर्देश केला आहे. हरिवंशामध्यें मनूचा पुत्र सुद्युम्न, त्याचा पुत्र गय व त्याचा कनिष्ठ पुत्र दंड म्हणून सांगितला असून त्यानें दंडकारण्याची स्थापना केली, असें सांगितलें आहे.

**यश्चकार महात्मा वै दण्डकारण्यमुत्तमम् ।**
**वनं तल्लोकविख्यातं तापसानामनुत्तमम् ॥१।१०।२५॥**
**तत्र प्रविष्टमात्रस्तु नरः पापात् प्रमुच्यते ॥**

"याच महात्म्या दंड राजानें लोकप्रसिद्ध व तपस्विजनांना श्रेष्ठ वाटत असलेल्या दण्डक अरण्याची स्थापना केली. या वनांत प्रवेश करितांच मनुष्य पापापासून मुक्त होतो."

या दोन कथा वास्तविक अगदीं एकमेकींविरुद्ध आहेत. दंडकारण्यांत पूर्वी वस्ती असून मग ती उठली असें रामायणांतील कथा सांगते, तर दंडराजानें या अरण्याची स्थापना केली असें हरिवंश म्हणतो. मात्र रामायणांतील कथेंत या अरण्यांत तपस्वी रहात असल्यामुळें यालाच जनस्थान असें नांव प्राप्त झालें, असें सांगितलें आहे. (७।८१।२०) व या दृष्टीनें दोन कथांची संगति लावितां येईल. अरण्याची स्थापना करण्याला कोणी राजा पाहिजे असें नाहीं; तें कार्य सृष्टि स्वतां करिते. प्रदेश मनुष्यवस्तीला योग्य—सुरक्षित—करणें हें काम राजाचें आहे;

आणि या कार्याला प्रारंभ फार प्राचीनकालीं झाला असें या दोन कथांवरून अनुमानितां येतें. हा प्रदेश दंड नामक राजानें असो वा कोणत्या तरी राजाचे दंडानें असो, सुरक्षित झाला व त्यांत तपस्वी प्राचीनकालीं रहात होते हें निर्विवाद आहे. ही परंपरा अखंड चालू राहिली असती तर अगस्त्य मुनींना कामगिरी राहिली नसती. परंतु हा प्रदेश मध्यंतरीं असलेल्या विंध्याद्रीमुळें दुर्गम व राक्षसांच्या उपद्रवामुळें वस्तीला अयोग्य होता व याकरितां ही परंपरा मध्यें त्रुटित झाली. या परंपरेचे अगस्त्य हे पुनःप्रवर्तक होत. हा प्रदेश विंध्य व शैवल यांचे मध्यभागीं असल्याचें रामायणांत सांगितलें आहे. (७।७९।१६) ही दंडकारण्याची प्राचीन कालची मर्यादा होय. कारण अगस्त्यमुनींचा आश्रम या प्रदेशाच्या पलीकडे दक्षिणभागीं होता. अगस्त्याश्रमापासून पंचवटी दोन योजनांवर असून तिचे समीप गोदावरी नदी होती, असें रामायणांत सांगितलें आहे; व या वर्णनाची संगति राखावयाची म्हणजे दंडकारण्याची मर्यादा मागाहून वाढत चालली असें मानणें भाग आहे. सांप्रत मुंबईसारख्या मोठ्या नगरीची वस्ती वाढत चालली म्हणजे तो तो प्रदेश सोयीकरितां नांव वेगळें देऊनहि त्याच नगरींत समाविष्ट केला जातो, तोच प्रकार दंडकारण्याविषयीं होय. सर्व प्रदेश दुर्गम असल्यामुळें तो एका नांवानें ओळखिला जाणें साहजिक दिसतें. अगस्त्यऋषींचे वेळीं दंडकारण्याची मर्यादा ठरवावयाची तर विंध्यापासून दक्षिणेकडे गोदावरीपुढील कांहीं प्रदेश त्यांत समाविष्ट केला पाहिजे. दक्षिणेकडील ही मर्यादा ज्याप्रमाणें वाढली आहे, त्याप्रमाणें उत्तरेकडीलहि वाढली आहे. विंध्याद्रि ही दंडकारण्याची उत्तरेकडील सीमा असें आपण म्हणतों व यासाठीं त्याच्या नेटोप्यानें दक्षिणेकडील प्रदेशाचा मात्र आपण त्यांत समावेश करितों;पण विंध्याद्रीचे ईशान्येकडील कांहीं प्रदेशहि दंडकारण्यांत त्या वेळीं मोडत होता असें दिसतें. विश्वामित्रांच्या मखरक्षणार्थ राम ज्या आश्रमांत आले तो सिद्धाश्रम दंडकारण्यांत गणला जात असे. बालकांडांत याविषयीं उल्लेख नाहीं. पण मारीचाकडे रावण साहाय्य मागण्याकरितां गेल्यावेळीं त्यानें त्याला रामाचे सामर्थ्याविषयीं जे आपले अनुभव सांगितले, त्यांत हा इतिहास आला असून त्यानिमित्तानें तेथें असा उल्लेख सांपडतो. विश्वामित्र राजा दशरथाकडे राजपुत्रांना मागण्यास गेले तें वृत्त सांगून तो पुढें म्हणतोः--

इत्येवमुक्त्वा स मुनिस्तमादाय नृपात्मजम् ।
जगाम परमप्रीतो विश्वामित्रः स्वमाश्रमम् ॥३८।१२॥
तं तथा दंडकारण्ये यज्ञमुद्दिश्य दीक्षितम् ।
बभूवोपस्थितो रामश्चित्रं विस्फारयन् धनुः ॥१३॥

"याप्रमाणें (राजाला सांगितल्यावर) विश्वामित्र मुनि त्या राजपुत्राला घेऊन अत्यंत आनंदित होऊन आपल्या आश्रमीं आले. नंतर दंडकारण्यामध्यें त्यांनीं यज्ञदीक्षा घेतली असतां राम आपलें अद्भुत धनुष्य लववीत त्यांचे समीप उभा राहिला." म्हणजे मनुष्यवस्ती राक्षसांचे उपद्रवामुळें उठत गेली तसतशी दंडकारण्याची मर्यादा वाढत गेली. दक्षिणेकडील पुढच्या पुढच्या प्रदेशांशीं तर संबंध याहूनहि कमी, यामुळें पुढील बराच प्रदेश दंडकारण्य या नांवानें मोडूं लागला. दंडकारण्यांत वस्ती करण्याचें धाडस नंतरच्या कालांत अगस्त्य ऋषींनीं प्रथम केलें. विंध्याद्रीचे ईशान्येकडील प्रदेश जरी दंडकारण्यांत मोडत होता तरी त्या बाजूला विश्वामित्रांचा आश्रम होता. यावरून तो प्रदेश त्या वेळीं फार दुर्गम वाटत नव्हता असें दिसतें. विन्ध्याद्रीच्या दक्षिणेकडील प्रदेशांत मात्र त्या पर्वतानिमित्त व राक्षसांचे उपद्रवानिमित्त प्रायः कोणी जात नसे आणि यासाठीं अगस्त्यांनीं विंध्याद्रीची मर्यादा ओलांडली म्हणून त्यांची त्या वेळीं विशेष प्रशंसा होऊं लागली.

अगस्त्यऋषींनीं दुर्गम विंध्याचल पादाक्रांत केला एवढ्यानें त्याचे कार्याची पूर्तता होत नसून पुढील दंडकारण्यांतील ज्या प्रदेशांत त्यांनीं स्वतांचे आश्रमाची स्थापना केली तो प्रदेश त्यांनीं तपस्वी जनांना निर्भय करून ठेविला होता. त्यांच्या या कार्याचें आश्रमासमीप आल्यावर रामानें आदरपूर्वक वर्णन केलें आहे. "ज्या अगस्त्य मुनींचे प्रभावामुळें राक्षस दक्षिण दिशेकडे नुसतें पाहतात,–आपला प्रदेश म्हणून उपभोग घेत नाहींत–त्यांचा हा आश्रम होय. दक्षिण दिशा ज्या वेळीं त्यांनीं आक्रमण केली त्या वेळेपासून निशाचर वैरभाव सोडून शांत राहिले आहेत. ह्या आश्रमामध्यें असत्य भाषण करणारा, क्रूर, लबाड, दुष्ट अथवा पापी जिवंत रहात नाहीं, असा ह्या मुनींचा प्रभाव आहे." (३।११।८३, ८४, ९१) अगस्त्य ऋषींचें मुख्य कार्य जें विंध्याक्रमण त्या

दृष्टीनें दंडकारण्याची मर्यादा आपण ठरविली पाहिजे व याकरितां विंध्यापासून त्याचे नेटोप्यानें दक्षिणेकडे असलेला गोदावरीपुढील कांहीं प्रदेशासह सर्व भाग त्या वेळीं दंडकारण्यांत मोडत होता असें मानणें भाग आहे. विंध्याचे पूर्व बाजूनें दक्षिणेकडे येण्याचा मार्ग दुर्गम नव्हता व याच मार्गानें येऊन रामानें दंडकारण्यांत प्रवेश केल्यामुळें मध्यंतरीं विंध्यपर्वत लागल्याचा उल्लेख रामायणांत आढळत नाहीं. दंडकारण्याची ही मर्यादा लक्षांत घेतली असतां सध्यां नाशिकाजवळ दाखविण्यांत येत असलेली पंचवटी हीच रामानें वास केलेली पंचवटी होय, असें उघड दिसून येतें.

## रा. रा. अभ्यंकर व पंचवटी.

पंचवटीचें स्थान निश्चित करण्याचे यापूर्वीं कित्येक विद्वानांनीं प्रयत्न केले असून त्यानिमित्त अयोध्येहून राम वनांत निघाल्यापासून पंचवटी येथें येईपर्यंतच्या त्याच्या प्रवासाविषयीं चर्चा केली आहे. या चर्चेला मुख्य आधार रामायणाचा असला तरी त्यावरून प्रत्येकानें वेगवेगळीं अनुमानें काढिलीं आहेत. रामाच्या प्रवासाविषयीं विचार करितांना मधील मुक्काम, दिवस इत्यादिकांविषयीं या सर्वांची एकवाक्यता नसली तरी मतभेद थोडा आहे, व यासाठीं त्यासंबंधानें एकदम चर्चा केल्यास अयुक्त होणार नाहीं. रामाचे प्रवासाविषयीं सविस्तर आणि सप्रमाण विवेचन रा. रा. महादेव गोविंद अभ्यंकर यांनीं आपल्या श्रीवाल्मीकिरामायणावरील निबंधांत केलें आहे. रामानें अरण्यांत प्रवेश केल्यावर पंचवटीपर्यंत व तेथून पंपेपर्यंत कसकसे मुक्काम केले व रामायणांत सांगितलेलें व अनुमानानें ठरविलेलें मधील अंतर किती असावें, हें त्यांनीं ठरविलें आहे आणि त्यांनीं केलेल्या विवेचनाचें येथें परीक्षण केल्यास रामाचे प्रवाससंबंधीं इतरांनीं जें विवेचन केलें आहे, त्याचें वेगळें परीक्षण करावयाचें कारण नाहीं. त्यांचें म्हणणें काय आहे, हें प्रथम त्यांचे शब्दांत सांगतों—"पहिले दिवशीं राम तमसातीरीं राहिले व दुसरे दिवशीं गंगातीरीं श्रृंगवेरपुराजवळ राहिले. हा प्रवास रामानें रथांतून केला ( २।४५–५३ ). तिसरे दिवशीं गंगा उतरून राम पायानें निघाले व एका झाडाखालीं निजले व चौथे दिवशीं प्रयागाजवळ भरद्वाजाश्रमीं राहिले ( २।५३–५४ ). पांचवे दिवशीं राम प्रयागाहून चित्र-

कूटास निघाले. हा पर्वत प्रयागाहून दहा कोस होता ( २।५४।२८ ). सहावे दिवशीं ते चित्रकूटास पोंचले. येथें रामास परत नेण्याकरितां भरत आला; परंतु राम परत न जातां पुढें निघाले. मग पहिले दिवशीं अत्रीचे, दुसरे दिवशीं दंडकारण्यांतील एका ऋषीचे, तिसरे दिवशीं विराधास मारून सहा कोसांवरील शरभंगाचे व नंतर सुतीक्ष्णाचे आश्रमीं गेले ( ३।४।२१ ). तेथून दहा वर्षे निरनिराळ्या ऋषींचे आश्रमांत राहून परत सुतीक्ष्णाश्रमीं आले. नंतर तेथून १६ कोसांवरील अगस्त्यांचे भावाचे आश्रमीं व दुसरे दिवशीं ४ कोसांवरील अगस्त्यांचे आश्रमीं व तिसरे दिवशीं ८ कोसांवर पंचवटींत पर्णकुटी करून राहिले ( ३।११–१५ ). रावणानें सीता हरण केल्यावर तीन कोसांवर क्रौंचारण्यांत ते गेले; तेथून तीन कोस जाऊन अयोमुखीचा वध केला. नंतर एक कोस जाऊन कबंधवध करून दुसरे दिवशीं शबरीचा उद्धार केला. रामाच्या या प्रवासांत मधील अंतरें सर्व सांगितलेलीं नाहींत. प्रयागापासून चित्रकूट १० कोस सांगितला आहे व सुतीक्ष्णाश्रमापासून पंचवटी २८ कोस सांगितली आहे. मधील प्रवास तीन दिवसांचा म्हणून अंतर ४८ कोसांहून अधिक होणार नाहीं. म्हणजे प्रयागापासून पंचवटी फार तर ८६ कोस अंतरावर येते. पंचवटीहून पंपेस दोन दिवशीं चालून गेले, म्हणून मधील अंतर अजमासें ३२ कोस होईल. एकंदरींत प्रयागापासून पंपा ९२ कोसांवर असली पाहिजे."

रा. रा. अभ्यंकर यांच्या प्रतिपादनाचें स्थूल स्वरूप याप्रमाणें आहे. आमचे मतें मधील अंतर ठरवितांना त्यांची थोडी भूल झाली आहे. चित्रकूटाहून राम निघाल्यानंतर जेथें जेथें त्यानें मुक्काम केल्याचें सांगितलें, तेथपर्यंत एक एक दिवसाचा प्रवास रामायणांत निर्देश नसतांहि त्यांनीं गृहीत धरिला आहे व या मुद्यावर त्यांची सर्व अनुमानपरंपरा अवलंबून आहे. सुतीक्ष्णाश्रमापासून पंचवटीपर्यंतचें अंतर रामायणांत स्पष्ट सांगितलें आहे व त्याविषयीं वाद नाहीं; पण चित्रकूटापासून सुतीक्ष्णाश्रमापर्यंत अंतर किती होतें, हें रामायणांत सांगितलेलें नाहीं. मध्यंतरीं तीन आश्रमांत रामानें मुक्काम केल्याचें वर्णन आहे व त्यावरून हा प्रवास रा. अभ्यंकर यांनीं ३ दिवसांचा मानिला आहे. पंचवटीपासून किष्किंधेपर्यंतचा प्रवास त्यांनीं २ दिवसांचा धरिला आहे. हा मार्ग किती विशाल व

विकट आहे, हें आम्हीं रामायणांतील अवतरणें देऊन पुढें किष्किंधेवरील विवेचनाचे प्रसंगीं दाखविणार आहों. रामाला कांहींतरी दिवस लागले असतील, हें कोणालाहि पटण्यासारखें आहे. चित्रकूटापासून सुतीक्ष्णाश्रमापर्यंतचा मार्ग कसा व केवढा होता, हें रामायणावरून वरीलप्रमाणें दाखवितां येत नाहीं; तथापि मार्गांतील अंतर थोडें असतां रामायणांत स्पष्ट सांगितलेलें असतें व तेंच फार असल्यास निर्देश मोघम केलेला असतो, एवढें अनुमान वरील दोन प्रकारच्या पद्धतींवरून होतें व म्हणून सुतीक्ष्णाश्रमापर्यंतचा प्रवास रा. अभ्यंकर मानितात तसा जवळचा वाटत नाहीं. मध्यंतरीं पुष्कळ नद्या रामाला उतरून जाव्या लागल्या, असें रामायणांत वर्णन आहे. ( ३।७।२ ) व तें आमच्या अनुमानास पोषकच आहे. चित्रकूटापासून विंध्याद्रीपर्यंत अंतर मोजलें तर तें सुमारें शंभर मैल येईल व रा. अभ्यंकर यांनीं चित्रकूटापासून किष्किंधेपर्यंतचें अंतरच तितकें ठरविलें आहे व यामुळें रामायणांतील पंचवटी व किष्किंधा विंध्याद्रीचे उत्तरेला असल्याचें त्यांचें मत दिसत आहे. विंध्याद्रीविषयींचें विवेचन पूर्वीं केलें आहे व त्यावरून अगस्त्यऋषींचा आश्रम विंध्याद्रीचे उत्तरेस असणें शक्य नाहीं हें दिसून येईल; आणि पंचवटी त्यापुढें दक्षिणेस असल्यामुळें रामायणांतील वर्णन व लोकप्रवादानुरूप सध्यां ठरलेली पंचवटी यांची संगति लागते. पंचवटी व गोदावरी हीं जवळजवळ असल्याचें रामायणांत सांगितलें आहे, तिकडे तर रा. अभ्यंकर यांनीं मुळींच लक्ष दिलें नाहीं. दुसरी गोदावरी कल्पून रामायणाची संगति लावतां येईल, पण तशी दुसरी गोदावरी सध्यां नाहीं व पूर्वीं होती असें म्हणण्यास प्रमाण नाहीं. रामाचे प्रवासाविषयींच्या या मोघम निर्देशाप्रमाणें सुग्रीवानें केलेलें भूगोलवर्णन हेंहि त्यांच्या अनुमानांतील घोंटाळा वाढविण्यास कारण झालें आहे. दक्षिणेकडे जाणाऱ्या वानरचमूला उद्देशून सुग्रीवानें जें भूगोलवर्णन केलें आहे, त्यांत त्यानें विंध्याद्रीचा उल्लेख केला आहे. रामाचे प्रवासाचे मुक्काम ठरवून चित्रकूटापासून किष्किंधेपर्यंत किती अंतर असावें याचें अनुमान त्यांनीं केलें व त्यावरून किष्किंधा विंध्याद्रीचे उत्तरेस येऊं लागली व सुग्रीवाचे या विधानानें त्यांचे अनुमानास पुष्टि मिळाली. याचा परिणाम लंकेचा शोध करण्याकरितां

दक्षिणेकडे न जातां त्यांना दुसऱ्या बाजूला जावें लागलें. विंध्याद्रीविषयीं मूळ रामायणांत कशी भूल झाली आहे व ती रामायणांतील अन्यत्र असलेल्या निर्देशांवरून कशी उघड होते, हें आम्हीं पुढें किष्किंधेवरील चर्चेत दाखविणार आहों. सुग्रीवाचें भूगोलवर्णन तर स्पष्टपणें प्रक्षिप्त आहे. तेव्हां त्यांतील कोणतेंहि विधान प्रमाणाई नाहीं. लंकादि स्थळांचा निर्णय करितांना अगस्त्याश्रम, गोदावरी, सह्याद्रि व दाक्षिणसमुद्र यांचे रामायणांतील उल्लेख दृष्टीआड करितां नये व त्यांची संगति राखून प्रतिपादन करावयाचें तर पंचवटी व किष्किंधा हीं विंध्याद्रीचे उत्तरेस होती अशी कल्पनाहि करितां येणार नाहीं. दाक्षिण समुद्राचा उल्लेख तर लंकेचा शोध अन्यत्र करूं पाहणाऱ्या शोधकाचे मार्गांत प्रत्येक वेळीं आड येणारा आहे. रामाचे प्रवासाचा काल अनुमानानें ठरवून त्यावरून मधील अंतर गृहीत धरल्यामुळें इतका घोंटाळा होत आहे. आणि हें अनुमान तर निराधार आहे. तेथें स्पष्ट निर्देश असता अथवा बाधक प्रमाण असतें तर रा. अभ्यंकर यांनीं हें धाडस केलें नसतें. मूळांतील निर्देश मोघम आहे व म्हणूनच तसें अनुमान त्यांनीं केलें आहे. पण रामायणांतील अन्यत्र असलेल्या भूवर्णनाची संगति राखण्याकरितां त्या दृष्टीनें हा निर्देश लाविला पाहिजे आणि तो तसा लावूं गेल्यास तो मोघम असल्यामुळें विरोध करणाराहि नाहीं. मग सर्व वचनांची संगति वरीलप्रमाणें कां लावूं नये ?

## गोदावरीचे मुखाकडील पंचवटी.

गोदावरीचे मुखाकडे भद्राचलम् जवळ पर्णशाळा म्हणून एक गांव आहे व राम तेथें राहिले व जेथून रावणानें सीतेचें हरण केलें तें स्थान हें, असें कित्येक विद्वानांचें मत आहे. या विषयावर कै. ओक यांचा लेख काव्यसंग्रहाचे अंकाबरोबर ( अंक ३४ वा. ) प्रसिद्ध झाला असून त्यांत त्यांनीं आपल्या मताचा पुरस्कार केला आहे. पंचशती रामायणांतील एका साकीवरील टीपेंत× प्रथम

---

× काव्यसंग्रह आक्टोबर १८९२ चे अंकांत पृष्ठ ८१ वर मोरोपंतकृत रामायणांपैकीं पंचशती रामायणांतील ४२० व्या साकीवरील गोदावरी शब्दावर व पुढें ४२३ व्या साकीवरील पंचवटी शब्दावर पुढील दोन टीपा आहेतः—

"१ ही गोदावरी प्रसिद्ध नाशिकाजवळची नव्हे. राजमहेंद्रीच्या पश्चिमेस ७५।१०•

कै. ओक यांनीं आपलें मत निर्दिष्ट केलें आहे. व त्याचे विरुद्ध श्री. बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं पत्र लिहून कळविल्यावर त्यांच्या या पत्राबरोबर ओकांनीं वरील लेख प्रसिद्ध केला आहे. यावर श्री. बापूसाहेब यांनीं उत्तर पाठविलें, परंतु तें बाहेर पडण्यापूर्वी ओक हे निवर्तल्यामुळें श्री. बापूसाहेब यांनीं दोनहि लेख " पंचवटीस्थलनिर्णय " या नांवानें एकत्र छापून प्रसिद्ध केले. ओक यांनीं आपलें मत मांडतांना त्याला अर्वाचीन शोधकांची संमति असल्याचें दाखविलें आहे. त्यांनीं रामाचे प्रवासांतील मुक्काम् वगैरे रा. अभ्यंकर यांच्याप्रमाणेंच धरिले आहेत. मात्र त्यांनीं पंचवटी गोदावरीचे मुखाकडे मानिली आहे. अभ्यंकर यांनीं पंचवटी विंध्याद्रीचे उत्तरेस मानून रामायणांतील वर्णनाशीं मेळ घातला आहे. पण पंचवटी गोदेच्या मुखाजवळ मानिल्यानें मधील अंतर लांबलें आहे व तें त्यांनीं कोसांचें प्रमाण वाढवून भरून काढिलें आहे. त्यांनीं कोस ७॥ मैलांचा धरला आहे. * प्राचीन कालीं कोसांचें प्रमाण

---

कोसांचे सुमारास जी गोदावरी आहे ती येथें घेतली पाहिजे. हल्लींचें सिंहलद्वीप हें जर लंका बेट असेल तर येथें प्रसिद्ध नाशिकाजवळच्या गोदावरीचें ग्रहण करणें सुयुक्तिक होणार नाहीं. याचप्रमाणें गोदावरीच्या मुखाजवळ जें जनस्थान आहे तेंच रामाचें वसतिस्थान समजलें पाहिजे. हल्लींच्या प्रसिद्ध नाशिकाला जनस्थान म्हणतात ही भ्रांति आहे. हल्लींच्या नाशिकाजवळ पंचवटी म्हणून जें स्थान आहे तें रामाचें पंचवटीस्थान नसून गोदावरीच्या मुखाशीं जें पंचवटीस्थान आहे तें रामाचें निवासस्थान असावें असें अर्वाचीन शोधकांचें मत आहे."

"२ पंचवटीनामक पर्णशाला ( दलशाला ) या नांवाचा गांव गोदावरीच्या मुखाजवळ उत्तरतीरीं अद्याप उत्तर तैलंगणांत आहे. त्या गांवाला पंचवटी हें नांव असावें असें अर्वाचीन शोधकांचें मत आहे."

*कै० ओक यांनीं कोसाचें प्रमाण वरीलप्रमाणें धरण्यास रामायणांतीलच आधार दिलेला आहे. गंगायमुनांचे संगमावर भरद्वाजाश्रमीं राम उतरले व मुनींनीं त्यांतला चित्रकूटाकडे जाण्याचा जो मार्ग सांगितला त्यांत त्यांनी तेथून चित्रकूट दहा कोसांवर असल्याचें म्हटलें आहे.(२।५४।२८) प्रयाग व चित्रकूट यांमध्यें अंतर पाहिलें तर तें ७५ मैल आहे. अर्थात् यावरून ७॥ मैलांचा एक कोस होतो. कै० ओक यांचें येथील अनुमान साधार व सयुक्तिक आहे, हें खरें; तथापि

काय होतें, हें लक्षांत घेतलें म्हणजे त्यांचे प्रतिपादनाची विसंगतता कळून येईल. पूर्वी हिंदुस्थानांत चार हजार हातांचा कोस प्रचारांत होता. ह्युएनत्संगनें आपल्या प्रवासवर्णनांत दोन नगरींतील अंतर सांगतांना 'ली' या प्रमाणाचा उपयोग केला आहे. पुष्कळ प्रसिद्ध स्थलांमधील सध्यां असलेलें अंतर व ह्युएननें दिलेलें अंतर यांचा मेळ घेऊन, सहा ली म्हणजे एक मैल, असें प्रमाण डॉ. कनिंगहॅम यानें ठरविलें आहे. दुसरा प्रवासी फाहिआन यानें आपल्या ग्रंथांत योजनांचा उपयोग केला. दोनहि प्रवाश्यांनीं, योजन म्हणजे ४० ली, असें प्रमाण दिलें आहे; आणि यावरून पूर्वीचा एक योजन म्हणजे सरासरी ६॥, ७ इतके मैल होतात. कै. ओकांनीं दिलेलें प्रमाण घेतलें तर ३० मैलांचा एक योजन होतो. मापांत न्यूनाधिक्य झालें तरी त्याचें महत्त्व नसतें; पण त्या मापांत प्रत्येक दिवशीं होणारा प्रवास मोजून पाहिला तर अनवस्थाप्रसंग येतो. सुतीक्ष्णाश्रमापासून अगस्त्यांचे बंधूचे आश्रमापर्यंत अंतर १६ कोस असल्याचें व हा प्रवास रामानें एका दिवसांत केल्याचें रामायणांत स्पष्ट सांगितलें आहे. वर दाखविल्याप्रमाणें एका योजनाचे मैल ६॥, ७ घेतले म्हणजे सोळा कोस अर्थात् चार योजनें यांचे २७ ते २८ मैल होतात आणि इतका प्रवास असंभाव्य दिसत नाहीं. पण कै. ओकांचें प्रमाण घेतल्यास सोळा कोस म्हणजे १२० मैल इतका प्रवास रामानें एका दिवसांत केला असें मानावें लागतें. हें तर अगदीं शक्य दिसत नाहीं. कारण रामाचा प्रवास आगगाडीसारखा रात्रंदिवस चालू नव्हता. नित्याचें आन्हिक आटोपल्यावर बाहेर निघावयाचें आणि सूर्यास्तापूर्वी कोठें तरी वस्ती करावयाची, असा त्याचा क्रम होता. म्हणजे

---

हें प्रमाण ग्राह्य धरण्यास दुसऱ्या कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत आधार मिळत नसून, मिळत असलेले आधार उलट त्यास बाधक आहेत. दोन स्थलांमधील अंतर सांगणारे निर्देश रामायणांत आणखी अवघे दोनतीन आहेत; परंतु तीं स्थलें अनिश्चित असल्यामुळें त्यांवरून कांहीं निर्णय करितां येत नाहीं. तेव्हां रामायणांत लंकेचा विस्तार शंभर योजनें सांगितला आहे तेथें ज्याप्रमाणें ती विशाल होती एवढाच अर्थ आपण घ्यावा असें पुढें दाखविलें आहे, त्याप्रमाणें येथें या दोन स्थलांमध्यें बरेंच अंतर होतें एवढाच बोध घ्यावयाचा आहे.

अस्तोदयकालचे दोन तास सोडावे लागतात, व मध्यें खाण्याकरितां अथवा विश्रांतीकरितां कांहीं काल आणखी कमी करावा लागेल--कारण अमुक वेळांत अमुक स्थळीं पोंचावयाचें असें डांकवाल्याप्रमाणें त्यांना बंधन नव्हतें--व ते अंदाजानें दोन तास कमी केल्यास आठ तासांत रामानें १२० मैल प्रवास केला असें होत आहे. व तें शक्य आहे काय तें वाचकांनींच आपल्या मनाशीं पहावें. तथापि प्रवासांतील कित्येक मुक्काम रामायणांत सांगितलेले नाहींत असें मानिल्यानें वरील अनवस्था टाळितां येण्यासारखी आहे. पंचवटी गोदेच्या उगमाजवळ अथवा मुखाजवळ कोठेंहि ठरविली तरी हा प्रश्न दोहोंकडे सारखाच आहे व याकरितां या कल्पनेविषयीं दुसऱ्या बाजूनें विचार करणें भाग आहे. कै. ओक व कुरुंदवाडकर यांच्या प्रतिपादनांमध्यें रामायणापेक्षां इतर ग्रंथांतील प्रमाणें अधिक घेतलेलीं आहेत. यांतील कित्येक प्रमाणें पुराणें, काव्यें व नाटकें यांतील असून, कित्येक अर्वाचीन शोधकांचीं मतें त्यांत दिलेलीं आहेत. अर्वाचीन शोधकांचीं मतें वाचलीं असतां शोधाची दिशा कळते व त्यांतील न्यूनाधिक्याची कल्पना होते. परंतु निर्णय करावयाचा तो आपणच करावयाचा आहे. कारण तीं मतें अधिकारी पुरुषांची असलीं तरी प्राचीन ग्रंथांचा आधार देऊन त्यांना आपल्या मताचें प्रतिपादन करावयाचें असतें व याकरितां प्राचीन ग्रंथ हाच सर्वांचा आधार, हें विसरतां नये. प्राचीन ग्रंथांपैकीं काव्यें व नाटकें यांचे काल प्रायः निश्चित आहेत. आणि ज्यांचा काल अनुमानावयाचा असे अर्थात् अनिश्चित कालांतील ग्रंथ म्हणजे पुराणें होत. यांतील कोणताहि ग्रंथ रामायणाइतका प्राचीन नाहीं. आणि इतर सर्व ग्रंथ मध्यंतरीं पुष्कळ काल गेल्यानंतर झालेले आहेत. हा काल अनिश्चित आहे व त्याचें दिग्दर्शन करावयाचें तर या कालांत रामायणांतील व्यक्तीनिमित्त वादविषयक स्थलाला तीर्थत्व प्राप्त झालें इतकें सांगतां येण्यासारखें आहे. म्हणजे या पुराणादि ग्रंथांवरून त्या त्या लेखकाचें त्या स्थानासंबंधी तसें मत होतें किंवा त्या कालीं तशी समजूत होती असें म्हणतां येईल. मात्र अशा मतांचा तीं रामायणाशीं जुळत असतां पोषक म्हणून उपयोग होईल, पण त्यांनीं विरोध केल्यास रामायणापुढें त्यांना महत्त्व कोणी देणार नाहीं. अर्थात् शेवटचा निर्णय रामायणावरून द्यावयाचा आहे.

गोदावरीचे उगमाजवळ पंचवटी असल्याचा लोकप्रवाद आहे व त्याला रामायणाचा विरोध नाहीं, असें आम्हीं पूर्वी दाखविलें आहे. भद्राचलम् जवळ असलेली पंचवटी अर्वाचीन शोधकांना संमत म्हणून पुढें आली असून तिलाहि रामायणाचा विरोध नसल्यास दोनहि बाजू सारख्या होऊन हा प्रश्न तसाच अनिर्णीत राहणार आहे. याकरितां या दोन स्थलांपैकीं रामायणांतील वर्णन कोणाशीं संगत होतें, हें पाहूं. नाशिकाजवळचे पंचवटीची आम्हीं प्रारंभीं जी रामायणांतील वर्णनाशीं संगति दाखविली आहे, ती विंध्याद्रीचे थेट दक्षिणेला अगस्त्याश्रम व त्यापुढें पंचवटी या एका मुद्यापुरती आहे; व ती गोदावरीचे मुखाकडील पंचवटीचे कल्पनेला उघड विरुद्ध आहे. अगस्त्यमुनींनीं पंचवटी-कडे जाण्याचा मार्ग सांगतांना त्यांचे भाषणांत पुढील वाक्य आहे—

**ततः स्थलमुपारुह्य पर्वतस्याविदूरतः ।**
**ख्यातः पंचवटीत्येव नित्यपुष्पितकाननः ॥३।१३।२२॥**

" नंतर पर्वताचे समीपच उघड्या प्रदेशावर चढून गेलें म्हणजे नित्य प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेलीं अरण्यें ज्यांत आहेत असा पंचवटी म्हणून प्रसिद्ध असलेला देश लागतो. "

येथें पंचवटी एका पर्वतासमीप असल्याचें सांगितलें आहे. पंचवटी आणि पर्वत यांमध्यें अंतर किती हें येथें सांगितलेलें नाहीं. तथापि हा पर्वत पंचवटीला अगदीं जवळ नसावा अथवा फार दूर नसावा असें दिसतें. नाशिकाजवळ सध्यां जेथें पंचवटी दाखवितात, तेथें डोंगर नाहीं; तथापि तो कांहीं अंतरावर आहे हें सर्व प्रसिद्ध आहे. भद्राचलंकडे मात्र याचे उलट स्थिति आहे. नकाशांत पाहिलें तर भद्राचलंचे उत्तरेला सुमारें शंभर मैलपर्यंत डोंगर दिसत नसून गोदावरीचे मुखाकडील प्रदेश दर मैलीं एक फूट याप्रमाणें उतरता झाला आहे. × हा सर्व प्रदेश सपाट आहे. रामलक्ष्मण आश्रमांत परत आल्यावर तेथें सीता दिसत नाहीं असें पाहून ते दोघे " वनें, पर्वत, नद्या व सरोवरें सर्व बाजूंनीं शोधूं लागले आणि तेथें असलेल्या पर्वताचीं शिखरें व टेंकाडे हुडकूं लागले. तथापि ती त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं. " ( ३।६१।२०, २१ ) असें

+ ज्ञानकोश–गोदावरी शब्द पहा.

वर्णन आहे. हें सर्व वर्णन भद्राचलं जवळच्या पंचवटीशीं अगदीं विरुद्ध आहे. नाशिकला समुद्र पर्वताचे पलीकडे असल्यामुळें दुर्गम आहे. आणि तो भद्राचलं-पासून जवळ आहे व मध्यंतरीं डोंगर नसल्यामुळें तेथें जातां येण्यासारखा आहे. असें असतां एकदांहि राम समुद्राकडे गेल्याचें रामायणांत वर्णन नाहीं. शिवाय रामायणांत वर्णिलेला दक्षिणोदधि असें याला कधीं म्हणतां येणार नाहीं. पंचवटीहून दक्षिणेकडे राम सीताशुद्ध्यर्थ जात असतां त्याला पंपेचें पश्चिमतीर लागल्याचें वर्णन आहे. भद्राचलंकडून पश्चिमेच्या बाजूनें तो दाक्षिणेकडे गेला असें मानिलें तरी त्याला पंपेचें पश्चिमतीर प्रथम लागणार नाहीं. नाशिकाजवळचा प्रदेश सह्याद्रीचे जवळ असून रम्य असल्याचें पुराणांतरीं वर्णन आहे व तें संभवनीय दिसतें. रामायणांत तेथें अरण्यें असल्याचें सांगितलें असून तींहि समुद्राचे बाजूपेक्षां डोंगराचे बाजूला असणें अधिक संभवतें. सध्यां अरण्यें कोठेंहि नाहींत व याकरितां तीं कोठें असणें संभवनीय आहे हें पाहणें भाग आहे; व या दृष्टीनें त्यांचा येथें विचार करावा लागला आहे. डॉ. भांडारकर यांनीं आपल्या "दख्खनचे इतिहासांत" असेंच मत दिलें असून श्री. बापूसाहेब यांनीं आपल्या बाजूचें म्हणून हें एक प्रमाण पुढें केलें आहे. याविषयीं डॉ. साहेबांचें कोणत्याहि बाजूनें निश्चित मत दिसत नाहीं. कारण रामायणांतील वर्णनावरून पंचवटीजवळचें गोदावरीचें पात्र रुंद असावें असें वाटतें, असें त्यांनीं याच ग्रंथांत लिहिलें असून, ओक यांनीं आपल्या मताचे समर्थनार्थ तें उद्धृत केलें आहे. हा मुद्दा पंचवटी गोदावरीचे मुखाकडे मानण्यास पोषक आहे यांत शंका नाहीं. रामायणांतील वर्णनावरून पंचवटीजवळचें गोदावरीचें पात्र रुंद असावें असा भास होतो. पण तसा तेथें स्पष्ट निर्देश नाहीं. आणि त्याचे उलट अनुमान करण्याजोगें प्रमाण मात्र आहे. सीताशुद्ध्यर्थ रामलक्ष्मण दक्षिणेकडे गेले व अर्थात् ते गोदावरी ओलांडून पलीकडे गेले. रामायणांत गंगायमुनांवरून जातांना त्यांनीं नावांचा व तराफांचा उपयोग केल्याचें लिहिलें आहे. गोदावरीचें पात्र रुंद असल्यानें पलीकडे जाण्यास त्यांना असें कोणतें तरी साधन उपयोगांत आणणें भाग होतें पण तसा उल्लेख रामायणांत नाहीं; अर्थात् ते जेथून पलीकडे गेले तेथें नदीचें पात्र रुंद होतें, असें

म्हणतां येत नाहीं. आणि पात्र अरुंद—पायउतार होण्याजोगें--मानावयाचें तर उगमाकडेच हें स्थान मानिलें पाहिजे. गोदावरीचे मुखाकडील प्रदेश सपाट असल्याचें पूर्वीं सांगितलें आहे व रामायणांत पंचवटींतील पर्णकुटिकेजवळ नदीवर जाण्याकरितां उतार केला असल्याचें ( ३।६४।३ ) वर्णन आहे. सीतेला शोधण्याकरितां रामानें सांगितल्यावरून लक्ष्मण नदीवर गेला, त्या प्रसंगानें या उताराचा उल्लेख आला आहे. या उतारानें नदीवर जाऊन लक्ष्मण परत आला व त्यानें तेथें सीता सांपडत नसल्याचें रामाला कळविलें. या सर्व व्यवहारावरून त्यांचा आश्रम नदीपासून बऱ्याच उंचावर व दूर असला पाहिजे, असें दिसतें. सपाट प्रदेशांतून वाहणाऱ्या नदीवर जाण्याकरितां उतार बांधण्याचें कारण नाहीं आणि अशा नदीवर गेलेल्या मनुष्याच्या शोधाकरितां मुद्दाम जाण्याचें कारण नाहीं; कारण असा प्रदेश दूर असला तरी दृष्टीच्या टप्यांत असूं शकतो. दुसरें असें कीं, मुखाकडील प्रदेश सपाट असल्यामुळें तेथें सध्यां प्रतिवर्षीं पावसाळ्यांत पूर येतात. अशा स्थलीं पावसाळ्यांत धोका येण्याचा संभव आहे हें सहज लक्षांत येण्यासारखें असतें व यासाठीं तेथें रामानें पर्णकुटिका बांधून राहणें संभवनीय नाहीं.*

पंचवटींत राम वास करीत असतां तेथील हेमंताचें वर्णन रामायणांत लक्ष्मणाचे मुखानें फार सुंदर केलेलें आहे. येथील वर्णनावरून तेथें त्या वेळीं थंडी फार पडत असून बर्फाचा पातळ थर सर्व भूमीवर बसत असे, असें दिसतें. ( ३।१६।१२ ) भद्राचलंजवळची पंचवटी समुद्राचे जवळ असून तेथें जवळ

* भद्राचलंकडे गोदावरींचें पात्र खोल असून पाण्याचा प्रवाह जोराचा असल्याचें इंपीरियल गॅझेटिअरमध्यें लिहिलेलें आहे. (भद्राचलम् built on the गोदावरी river which is very deep and rapid about 104 miles from राजमेंहंद्री) येथूनच रामानें लंकेवर स्वारी केल्याची लोकांत समजूत आहे, अशी नोंद वरील माहितीबरोबर गॅझेटिअरमध्यें केलेली आहे, हेंहि आम्हीं येथें सांगतों. गोदावरीचें पात्र तेथें रुंद व खोल असल्यामुळें तेथें पायांनीं उतार होण्यासारखा नाहीं, एवढेंच येथें आम्हांस दाखवावयाचें आहे; व त्या कामापुरती माहिती आम्हांस त्यांत उपलब्ध झाली आहे, ती येथें दिली आहे.

पर्वत असल्यामुळें हेमंतांतहि हिमवृष्टि होण्याइतकी थंडी त्या प्रदेशांत पडणें संभवनीय नाहीं. उगमाजवळचे पंचवटींत सध्यां हेमंतांत हिमवृष्टि होते, असें नाहीं; तथापि प्राचीनकाळीं तेथेंच ती संभवनीय वाटते.

अशा रीतीनें भद्राचलंकडील प्रदेशाची स्थिति रामायणांतील वर्णनाशीं विरुद्ध आहे आणि नाशिकमधील पंचवटीला अनुकूल आहे; तेव्हां राम तेथेंच पर्णकुटी बांधून राहिल्याचें स्पष्ट होत नाहीं काय ?

## कै. ओकांचे नाशिकपंचवटीवरील आक्षेप.

गोदावरींचे उगमाजवळची पंचवटी ही रामायणीय पंचवटी नव्हे, असें सांगतांना कै. ओक यांनीं या समजुतीवर जे आक्षेप घेतले आहेत, त्यांविषयीं आतां विचार करूं. कै. ओकांचा पहिला आक्षेप पुढीलप्रमाणें *आहे.—" वाल्मीकीचा राम गोदादक्षिणतटाकीं आल्यापासून प्रथम बराच दूरपर्यंत पश्चिम दिशेनें व पुढें क्रौंचारण्यास येईपर्यंत बहुतेक नैर्ऋत्य दिशेनें गेला. आतां नाशिकाहून रामास थेट पश्चिम व पुढें नैर्ऋत्य अशा दिशेनें नेल्यास तो मुंबईस गेला, असें होईल व हें एका दृष्टीनें सुसंगतच आहे. कारण मुंबईंतील प्रसिद्ध वालुकेश्वर याची स्थापना रामानें केली, असें वालुकेश्वरमाहात्म्यांत सांगितलें आहे; परंतु मुंबईहून नैर्ऋत्य दिशेनें रामास नेलें असतें तर क्रौंचारण्याची गांठ न पडतां आरबी समुद्रांतील तिमिंगलारण्यांत रामास वास करावयास लागला असता. "

कै. ओक यांची शंका वरवर पाहतां बरोबर दिसते; पण विचार केला तर त्यांत स्वारस्य काय आहे ? त्यांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, राम जनस्थानाहून पश्चिम बाजूनें नैर्ऋत्येकडे गेल्याचें रामायणांत सांगितलेलें आहे, पण मुंबईकडे आल्याचा तर उल्लेख नाहीं; त्यापक्षीं नाशिक हें रामायणीय जनस्थान नव्हे. पण राम जनस्थानाहून पश्चिमेकडे वळले, असें रामायणांत सांगितलेलें असलें तरी त्या बाजूला ते किती कोसपर्यंत गेले व पुढें नैर्ऋत्येकडे किती अंतर चालले, याविषयीं जोंपर्यंत रामायणांत प्रमाण मिळत नाहीं, तोंपर्यंत पश्चिमेकडे वळले व पुढें नैर्ऋत्येकडे गेले, एवढया उल्लेखावरून ते मुंबईकडे गेले असावेत, असा तर्क कसा करावयाचा ? व असा उल्लेख नाहीं, म्हणून नाशिक

* काव्यसंग्रह–पुरवणी फब्रुवारी, १८९६, पृ. २६.

हें रामायणीय जनस्थान नव्हे, असा सिद्धांत कसा काढावयाचा ? उलट आम्ही म्हणतों कीं, मुंबईकडे गेल्याचा—अर्थात् त्या बाजूनें समुद्राचा—उल्लेख रामायणांत नाहीं—यावरून ते पश्चिमेकडे वळले असले तरी इतके दूर गेलेच नव्हते. वालुकेश्वरमाहात्म्यांत मुंबईतील वालुकेश्वराची स्थापना रामानें केल्याचें लिहिलें आहे, असें कै. ओक लिहितात. हें प्रमाण तर त्यांनीं कोणत्या हेतूनें दिलें आहे, हें कळत नाहीं. रामायणकालाचे स्थलनिर्णयाचे कामीं रामायणानंतरच्या ग्रंथांतील प्रमाण उपयोगाचें नाहीं, हें कै. ओक यांनीं तेथेंच उपक्रम करितांना लिहून ठेविलें आहे व यामुळें तें स्वभावतः निरुपयोगी आहे; आणि तें प्रमाण ग्राह्य मानिलें तर तें नाशिक हेंच रामायणांतील जनस्थान ठरविण्यास साधन आहे. तेव्हां त्यांचा हा आक्षेप व्यर्थ आहे.

त्यांचा दुसरा आक्षेप पुढीलप्रमाणें आहे:—" राम जे वेळेस अयोध्येवरून अरण्यवासाकरितां निघाला, ते वेळेस त्यानें " वत्स्यामि विजने वने " " वन्येन वृत्तिं कर्ताहम् " " न हि वर्ते प्रतिग्रहे " ( वा. रा. अ. कां. सर्ग ५०, श्लोक ४३।४९). अशासारख्या प्रतिज्ञा केल्या होत्या व त्या प्रतिज्ञानुरूप गुहाच्या शृंगवेरपुरांत किंवा सुग्रीवाच्या किष्किंधेंत किंवा बिभीषणाच्या लंकेंत जो क्षणभरसुद्धां रहावयास गेला नाहीं, तो राम जनस्थानपुरांत वर्ष सहा महिने राहिला, असें मानणें म्हणजे एकवचनी रामाला बोलांत बोल नाहीं अशा प्रकारचा मनुष्य बनविणें होय. व हें कोणाहि रामगुणपक्षपातीपुरुषास कधींहि आवडणार नाहीं."* हा आक्षेप वाचला तर तो कै. ओकांनीं कसा लिहिला याचें आश्चर्य वाटतें! जनस्थान हा लोकवस्ती असलेला गांव होता असें ते गौतमीमाहात्म्यावरून ठरवितात व तेथें राहाण्यानें रामाकडे प्रतिज्ञाभंगाचा दोष येईल ह्मणतात! पण रामाचे निवासानिमित्त जनस्थानाला तीर्थत्व आल्यानंतरचें हें माहात्म्य, याचा त्यांनीं विचार करावयास नको होता काय ? केवळ नांवावरून [ जन+स्थान ] तेथें लोकवस्ती होती असें मानावयाचें असेल तर तो आक्षेप उभय जनस्थानांवर सारखाच येणार ! गौतमीमाहात्म्यांत जनस्थानाला पुर म्हटलें आहे, त्यावरून तें माहात्म्य लिहिलें गेलें त्या वेळीं तेथें वस्ती होती, असें म्हणतां येईल व तें सरळ आहे.

* किता, पृ. २६.

पण तेथें पुढें वस्ती झाली म्हणून त्यापूर्वी तेथें अरण्य असतां रामानें वस्ती केल्यानें त्याजकडे प्रतिज्ञाभंगाचा दोष कसा येणार ?

कै. ओकांचा तिसरा आक्षेप वरीलसारखाच आहे. चित्रकूटाहून नाशिकाकडे येतांना मार्गांतील देशांचा रामायणांत उल्लेख नाहीं. येथें कै. ओकांनीं ब्रह्मपुराणावरून दाक्षिणेकडील देशांची यादी दिली आहे. पुढें ते म्हणतात, "या देशांतून राम कधींच आला नसता. याचें कारण दशार्ण, चेदि, कोसल, विदर्भ, हे देश म्हणजे कोणी रामाचें आजोळ, व कोणी रामाचें पणजोळ, अशासारख्या सर्व गोतवळ्यांनीं भरलेले होते. तेव्हां अशा नातेवाईकांच्या देशांतून रामास प्रतिज्ञाभंग न करितां जाणें अगदीं अशक्य × होतें. मधील देशांचीं नांवें कै. ओक यांनीं ब्रह्मपुराणांतून घेतलीं आहेत. यांतच मागीलप्रमाणें कालक्रमविपर्यासदोष येत आहे. रामायणकालीं दंडक हें अरण्य होतें, तर पुढें तेथें लोकवस्ती होऊन तो एक देश झाला व त्याचा उल्लेख ब्रह्मपुराणांत दाक्षिणात्य देशांचे यादींत केलेला आहे. तेव्हां ब्रह्मपुराणोक्त सर्व दाक्षिणात्य देश रामायणकालीं त्याच नांवानें प्रसिद्ध असतील व त्यांत लोकवस्ती असेल असें संभवत नाहीं, हें उघड आहे. फार काय सांगावें ? कित्येक देशांच्या रामायणकालच्या सीमाहि कळत नाहींत. व कित्येक अनुमानितां आल्या तरी त्या पुढें टिकल्या असा भरंवसा देतां येत नाहीं. अर्थात् रामाचे यात्राक्रमांत मार्गांतील एकाहि देशाचा निर्देश वाल्मीकींनीं केला नाहीं यांत कै. ओक म्हणतात तसा चमत्कार कोठें आहे ? नाहीं म्हणावयास दंडकाचा निर्देश रामायणांत अरण्य म्हणून केलेला आहे, व तो कै. ओक यांना मान्यच आहे. म्हणजे ब्रह्मपुराणांतील दंडकावांचून इतर देश रामायणकालीं त्या नांवानें प्रसिद्ध नव्हते असें उघड होत नाहीं काय ? बरें, मधील दशार्णादि स्वतांचे नातेवाईकांचे देशांतून रामानें प्रवास करणें अशक्य असल्याची जी शंका कै. ओक यांनीं काढिली आहे, ती तर हास्यास्पद आहे. कारण, किष्किंधा व लंका यांतून व विशेषतः गुहाचे शृंगवेरपुरांतून जसा प्रतिज्ञा पालन करून रामाला प्रवास करितां आला, तसा या प्रदेशांतूनहि करतां आला असता. प्रति-

× किता-पृष्ठ २७२८.

पालनाचें कौशल्य व त्या कामीं लागणारा दृढ निश्चय रामाचे ठायीं भरपूर होता; त्याची चिंता कै. ओकांना करावयाचें कारण नव्हतें.

नर्मदा व तापी या नद्यांचा उल्लेख रामाचा यात्राक्रम सांगतांना रामायणांत केलेला नाहीं, ही आणखी एक बाधक गोष्ट कै. ओक यांनीं येथें सांगितली आहे. वास्तविक उल्लेखाचा अभाव हें कांहीं प्रमाण नव्हे; पण या नद्या मोठ्या असल्यामुळें त्यांचा उल्लेख संभवनीय दिसतो व यासाठीं त्यांची शंका युक्त म्हणावी लागते. येथें या नद्या चुकवून दक्षिणेकडे येणाचा मार्ग संभवनीय असल्याचें त्यांनींच लिहिलें आहे. मात्र "हा मार्ग रामाचा नव्हता; याला प्रथम व मुख्य कारण वाल्मीकीनें सुतीक्ष्णाश्रमापासून गोदावरीपर्यंत अंतर व दिशा दिल्या आहेत, त्याला सर्वस्वी विरोध येतो." × असें त्याचें निराकरण त्यांनीं केलें आहे. परंतु येथें त्यांची स्वतांची भूल झाली आहे. किंबहुना त्यांच्या सिद्धांताला जुळविण्यासाठीं त्यांनीं करून घेतलेली आहे. सुतीक्ष्णाश्रमाचें स्थान त्यांनीं बिलासपूर जिल्ह्यांत ठरविलें आहे व तेथून सात योजनांवर पंचवटी असल्याचें रामायणांत सांगितलेलें आहे. तीस मैलांचा एक योजन या त्यांच्या कल्पनेप्रमाणें मधील अंतर २१० मैलांचें येतें. म्हणजे बिलासपूरपासून २१० मैलांवर पंचवटी येते. नकाशावर पाहूं लागावें तों बिलासपूरपासून २१० मैलांवर कै. ओकांनीं ठरविलेल्या पंचवटीचा पत्ताच मिळत नाहीं. ही अनवस्था टळावी म्हणून कै. ओक यांनीं वेगळीच योजना करून ठेविली आहे. अगस्त्याचे आश्रमापासून रामायणांतील पंचवटी दोन योजनांवर आहे. या आश्रमाचें स्थान निश्चित करितांना कै ओक लिहितात, "या आश्रमाची स्थिति हल्लींच्या बस्तर संस्थानाच्या बहुतेक भागभर होती. कारण त्या आश्रमापासून सुमारें ९० मैलांवर पंचवटीचा प्रदेश सुरू होत होता व गोदावरी ७५।८० मैलांवर होती."* आश्रमाचा प्रदेश असें म्हटलें म्हणजे एकादी झोंपडी राहील इतकी भूप्रदेश अशी आपली कल्पना होते व आश्रम म्हणजे पर्णकुटिका या दृष्टीनें ती खरी आहे. परंतु पूर्वीं एकाद्या ऋषीचा आश्रम म्हणून वर्णन आलें असलें तरी अनेक तापसी एकमेकांसमीप आश्रम बांधून रहात असल्यामुळें ती एक

× कित्ता, पृ. २८ * कित्ता, पृ. १६.

वसाहत होत असे व मुख्य ऋषीच्या नांवानें तो प्रदेश मोडत असे. अर्थात् ही एक लहानशी वसाहतच असे. या दृष्टीनें अगस्त्य ऋषींच्या आश्रमानें मोठा प्रदेश व्यापिलेला असणें संभवनीय आहे. तथापि या आश्रमाची व्याप्ति एकाद्या प्रांताप्रमाणें वाटेल तितकी कशी कल्पावयाची? ही व्याप्ति कल्पितांना कै. ओकांनीं कार्यकारणांची जी सांगड घातली आहे, ती तर अगदींच विचित्र आहे! आश्रमाची व्याप्ति इतकी कां? तर त्यापुढें ६० मैलांवर पंचवटीचा प्रदेश सुरू होतो म्हणून. म्हणजे पंचवटीचें स्थान ठरविण्याचा प्रयत्न चालला असतां, तें निश्चित धरून त्यावर दुसरें अनुमान करावयाचें व पुनः त्याच कारणावरून पहिला उद्देश सिद्ध करावयाचा, याला काय म्हणावें? आश्रमाची व्याप्ति वाढवून तरी कार्यसिद्धि कोठें झाली आहे? पंचवटीप्रदेश जेथें सुरू होतो, असें अगस्त्याश्रमाची व्याप्ति वाढवून कै. ओक यांनीं ठरविलें, तेथून गोदावरी ७५।८० मैलांवर असल्याचें तेच सांगतात. बरें, याला आधार काय? तर कै. ओक यांचें अनुमान! आतां अगस्त्यांच्या भाषणांतील पुढील वाक्यें पहा. रामाला पंचवटीची माहिती सांगतांना ते म्हणतातः—

**इतो द्वियोजने तात बहुमूलफलोदकः ।**
**देशो बहुमृगः श्रीमान् पंचवट्यभिविश्रुतः ॥** वा.रा.॥३।१३।१३॥
**स देशः श्लाघनीयश्च नातिदूरे च राघव ।**
**गोदावर्याः समीपे च मैथिली तत्र रंस्यते ॥१८॥**

" बाळा, येथून दोन योजनांवर पंचवटी म्हणून प्रख्यात असलेला प्रदेश आहे. तेथें मृग पुष्कळ असून, फळें, मुळें व उदक हींहि विपुल आहेत. गोदावरीचे समीप असलेला तो प्रदेश येथून फार दूर नाहीं. तेथें सीता आनंदानें राहील. "

येथें पंचवटीप्रदेश गोदावरीचे समीप असल्याचें अगस्त्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे. म्हणजे पंचवटीप्रदेश व गोदावरी यांमध्यें ७५।८० मैल अंतर असणें संभवनीय नाहीं, हें उघड आहे. येथील ही आपत्ति टाळण्यासाठीं कै. ओक यांनीं पंचवटीची व्याप्तिच वाढवून ठेविली आहे. पण येथें त्यांच्या असें लक्षांत आलें नाहीं कीं, अशी व्याप्ति वाढवून संगति लावितां आली तरी रामाल

पर्णकुटी बांधून रहावयाचें होतें, तें उदकाचे समीप रहावयाचें होतें; आणि या दृष्टीनें पंचवटीप्रदेशांत गोदावरीसमीप त्यांनीं पर्णकुटी बांधावयाची म्हणजे अगस्त्यांनीं स्वतांचे आश्रमापासून पंचवटीपर्यंत जितकें अंतर-दोन योजनें (साठ मैल)-सांगितलें आहे त्याहून आणखी तितक्या अंतरावर रामाची पर्णकुटी यावयाची. मग रामायणांत सांगितलेलें अंतर व दिशा यांची संगति आपण राखिल्याचें ते सांगतात त्यांत अर्थ काय? पंचवटीचा प्रदेश वास्तविक इतका विशाल असल्याचें रामायणावरून दिसत नाहीं आणि विशाल होता असें मानिलें तरी रामाची पर्णकुटी व गोदावरी यांमध्यें तरी अंतर नव्हतें, यांत शंका नाहीं. रामाची पर्णकुटी गोदावरीसमीप मानावयाची; अगस्त्यांच्या सांगण्याप्रमाणें त्या प्रदेशांत व त्या स्थानीं त्यानें पर्णकुटी बांधिली असें म्हणावयाचें-आणि तसें मानणें कां भाग आहे हें वर दाखविलेंच आहे;-तर रामायणांत सांगितलेलें अंतर कै. ओकांच्या कल्पनेमध्यें जमत नाहीं, हें उघड होत नाहीं काय? रामलक्ष्मणांनीं पंचवटींत गेल्यावर जी पर्णकुटी बांधिली ती अगस्त्यांनीं सांगितलेल्या स्थलींच बांधिली व गोदावरीवर तीं तिघेंहि नित्य स्नानाकरितां जात असत व तेथें जातांच लक्ष्मणानें पर्णकुटी बांधल्यावर तो स्वतां गोदावरीवर स्नान करून आल्याचें जें वर्णन आहे त्यावरूनहि पर्णकुटी गोदावरीचे समीप होती, असें दिसून येतें. फार कशाला, राम त्या प्रदेशांत आल्यावर तो स्वतांच लक्ष्मणाला काय म्हणतो पहा:—

**अदूरे दृश्यते रम्या पद्मिनी पद्मशोभिता ॥३।५१।११॥**
**यथाख्यातमगस्त्येन मुनिना भावितात्मना ।**
**इयं गोदावरी रम्या पुष्पितैस्तरुभिर्वृता ॥ १२ ॥**

"जवळच कमलांनीं सुशोभित असलेली नदी दिसत आहे. जितेंद्रिय अगस्त्य मुनींनीं सांगितल्याप्रमाणें प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेली ही रम्य गोदावरी पहा."

यावरून गोदावरीचे तीरीं थोड्या अंतरावर रामाची पर्णकुटी होती, यांत शंका नाहीं. पंचवटीचा प्रदेश विशाल मानण्यांत पंचवटीच्या प्रारंभापर्यंत रामायणांत सांगितलेल्या दोन योजनें अंतराची संगति राखण्याचा कै. ओक यांचा

हेतु आहे व यासाठी रामाची पर्णकुटी गोदावरीचे समीप होती, असे आम्हीं दाखविलें तरी त्यांच्या कल्पनेंतील विसंगतता कित्येक वाचकांस कदाचित् पटणार नाहीं. अशा वाचकांकरितां पंचवटींत गेल्यावर रामानें फार दूर अंतर चालून मग पर्णकुटी बांधिली नाहीं, हें आम्ही आतां दाखविणार आहों. ही गोष्ट रामायणांत स्पष्ट सांगितलेली नाहीं; तथापि रामाचे भाषणावरून ती अनुमानितां येते. अगस्त्यांनीं सांगितल्याप्रमाणें राम पुढें चालला व तो पंचवटीप्रदेशांत आल्यावर लक्ष्मणाला म्हणतो:—

**आगताः स्म यथोद्दिष्टं यं देशं मुनिरब्रवीत् ।**
**अयं पञ्चवटीदेशः सौम्य पुष्पितकाननः ॥ ३।१५।२ ॥**

"अगस्त्य मुनींनीं जो प्रदेश आपणांला सांगितला त्या प्रदेशाप्रत आम्ही त्यांच्या सांगण्याप्रमाणें प्राप्त झालों. हे सौम्य लक्ष्मणा, प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेला हाच तो प्रदेश."

रामाच्या या भाषणावरून पंचवटींत त्यानें नुक्ताच प्रवेश केला होता, असें उघड दिसतें. अगस्त्यांनीं सांगितल्याप्रमाणें दोन योजनें चालून आल्यावर त्या प्रदेशासंबंधी ज्या खुणा त्यांनीं सांगितल्या होत्या त्या पटूं लागल्या तेव्हां रामानें वरील उद्गार काढिले आहेत; पंचवटी प्रदेशांत आल्यावर ७।५० मैल चालत जाऊन मग रामानें असें भाषण करणें संभवनीय नाहीं, हें कोणालाहि पटण्यासारखें आहे. पंचवटींत प्रवेश केल्यावर रामानें वरील उद्गार काढिले, हें लक्षांत घेतलें आणि याच वेळीं रामानें लक्ष्मणाकडून तेथें पर्णकुटी बांधविली असल्याचें यापुढील वर्णन वाचलें म्हणजे कै. ओक यांनीं अगस्त्याश्रमापासून रामाचे पंचवटींतील पर्णकुटीपर्यंत कल्पिलेलें अंतर रामायणाचे विरुद्ध ठरत नाहीं काय?

रामायणांतील स्थलनिर्णयाचे कामीं मुख्य आधार वाल्मीकींचा मानिला पाहिजे, हें कै० ओक यांनीं मान्य केलें आहे व या दृष्टीनें रामाचा प्रवासक्रम त्यांनीं रामायणावरून दिला आहे; परंतु पुढें स्थानांचा निश्चय करितांना त्यांची सारी भिस्त गौतमीमाहात्म्यावर आहे. या कामीं गौतमीमाहात्म्याचा अधिकार किती आहे, याविषयीं त्यांनीं विचार केलेला नाहीं; आणि कित्येक बाबी तर

त्यांत सांगितलेल्या नसतां त्यांनीं केवळ अनुमानानें निश्चित केल्या आहेत. त्यांच्या अनुमानाविषयीं एक मौजेचें उदाहरण त्यांच्याच शब्दांत सांगतों. गौतमी-माहात्म्याची माहिती सांगतांना ते लिहितात.–"गोदावरीचे उगमापासून मुखा-पर्यंत ७०० मैलांची लांबी आहे. तितक्या अंतराचें वर्णन १०५ अध्यायांत आहे. म्हणजे सरासरी ७ मैलांतील तीर्थांचें वर्णन एका अध्यायांत आहे, असें स्थूलमानानें समजण्यास कांहीं हरकत नाहीं."× या तर्कपद्धतीला काय नांव द्यावें हेंच आम्हांला कळत नाहीं. अध्यायसंख्या बरोबर आहे व लांबीहि बरोबर आहे असें धरिलें* तरी सात मैलांवर तीर्थ असावें व प्रत्येक अध्यायांत क्रमानें त्यांचें वर्णन असावें असें स्थूलमानानें तरी समजण्यास आधार काय? या माहात्म्यांत गौतमीतीरावरील तीर्थांचीं प्रत्येक अध्यायांत वर्णनें आहेत, अशी कै० ओकांनीं दिलेल्या माहितीवरून वाचकांची समजूत होते;पण वस्तुस्थिति काय आहे? पहिल्या नऊ अध्यायांत तर गंगेची उत्पत्ति सांगितली आहे व कै० ओकांच्या मता-प्रमाणें तर ६३ मैलांतील तीर्थांचीं वर्णनें तेथपर्यंत आलीं पाहिजेत. मग वरील अनु-मानाची संगति कशी लागणार? रामतीर्थ, सहस्रकुंडतीर्थ, किष्किंधातीर्थ, भद्रातीर्थ व पतत्रितीर्थ या तीर्थांचें माहात्म्य सांगतांना या पांचहि ठिकाणीं राम वनवास-प्रसंगीं गेल्याचा उल्लेख आहे, असें कै. ओक म्हणतात व हीं सर्व तीर्थें त्यांनीं बसविलेल्या वरील नियमास अनुसरून नाशिकचे आग्नेयीस ४००।५०० मैलां-वर येत आहेत. आम्हांला या तीर्थांचें स्थान कोणतें हें प्रस्तुत ठरवावयाचें नाहीं व यासाठीं हीं तीर्थें ते म्हणतात त्याप्रमाणें गोदावरीच्या मुखाकडे असलीं, तरी त्यावरून पंचवटीस्थान निश्चित कसें करितां येईल? पंचवटी–कीं जेथें राम पर्णकुटी बांधून राहिले होते व जेथून रावणानें सीतेचा अपहार केला–तें स्थान कोणतें, हें आपणांस ठरवावयाचें आहे. वनवासप्रसंगीं राम वरील तीर्थां-वर गेल्याचें या माहात्म्यांत सांगितलेलें आहे. एवढ्यावरून रामानें तेथें **निवास** केल्याचें कसें ठरवितां येईल? या माहात्म्यांत आलेलें रामचरित्र कसें विसंगत आहे, तें आम्ही त्याविषयींच्या स्वतंत्र भागांत दाखविणार आहोंत; तथापि स्वतां कै. ओक यांनाहि यांतील वर्णन रामायणाशीं विरुद्ध असल्याचें लक्षांत आलें

× कित्ता, पृ. २०. * गोदावरीची वास्तविक लांबी ९१८ मैल आहे.

नव्हतें, असें नाहीं. एक तर निर्णयाचा मुख्य विषय जी पंचवटी तिचें यांत नांव नाहीं व यामुळें हा मुळावरच घाव पडत आहे; दुसरें असें कीं, रामायणाप्रमाणें जनस्थान दंडकांत येत असतां या माहात्म्यांत ते भिन्न प्रदेश मानिले आहेत. इतकें करूनहि रामाचें निवासस्थान म्हणून यांत कोणतेंच तीर्थ सांगितलेलें नाहीं. ज्या पांच तीर्थांचीं नांवें देऊन तेथें राम वनवासप्रसंगीं गेल्याचें या माहात्म्यांत सांगितलेलें आहे, असें कै. ओक म्हणतात, त्यांपैकीं भद्रातीर्थ व पतत्रितीर्थ यांचें माहात्म्य पाहतां त्यांत तर रामाचें नांवहि आलेलें नाहीं. सध्यां जेथें भद्राचलम् हें गांव आहे, तें पूर्वीचें भद्रतीर्थ होय, व याजवळ रामाचें निवासस्थान होतें, असें कै. ओक यांना दाखवावयाचें होतें; व यासाठीं राम वनवासप्रसंगीं तेथें गेल्याचें त्यांनीं सांगून ठेविलें आहे. पतत्रितीर्थाचें माहात्म्य सांगतांना हाच प्रकार आहे. मात्र या तीर्थाचे माहात्म्यांत रामाचा संबंध आलेला नाहीं, हें त्यांच्याहि लक्षांत आलें असावें असें दिसतें. कारण या तीर्थाची माहिती देतांना कै. ओक लिहितात:—" या तीर्थाचें असें नांव पडण्याचें कारण, या ठिकाणीं जटायु व संपाति राहात होते. रामकथेशीं जटायूचा किती व कसा संबंध आहे, हें पूर्वींच आम्हीं सांगितलें आहे. *" रामायणवर्णित पात्रें जटायु व संपाति यांचा उल्लेख या माहात्म्यांत आहे हें खरें आहे; पण एवढ्यावरून रामानें तेथें निवास केला असें ठरवावयाचें म्हणजे बादरायणसंबंधाचें एक नवें उदाहरण निर्माण करावयाचें आहे. बाकीच्या तीन तीर्थांचे माहात्म्यांत राम तेथें आल्याचें मात्र सांगितलेलें आहे. पंचवटीचें स्थान यावरून कसें निश्चित करणार ?

पण या माहात्म्याचे मतें तरी या स्थानाचा निर्णय करितां येतो काय तें पाहूं. पंचवटीप्रदेश जनस्थानांत असल्याचें रामायणांत सांगितलेलें आहे. या माहात्म्यांतील जनस्थान म्हणजे सध्यांचें नाशिक होय, असें कै. ओक यांनीं सुचविलेल्या कल्पनेप्रमाणें दिसतें. कारण त्याचें वर्णन प्रारंभींच्या म्हणजे २२ व्या अध्यायांत आहे. या माहात्म्यांत त्याला " पुर " म्हटलें आहे व रामायणांत तें " अरण्य " म्हटलेलें आहे व हीच काय ती कै. ओक यांना त्यांची

* किता, पृष्ट २०

एकवाक्यता करितांना शंका आलेली आहे; पण हा भेद कालांतरानें झाला असें मानून ह्या विरोधाचा परिहार करितां येण्यासारखा आहे. या माहात्म्यांत पैशाच तीर्थाचें वर्णन सांगतांना अंजनपर्वताची माहिती आली आहे. (अ. १५) या अंजन पर्वतावर मारुतीची माता अंजना होती अशी कथा यांत सांगितली असून हा पर्वत ब्रह्मगिरीचे पार्श्वभागीं असल्याचें त्यांत वर्णन आहे. ब्रह्मगिरी नाशिकापासून जवळच त्र्यंबकेश्वरीं असल्याचें सर्वांना माहीत आहे. अंजन-पर्वतहि जवळच असून तो सध्यां त्याच नांवानें प्रसिद्ध आहे. जनस्थानाचें माहात्म्य मध्यें तीन अध्याय झाल्यावर आलेलें आहे. यावरून येथें नाशिकच विवक्षित आहे हें उघड आहे. पुढें २३ व्या अध्यायांत धूतपापनामक तीर्थाचें माहात्म्य आहे. हें तीर्थ नाशिकाजवळ गोदावरी नदींत असून सध्यांहि तें त्याच नांवानें प्रसिद्ध आहे. यावरूनहि येथील जनस्थान नाशिकहून वेगळें नाहीं, हें सिद्ध होतें. कै. ओक यांच्या कल्पनेप्रमाणें जनस्थानाचे स्थलाविषयीं वरील विवेचन केलें आहे. वास्तविक गौतमीमाहात्म्यांतील तीर्थांचीं माहात्म्यें कोणत्याच क्रमानें सांगितलेलीं नाहींत. पैशाचतीर्थाचें माहात्म्य १५ वे अध्यायांत असल्याचें वर सांगितलें आहे. त्यालाच मार्जारतीर्थ अशी दुसरी संज्ञा तेथें दिलेली आहे. पुढें ६० व्या अध्यायांत इंद्रतीर्थाचें माहात्म्य सांगतांना वरील तीर्थालाच हें आणखी नांव असल्याचें सांगून पूर्वी याविषयींचें आख्यान सांगितलें असल्याची येथें स्पष्ट नोंद केलेली आहे [ अ. ६० श्लो. ९,१० ], कै. ओकांच्या कल्पनेप्रमाणें पाहूं गेलें तर त्या दोन तीर्थांमध्यें ३००।३५० मैल अंतर येईल; ह्मणजे स्वतां या माहात्म्याचे लेखकानें तीर्थें सांगतांना कोणताहि क्रम धरिलेला नाहीं किंवा जवळजवळ असलेल्या तीर्थांचीं माहात्म्यें एकदम सांगितलीं असेंहि केलें नाहीं हें उघड आहे. सध्यां नाशिकचे पश्चिमेस गोवर्धनगंगापुर आहे तेथपर्यंत गोदावरीच्या पात्रांत एकंदर अकरा तीर्थें आहेत. यांपैकीं पैशाचीतीर्थाचे माहात्म्यानंतर क्षुधातीर्थ [अ. १६] गोवर्धनतीर्थ [अ.२२], धूतपाप किंवा पापनाशनतीर्थ [ अ. २३ ], विश्वामित्रतीर्थ [ अ. २४ ], श्वेततीर्थ [ अ. २५ ], अग्नितीर्थ [ अ. २९ ], ऋणमोचनतीर्थ [ अ. ३० ] यांचीं माहात्म्यें क्रमानें आलीं आहेत व हीं सर्व तीर्थें नाशिक व गोवर्धन गंगापुर यांमधील

सहा मैलांइतक्या प्रदेशांत आहेत. * वराहतीर्थ व कुशावर्त हीं तीर्थे ञ्यं येथें असून त्यांचीं माहात्म्यें अनुक्रमें १० व ११ या अध्यायांत आलीं आहेत. पुढें दोन अध्यायांत कुमारतीर्थ व कृत्तिकातीर्थ यांचीं माहात्म्यें असून १४ व्या अध्यायांत दशाश्वमेधतीर्थाचें माहात्म्य आहे व तें तीर्थ तर नाशिक येथें आहे. तेव्हां कै. ओकांनीं अध्यायवार तीर्थांची जी वांटणी कल्पिली आहे, ती कितपत ग्राह्य आहे, तें आतां वाचकांनींच आपल्या मनाशीं ठरवावें. राम वनवासप्रसंगीं ज्या तीर्थांवर गेल्याचें या माहात्म्यांत सांगितल्याचें कै. ओक हे ह्मणतात त्यांपैकीं दोन तीर्थांविषयीं त्यांची भूल झाल्याचें वर सांगितलें आहेच. बाकी तीन तीर्थे राहिलीं; व तेथें राम गेल्याचें वर्णन या माहात्म्यांत आहे. मात्र किष्किंधातीर्थ व सहस्रकुंडतीर्थ येथें राम गेल्याचें यांत सांगितलें असलें तरी तें वनवासप्रसंगीं नसून दोनहि तीर्थांवर नवीनच प्रसंग कल्पिलेले आहेत. सीतात्यागानंतर रामानें सहस्रपरिमित परिवारासह गौतमीतीरीं येऊन जेथें तपश्चर्या केली तेथें सहस्रकुंडतीर्थ सांगितलेलें आहे; व रावणवधानंतर परत येतांना रामानें किष्किंधावासियांसह गौतमीतीरीं जेथें मुक्काम केला तेथें किष्किंधातीर्थ सांगितलेलें आहे. तीर्थाची संज्ञा व कथा यांचा मेळ येथें कितपत आहे तें वाचकांनींच पाहावें ! रामतीर्थावर मात्र राम वनवासप्रसंगीं गेल्याचें यांत सांगितलेलें आहे. रामतीर्थाचें हें माहात्म्य ५४ व्या अध्यायांत आलें असून, त्यांत तेथें येऊन रामानें दशरथाला उद्देशून पिंडदान केलें व त्यामुळें दशरथ श्रावणवधानिमित्त नरकांत पतन पावला होता तो मुक्त झाला, अशी कथा सांगितली आहे. हें रामतीर्थ गोदेच्या मुखाकडे ह्मणजे सध्यांचे नाशिकापासून ४००।५०० मैलांवर असल्याचें कै. ओक यांनीं ठरविलें आहे. भद्रतीर्थाचें माहात्म्य ९६ व्या अध्यायांत आहे व हें तीर्थ सध्यांचे भद्राचलम् गांवाशीं असावें असें त्यांनीं अनुमानिलें आहे व तें सरळ आहे. सुमारें १०।११ अध्याय पूर्वीं किष्किंधातीर्थ व सहस्रकुंडतीर्थं यांचें माहात्म्य आहे व यावरून भद्राचलम् गांवाचे तीं समीप असावींत असें त्यांनीं अनुमानिलें आहे. सहस्र-

* नाशिक व त्र्यंबक येथील तीर्थांविषयींची माहिती रा गोंचिडे यांच्या पुस्तकावरून येथें घेतली आहे.

कुंडतीर्थाचे माहात्म्यांत सीतात्यागानंतर राम पुनः गोदावरीवर आला असा उल्लेख आहे. तेव्हां अर्थात् एकवार पूर्वी या सहस्रकुंडाजवळ राम आला होता* असा कै. ओक यांनीं तर्क केला आहे. रामायणाचें गायन होऊन कुशलवांचा रामानें स्वीकार केला व पुढें त्यांना राज्याभिषेक करण्यांत आला. इतक्यांत बिभीषणादि राक्षस व सुग्रीवहनुमत्प्रभृति वानर तेथें आले; मारुती व अंगद यांना सीतेचा त्याग रामानें केल्याचें शोध केल्यावर या वेळीं समजलें व ते

**मरिष्याव इति ह्युक्त्वा गौतमीं पुनरीयतुः ॥ ८५।२६ ॥**

" आतां मरावयाचें असें बोलून पुनः गोदावरीवर आले."

असें वर्णन या माहात्म्यांत आलें आहे. त्यांचे मागून राम गोदातीरीं गेले. राम पुनः गोदातीरीं आल्याचा उल्लेख या महात्म्यांत आहे असें जें कै० ओक म्हणतात तो हाच. येथें पुनरागमन रामाचें म्हणून सांगितलेलें नसून मारुती व अंगद यांचें आहे, हें वरील अवतरणावरून वाचकांचे सहज लक्षांत येईल. अर्थात् पुढील तर्काचा आधार आपोआप गळून पडत आहे. किष्किंधातीर्थाचे माहात्म्यांत राम लंकेतून परत येतांना तेथें उतरल्याचें वर्णन आहे व ज्या मार्गानें ते लंकेकडे गेले त्याच मार्गानें परत आल्याचें रामायणांत सांगितलें आहे. म्हणून वनवासप्रसंगीं ते तेथें गेले असावे असा कै० ओक यांनीं तर्क केला आहे. या माहात्म्यांत वाल्मीकिरामायणाचे विरुद्ध पुष्कळ विधानें आलेलीं आहेत. तेव्हां दोहोंतील कथांचा मेळ घालणें निरर्थक आहे, हें सांगावयास नकोच. मिळून या दोनहि तीर्थांवर राम वनवासप्रसंगीं गेल्याचें निश्चयानें सांगण्यासारखा आधार या माहात्म्यांत नाहीं. रामतीर्थाचें स्थान निश्चित करण्यास भद्रतीर्थाचे सांनिध्यावांचून आतां दुसरा आधार राहिलेला नाहीं.

रामतीर्थाचे माहात्म्यांत तेथें रामानें दशरथाला पिंडदान करून मुक्त केल्याची कथा आहे. या माहात्म्याचे २४ व्या अध्यायांत पितृतीर्थाचे माहात्म्यात सांगतांना पुढील श्लोक आहे:--

**यत्र दाशरथी रामः सीतया सहितो द्विज ।**
**पितॄन् संतर्पयामास पितृतीर्थं ततो विदुः ॥ २४।१ ॥**

---

* किता, पृष्ठ २२.

" येथें रामानें सीतेसहवर्तमान ( येऊन ) पितरांचें तर्पण केलें, म्हणून याला हे ब्राह्मणा, पितृतीर्थ असें म्हणतात. "

रामानें दशरथाला उद्देशून पिंडदान केल्याची जी कथा अन्यत्र आलेली आहे तीच येथें विवक्षित असावी हें उघड आहे. पितृतीर्थाचें हें माहात्म्य धूतपापतीर्थाचें माहात्म्य संपतांच आलें आहे. धूतपापतीर्थ नाशिकाजवळ असल्याचें पूर्वीं दाखविलें आहे. म्हणजे वरील पितृतीर्थ तेथून दूर नेतां येणार नाहीं व कथासादृश्यावरून रामतीर्थाहून तें भिन्न नव्हे, हें उघड आहे.

किष्किंधा तीर्थाचें माहात्म्य सांगतांना राम गोदातीरीं उतरल्यावर त्यानें वानरांना उद्देशून जें भाषण केलें त्यांत प्रथमच पुढील वाक्य आहे:—

**अस्याः प्रभावाद्धरयो योऽसौ मम पिता प्रभुः ।**
**सर्वपापविनिर्मुक्तस्ततो यातस्त्रिविष्टपम् ॥** ८८।९ ॥

" हे वानर हो, जो माझा पिता राजा दशरथ सर्व पातकांपासून मुक्त होऊन स्वर्गलोकीं निघून गेला तो (केवळ) या (गोदावरी)चा प्रभाव !"

येथें किष्किंधातीर्थाचें माहात्म्य सांगावयाचें असलें तरी रामतीर्थाहून तें दूर नव्हे असें यावरून उघड दिसतें. रामतीर्थ व पितृतीर्थ यांची एकवाक्यता पूर्वीं दाखविली आहेच. अर्थात् हीं सर्व तीर्थें नाशिकाजवळ येतात. हीं सर्व तीर्थें गोदावरींत आहेत व त्यांच्या संज्ञा नंतरच्या काळात लोकांनीं दिलेल्या आहेत हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. रामानें ज्या वेळीं वरील भाषण केलें त्या वेळीं हे तीर्थभेद झालेले नसून गोदावरी हें एकच नांव प्रचलित होतें.

गौतमीमाहात्म्यांतील रामतीर्थ जनस्थानापासून किंवा नाशिकपासून दूर असावें अशी अजूनहि ज्यांना शंका असेल त्यांनीं रामतीर्थमाहात्म्यांतील पुढील पंक्ति वाचावी. शंकराकडून रामाला वर प्राप्त झाल्यावर त्यानें पुढें काय केलें तें तींत सांगितलेलें आहे:—

**गते तस्मिन् सुरश्रेष्ठे रामोऽप्यनुचरैः सह ॥**
**गौतमी यत्र चोत्पन्ना शनैस्तं देशमभ्यगात् ॥** ५४।२१२ ॥

" सुरश्रेष्ठ शंकर निघून गेल्यावर राम आपल्या अनुचरांसह गोदावरी जेथें उत्पन्न झाली तेथें हळूहळू प्राप्त झाला. "

अर्थात् रामानें जेथ पिंडदान केलें व ज्या स्थानाला रामतीर्थ अशी संज्ञा प्राप्त झाली तें स्थान गोदावरीचे उगमापासून जवळच असलें पाहिजे. सध्यांचें नाशिक हें पूर्वीचें जनस्थान मानिलें तरच येथील वर्णनाची संगति लागणार आहे. राम आपल्या अनुचरांसह गेल्याचा येथें उल्लेख आहे व या वेळीं रामाबरोबर तर कोणीहि अनुचर–सेवक नव्हते. तेव्हां हा उल्लेख विसंगत दिसतो हें खरें; पण प्रस्तुत आमचें विवेचन पंचवटीचे स्थलनिर्णयासाठीं आहे. अर्थात् ऐतिहासिकदृष्टया सत्यासत्यतेची चर्चा करण्याचें हें स्थल नव्हे आणि पंचवटीचें स्थान कोणतेंहि ठरविलें, तरी या उल्लेखांतील विसंगतता दडावयाची नाहीं. आनंदाश्रमाचे ब्रह्मपुराणाचे प्रतींत येथें "अनुगतैः" असा पाठभेद दिलेला आहे व हा घेतला तर " मागून आलेल्या मंडळींसह " अर्थात् " जे ऋषि वगैरे बरोबर आले असतील त्यांसह " असा बोध होतो व अशा रीतीनें येथें संगति लावितां येण्यासारखी आहे. असो. राम गोदावरीचे उगमाकडे **हळू हळू** गेल्याचें येथें सांगितलें आहे. अर्थात् रामानें जेथें पिंडदान केलें, तेथून उगमस्थान दूर नव्हतें, हें उघड आहे.

रामतीर्थाविषयींची ही कथा त्र्यंबकक्षेत्रमाहात्म्याचे १९ व्या अध्यायांत संक्षेपतः आली असून त्यांत तर रामानें तेथें येऊन पिंडदान केल्याचें सांगितलें आहे. कथेचें सादृश्य पाहिलें म्हणजे गौतमीमाहात्म्याचा तो अनुवाद आहे, हें सहज लक्षांत येतें. रामानें पिंडदान केल्याचें स्थल अशा रीतीनें अनिश्चित होऊं लागलें तरी गोदावरीचे मुखापाशीं तें येत नाहीं, असें यावरून म्हणतां येतें व एवढ्यापुरताच या बाबीचा येथें उल्लेख केला आहे.

लौकिक प्रवादाकडे पाहिलें तर गौतमीमाहात्म्यांत सांगितलेलें रामतीर्थ नाशिक येथें असल्याची लोकांत समजूत आहे. सध्यां त्याला रामगयातीर्थ किंवा रामकुंड असें म्हणतात. ही समजूत दीर्घकालची असल्यामुळें ती डोळ्यांआड करितां येत नाहीं. भद्राचलंकडे पर्णशाला गांव असलें तरी रामतीर्थाचें स्थान नाहीं. गौतमीमाहात्म्याचे मतें जनस्थानाशींच रामतीर्थ होतें, हें वरील विवेचनावरून तर स्पष्ट होत आहे. पंचवटीचें नांव या माहात्म्यांत आलेलें नाहीं; तथापि ती जनस्थानांत असल्याचें आपणांस रामायणावरून कळलें आहे व तेथें

राम आल्याचें या माहात्म्यांत सांगितलें आहे, म्हणजे लौकिक समजुतीस तें पोषकच आहे. रामतीर्थाचें स्थान गोदावरीचे मुखाशीं असल्याची समजूत कै. ओक यांची झाली व जनस्थान तेथून दूर असल्यामुळें रामाचें निवासस्थान जी पंचवटी तिचें स्थान दुसरीकडे त्यांनीं मानिलेल्या रामतीर्थाचे स्थानाजवळ ठरविण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. त्यांची समजूत कशी चुकली, हें येथवर दाखविलें असल्यानें आतां तरी तीविषयीं कोणाला शंकित राहाण्याचें कारण नाहीं.

## २४ किष्किंधा.

किष्किंधा म्हणजे रामाला सीताशुद्धीचे कामीं साहाय्य करणाऱ्या सुग्रीवाचें निवासस्थान. हें स्थान पंपासरोवराचे निकट असल्याचें रामायणांत सांगितलेलें आहे. सध्यां हें स्थान त्याच नांवानें प्रसिद्ध नाहीं; तथापि विजयानगरपासून जवळच हें स्थान असल्याचा लौकिक प्रवाद आहे विजयानगरास लागून हंपी विरूपाक्ष नांवाचें क्षेत्र आहे व या क्षेत्रांतच किष्किंधा, पंपासरोवर व ऋष्यमूक पर्वत हीं दाखविण्यांत येतात. सध्यां किष्किंधेच्या स्थानीं अनागोंदी हें गांव आहे. पंपा शब्दाचेंच कानडी भाषेंत हंपी असें अपभ्रष्ट रूप झालें, असें कित्येकांचें मत आहे. मारुतीशीं रामाची जेथें प्रथम भेट झाली तें स्थान, सुग्रीवाशीं जेथें सख्य झालें तें स्थान, सप्ततालच्छेद रामांनीं केला तें स्थान; वालिवधाचें व वालिदहनाचें स्थान अशीं स्थानें तेथील लोक प्रवाशांना दाखवीत असतात. माल्यवान् पर्वत अनागोंदीपासून जवळ आहे व ऋष्यमूक पर्वत जरा दूर आहे. अनागोंदी व पंपा यांमध्यें सुमारें एक कोस इतकें अंतर आहे. किष्किंधेविषयीं असलेल्या या लौकिक प्रवादाच्या सत्यतेविषयीं निश्चय आपणांस पूर्वीप्रमाणें रामायणावरून करावयाचा आहे; यासाठीं आतां रामायणांत सांगितलेल्या रामाच्या प्रवासक्रमाकडे वळूं.

सीताशुद्ध्यर्थ राम पंचवटीहून थेट दक्षिणेकडे निघाला. सीता कोठें आहे, असा रामानें मृगांना प्रश्न केला असतां ते सर्व दक्षिणाभिमुख झाले व त्यावरून लक्ष्मणानें ती दक्षिणेकडे गेली असावी, असा तर्क केला आणि यासाठीं त्या दिशेकडे आपण जावें असें रामाला सुचविलें. (३।६४।२२) व त्याप्रमाणें ते दोघे त्या दिशेकडे निघाले सीतेच्या अंगावरील पुष्पें भूमीवर पडलेलीं होतीं

तींहि क्रमानें दक्षिणेकडे पडत गेलेलीं मार्गांत त्यांच्या दृष्टीस पडलीं व त्यावरून त्यांना आपल्या पूर्वीच्या तर्काची सत्यता पटली. जटायूची गांठ पडल्यावर त्यानें सीतेला रावणानें नेली व तो आकाशमार्गानें दक्षिणेकडे गेला असें स्वतां पाहिल्याचें सांगितलें. (३।६८।१०) सीतेचा शोध दक्षिणेकडे करावयाचा असा येथें निश्चय होऊन राम दक्षिणेकडे निघाला तो प्रथम जनस्थानापासून तीन कोसांवर असलेल्या क्रौंचारण्यांत शिरला. (३।६९।५) हें अरण्य थेट दक्षिणेकडे नसून तिकडे जाण्याकरितां तो प्रथम पश्चिमदिशेकडे गेला (३।६९।१) व मग दक्षिणेकडे वळला असें लिहिलें आहे. (३।६९।२) नंतर तो परत पूर्वेकडे वळून तीन कोसांवर असलेल्या मतंगाश्रमांत आला. (३।६९।६) प्रथम तो पश्चिमेकडे जाऊन मग पूर्वेकडे वळला असल्याचें लिहिलें आहे त्यावरून मतंगाश्रम पंचवटीच्या थेट दक्षिणेकडे असावा असें वाटतें. येथील पर्वतावरील एका दरीजवळ अयोमुखी राक्षसीचे कान व नाक कापून लक्ष्मणानें तिला पिटाळली व पुढें निघतात तोंच कबंध राक्षस त्यांना भेटला. यानें रामाला सुग्रीवाशीं सख्य संपादन करण्याची सूचना केली आणि सुग्रीव जेथें राहात होता त्या ऋष्यमूक पर्वताकडे जाण्याचा मार्ग सांगितला. त्यानें तेथून पश्चिमेच्या बाजूला जी फुललेल्या वृक्षांची झाडी दिसत आहे तिकडून पुढें जाण्यास सांगितलें. (३।७३।२) व यापुढें असेंच एक अरण्य लागेल असें सांगून पुढील मार्ग कसा चालावयाचा तें संक्षेपतः दर्शविलें आहेः—

**चंक्रमन्तौ वराञ्छैलाच्छैलं वनाद्वनम् ।**
**ततः पुष्करिणीं वीरौ पंपां नाम गमिष्यथ ॥ ३।७३।१० ॥**

"या पर्वतावरून त्या पर्वतावर व या वनांतून त्या वनांत याप्रमाणें श्रेष्ठ श्रेष्ठ पर्वत व वनें हिंडतां हिंडतां हे वीर हो, तुम्ही पंपापुष्करिणीला जाल."

येथें कबंधानें तेथून ऋष्यमूक पर्वत किती दूर आहे हें मुळींच सांगितलेलें नाहीं. तथापि मध्यंतरीं अनेक पर्वत व अरण्यें असल्याचें वर्णन केलें आहे. त्यावरून मधील अंतर कित्येक योजनें असावें, हें उघड आहे. पुढील प्रवासाला किती काल लागला याचा निर्देशहि रामायणांत नाहीं. ऋष्यमूकाकडे जावयाचें तें पश्चिम दिशेला जावयास सांगितलें आहे. तथापि पंचवटीहून दक्षिणेकडे

सहा कोस आल्यावर तेथून थेट पश्चिमेकडे जावयाचें तर मार्गांत अनेक अरण्यां-विषयीं निश्चयानें सांगतां आलें नाहीं, तरी पर्वत नाहींत हें निश्चित आहे. कारण तेथून पश्चिमेकडे सह्याद्रि हाच पर्वत आहे. आणि म्हणून ते पश्चिमेकडे गेले म्हणजे पश्चिमेच्या बाजूनें दक्षिणेकडे गेले असें मानणें भाग आहे. कबंधोपदिष्ट मार्गानें गेल्यावर ते प्रथम पंपेच्या पश्चिमतीरीं उतरल्याचें सांगितलें आहे. ( ३।७४।१ ) यावरून आमच्या अनुमानाला पुष्टिच मिळत आहे. पश्चिमेकडे थेट गेले तर प्रथम पूर्वेकडील तीर लागणें संभवनीय आहे. पश्चिमेकडे जाऊन आधीं पश्चिमतीर गांठतां येणार नाहीं. उत्तर-तीर गांठून त्या धोरणानें दक्षिणेकडे वळल्यावर पश्चिमतीर सांपडावयाचें. शिवाय तेथें जाण्यास आंखलेला मार्ग नसून तो स्वतां आंखावयाचा होता व याकरितां पूर्वतीराकडे न येतां उत्तरेकडे जाऊन मग ते दक्षिणेकडे वळले असा तर्क कर-ण्याचें काय कारण ? तेव्हां पश्चिमेच्या बाजूनें ते दक्षिणेकडे गेले अशी कल्पना करणें भाग आहे. मध्यंतरीं त्यांनीं पर्वताचे पृष्ठभागीं मुक्काम केल्याचें सांगि-तलें ( कृत्वा तु शैलपृष्ठे वासं, ३।७४।३ ) आहे. अर्थात् कबंधाचा निरोप घेऊन ते निघाले ते त्याच दिवशीं पंपातीरीं आले असें म्हणतां येत नाहीं. तेथपर्यंत येतांना मार्गांत ते पर्वताचे पृष्ठभागीं रहात असें लिहिलें आहे, पण असे मुक्काम त्यांना किती वेळां करावे लागले हें ठरविण्याचें साधन नाहीं. एकच मुक्काम असता तर तसा स्पष्ट निर्देश रामायणांत आला असता; पण तसें सांगितलें नाहीं. व तसें अनुमान करावें तर या पर्वतावरून त्या पर्वतावर व या अरण्यांतून त्या अरण्यांत चालत जाण्याचा हा एवढा दूरचा व बिकट प्रवास त्यांनीं एका दिवसांत केला, हें संभवत नाहीं. संभवनीय अनुमान करावयाचें तर तें पंचवटीच्या पश्चिम बाजूनें थेट दक्षिणेला फार दूर अंतरावर किष्किंधा आहे, असें करितां येईल. रामाला पंपा आधीं लागली व तिच्या दुसऱ्या तीरावर ऋष्यमूक पर्वत असून तेथें सुग्रीव वालीच्या भयानें रहात असे व किष्किंधा तेथून अगदीं जवळ असल्याचें रामायणांतील वर्णनावरून दिसतें. ( ४।१२।१४ व ४।१४।१ ) तर मग रामायणांतील हें अनुमान व लौकिक परंपरा यांची संगति कां लावूं नये ? आज तुंगभद्रेजवळ पंपासरोवर प्रत्यक्ष साक्ष देत असून त्याला

पुष्टि देण्यास ऋष्यमूक व माल्यवान पर्वत त्याच्या जवळ उभे आहेत. ग्रामाचें नामांतर झालें म्हणजे ऐतिहासिक कालांतील गोष्टींची साक्ष देण्यास त्याचा उपयोग पूर्वीचें नांव माहीत नसेल तर होत नसतो; पण पर्वताचें स्थलांतर होत नाहीं व येथें नामांतरहि झालेलें नाहीं. पंपासरोवराचा विशेष किष्किंधा कांड उघडतांच प्रथम दिसतो व तो त्यांत कमलें फुलून इतस्ततः पसरलेलीं असत व त्यामुळें तें अत्यंत मनोरम दिसत असे हा आहे; आणि तो अद्यापि तसाच आहे. पंपेवर तरंगणारीं कमलें प्रथम पाहतांच रामाला त्यांचें जसें कौतुक वाटलें तसें ते प्रवासी लोकांना सध्यांहि वाटल्यावांचून रहात नाहीं. किष्किंधा ही एका गुहेंत असल्याचें रामायणांत लिहिलें आहे. ( ४।३३।१ ) व सुग्रीवाला अभिषेक झाल्यावर रामानें वर्षऋतु पर्वतावरील एका गुहेंत राहून काढिल्याचें वर्णन आहे. ( ४।२६।७ ) सध्यांहि या पर्वतावर पुष्कळ गुहा आहेत. इतकें सादृश्य असल्यावर किष्किंधेचा शोध अन्यत्र कोठें करावयाचा ?

## २५ लंका.

आतां रावणाची राजधानी लंका कोणती तें पाहूं. ' रावणाचें निवासस्थान कोठें आहे हें आपणास माहीत नाहीं, तथापि तें शोधून काढून रावणाकडून सीता परत आणण्याचा प्रयत्न करूं ' असें आश्वासन सुग्रीवानें रामाला दिलें होतें व त्याला अनुसरून सीताशुद्धीकरितां त्यानें वानर पाठविले. वानरांना बाहेर पाठवितेवेळीं चार दिशांकडे जाण्यासाठीं वानरांच्या चार टोळ्यांची त्यानें योजना केली व त्यांना कोणकोणत्या भूप्रदेशांतून त्यांनीं शोध करावा त्याचें स्पष्टीकरण केलें. या निमित्तानें चारी दिशांकडील भूप्रदेशाची माहिती रामायणांत ग्रथित केली आहे. हें भूगोलवर्णन अस्थानीं व विसंगत असल्यामुळें प्रक्षिप्त आहे हें आम्ही तद्विषयक स्वतंत्र प्रकरणांत स्पष्ट केलें आहे. तेव्हां या भौगोलिक वर्णनाचे आधारानें लंकेचें स्थान ठरविणें सयुक्तिक नव्हे. हें भौगोलिक वर्णन सोडून दिल्यावर रावणाच्या लंकेचा ज्या वानरगणानें शोध लाविला ते अंगदादि कोणत्या मार्गानें कसे गेले या संबंधीं रामायणांत जें वर्णन आलें आहे त्यांत कांहीं आधार असल्यास पाहूं. अंगदादि वानर निघाले त्यांनीं प्रथम विंध्याद्रीवरील अरण्यें शोधिलीं आणि सीतेचा थांग लागेना तेव्हां " विंध्यपर्वतासंबंधीं

वनांनीं व्याप्त झालेल्या दक्षिण दिशेकडील प्रदेशांत ते हिंडूं लागले." (४।१२।१५) "पर्वतसमुदायांनीं व्याप्त झालेला दक्षिणेकडील प्रदेश शोधीत जात असतां एका विवरांत क्षुधार्त होऊन शिरले." (४।५०।१८,१९) या विवरांत अंधकारामुळें कांहीं दिसेना, परंतु तेथें एक तापसी भेटली व तिनें त्यांना विवरांतून बाहेर आणून सोडिलें.(४।५२।२९) या वेळेपर्यंत त्यांनीं दक्षिणेकडील प्रदेश शोधिला व ते फिरत फिरत समुद्रापर्यंत आले होते असें मारुतीनें तापसीला जो आपल्या कार्याचा संक्षिप्त वृत्तांत सांगितला त्यावरून दिसतें. (४।५२।९) वानरांच्या या प्रवासांत विंध्याद्रीचा उल्लेख बरेच वेळां आलेला आहे. (४।४८।२; ४।४९।२२; ४।५०।१; ४।५६।३; ४।५८।७; ४।६०।४; ४।६०।७; ४।६३।२ ) तसाच दक्षिण दिशेचा आहे (४।४९।२१;४।५०।२१;७।१५;४।५२।७;४।६०।७; ४।६४।४) दक्षिण दिशा, विंध्याद्रि व समुद्र असे तीन धागे आपल्या हातीं लागले आहेत; दिशेचा उल्लेख कशाचे तरी अपेक्षेनें असावयाचा हें सांगावयास नको. उत्तरध्रुवापासून उलट फिरल्यास सर्व दक्षिण दिशा होते व दक्षिण ध्रुवाचे अपेक्षेनें तीच उत्तर दिशा होऊं शकते. येथील दक्षिणदिशेचा उल्लेख किष्किंधेच्या अपेक्षेनें आहे हें तेथून ते दक्षिणेकडे निघाले या वर्णनावरून सहज लक्षांत येतें. पण यापूर्वीं विंध्याचे दक्षिणेकडे किष्किंधा असल्याचें आपण अनुमान केलें आहे व त्याविषयीं प्रमाणें मिळविलीं आहेत. त्याला वानरांनीं किष्किंधेहून दक्षिणेकडे येऊन विंध्यपर्वत शोधिला असें म्हटल्यानें बाध नाहीं का येणार? किष्किंधा विंध्याचे दक्षिणेकडे मानण्यांत आपल्याकडून प्रमाद झाला असें होणार नाहीं काय? रामाच्या पूर्वीचे प्रवासांत विंध्याद्रीचा स्पष्ट उल्लेख नाहीं व येथें तर तो स्पष्ट आहे, तेव्हां याची संगति कशी लावावयाची? तर प्रथमतः किष्किंधेकडे उलट शोधीत जाण्यापेक्षां येथें कांहीं भूल झाली आहे काय, तें पाहूं. विवरांत गेल्यावर तापसीला उद्देशून बोलतांना मारुती म्हणतोः—

**राजा वानरमुख्यानां येन प्रस्थापिता वयम् ।**
**अगस्त्यचरितामाशां दक्षिणां यमरक्षिताम् ॥४।५२।७॥**

" वानराधिपति ( सुग्रीव ) यानें आम्हांला अगस्त्यऋषि वास करीत अस-

लेल्या (अथवा त्यांनीं स्वीकारिलेल्या) व रामानें पालन केलेल्या दक्षिण दिशेला पाठविलें आहे."

येथील दक्षिण दिशेचा निर्देश "अगस्त्यचरितां" म्हणून केलेला असून तो महत्त्वाचा आहे. कोणताही प्रदेश दुसऱ्याचे अपेक्षेनें कोणत्याहि दिशेला येऊं शकतो हें आम्हीं वर दाखविलें आहे व यामुळें केवळ दक्षिण दिशेच्या निर्देशानें कार्यभाग होणें शक्य नाहीं. मात्र दक्षिण दिशेला "अगस्त्यचरिता" हें नांव अगस्त्याश्रमाचे उत्तरभागीं प्राप्त होण्याचें कारण नाहीं. अगस्त्याश्रम विंध्य चे दक्षिण भागीं होता व ते तर विंध्याद्रि अखंड नम्र रहावा म्हणून त्याचे दक्षिणेकडे येऊन राहिले होते. विंध्याद्रीचे दक्षिणेकडील प्रदेश तपस्विजनांला राहण्याजोगा करणें ही त्यांची मुख्य कामगिरी होती. तेव्हां येथील विंध्याद्रीचा निर्देश प्रमाण म्हणून ग्राह्य मानितां येत नाहीं. वानरांना पर्वत लागला व तो कोणता हें माहीत नसल्यामुळें तो विंध्याद्रि असें समजून ते पुढें चालूं लागले. इतकेंच नव्हे तर "नानाप्रकारचे वृक्ष व पर्वत" शोधीत ते पुढें गेले, (४।४८।३, ४) असें सांगितल्यानंतरहि विंध्याद्रीचा निर्देश वारंवार आला आहे. मार्गांत आढळलेला पर्वत त्यांना विंध्याद्रि वाटला व त्यांची जशी * समजूत झाली तशी वाल्मीकींनीं काव्यांत ग्रथित केली अशी फार तर येथें संगति लावितां येईल. वास्तविक ही कल्पना असून तिला मूळांतील आधार नाहीं. कदाचित् दक्षिणेचे टोंकापर्यंत गेलेल्या सह्याद्रीला हें दुसरें नांव असेल. म्हणजे अगस्त्यांना नम्र झालेला विंध्य व हा एक असे दोन विंध्य मानावे लागतील. कांहीं मानिलें तरी येथील विंध्यनिर्देश विसंगत आहे हें नाकारितां येत नाहीं. वानरांना दक्षिणेकडे प्रवास करितांना आढळलेला पर्वत विंध्याद्रि नसून सह्याद्रि होय असें मानण्यास आणखी एक कारण आहे. विंध्याद्रीवरील एक गुहा व वनें

---

* विंध्याद्रीचा घोटाळा प्राचीन कालींच नसून पुढील कालांतहि तसा राहिला. या घोटाळ्याविषयीं निर्देश करून कै० शंकर बाळकृष्ण दीक्षितांनीं शेवटीं "विंध्याद्रि दक्षिणेस आहे एवढ्या वर्णनावरून, दक्षिणेस येतांना पहिला पर्वत लागतो तो विंध्याद्रि, असें म्हणण्याची एकदां रूढी पडली ती पडली, असें दिसतें" असा आपला अभिप्राय दिला आहे.—

भारतवर्षीय भूवर्णन, पृष्ठ ६१.

शोधितां शोधितां ते एका विवरांत शिरले, याविषयींचें वृत्त सांगण्यापूर्वीं पुढील श्लोक आहे:—

आसेदुस्तस्य शैलस्य कोटिं दक्षिणपश्चिमाम्।
तेषां तत्रैव वसतां स कालो व्यत्यवर्तत ॥ ४।५०।२ ॥

"( शेवटीं ते ) त्या पर्वताचे नैऋत्य टोंकावर गेले आणि तेथें वास करीत असतां त्यांची ( परत येण्याची ) मुदत भरून गेली."

पर्वताचें दक्षिण व पश्चिम यांमधील टोंक येथें सांगितलें आहे व विंध्याद्रीची मांडणी पाहतां त्याला या दिशेचें टोंक संभवत नाहीं. विंध्याद्रीची ओळ ( दक्षिणेकडे कलती होत गेलेली असली तरी ) पूर्वपश्चिम आडवी आहे व म्हणून तिचें टोंक थेट पश्चिमेकडे येतें. सह्याद्रीची ओळ मात्र दक्षिणोत्तर उभी असून ती पश्चिम बाजूकडे विशेष आहे व म्हणून तिचें टोंक येथें इष्ट आहे, असें वाटतें. हें टोंक सह्याद्रीचें होतें असें मानिलें म्हणजे विवरांत गेल्यावर मारुतीनें तापसीला सांगतांना समुद्रापर्यंत दक्षिणदिशा शोधिल्याचें जें ध्वनित केलें आहे [ ४।५२।९ ] त्याची संगति लागते. हा पर्वत समुद्राचे तीरासमीप असल्याचें, तापसीनें वानरांना विवरांतून बाहेर आणिल्यावर आश्वासन देऊन जें भाषण केलें, त्यावरून व्यक्त होत आहे. "वृक्षलतांनीं युक्त असलेला हा सुंदर विंध्य पर्वत, हा प्रस्रवण आणि हा विशाल महासागर पहा" अशा प्रकारें तिनें हा पर्वत व हा समुद्र जवळ असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे (४।५२।३१)

तथापि हा समुद्र कोणता हें यावरून स्पष्ट होत नाहीं. हिंदुस्थानाला तीन बाजूंनीं समुद्र असल्यामुळें येथील समुद्र पूर्वपश्चिम या दिशांकडील कां घेऊं नये, अशी शंका येण्याचा संभव आहे. दक्षिण दिशेचा निर्देश असला तरी त्यानें सर्वांचें समाधान होईल, असें नाहीं; अशा शंकितांचें समाधान करण्याचा प्रयत्न संपातीनें आपल्या भाषणांत केला आहे. सूर्यकिरणांचे योगानें पंख दग्ध होऊन तो या शिखरावर पडला, तेव्हां त्याला सहा दिवस शुद्धि नव्हती; तदनंतर सागर, पर्वत वगैरे अवलोकन करून त्याची मति चालूं लागली व मग तो म्हणतो:—

हृष्टपक्षिगणाकीर्णः कंदरोदरकूटवान् ।
दक्षिणस्योदधेस्तीरे विंध्योऽयमिति निश्चितः ॥ ४।६०।७ ॥

" पक्षिसमूह आनंदानें फिरत असून ( या पर्वतावर ) गुहा व शिखरें ( अनेक ) आहेत, असें पाहून दक्षिण समुद्राचे उत्तरतीरावर असलेला विंध्याद्रि हा, असा माझा निश्चय झाला. "

संपातीच्या या भाषणावरून हिंदुस्थानचे दक्षिणभागीं असलेला जो समुद्र त्याचेजवळ हा पर्वत असून त्याचे शिखरावरून समुद्र दूर असल्याचें दिसत असे, हें उघड होत आहे. मात्र हा पर्वत समुद्राशीं अगदीं भिडलेला नव्हता. विंध्याद्रि या नांवामुळें घोंटाळा होत आहे, परंतु दक्षिणेकडील उदधीच्या निर्देशानें हा घोंटाळा नांवाचा असून खरा नव्हे, असें दर्शविलें आहे. 'संपातीचे तोंडून सीतेचा वृत्तांत कळल्यावर वानरांना अत्यंत आनंद झाला व ते उड्या मारीत समुद्राकडे गेले व नंतर त्या महाबलाढ्य वानरांनीं दक्षिण समुद्राचे उत्तरतीरीं तळ दिला.' ( ४।६४।४ ) याप्रमाणें पुढील वृत्तांत सांगतांना दक्षिण समुद्राचा निर्देश पुनः केला आहे. एवंच सीताशुद्ध्यर्थ गेलेले वानर हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकाला लागून असलेल्या समुद्रापर्यंत गेले, हें निश्चित होय.

लंका शोधण्याचा आतां आणखी एकच आधार राहिला आहे व तो राम वानरसेनेसह सीतेचा शोध लागल्यानंतर लंकेकडे गेले त्या विषयींचें रामायणांतील वर्णन शोधणें, हा आहे. वानरसेना निघाली त्यापूर्वी मार्ग पाहण्याकरितां पुढें नील वानर गेला ( ६।४।१० ) व त्यामागून राम व लक्ष्मण सर्व सैन्यासह दक्षिणदिशेकडे निघून गेले. ( ६।४।२४, २७, ४३, ५९ ) ही सेना जी दक्षिणेकडे गेली ती मार्गांत मध्यंतरीं बाजूला वळल्याचें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. ही वानरसेना रात्रंदिवस सारखी चालत होती व सीतेला सोडवून आणण्याच्या उत्सुकतेनें ती मध्यंतरीं एक मुहूर्तहि थांबली नाहीं. (६।४।७०—७१) कांहीं वानर वृक्ष व पर्वत यांवरून उड्या मारीत जात होते व कांहीं भूमीवरून चालत होते. ( ६।४।६५ ) लक्ष्मणानें अंगदाचे स्कंधांवर आरोहण केलें होतें असें स्पष्ट म्हटलें आहे. ( ६।४।४४ ) व त्यावरून रामानेंहि कोणातरी वानरावर आरोहण केलें असें अनुमान होतें व यामुळें वानर उड्या मारीत

चालले असतां हे त्यांबरोबर कसे चालले अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. याप्रमाणें बराच मार्ग आक्रमण केल्यावर त्यांना सह्यपर्वत प्रथम दिसला. ( ६।४।३८ ) व पुढें त्यांनीं त्यावर आरोहण केलें. ( ६।४।७२ ) मलयपर्वताचा निर्देशहि याबरोबर येथें केला आहे. ( ६।४।७३ ) महेंद्रपर्वतावर * चढल्यावर रामाला समुद्र दिसूं लागला; ( ६।४।९४,९५ ) सह्य व मलय हे ओलांडून गेल्यावर ते समद्रतीरीं आले. नंतर समुद्राचे उत्तरतीरावर नील वानरानें सर्व सेना व्यवस्थित उतरविली ( ६।५।१ ); बिभीषण लंकेंतून रामाकडे आल्याचें लिहितांना तो समुद्राचे उत्तरतीरीं आल्याचें सांगितलें आहे; ( ६।१७।१० ) व मारुती लंकेंत गेला, तो तिचे उत्तरद्वाराशीं पोंचला, ( ५।२।२२ ) असें मारुतीचे प्रवासवर्णनांत लिहिलें आहे. आणि अशा प्रकारें येथील दिशांचा मेळ अगदीं सुसंगत आहे. रामायणांतील वर दिलेल्या उल्लेखांत मध्यंतरीं अंतर किती होतें व तें वानरसेनेला चालून जाण्याला किती काल लागला, हें सांगितलेलें नाहीं. अंगदादि वानर लंकेकडे प्रथम गेले, तेव्हां त्यांना मार्गांत लागलेला विंध्यपर्वत या वानरसेनेला मुळींच लागला नाहीं व यावरून पूर्वीं सांगितलेल्या वर्णनांत कांहीं भूल आहे, यांत शंका नाहीं. सह्याद्रीचा स्पष्ट उल्लेख आहे व तो तर थेट दक्षिणेकडे गेलेला अद्यापि तसाच उभा आहे. समुद्राचा निर्देश त्याहून महत्त्वाचा आहे. वानर-

* महेंद्र पर्वताचा उल्लेख येथें व पूर्वीं मारुतीनें उड्डान केलें त्या वेळीं त्या निमित्तानें ( ५।१।१५ ) आला आहे. हिंदुस्थानचे पूर्व किनाऱ्याला महेंद्र पर्वत असल्याचें प्रसिद्ध आहे. परंतु येथील दक्षिणसमुद्राचे निर्देशावरून येथें पूर्वेकडील महेंद्र घेण्याचें कारण नाहीं. मलयपर्वताच्या एखाद्या शिखराचें हें नांव असावें. रामलक्ष्मण सह्य व मलय यांवरील नदीप्रवाह अवलोकन करीत ( ६।४।७३ ) पुढें आले व रामानें महेंद्रावर आरोहण केल्याचें ( ६।४।९४ ) व तेथून त्याला समुद्र दिसल्याचें सांगितलें आहे व याबरोबर इतर वानर सह्य व मलय ओलांडून पुढें आल्यावर त्यांनीं समुद्रतीर गांठल्याचें वर्णन ( ६।४।९६ ) आलें आहे. यावरून येथें तिसरा पर्वत सांगितलेला दिसत नाहीं. अर्थात् येथील महेंद्र म्हणजे मलयाचें एकादें शिखर होय. पूर्व तीरावरील महेंद्रपर्वत त्यांना माहीत असणार; तेव्हां सादृश्यास्तव हें नांव त्या पर्वताला त्यांनीं नवें दिलें असावें.

सेना थेट दक्षिणेकडे गेली व शेवटीं तिला समुद्र लागला. म्हणजे ती हिंदुस्थानच्या अगदीं दक्षिणटोंकाला गेली, हें उघड आहे. समुद्राचे उत्तरतीरीं सेना उतरली, असें सांगून हा समुद्र दक्षिणेकडील हें आणखी स्पष्ट केलें आहे. हिंदुस्थानच्या पूर्व व पश्चिम बाजूला समुद्र असले तरी थेट दक्षिणेकडे जाणाराला ते गांठतां येणार नाहींत व त्या समुद्रांचें उत्तरतीर संभवनीय नाहीं. येथील समुद्र इतका विशाल सांगितला आहे कीं, त्याचे उत्तरतीरावरून दक्षिणेकडे कांहीं भूप्रदेश असावा, असें दिसत नव्हतें व उलट आकाशाला समुद्र भिडल्याचा भास होत होता. ( ६।४।१९ ) सीताशुद्ध्यर्थ मारुतीनें समुद्रावरून उड्डान केलें, तो हा प्रदेश होय. रावण सीतेला घेऊन दक्षिणेकडे गेला, असें कळल्यावरून अंगदादि वानर प्रथम त्या दिशेला गेले आणि सीतेचा शोध न लागल्यामुळें निराश होऊन दक्षिणसमुद्राचे उत्तरतीरावरील पर्वतावर बसले असतां संपातीनें त्यांना रावणाची लंका कोठें आहे तें प्रथम कळविलें. संपातीनें लंकेचा पत्ता त्या वानरांना सांगितला, तो पुढीलप्रमाणें आहे:—

**अध्यास्ते नगरीं लंकां रावणो नाम राक्षसः ॥४।५८।१९॥**
**इतो द्वीपे समुद्रस्य संपूर्णे शतयोजने ।**
**तस्मिल्लँकापुरी रम्या निर्मिता विश्वकर्मणा ॥ २० ॥**

" तो रावण राक्षस लंकानगरींत रहात असून ती सुंदर नगरी येथून पूर्ण शंभर योजनांवर समुद्रांतील एका बेटामध्यें विश्वकर्म्यानें निर्माण केली आहे. "

संपाती व वानर यांची दक्षिणसमुद्राच्या उत्तरतीरीं गांठ पडली, हें वर निश्चित झालेलें आहे व यासाठीं तेथून शंभर योजनांवर समुद्रांत लंकाद्वीप असावयाचें, हें उघड आहे. सध्यां लंकाद्वीप म्हणून जें दाखविण्यांत येतें, तें वरील वर्णनाप्रमाणें हिंदुस्थानचे दक्षिणटोंकापुढें समुद्रांत आहे. मधील अंतर मात्र जमत नाहीं; पण इतर सर्व प्रमाणांचा मेळ बसल्यावर या एका मुद्यासाठीं लंकाद्वीपाचा शोध अन्यत्र करण्याची आवश्यकता आहे, असें वाटत नाहीं. ज्या कालीं रामायण लिहिण्यांत आलें, त्या कालची परिस्थिति लक्षांत घेऊन अशा वर्णनाचा मेळ हातांत मापाची सांखळी घेऊन करितां नये. दंडकारण्यांतील रामाचा प्रवास सांगतांना कित्येक स्थलांमधील अंतर निश्चित सांगितलें आहे, तर कित्येक

स्थलांतील अंतर मोघम दिलें आहे, याचें कारण याहून वेगळें नाहीं. मनुष्यांची वस्ती असल्यावांचून असें अंतर निश्चित करावयाचें कार्य कोण करणार ? तेव्हां शंभर योजनांचे अंतरावर म्हणजे पुष्कळ अंतरावर इतकाच अर्थ घ्यावयाचा आहे. शंभर ही संख्या वाचूनहि हा निर्देश मोघम केला असावा, अशी शंका येते. ग्रंथसंख्या सांगतांना एक लक्ष संख्या विशालतेची द्योतक मानितात. शतयोजनांची संगति याप्रमाणें लाविली म्हणजे झालें. लंकेची लांबी, रुंदी व घेरहि रामायणांत अंदाजानें सांगितले आहेत. अंतर शंभर योजनें सांगितलें आहे, तशी लांबी शंभर योजनें सांगितली असून रुंदी ३० योजनें सांगितली आहे. ( ७।५।२५ ) सध्यां या द्वीपाची लांबी २७० मैल असून रुंदी १४५ मैल आहे. म्हणजे रामायणवर्णित लंका सध्यांपेक्षां फार मोठी होती अशी कल्पना होते. पूर्वी मोठी असून आतां सर्व बाजूंनीं झरत गेली असें म्हणावें तर मधील अंतर रामायणांत सांगितल्याहून अधिक झालें पाहिजे होतें; पण तें तर त्याहून फार कमी आहे. तेव्हां या सर्व संख्या विशालत्वदर्शक असून याहून त्यांना अधिक महत्त्व देऊं नये हें उचित दिसतें. त्या वेळीं प्रचलित असलेल्या लोकप्रवादानुरूप हे संख्यानिर्देश केले असावेत. शिवाय प्राचीन संस्कृत वाङ्मयांत शतशब्द असंख्यातवाची म्हणून योजल्याची पद्धति पुष्कळ आढळते, तिकडेहि येथें लक्ष देणें अवश्य आहे. आणि हा अर्थ घेतला म्हणजे शंकेचें कारण राहाणार नाहीं. प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संग यानें या द्वीपाचा घेर ११६७ मैल सांगितला असून तो वास्तविक घेराचे जवळजवळ दुप्पट आहे. कित्येक ग्रीक ग्रंथांतूनहि हा घेर फार जास्त लिहिला आहे. ह्युएन हा हिंदुस्थानांत सातव्या शतकांत आला होता व त्या वेळीं तेथें बौद्धधर्मानुयायी राजाचें राज्य होतें. तो स्वतां लंकेंत गेला नसून त्यानें ऐकींव माहिती आपल्या ग्रंथांत ग्रथित केली आहे. तथापि त्या वेळच्या अनुकूल परिस्थितींतहि त्यानें केलेलें वर्णन व वस्तुस्थिति यांत फेर पडत आहे. मग वाल्मीकींनीं केलेलें वर्णन बरोबर भरलें नाहीं तर आश्चर्य कसलें ? हिंदुस्थानचे तीरावरून समुद्राचें पलीकडचें तीर दिसत नव्हतें व मध्यें नावाहि चालू नव्हत्या, असें मारुतीनें रामाला लंकेचें वर्णन करितांना सांगितलें आहे. ( ६।३।२१ )

आणि यावरून मधील अंतर रामायणांत अनुमानानें सांगितलेलें आहे, हें उघड आहे. रामायणांतील वर्णनाप्रमाणें पाहूं गेलें तर हिंदुस्थानचे दक्षिणेकडे शंभर योजनांवर समुद्रांत एकहि द्वीप नाहीं व पूर्वी असून मागाहून समुद्रांत गडप झालें असें मानण्यास ऐतिहासिक आधार नाहीं. हिंदुस्थानचे दक्षिण टोंकापलीकडे समुद्र असून त्यांत लंकाद्वीप आहे, हा मुद्दा मुख्य आहे—कारण त्यांत भूल होण्यासारखी नाहीं;—व तो सध्यांचे सिंहलद्वीपाशीं जुळतो.

## पूर्वीची लंका व सध्यांचें सिंहलद्वीप यांची तुलना.

लंका हें नांव रावणाचे राजधानीचें व त्या द्वीपाचें एकच होतें असें दिसतें. मुंबई हें ज्याप्रमाणें एका प्रांताचें व त्यांतील मुख्य नगरीचें एक नांव आहे, त्याप्रमाणेंच हा प्रकार आहे. समुद्रांतून सेतूवरून उतरून पलीकडे गेल्यावर रामानें आपल्या सैन्याचा तळ दिला व तो लंकेंत दिला. रामाचे सैन्याची टेहेळणी करण्याकरितां रावणाकडून शुक व सारण नामक दूत याच स्थलीं आले होते. लंका नगरीवर रामाचे वानरसेनेनें येथून हल्ला केला. यावरून समुद्रतीरापासून लंकाद्वीपाची हद्द लागली तरी लंका नगरी तेथून कांहीं अंतरावर होती व मध्यंतरीं सेना उतरण्यासारखी जागा होती, असें अनुमान होतें. सेनेचा तळ पडला तेथून पुढें एका पर्वताचे शिखरावर ( शैलाग्रे रचिता, ६।३।२२ ) लंका नगरी होती. नगरीची रचना किल्ल्यासारखी होती. या नगरीचे भोंवतीं चार प्रकारचे कोट होते ( ६।३।२० ) व भोंवतीं खंदक होते. कोटांपैकीं एक " नादेय " म्हणजे नद्यांचा व दुसरा " पार्वत " म्हणजे पर्वतांचा असे दोन कोट नैसर्गिक दिसतात. नगरीला चार दिशांकडे चार द्वारें असून चारी द्वारांवर रक्षणाकरितां राक्षसांची सेना नित्य सिद्ध ठेविलेली होती. नगरीचें उत्तरद्वार हिंदुस्थानाला जवळ होतें व इतर दिशांचे द्वारांजवळ द्वीपापलीकडे समुद्रच होता व बहुधा याकरितांच उत्तरद्वाराकडील संरक्षक सेना अधिक होती. ( ६।३।२४–२७ ) रामाचे वानरसेनेचा तळ सुवेलाचलाजवळ होता. ( ६।२९।२५ ) वेला हें समुद्रतीराला नांव आहे व यावरून हा पर्वत समुद्रतीरीं होता, हें उघड आहे. लंका नगरीला असलेल्या पर्वताचे नैसर्गिक कोटांपैकीं हा एक असावा. या सुवेलाचलाचे शिखराचा विस्तार रामायणांत

दोन योजनें सांगितला आहे. ( ६।४०।१ ) व तेथें वर चढल्यावर लंकानगरी रामाला अवलोकन करितां आली. अर्थात् सुवेलाचलाचे मध्यभागीं त्रिकूटाचलावर लंकेची मांडणी होती. कूट म्हणजे शिखर व त्रिकूटाचल म्हणजे तीन शिखरें असलेला पर्वत. सध्यांचे सिंहलद्वीपाची पाहणी करूं लागल्यास त्यांत यांतील कोणकोणत्या बाबी आढळतात तें आतां पाहूं.

सिंहलद्वीपाची लांबी व रुंदी वर सांगितली आहे व यावरून हिंदुस्थानांतील एकाद्या छोट्या प्रांताइतकाहि त्याचा आकार नाहीं, हें लक्षांत येईल. तथापि एका प्रांतांत ऋतुमान सामान्यपणें सारखें दिसून येतें, तसें या द्वीपांत नसून उलट अगदीं परस्परा विरुद्ध असें ऋतुमान थोडक्या अंतरावर आढळतें. याचें कारण या द्वीपाचा मध्यभाग अगदीं डोंगराळ असून त्याचे योगानें एका बाजूला पाऊस तीस इंच तर दुसऱ्या बाजूला दोनशें इंच, याप्रमाणें पडतो. या डोंगराळ प्रदेशाचे माथ्यावर सपाट मैदान असून त्यावर पुनः मध्यें उंच पर्वत आहे. या पर्वताला शिखरें तीन असून त्यांतील दोन शिखरांची उंची मात्र मिळते. तिसरें शिखर असल्याचें वर्णन आढळतें, पण त्याची उंची सांगितलेली नाहीं. यांपैकीं आदामचें शिखर ७३५३ फूट उंच असून दुसरें पेद्रोतालगला शिखर ८२९६ फूट उंच आहे. यांतील आदामचें शिखर पश्चिम बाजूला व पेद्रोतालगला शिखर उत्तरेचे बाजूला आहे व तिसरें शिखर या दोहोंचे काटकोनांत आहे. एका ग्रंथांत या शिखरांपैकीं सर्वांत उंच शिखर ८००० फुटांपेक्षां अधिक उंच असल्याचें सांगितलें आहे व अशा प्रकारचें एक शिखर वरील दोहोंपैकीं एक आहे आणि म्हणून तिसऱ्या शिखराची उंची या दोहोंच्या मानानें असावी, अधिक नसावी, असा तर्क होतो. या शिखराला किरिगालपोट्टा असें नांव असून तें उत्तरेकडील शिखरापासून सुमारें पंधरा मैल अंतरावर व पश्चिमेकडील शिखरापासून सुमारें वीस मैल अंतरावर आहे. हा डोंगराळ भाग सुमारें ७५ मैल व्यासाचा असून तो समुद्रसपाटीपासून ६००० फूट उंचीवर आहे. या भागाचे माथ्यावर मैदानांत असलेला वरील पर्वत २००० फूट उंच आहे. आणि वर उंच म्हणून सांगितलेलीं तीन शिखरें त्या पर्वताचीं होत. मधील दोन शिखरांचे बाजूंनीं गंगा आणि महाविलिगंगा

म्हणून दोन नद्या वहात असून त्यांपैकीं महाविलिगंगा ही या द्वीपावरील सर्वांत लांब नदी होय. हिची लांबी १५० मैल सांगितली असून ती पूर्वेकडे वाहात जाऊन त्रिंकोमालीजवळ समुद्राला मिळते. सिंहलद्वीपांत उत्तरेकडून प्रवेश करितांना काय दिसतें त्याची ही स्थूल रूपरेषा आहे. रामायणांतील लंकेचे वर्णनाशीं हें वर्णन तंतोतंत जुळत आहे. समुद्राचे वेलेवर रामाची वानरसेना उतरली होती व तेथून ती सुवेलाचलावर चढली. सिंहलद्वीपाचे मध्यभागीं जो डोंगराळ प्रदेश सांगितला आहे, हाच पूर्वींचा सुवेलाचल होय. सुवेलाचल चढून गेल्यावर त्रिकूटाचलीं वसविलेली लंका रामाला दिसली असें वर्णन आहे. अर्थात् सध्यांचे सिंहलद्वीपांत डोंगराळ प्रदेशाचे माथ्यावर तीन शिखरें असलेला जो पर्वत सांगितला आहे तो पूर्वींचा त्रिकूटाचल होय. त्रिकूटाचलाचे मध्यशिखरावर रावणाची लंकानगरी होती. (७।५।२३) म्हणजे वरील तीन शिखरांपैकीं किरिगालपोट्टा हें तिचें स्थान होय. दोन बाजूंनीं वाहणाऱ्या नद्या हा या नगरीचा "नादेय" आणि दोन बाजूंचीं दोन शिखरें हा तिचा "पार्वत" कोट होय. पर्वताचे कोटाची ही कल्पना इतकी नैसर्गिक आहे कीं, रामायणांतील या कल्पनेची कल्पना नसतांहि ती सध्यांचे सिंहलद्वीपाचे वर्णनांतून केलेली आढळते. × सुवेलाचलाचे शिखराचा विस्तार रामायणांत दोन योजनें सांगितलेला आहे. अर्थात् हा विस्तार म्हणजे डोंगराळ प्रदेशाचे माथ्यावर गेल्यावर मधील पर्वताचे पायथ्यापर्यंतचा भाग होय. सध्यां हें अंतर किती आहे, हें कळण्यास मार्ग नाहीं. तेव्हां आतां सादृश्याचे इतर भागांकडे वळूं.

त्रिकूटाचलाचें उत्तरेकडील शिखर—ज्याला सांप्रत आदामचें शिखर म्हणतात—त्याचे दर्शनाकरितां हजारों बौद्धधर्मानुयायी प्रतिवर्षीं येत असतात. या शिखरावरील वनश्री इतकी मनोहर आहे कीं, तिचें वर्णन करण्यास पुरेसे शब्द नाहींत, असे उद्गार तें दृश्य पाहून आलेल्या सध्यांचे लेखकांनीं* काढिले आहेत.

× "The hill country lies in the middle of the Island, walled in by a great rampart of mountains."

—British Empire Series, Vol. I. page 424.

* किस्ता, a 28.

प्रातःकालीं सूर्याचा उदय झाला असतां हें दृश्य अधिक मनोहर दिसूं लागतें आणि सूर्य तटस्थ राहून तें पहात असेपर्यंत आपणासहि तटस्थपणें तें पहात राहण्याचा मोह आवरत नाहीं. रामलक्ष्मण आणि त्यांची वानरसेना यांनीं ज्या वेळीं हा देखावा प्रथम पाहिला त्या वेळीं त्यांची स्थिति काय झाली, हें रामायणांत लिहिलें आहे आणि तें वाचलें म्हणजे पर्वतावरील ही नैसर्गिक वनश्री रामायणकालीं आपलें स्वरूप कसें होतें हें प्रत्यक्ष दाखविण्याकरितां जशाची तशी अद्यापि राहिली आहे कीं काय असा भास होतो. समुद्रतीरीं वानरसेना उतरल्यावर लंकेवर कोणीं कोठल्या बाजूनें हल्ला करावयाचा हें त्यांनीं आपापसांत ठरविलें आणि सायंकाळीं सुवेलाचलावर चढून तेथें त्या रात्रीं रहावें अशी योजना केली. या वेळीं राम अत्यंत क्रुद्ध झाला होता व अशा स्थितींत सुवेलाचलावर तो चढूं लागला. त्याचे मागून लक्ष्मणसुग्रीवादि मंडळी गेली. ते सुवेलाचलावर चढल्यावर सूर्य अस्तास जाऊन चंद्रोदय झाला. या वेळीं समोरचे त्रिकूटाचलाचा देखावा अत्यंत मनोहर दिसूं लागला व रामाचा क्रोध आणि शोक बाजूला राहून सर्व मंडळी आश्चर्यचकित होऊन गेली. (६।३९।२) "ज्यांचीं अग्रें प्रफुल्लित झालीं आहेत व लतांचें ज्यांना वेष्टन झालेलें अशा नानाविध व सुंदर वृक्षांनीं ती लंका इंद्राचे अमरावतीप्रमाणें सुशोभित दिसत होती. चित्रविचित्र पुष्पें, आरक्तवर्ण कोमल पल्लव, नीलवर्ण तृण आणि मनोहर वनराजि यांचे योगानें तिला विलक्षण शोभा आली होती. सुवासिक व अत्यंत सुंदर पुष्पें व फळें तेथील पर्वतांनीं मनुष्य अलंकार धारण करितात त्याप्रमाणें धारण केलीं होतीं. कुबेराचे चैत्ररथवनाप्रमाणें अथवा इंद्राचे नंदनवनाप्रमाणें तें वन सुंदर दिसत होतें. सर्व ऋतूंतील फळें व फुलें ( त्यांतील वृक्षांवर ) आलीं असून भ्रमरांनीं तें भरून गेलें होतें." (६।३९।५–८)

लंकेचें जें दृश्य रामाला प्रथम दिसलें त्याचें वर्णन याप्रमाणें रामायणांत आलें आहे. येथील सर्वच वर्णन रम्य असून तें वाचकांनीं मूळांतच अवश्य पहावें. कल्पना येण्यापुरतें येथें अवतरण घेतलें आहे. त्रिकूटाचलावरील सध्यांचे वनश्रीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलेलें× आहे. "शिवाय या प्रदेशांत

---

* British Empire Series. Vol. I, page 424–425.

गर्द छायेचें निबिड अरण्य असून त्यांत दोरखंडासारख्या मोठमोठ्या लतांनीं वेढिलेले महान् वृक्ष आहेत व या लतांवर चढून वानर झोंके घेत असतात. डोंगरांतील उंच प्रदेशावरील देखावा फार भव्य आहे. या प्रदेशांत फार मोठमोठे खडप, तुटलेले कडे व धबधबे असून डोंगरांच्या शिखरांवर निबिड अरण्यें व उतरणींवर तृणाच्छादित प्रदेश आहेत. या ठिकाणीं आम्रवृक्षांइतके मोठे वृक्ष असून त्यांवर लाल रंगाच्या शोभिवंत फुलांचे झुबकेच्या झुबके आलेले दिसतात." वनश्रीचें हें दृश्य हजारों वर्षें मध्यंतरीं गेल्यानंतरहि आकाशांतील दृश्याप्रमाणें अभंग राहिलें आहे, हें पाहून आश्चर्य वाटतें व तें रेखाटणाऱ्या चित्राकाराचें स्मरण होऊन अंतःकरण गुंग होऊन जातें.

सिंहलद्वीपामध्यें जंगलें दाट असून त्यांत इमारतीचें लांकूड पुष्कळ मिळण्यासारखें आहे असें सध्यांचे द्वीपाविषयीं वर्णन केलें आहे × आणि रामायणांत लंकेंतील दृश्याचें वर्णन करितांना अरण्यांत स्थूलतः दिसणारे वृक्ष प्रथम सांगितले आहेत, त्यांत "चंपक, अशोक, बकुल, साल, ताल, तमाल, नाग, हिंताल, अर्जुनवृक्ष कदंब, सांतवण, तिलक, कर्णिकार व पाडला" (६।३९।३ व ४) इतके वृक्ष आले आहेत. यांतील बहुतेक वृक्ष इमारतीचे उपयोगाचे आहेत, हें सांगावयाचें कारण नाहीं.

सिंहलद्वीपांतील पशुपक्ष्यांविषयीं सांगतांना त्यांत हत्ती, अस्वल, बिब्या वाघ, नानाजातींचे मृग, वानर व मोर पुष्कळ असल्याचें वर्णन केलें* आहे. मारुती लंकेंत गेल्यावर त्यानें अशोकवनांत प्रवेश केला, तेव्हां त्याला तेथें नानाविध पशु व पक्षी आढळल्याचें लिहिलें आहे; तथापि कोकिल, भ्रमर व मोर यांचा स्पष्ट निर्देश केला आहे. (५।१४।७–८) राम सुवेलाचलावरून लंका अवलोकन करूं लागल्याचें वर लिहिलें आहे. तेथें मोरांचा व कोकिलांचा निर्देश असून (६।३९।९, १०) पुढें अस्वलें, महिष, गज व मृग या पशूंचा निर्देश केलेला आहे. सिंहलद्वीपांतील विशेष म्हणून सध्यां प्रवास करणारे मार्मिक लेखक ज्यांविषयीं वर्णन करीत असतात त्या सर्व बाबी प्राचीन कालांतील रामायणीय वर्णनाशीं मिळत आहेत. कालांतरानें फेरफार पुष्कळ होत अस-

× किता, पृष्ठ ४२६. * Nelson's Encyclopaedia, page 411.

तात; तथापि ऋतुमान, नद्या, पर्वत हीं बदलण्याचा संभव नसतो. भूकंपादि उत्पातानें मोठी उलथापालथ होते व हा एक आक्षेप आमचे विधानावर येण्यासारखा आहे; परंतु त्याविषयीं इतिहासाचें प्रमाण मिळतें व तें मिळाल्यावर भिन्नतेविषयीं कोणी शंका घेत नाहीं.* अशा रीतीनें रामायणांतील स्थलवर्णन व लौकिक प्रवाद यांची संगति लागत आहे आणि यासाठीं रावणाची लंका सध्यांचे सिंहलद्वीपापासून भिन्न होती, असें म्हणतां येत नाहीं.

## रामाचे प्रत्यागमनाच्या मार्गाचें निरीक्षण.

राम पुष्पक विमानांत बसून सर्व मंडळींसह परत अयोध्येकडे गेले त्या वेळीं त्यांना मार्गांत कोणकोणतीं स्थानें लागलीं तीं रामायणांत सांगितलेलीं आहेत. या स्थलांचा क्रम रामायणांत पूर्वीं लंकेकडे येतांना लागलेल्या स्थलांचा जो क्रम आहे त्याचे अगदीं उलट असावयाचा, हें उघड आहे. हीं स्थलें मागील वर्णनाशीं तोलून पाहिलीं असतां त्यांतील न्यूनाधिक्य कळणार आहे. याकरितां आतां तिकडे वळूं.

विमान वर गेल्याबरोबर हीं स्थलें रामानें सीतेला दाखविलीं आहेत. प्रथम लंका व त्यानिमित्त कोणकोणते राक्षस युद्धामध्यें पतन पावले त्याचा निर्देश रामाचे भाषणांत आला आहे व पुढील स्थलांचे निर्देश विमानाचे वेगाप्रमाणें नांवापुरते आहेत. लंकेनंतर सेतु, समुद्र, बिभीषणसमागमाचें स्थान, किष्किंधा, सुग्रीवाशीं समागम जेथें झाला तो ऋष्यमूक, पंपा, शबरीची भेट झाली तें स्थान, कबंधवधाचें स्थान, जनस्थानांतील वट, जटायूचे वधाचें स्थान, पर्णशाला,

---

* प्राचीन कालच्या लंकेंतील सध्यां आढळणारा अवशेष म्हटला म्हणजे निकुंभिला देवीचें स्थान होय. रामायणकालच्या याच नांवानें तें सांप्रत प्रसिद्ध आहे. याच देवतेला उद्देशून इंद्रजितानें यज्ञ केल्याचें रामायणांत वर्णन आहे. हें स्थान कोलंबोपासून ४० मैलांवर आहे. Buddhist Text Society's journal Vol. III. part 1.

तसेंच सीतेचें नांव सीलोनमध्यें अजून जागृत आहे. सीतातलाव, सीताइला (झरा), सीताकुंड, सीतापाक अशीं स्थलें तिकडे प्रसिद्ध आहेत. नुवारएलिया येथें सीताकुंड आहे, त्याचेनजीकच सीतेला रावणानें कैदेंत ठेविलें होतें, असें सांगतात."

रा. ब. शार्ङ्गपाणी यांचा "आमचा सीलोनचा प्रवास."

( आनंद, अंक १००, पृष्ठ १२५. )

गोदावरी, अगस्त्याश्रम, शरभंगाश्रम, आश्रममंडल ( त्यांतील तापसांचा उल्लेख येथें आहे ), अत्रींचा आश्रम, विराधवधाचें स्थान, चित्रकूट, भरद्वाजाश्रम, असे निर्देश रामाचे भाषणांत आले आहेत. चित्रकूटापासून ज्या स्थलांविषयीं वर क्रमानें विचार केला आहे त्याचे उलट क्रमानें येथील निर्देश आहेत. तेव्हां पूर्वींचे निर्देशांत भूल झाली असा संशय घेण्याचें प्रयोजन नाहीं.

## मधील मार्ग.

लंकेचें स्थान निश्चित झालें आहे, तेव्हां आतां मधील मार्गाकडे वळूं. हिंदुस्थानचे दक्षिणेकडील टोंक व लंका यांमधील अंतर शंभर योजनें असल्याचें रामायणांत सांगितलें असून या शंभर योजनांचा अर्थ पुष्कळ दूरवर तें होतें इतकाच घ्यावयाचा, असें पूर्वीं दाखविलें आहे. त्या वेळीं नावांचा प्रचार होता व त्याप्रमाणें येथें त्या असावयाच्या; परंतु त्या येथें नव्हत्या व म्हणूनच पुढील सेतूचा उपाय योजावा लागला, हें उघड आहे. येथें नावा नव्हत्या, इतकेंच नव्हे, तर नावा चालण्यासारखा समुद्रांत मार्गच नव्हता. ( नौपथाश्चापि नाऽस्त्यत्र, ६।३।२१ ) असें मारुतीचे भाषणांत स्पष्ट आलें आहे. समुद्राचें पाणी विपुल असून नावा चालू नाहींत, म्हणजे पाण्यांत मधून मधून खडक असावेत, हें उघड आहे. हिंदुस्थानचे दक्षिणेकडील भागांत त्या वेळीं मनुष्यवस्ती नव्हती. नाहीं म्हणावयास मारुतीप्रभृति वानरांना एका विवरांत तापसी भेटल्याचें ( ४।५०।३९ ) व महेंद्र पर्वतावरून मारुती उडी मारूं लागला असतां तेथील तपस्वी व विद्याधर त्रस्त होऊन गेल्याचें ( ५।१।२२ ) वर्णन आहे. लंकेंत वस्ती होती, परंतु तिचा समुद्रापलीकडील हिंदुस्थानाशीं कांहीं संबंध दिसत नाहीं. रावण सीतेचा अपहार करण्याकरितां इकडे आला व परत गेला, असें रामायणांत लिहिलें आहे; परंतु तो मधील समुद्रांतून कसा गेला व आला, हें मुळींच सांगितलेलें नाहीं. तो लंकेंतून बाहेर पडतेवेळीं रथांत बसून निघाल्याचें वर्णन ( ३।३५।४ ) आहे; परंतु तो समुद्राचे पार कसा झाला, हें कळण्यास मार्ग नाहीं. सीतेला त्यानें उचलिली व नेली; पण ती आकाशमार्गें नेली, असें स्पष्ट सांगितलें आहे. ( ३।४९।२३ व ३।५२।३१ ) रावणाचे वाहनाचा निर्देश येथें केला नसला तरी तो आकाशमार्गानें गेल्याचें सांगितलें आहे.

त्यावरून तो विमानांतून गेला असावा, असें वाटतें. रावणवधानंतर राम येत असल्याचें वर्तमान कळविण्यासाठीं रामाकडून भरताकडे मारुती पुढें गेला, त्यावेळीं त्यानें भरताला वनांतील रामाचा जो वृत्तान्त निवेदन केला, त्यांत रावणानें सीतेला पुष्पकांतून नेल्याचें सांगितलें आहे. ( ६।१२०।२९ ) अर्थात् त्याविषयीं आतां अनुमान करण्याचें कारण नाहीं.

बिभीषण रामाकडे येऊन मिळाला तेव्हां तोहि आकाशमार्गानें आल्याचें वर्णन ( ६।१७।२ ) आहे. अर्थात् समुद्रांतून जाण्याचे साधनाची त्यांना अपेक्षा नव्हती. तेव्हां हिंदुस्थानांतून लंकेंत समुद्र ओलांडून जाण्याचा प्रश्न रामापुढेंच प्रथम पडला, असें दिसतें. तेथून नावा जाण्यास मार्ग नसल्यामुळें त्यानें हा सेतूचा मार्ग स्वीकारला. रामाचे सेतूसंबंधीं असलेल्या दंतकथेंत तथ्य नसल्याचें पूर्वीं सांगितलें आहेच. मधील समुद्र शंभर योजनें असल्याचें सांगितल्याप्रमाणें या सेतूची लांबीहि तितकीच सांगितली असून रुंदी दहा योजनें सांगितली आहे.(६।२२।७३) रामायणांतील वर्णनावरून पाहतां समुद्रांतील खडकांचा आधार धरून त्यांवर वानरांनीं हा सेतु म्हणजे सांकव बांधला असें दिसतें. मोठमोठे वृक्ष व पर्वत त्यांनीं आणिले, परंतु ते आंत टाकून समुद्रांत स्थिर राहणें शक्य नाहीं. वृक्ष वगैरे त्यांनीं दोरांनीं बांधून स्थिर केले असावे असें वाटतें. (६।२२।५९) मोठमोठे पर्वत व शिला त्यांनीं यंत्रांचे साहाय्यानें समुद्रापर्यंत आणिल्या. (६।२२।५७) येथील वर्णनावरून हीं यंत्रें म्हणजे सध्यांची यारी असावी. हा सेतु वानरांनीं पांच दिवसांत बांधून पुरा केला. सध्यां या स्थानीं तसाच खडकाळ समुद्र असून पाण्याची खोली फार नाहीं. समुद्राचे या स्थितीकडे पाहिलें तर सेतुबंधाला हें स्थान युक्त दिसतें. लंकेची कल्पना अन्यत्र केल्यास समुद्राची अशा प्रकारची स्थिति दुसरीकडे नाहीं. सेतूच्या वरील स्वरूपाकडे पाहिलें असता तो वानरसेना लंकेंत गेल्यावर दीर्घकाल तसाच टिकून राहणें शक्य दिसत नाहीं. वृक्ष आपोआप नष्ट होऊन शिला तेवढ्या रहावयाच्या, हें उघड आहे. रामानेंच धनुष्यानें सेतु भग्न केला अशी कथा पुराणांतरीं आहे व ती या स्थितीस अनुसरूनच आहे. सध्यां तेथें रामाचे सेतूचें स्थान दाखविण्यास मोठमोठे खडक व शिला अद्यापि आहेत. रामेश्वरास जाण्याकरितां जो मोठा

पूल सध्यां बांधलेला आहे त्याचे दोहों बाजूस समुद्रांत मोठमोठाले दगड सध्यां दिसतात व हा सेतूचा अवशेष असावा. एकंदरींत मधील समुद्राची ही स्थिति रामायणांतील वर्णनाशीं जुळती आहे.

रामायणांतील लंका व सध्यांचें सिंहलद्वीप यांची तुलना करून पाहातां दोहोंमध्यें सर्व प्रकारें सादृश्य दिसत आहे. विरुद्ध बाजू एकादी आहे किंवा काय व तिची संगति लावितां येण्यासारखी आहे किंवा नाहीं, हें आतां पाहूं. रामायणांत मारुतीनें समुद्रावरून उडी मारिली तेव्हां सोयीसाठीं म्हणून तो महेंद्रपर्वतावर चढल्याचें ( ४।६७।४० ) व राम वानरसेनेसह येथें आला त्या-वेळीं त्यानेंहि त्यावर आरोहण केल्याचें वर्णन आहे. ( ६।४।९४ ) वानर-सेना या वेळीं वेलावनांत उतरली होती. म्हणजे महेंद्रपर्वत, त्यापुढें वेलावन व त्यापुढें समुद्र अशी स्थिति होती. तसेंच लंकेच्या उत्तरभागीं वेला व त्यापुढें सुवेलाचल सांगितला आहे. रामायणांतील वर्णनावरून महेंद्रपर्वत व समुद्र यांमध्यें फार अंतर दिसत नाहीं. सध्यां रामाचा सेतु म्हणून जेथें दाखवितात तेथून महेंद्रपर्वत तर फार दूर आहे. या दोहोंची संगति लावावयाची तर महेंद्र पर्वतापासून त्याचे पूर्वेच्या बाजूनें सेतूला प्रारंभ झाला असावा अशी कल्पना केली पाहिजे. सध्यां येथील समुद्र बराच उथळ आहे व तो रामेश्वराचे बाजूला अधिक उथळ होत गेला आहे. या बाजूनें सेतु बांधून वानरसेना त्यावरून लंकेंत गेली असें मानिल्यानें महेंद्रपर्वत समुद्रापासून दूर होत नाहीं व लंकेच्या थेट उत्तरेकडे सुवेलाचलापर्यंत मध्यंतरीं सपाट मैदान लागल्यामुळें समुद्रापासून सुवेलाचल फार दूर वाटतो तोहि अनवस्था प्रसंग टळेल, असें वाटतें. सध्यां तेथें सेतु नाहीं ही काय ती अडचण आहे. परंतु जेथें तो सध्यां आहे तेथें तरी संपूर्ण कोठें आहे? रामेश्वराचे बाजूला सेतूचा अवशेष आहे, व त्यावरून बाकीचा नष्ट झाला असें आपण अनुमानितों. त्याप्रमाणेंच इकडील सेतूविषयीं कां अनुमानूं नये? हिंदुस्थानचे दक्षिणेकडील पूर्व किनाऱ्याला जर पर्वत असेल तर मात्र वरील अनुमान करून संगति लावण्याचा यत्न करण्याचें कारण नाहीं, हें सांगावयास नको.

भरतखंड व लंका यांमधील मार्गाविषयीं प्रसिद्ध ज्योतिर्विद् रा. रा. वेंकटेश बापूजी केतकर यांनीं एक कल्पना सुचविली आहे, तीहि विचार करण्यासारखी आहे; त्यासाठीं ती येथें नमूद करितों.× ते म्हणतात, “ मला वाटतें फार प्राचीन कालीं रामेश्वरापासून सिंहलद्वीपापर्यंत सेतूसारखा पायरस्ता होता व तो समुद्राच्या धडाक्यानें जेथें तेथें थोडा धुपून गेला होता; तो मात्र रामाच्या सैन्यानें दुरुस्त केला. हा सेतु ह्याच कारणामुळें हल्लीं बहुतेक नाश पावून समुद्राखालीं खडकाच्या रूपानें व बेटांच्या रांगेच्या रूपानें हल्लीं देखील व्यक्त आहे. ”

## लंकेचें स्थान—मालदीव, जावा, अंदमान वगैरे

रामायणांत हिंदुस्थानचे दक्षिणतीरापासून लंकेपर्यंतचें अंतर शंभर योजनें सांगितलें आहे व मालदीव हें प्राचीन लंका मानिल्यास या एका बाबीपुरती संगति लागते; पण रामायणवर्णित इतर सर्व बाबींची संगति लागली पाहिजे, याची वाट काय? या बेटांची लांबीरुंदी रामायणांतील वर्णनाशीं मिळत नाहीं. यांतील एकहि बेट समुद्राचे सपाटीपासून २० फुटांहून अधिक उंच नाहीं. तेथील हवा चांगली नाहीं. * त्यांत तीन शिखरांचा पर्वत नाहीं. मग केवळ मधील अंतर जमतें म्हणून प्राचीन लंका तेथें आणतां येईल काय? प्राचीन ग्रंथांत मलयद्वीपाची गणना केलेली आढळते व तें हें असावें असें नांवावरून दिसतें. बाकी सांप्रतचें मालदीव ही पूर्वीची लंका असावी अशी कल्पना सध्यां नव्यानें उत्पन्न झाली आहे असें नसून ती जुनीच आहे. वायुपुराणांत पूर्वार्धामध्यें भुवनविन्यास नामक जो ( ४८ वा ) अध्याय आहे त्यांत ही कल्पना स्पष्ट लिहिली आहे. पुढील अवतरण पहाः——

**तथैव मलयद्वीपमेवमेव सुसंवृतम् ॥ २० ॥**
**तत्र श्रीमांस्तु मलयः पर्वतो रजताकरः ॥२२॥**
**द्वितीयं मन्दरं नाम प्रथितं च सदा क्षितौ ।**
**अगस्त्यभवनं तत्र देवासुरनमस्कृतम् ॥२३॥**
**नानापुष्पफलोपेतं स्वर्गादपि विशिष्यते ।**

---

× केरळ कोकिल, वर्ष १३, अंक ४ ( एप्रिल १८९९ ) पृष्ठ ९२.

* नेलसनचा एन्सायक्लोपीडिआ, पृ. ७६ पहा.

**तत्रावतरते स्वर्गः सदा पर्वसु पर्वसु ॥२५॥**
**तथा त्रिकूटानिलये नानाधातुविभूषिते ॥२६॥**
**तस्य कूटतटे रम्ये हेमप्राकारतोरणा ॥२७॥**
**शतयोजनविस्तीर्णा त्रिंशदायामयोजना ।**
**नित्यप्रमुदिता स्फीता लंकानाम महापुरी ॥२८॥**
**सा कामरूपिणां स्थानं राक्षसानां महात्मनाम् ।**
**आवासो बलदृप्तानां तद्विद्याद्देवविद्विषाम् ॥**
**मानुषाणामसंबाधा ह्यगम्या सा महापुरी ॥ २९ ॥**

हें लांबलचक अवतरण पुढील तुलना वाचकांना कळण्यास सुलभ पडावें या हेतूनें घेतलें आहे. "मलयद्वीपांत मलयपर्वत असून त्यावर अगस्त्याश्रम आहे. हा स्वर्गाहूनहि सुंदर असून येथें पर्वापर्वाचे ठिकाणीं प्रत्यक्ष स्वर्ग अवतरत असतो. ( या द्वीपांतील दुसरा पर्वत ) त्रिकूटाचल याचे एका शिखरावर राक्षसांची लंकानामक नगरी असून तिकडे माणसांना जातां येत नाहीं." इतकी माहिती यांत सांगितली आहे. साग्र भाषांतराची तादृश्य आवश्यकता नसल्यामुळें दिलें नाहीं. यापुढें या द्वीपाचे पलीकडे पूर्वतीरावर गोकर्ण क्षेत्र असल्याचें स्पष्ट लिहिलें आहे आणि यावरून वरील मलयद्वीपशब्दानें सध्यांचें मालदीव अभिप्रेत असल्याचें स्पष्ट दिसून येतें. आतां किष्किंधाकांडांतील सुग्रीवाचे तोंडीं भूगोलवर्णन आहे, त्यांतील पुढील श्लोक पहा:—

**ततः समुद्रमासाद्य संप्रधार्यार्थनिश्चयम् ।**
**अगस्त्येनान्तरे सत्र सागरे विनिवेशितः ॥४१।१९॥**
**चित्रसानुनगः श्रीमान् महेन्द्रः पर्वतोत्तमः ॥**
**जातरूपमयः श्रीमानवगाढो महार्णवम् ॥२०॥**
**नानाविधैर्नगैः फुल्लैर्लताभिश्चोपशोभितम् ॥२१॥**
**तमुपैति सहस्राक्षः सदा पर्वसु पर्वसु ॥ २२ ॥**
**द्वीपस्तस्यापरे पारे शतयोजनविस्तृतः ।**
**अगम्यो मानुषैर्दीप्तस्तं मार्गध्वं समंततः ॥ २३ ॥**
**स हि देशस्तु वध्यस्य रावणस्य दुरात्मनः ॥ २४ ॥**

वायुपुराणांतील पूर्वी अवतरिलेलें व वरील रामायणांतील अशीं दोनहि वर्णनें जवळजवळ एक आहेत. वायुपुराणांत पर्वताचें नांव मलय आहे तर रामायणांत महेंद्र आहे. वायुपुराणांतील लंका मलयावरील त्रिकूटाचलावर आहे तर रामायणांतील स्वतंत्र द्वीपांत सांगितली आहे. वायुपुराणांत स्वर्ग अवतरत असल्याचें सांगितलें आहे तर रामायणांत त्याचे स्थानीं इंद्राचें नांव आहे. हे भेद बाजूला ठेविले तर बाकी सर्व वर्णन अगदीं एक आहे. रामायणांतील हा भाग प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. रामायणांत लंकापुरी व लंकाद्वीप यांचा अभेदानें व्यवहार केला आहे व वायुपुराणांतील लंकापुरी मलयद्वीपांत सांगितली आहे. रामायणांत मलयद्वीपाचें नांवहि आलेलें नाहीं. लंकापुरीचें वर्णन करितांना लंकाद्वीपाचा स्पष्ट व भिन्न निर्देश नसला तरी द्वीपाच्या भिन्न नांवांचा निर्देश त्यांत नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे; आणि अर्थात् यावरून द्वीपाचें नांव भिन्न नव्हतें, हें उघड आहे. लंकाद्वीप व लंकानगरी हीं भिन्न मानून रामायणांत वर्णन केलेलें नाहीं. लंकाद्वीपाचें वर्णन लंकापुरी किंवा लंका असें मोघम नांव घेऊन केलेलें आहे. आणि म्हणून त्यांत सांगितलेली लांबीरुंदी द्वीपाची समजावयाची आहे. सुग्रीवाच्या वर अवतरिलेल्या भाषणांत ( ४।४१।२३ ) द्वीपाचा स्पष्ट निर्देश करून तें " शतयोजनविस्तृत " असल्याचें सांगितलें आहे व यावरून हा भाग आमचे मतें प्रक्षिप्त असला तरी रामायण वाचून प्रक्षेपकाची त्याविषयीं झालेली भावना त्यांत व्यक्त झाली आहे व ती आमच्या वरील अनुमानास पोषकच आहे. वायुपुराणांतील प्रक्षेपकाची भावनाहि अशी होती व तीस अनुसरून त्यानें मलयद्वीपांतील लंका नगरीचा म्हणून तितकाच विस्तार सांगितला आहे. मात्र पूर्वींचें मलयद्वीप किंवा सध्यांचें मालदीव ही पूर्वींची लंका असल्याची त्याची कल्पना होती व तदनुरूप त्यानें वरील वर्णन केलें आहे; परंतु त्यानें मलयद्वीपांत लंका असें स्पष्ट सांगून शोधकांचा मार्ग मोकळा ठेविला आहे. गोकर्ण क्षेत्राचे समोर समुद्रांतील द्वीपांत लंका, असा द्वीपाचें नांव न घेतां त्यानें निर्देश केला असता, तर मालदीव हीच पूर्वींची लंका असा संशय घेण्यास कारण झालें असतें; परंतु मलयद्वीपांत लंका असें त्यानें वर्णन केलें व तें रामायणाचे विरुद्ध असल्यामुळें

आतां संशयसुद्धां घ्यावयास नको, असें झालें आहे. वायुपुराण व्यासांनीं केलेलें, व त्यांत श्रीकृष्णापर्यंत उल्लेख आहेत. तेव्हां महाभारतांत वर्णन केल्याप्रमाणें रामसेवक बिभीषणाचें राज्य तेथें असावयाचें; असें असतां वायुपुराणांत देवांचा द्वेष करणारे राक्षस तेथें राज्य करीत असल्याचें सांगितलें आहे. हें तर उघड उघड विसंगत आहे.

सध्यांचें मालदीव हेंच पूर्वीचें मलयद्वीप असून रावणाची लंका नगरी ह्यांत होती अशी कल्पना अलिकडे रा. रा. विष्णु हरी वडेर यांनीं विशेष पुढें आणिली आहे. याविषयीं त्यांचे लेख "चित्रमय जगत्" जानेवारी १९२३ व "The Indian Historical quarterly" (June 1926) यांत आले आहेत. वायुपुराण व रामायण यांमधील भूगोलवर्णनांतील सादृश्यच त्यांनीं प्रमाण म्हणून पुढें केलें आहे, व त्यांचे वरील लेख पाहूनच आम्हांला दोनहि ग्रंथ ताडून पाहण्याची स्फूर्ति झाली, हें आम्ही येथें प्रांजलपणें नमूद करून ठेवितों. मात्र वरील सादृश्यावरून त्यांनीं काढिलेला सिद्धांत, दोनहि ग्रंथांतील तुलनाविषयक भाग प्रक्षिप्त असल्यामुळें चुकला आहे. पूर्वेकडील समुद्रांतील जावा बेट ही लंका असावी असें कोणी म्हणतात. पण प्राचीन कालांतील यवद्वीपाचा अपभ्रंश होऊन सध्यांचें नांव प्रचारांत आलें, असें नांवावरूनच दिसतें. जावामध्यें ज्वालामुखी पर्वत १२५ आहेत असें म्हणतात. हे ज्वालामुखी सध्यां जिवंत आहेत असें नाहीं, तथापि या प्रदेशाचा विस्तार पाहातां त्यांनींच सर्व प्रदेश व्यापिल्याचें दिसून येतें. लंकेंतील वर्णनांत एकाहि ज्वालामुखीचें वर्णन नाहीं. जावाचा दक्षिणेकडील प्रदेश उंच व उत्तरेकडील सखल आहे व मधील भाग सर्वांत लहान आहे. लंकेचा उत्तर भाग सखल आहे, पण मधील भाग फार उंच–डोंगराळ आहे. जानेवारी, फेब्रुवारी व मार्च या महिन्यांत येथें पाऊस पडतो. परंतु ही स्थिति रामायणांतील लंकावर्णनाशीं मिळत नाहीं. रावणवधानंतर बिभीषणाला लंकेच्या सिंहासनावर बसवून राम पुष्पकविमानांतून चैत्रमासाचे प्रारंभीं अयोध्येंत आल्याचें रामायणांत लिहिलें आहे. अर्थात् रावणवधाचे वेळीं लंकेंत पावसाळा जोराचा असण्याचा संभव होता; पण लंकेंत त्या वेळीं पावसाचें नांवहि दिसत

नाहीं. रामायणांतील वर्णनें पाहतां लंकेंतील ऋतुमान हिंदुस्थानाप्रमाणें दिसतें. लंकेंत हत्ती पुष्कळ असल्याचें रामायण सांगतें, तर सध्यांचे जावाचे वर्णनांत हत्तीचें नांव ऐकूं येत नाहीं. जावामध्यें पोपटाप्रमाणें बोलणारा एक पक्षी आढळतो, त्याचें वर्णन रामायणांत नाहीं. अशा प्रकारें जावा आणि लंका स्वभावतांच भिन्न दिसतात. अंदमान व निकोबार या बेटांसंबंधानें हीच स्थिति आहे. अंदमानाचे सुंदर ऋतुमानाचें वर्णन बॅ. सावरकर यांनीं आपल्या बंदीगृहांतील वृत्तांत सांगण्याचे निमित्तानें केसरींतून प्रसिद्ध केलें आहे व सरकार तेथें वस्ती करून राहणारास सवलती देत असतांहि कोणी तिकडे जाण्याचें साहस करीत नाहीं व काळ्या पाण्यावरचे कैदी तेथें ठेवण्यांत येत असल्यामुळें कैद्यांचीच ती एक वसाहत होऊं पाहात आहे. यावरून विलासी रावण स्वतां होऊन काळ्या पाण्यावरची ही शिक्षा अनुभवण्याचें पत्करील काय, तें वाचकांनींच ठरवावें ! निकोबारला तर पाणीहि स्वच्छ नाहीं. यांतील प्रदेश डोंगराळ आहे तरी सर्वांत उंच डोंगर २००० फुटांचे मानानें उंच आहे. या बेटाचा दक्षिण भाग उंच आहे, तो तर लंकेशीं मुळींच मिळत नाहीं. *

ऑस्ट्रेलिया ही पूर्वीची लंका मानण्याची कल्पना तर कोठल्याच बाजूनें जमत नाहीं. लंकेचा रामायणांत जो विस्तार सांगितला आहे त्या दृष्टीनें संगति राखण्याकरितां ही कल्पना पुढें आलेली आहे; पण मधील समुद्राचें अंतर त्यामुळें फार वाढलें आहे. कोणतीहि कल्पना घेतली तरी तीवर कोणता तरी आक्षेप येणारच. परंतु इतर सर्व बाबींची संगति लागली असतां एकादी गौणबाब क्षम्य म्हणून सोडून देतां येते. वरील सर्व कल्पनांपैकीं एकहि कल्पना अशा प्रकारची नाहीं. प्रत्येक कल्पना रामायणांतील एखाद्या स्थलीं सांगितलेल्या वर्णनाशीं मिळते; पण तिचे विरुद्ध प्रमाणें अनेक असतात. तेव्हां अशा कल्पनांविषयीं अधिक विचार करण्यांत अर्थ काय ?

## भूमध्यरेषेवरील लंका.

रामायणांतील लंका सांप्रतच्या सिंहलद्वीपाहून भिन्न मानण्याकडे कित्येकांची

---

* वरील सर्व माहिती डॉ. केतकर यांचे ज्ञानकोशांतून घेतली आहे.

जी प्रवृत्ति आहे तिला आमचेकडील प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य यांचा एक उल्लेख कारण झाला आहे. भास्कराचार्यांनीं भूगोलाचें वर्णन करितांना लंका-ही भूमध्यरेषेवर ( लका कुमध्ये । ) असल्याचें सांगितलें आहे. भूमध्यरेषा उज्ज-नविरून धरण्याची इकडची पद्धति आहे व तीस अनुसरून लंकेचें स्थान भूमध्य-रेषेवर शोधावयाचें म्हणजे रामायणांतील लंका सध्यांचे सिंहलद्वीपाचे पश्चिमेस येणें साहजिक आहे. सिंहलद्वीपाचे पश्चिमेला भूमध्यरेषेवर पाहूं गेलें तर सध्यां तेथें एकहि द्वीप नाहीं. तेव्हां पूर्वींची लंका समुद्रांत कोठें तरी गडप झाली असावी, असें कित्येकांनीं अनुमान केलें आहे. वास्तविक भास्कराचार्यांच्या वरील उल्लेखावरून, लंकेविषयीं त्यांची तशी समजूत होती असें म्हणतां येईल; याहून त्याला अधिक महत्त्व देतां येत नाहीं. रामाचा सेतु तर पूर्वेच्या बाजूनें आहे व समुद्रहि त्या बाजूनें उथळ आहे. पश्चिमेकडील समुद्र खोल असून त्या बाजूनें सेतु बांधणें संभवनीय दिसत नाहीं. दुसरें असें कीं, भास्कराचा-र्यांचे वरील उक्तीवर लंकेचा प्रश्न सोडविणें उचित नव्हे. प्रसिद्ध ज्योतिर्विद् रा. रा. वेंकटेश बापूजी केतकर यांनीं तर भास्कराचार्यांचे ग्रंथांतील स्थलां-विषयींचे कित्येक उल्लेख काल्पनिक आहेत, असें स्पष्ट सांगितलें आहे. "आचा-र्यांनीं पृथ्वीच्या गोलाकारामुळें भिन्नभिन्न स्थानीं सूर्यादिकांचे उदय, मध्य व अस्त एकाच क्षणीं निरनिराळे असतात हें दाखविण्यासाठीं पृथ्वीच्या पाठीवर ९०°–९०° अंशांच्या अंतरावर कांहीं स्थलें कल्पिलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं सत्याजवळ व कांहीं निव्वळ काल्पनिक आहेत. रोम व लंका हीं पहिल्या वर्गां-तील, सिद्धपूर व केतुमाल हीं दुसऱ्या वर्गांतील. याच श्लोकाच्या आधारानें सांप्रतचें रोम हें रोम नव्हे तर उज्जयिनीच्या पश्चिमेस ९०° अंशांवर पूर्वी दुसरें खरें रोम होतें व तें आतां नाहींसें झालें आहे, असें कोणी म्हणेल तर शोभेल काय?*" तेव्हां भास्कराचार्यांचे उल्लेखावरून ज्याप्रमाणें रोमचें स्थान बदलतां येणार नाहीं, त्याप्रमाणें लंकेच्या बाबींत समजावयाचें आहे.

पण भास्कराचार्यांच्या उक्तीची संगति लावण्याचा प्रयत्न प्रसिद्ध ज्योतिर्विद् कै० जनार्दन बाळाजी मोडक यांनीं "भास्कराचार्य आणि तत्कृत ज्योतिष"

* केरळकोकिळ, वर्ष १३, अंक ४ (एप्रिल १८९९) पृ. ९२.

या नांवाचें एक लहानसें पुस्तक लिहून त्यांत केला आहे. त्यांतील कांहीं अवतरणें येथें दिल्यानें या विषयाची दुसरी बाजू ज्ञात्यांपुढें येणार आहे. यासाठीं तीं अवतरणें येथें देतों.

पृ० १७. "लंका कुमध्ये। अर्थः--(भूमध्यवृत्तावर) मध्यभागीं लंकानगर. टीपः-सांप्रत सिंहलद्वीपांत जें क्यांडी शहर आहे तेथेंच पूर्वीं लंकानगर होतें."

पृ० २३. "निरक्षदेशात् क्षितिषोडशांशे भवंदवंती गणितेन यस्मात्। अर्थः–विषुववृत्तापासून सोळावे अक्षांशावर उज्जनी शहर आहे. टीपः-सांप्रत उज्जनी शहर २३° अंशावर आहे; परंतु प्राचीन भरतखंडस्थ ज्योतिषी विषुववृत्त लंकापुरींतून म्हणजे सिंहलद्वीपांतील सांप्रतच्या क्यांडी शहरांतून जातें असें मानीत; त्यामुळें तेथून उज्जनीचें अंतर १३° च अंश भरे. कारण क्यांडी शहराचे अक्षांश सात आहेत. ते वजा जाऊन २३° तून बाकी सोळाच राहात."

पृ० २४. "यल्लंकोज्जयिनीपुरोपरिकुरुक्षेत्रादिदेशान् स्पृशत्, सूत्रं मेरुगतं बुधैर्निगदिता सा मध्यरेखा भुवः॥ अर्थः–लंकापुरी, उज्जनी व कुरुक्षेत्रादि देश यांतून जाऊन उत्तरध्रुवास मिळणारें जें वृत्त त्यास भूरेखा किंवा पहिलें याम्योत्तरवृत्त विद्वान् म्हणतात. टीपः-क्यांडी शहराचे पूर्वरेखांश ८१° व उज्जनीचे ७६° आहेत. यावरून प्राचीन ज्योतिष्यांनीं कल्पिलेलें याम्योत्तर जरा तिर्कस होतें हें वाचकांचे लक्षांत येईल."×

लंकेचें स्थान निश्चित करितांना भास्कराचार्यांच्या ग्रंथांतील उल्लेख पुष्कळ वेळां संदेह उत्पन्न करितो व यासाठीं ज्योतिःशास्त्रांतील दोघां पंडितांचीं मतें आम्हीं वर दिलीं आहेत. यांतील कोणत्याहि रीतीनें संगति लाविली तरी लंकेचें स्थान सध्यांचे सिंहलद्वीपाहून अन्यत्र शोधावयाचें कारण नाहीं, हा मुद्दा दोहोंकडे सारखाच आहे.

---

× कै० मोडक यांचें मूळ पुस्तक आम्हीं पाहिलेलें नाहीं. पंचवटीसंबंधीं कै० वामन दाजी ओक यांनीं कै० श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर यांना उत्तर देण्याच्या निमित्तानें काव्यसंग्रहमासिकाचे द्वारा जी चर्चा केली तींत त्यांनीं वरील अवतरणें दिलेलीं आहेत व तींच आम्हीं येथें जशाचीं तशीं उद्धृत केलीं आहेत. त्या वेळींहि तें पुस्तक दुर्मिळ झालें असल्याचें त्यांनीं लिहिलें आहे. –काव्यसंग्रह पुरवणी, फेब्रुवारी १८९६, पृ० ३–४.

## मध्यहिंदुस्थानांत लंका.

इंदूर येथील प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे-साहेब यांचें लंकेविषयीं एक लहान पुस्तक प्रसिद्ध झालें असून त्यांत लंका व त्यानिमित्त किष्किंधा कोठें आहे याचा विचार केला आहे. मद्रास येथील इंडियन रिव्ह्यूचे सन १९१४ चे आगस्टचे अंकांत इंग्रजींतून व विविधज्ञान-विस्ताराचे याच सालचे आक्टोबरचे अंकात मराठीतून त्यांचे याविषयींचे विचार पूर्वीं आले असून तेच स्वतंत्र पुस्तकरूपानें त्यांनीं प्रकाशित केले आहेत. " रावणाचे लंकेचा शोध लागला " ( Ravan's Lanka discovered ) असें त्यांचे पुस्तकाचें नांव असून नामानुरूप त्यांत लंकेविषयीं विशेष विचार केला आहे. त्यांचे मतें " किष्किंधा विंध्याद्रीचे उत्तर उतरणीवर असून लंका त्याचे दक्षिणेस कांहीं अंतरावर एका विस्तीर्ण जलाशयांत होती; आणि हीं दोनहि स्थानें विंध्याचे पूर्वभागांतच असावींत. विंध्याचे उत्तर उतरणीवर सध्यां कंधो नांवाचें गांव आहे; आणि शब्दसादृश्यावरून हीच पूर्वीची किष्किंधा असावी. रामायणांत वर्णन केलेला प्रस्रवणपर्वत हा सध्यांचा अमरकंटक असून त्यापासून तीन दिशांस तीन नद्या निघतात. बंगाल-नागपूर रेल्वेच्या बिलासपूर-कटनी शाखेवरील पेंढरारोड म्हणून जें एक स्टेशन आहे, तेथून दहा मैलांवर एक टेंकडी असून तीवर एक किल्ला आहे. तो दंतकथेंतील राणी बकावलीचा म्हण-तात. ही टेंकडी रेवा संस्थानच्या बंडवगड परगण्यांत आहे. नर्मदेचे उगमा-पासून दोन मैलांवर भृगु-आश्रम म्हणून जे एक स्थान दाखविण्यांत येतें, तेथून हा भाग दिसतो. किल्ल्याचे आसपास सर्व दलदलीची जागा असल्यामुळें किल्ल्याकडे कोणास जातां येत नाहीं. सन १८६० मध्यें सर रिचर्ड टेंपल हे त्या प्रांताचे चीफ कमिशनर असतां त्यांनीं हत्तीवर बसून या दलदलींतून किल्ल्याकडे जाण्याचा प्रयत्न केला होता; परंतु हत्ती चिखलांत रुपल्यामुळें तो तितकाच राहिला. दलदलीच्या अलीकडच्या तीरावरून पाहतां तो किल्ला धुक्यांत गडप झालेला दिसतो व यामुळें तो वास्तविक अंतरापेक्षां फार दूरवर दिसतो. पलीकडचा किनारा न दिसल्यामुळें त्याला समुद्र असें नांव देण्यांत

आलें व पुढें तोच ग्रह दृढ झाला." श्रीमंत किबेसाहेबांनीं जो निबंध लिहिला, त्यांतील शेवटचा सिद्धांत येथें शक्य तितका त्यांच्याच शब्दांत सांगितला आहे.

श्रीमंत किबेसाहेबांनीं किष्किंधा व लंका यांविषयींची आपली कल्पना लोकांपुढें सिद्धांत म्हणून पुढें ठेविली असली तरी स्वतः त्यांनाहि ती कल्पना संशयित वाटत असल्याचें, निबंधाची समाप्ति करितांना "ही रावणाची लंका असेल काय ?" असे जे उद्गार काढिले आहेत, त्यावरून दिसून येतें; आणि खरोखर त्यांनीं आपल्या कल्पनेच्या पुष्ट्यर्थ म्हणून दिलेलीं प्रमाणें तशींच संशयग्रस्त आहेत. किष्किंधा कोठें असावी, अशी शंका त्यांना प्रथम आली; व सुग्रीवानें केलेलें भूगोलवर्णन पाहून त्यावरून तिचें स्थान ठरविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. आधारार्थ म्हणून त्यांनीं हातांत धरिलेलें वर्णन मुळांतच लटपटीत असल्यामुळें पुढील सर्व अनुमानें या आधाराप्रमाणें लटपटीत झालीं आहेत. सुग्रीवानें केलेल्या भूगोलवर्णनावरून त्याची किष्किंधा विंध्याचे उत्तरेस, चित्रकूटाचे नैर्ऋत्येस व गंगायमुनेच्या पश्चिमेस असल्याचें दिसून येतें व ही त्यांची कल्पना ठीक आहे; पण त्यापूर्वींच राम विंध्याद्रीचे दक्षिणेला आल्याचें रामायणांतील वृत्तान्तावरून दिसतें व यासाठीं येथील वर्णन विसंगत आहे, इकडे त्यांनीं लक्ष द्यावयास नको काय ? भूगोलाचा हा प्रश्न बाजूला ठेवून रामायणांतील इतर वर्णनाची संगति त्यांनीं राखिली आहे काय, म्हणून पहावें, तर तेथेंहि निराशा होते. लंका मध्यहिंदुस्थानांत असल्याचें गृहीत धरल्यामुळें त्यांचीं विधानें व रामायणांतील वर्णनें यांत कशी विसंगतता येत आहे, हें क्रमानें सांगतों.

( १ ) चित्रकूटाहून निघतांच रामानें दंडकारण्यांत प्रवेश केला, असें ते म्हणतात; परंतु आधीं त्यानें अत्रिऋषींचे आश्रमांत मुक्काम केला व तेथून पुढें गेल्यावर दंडकारण्यांत प्रवेश केला. ( २।११७।५ व ३।१।१ ) अर्थात् चित्रकूटापासून दंडकारण्य कांहीं अंतरावर—निदान एक दिवसाचे प्रवासाचे अंतरावर—होतें, हें निर्विवाद आहे.

( २ ) शरभंग दिवंगत झाल्यावर राक्षसांचे उपद्रवामुळें त्रस्त झालेल्या ऋषींचें एक मंडळ रामाकडे संरक्षणाकरितां आलें, त्या वेळीं पंपा व मंदाकिनी यांचे

तीरांवरील, चित्रकूटावरील ऋषींचे वसाहतींना राक्षसांपासून फार पीडा होत असल्याचें त्यांनीं निवेदन केलें. त्यांच्या या भाषणांतील हा श्लोक पूर्वीं आम्हीं अवतारिलेला आहे. ऋषींच्या या विधानावरून किबेसाहेबांनीं या दक्षिण, उत्तर व नैर्ऋत्य दिशांकडील मर्यादा ठरविल्या आहेत. पश्चिमेकडे केवळ अरण्य होतें; दक्षिणेकडे किष्किंधेजवळ सौराष्ट्रावांचून दुसरा प्रदेश नव्हता व वरील मर्यादेपलीकडे वानरांची वसाहत होती, अशी त्यांची कल्पना आहे. किष्किंधेच्या स्थानाविषयीं त्यांची जी समजूत आहे, तिला अनुसरून तेथून सौराष्ट्र जवळ आहे; पण सौराष्ट्रांतील राजा अयोध्याधिपतीचा मांडलीक होता, (२।१०।३६) मग त्याच्या अलीकडे असलेला किष्किंधापति त्याचे सत्तेबाहेर कां असावा? बरें, त्यावर सत्ता नसली, तरी रामासारख्या चौकस व धोरणी पुरुषाला सौराष्ट्राची माहिती असतां मधील किष्किंधेची माहिती नसावी व किष्किंधा कोठें आहे याचा त्यानें शोध करीत सुटावें, याचा अर्थ काय? दक्षिणेकडे सर्व अरण्य असून त्यांत मनुष्याची वस्ती नव्हती, असें ते म्हणतात; इतकेंच नव्हे तर अशी पुष्कळ विद्वानांची समजूत आहे; पण वस्तुस्थिति वेगळी आहे. आमचे मतें विंध्याद्रीचे दक्षिणेकडे हिंदुस्थानचे पश्चिम बाजूनें मनुष्यवस्ती नव्हती, तरी ऋषींचे आश्रम मधून मधून असत, आणि पूर्वेच्या बाजूला तर नांदती वस्ती होती. लंकेवर जाण्याकरितां रामाबरोबर जी वानरसेना निघाली, ती त्याचे आज्ञेप्रमाणें लोकांना उपद्रव होऊं नये, म्हणून केवळ अरण्यांतून—सह्याद्रीचे बाजूनें—चालली होती. पुढील श्लोक पहा:—

**रामस्य शासनं ज्ञात्वा भीमकोपस्य भीतवत्।**
**वर्जयन्नगराभ्याशांस्तथा जनपदानपि ॥६।४।३९॥**
**सागरौघनिभं भीमं तद्वानरबलं महत्।**
**निःससर्प महाघोरं भीमघोषमिवार्णवम् ॥४०॥**

"ज्याचा राग भयंकर आहे अशा रामाची आज्ञा लक्षांत घेऊन त्याची भीति बाळगणारें तें प्रचंड समुद्रतुल्य वानरसैन्य नगरासमीप असलेले आणि लोकवस्तीचे देश वर्ज्य करीत पुढें चाललें असतां भयंकर गर्जना करणारा हा समुद्रच कीं काय असा भास होऊं लागला." पंपा आणि किष्किंधा यांचीं

स्थानें कोठेंहि ठरविलीं तरी दक्षिणेकडील मनुष्यवस्तीची पंपा ही अंतिम सीमा अशी किबेसाहेबांची कल्पना आहे आणि रामाला तर लंकेकडे किष्किंधेहून पुढें जावें लागलें, हें निर्विवाद आहे; व वरील अवतरण रामाच्या या पुढील प्रवासांतील आहे.

( ३ ) ज्या गोदावरीचे तीरीं रामानें निवास केला तिचा उगम बहुधा चित्रकूटांत झाला असावा अशी किबेसाहेबांची एक कल्पना आहे व तिचे पुष्ट्यर्थ चित्रकूटावर सध्यां असलेली एक गुहा व तिच्यांत असलेला एक पाण्याचा स्रोत त्यांनीं निवेदन केला आहे; हा प्रवाह त्या गुहेंत गुप्त होऊन कांहीं अंतरावर उगम पावतो असें त्यांनीं सांगितलें आहे. चित्रकूटावरील हा स्रोत आम्हीं पाहिलेला नाहीं; तथापि त्यांनीं दिलेल्या वर्णनावरून हा लहानसा पर्या अथवा वहाळ असेल. ही कल्पना मूळांतच विसंगत आहे. राम चित्रकूट सोडून निघाल्यावर त्याचे मुक्काम ( अत्रिऋषींच्या आश्रमांतील मुक्काम त्यांनीं दिलेला नाहीं, तो सोडून दिला तरी) दंडकारण्यांतील ऋषींचें आश्रममंडल, शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्यबंधु व अगस्त्य इतक्यांचे आश्रमांतून झाल्याचें त्यांनीं दिलें आहे. अर्थात् चित्रकूट सोडून मधील प्रवास एकएक दिवसाचा धरला तरी पांच दिवस चालून गेल्यानंतर रामानें पंचवटींत प्रवेश केला, हें त्यांना मान्य आहे; आणि यानंतरहि चित्रकूटांत उगम पावणाऱ्या एका गोदावरीनामक प्रवाहाचें नामसादृश्य पाहून त्यांनीं तेथेंच रामाची पंचवटी होती अशी कल्पना करावी, याला काय म्हणावें ? चित्रकूट पर्वताची मर्यादा इतकी वाढवावयाची कीं काय ? रामायणांत गोदावरीजवळ चित्रकूटाचें नांवहि नाहीं. चित्रकूटावरील गोदावरीचा उगम एका गुहेंत असून तो तेथेंच गुप्त होऊन थोड्या अंतरावर प्रकट झाला आहे; आणि रामायणांत वर्णिलेली गोदावरी वाहती नदी असून ती पर्वताचे जवळ आहे, गुहेंत नाहीं. ( ३।१३।२२ ) तो प्रदेश सपाट व रम्य असून ( ३।१५।१० ) हंस व कारंडव पक्ष्यांनीं गजबजून गेलेला असल्याचें सांगितलें आहे. ( ३।१५।१३ ) तिचेविषयीं नदी असा स्पष्ट शब्द योजिलेला आहे. ( ३।१६।४१; ३।६४ १,३,६,७,९,१० ] तिला तीर असल्याचें सांगितलें आहे. ( ३।१७।१ )

चित्रकूटावरील या झऱ्याला गोदावरी नांव असलें तरी त्याला नदी म्हणतां येईल काय ? व याचेजवळ रामानें मुक्काम केला असें म्हणतां येईल काय ?

( ४ ) चित्रकूटापासून किष्किंधेपर्यंतचा प्रवास त्यांनीं ९८ मैलांचा धरला आहे; व विंध्याद्रीपर्यंत अंतर तितकें येतें, म्हणून विंध्याद्रीचे उत्तर उतरणीवर किष्किंधा असावी असें त्यांचें म्हणणें आहे. सध्यां या दोन प्रदेशांत असलेलें अंतर व रामायणावरून त्यांनीं काढिलेलें अंतर यांचा त्यांनीं बरोबर मेळ घातला आहे; पण अगस्त्याश्रमांतून राम दक्षिणेकडे आल्याचें त्यांना मान्य आहे व तो आश्रम तर विंध्याचे दक्षिणेकडे आहे; मग त्यापुढें दक्षिणेकडे आलेल्या रामाला विंध्याचे उत्तरेकडची किष्किंधा कशी गांठतां येईल ? राम अगस्त्याश्रमांत येत असतां त्याचा लक्ष्मणाशीं जो संवाद झाला त्यांत रामानें " सूर्याच्या मार्गांत विरोध करणारा पर्वतश्रेष्ठ विंध्य अगस्त्यऋषींच्या आज्ञेचें पालन करीत असल्यामुळें आतां वाढत नाहीं. " ( ३।११।८६ ) असा गौरव करून अगस्त्यांविषयींची प्रसिद्ध कथा ध्वनित केली आहे. रामाचे या भाषणावरून हा आश्रम विंध्याद्रीचे दक्षिणेकडे असल्याचें उघड होत आहे. पण मग त्या आश्रमाचे दक्षिणेकडे असलेली किष्किंधा विंध्याद्रीचे उत्तरेला कशी असूं शकेल ?

( ५ ) विंध्याद्रीचे उत्तर उतरणीवर कंधोनामक गांव आहे, आणि ध्वनिसादृश्यावरून हीच किष्किंधा असावी, असें त्यांनीं सुचविलें आहे. किष्किंधा याचें कंधो हें अपभ्रष्ट रूप असावें, असें त्यांच्या प्रतिपादनाचें धोरण दिसतें येथें ध्वनिसादृश्यामुळें अपभ्रष्टरूपाविषयीं संशय येण्यासारखा आहे. पण थोडा विचार केल्यास तो राहणार नाहीं. मूळ शब्द त्र्यक्षरी व अपभ्रष्टरूप द्व्यक्षरी आहे, हा त्यांत भेद आहे; संयुक्तवर्णांतील आद्यवर्णाचा उच्चार सौकर्यास्तव अपभ्रष्टरूपांमध्यें लुप्त होत असतो, हें खरें आहे. पण असा लोप संयुक्तवर्ण शब्दाचे प्रारंभीं असल्यास होतो. केव्हां केव्हां तर संयुक्तवर्ण आधीं असल्यास उच्चारसौकर्यार्थ त्यापूर्वीं इ सारखा अर्थहीन वर्ण योजून रूपें योजण्यांत येतात. येथें तर संयुक्तवर्ण प्रारंभीं नसून पूर्वीचे वर्णानें मधील संयोग उच्चाराला सुकरच करून ठेविला आहे. तेव्हां ध्वनिसादृश्यावरून अपभ्रंश झाल्याची ही कल्पना चिंत्य होय.

( ६ ) येथें प्रतिवर्षी जत्रा भरत असते व ती दशरथानें श्रावणाचा वध येथें केला त्याचे स्मरणार्थ भरते, असें लोक सांगतात, असें एक प्रमाण स्व-मताचे पुष्ट्यर्थ किबेसाहेबांनीं दिलें आहे. हें प्रमाण त्यांनीं कोणत्या हेतूनें दिलें, हें कांहीं कळत नाहीं श्रावणवधाची कथा रामायणांत आहे व त्या कथेंतील इतिहास येथें घडला असा लोकप्रवाद आहे, असा या दोहोंचा संबंध आहे; पण रामायणांतील एक कथा, यापलीकडे तिचा किष्किंधेशीं कोणताहि संबंध नाहीं. उलट तरुणपणीं दशरथ तेथें मृगयेकरितां म्हणून गेला होता. या इतिहासावरून तें स्थान मृगयेला योग्य होतें; आणि तें स्थान धनुर्विद्येंत निष्णात असलेल्या त्याच्या पुत्राला माहीत नसणें असंभवनीय दिसतें व हें तर किबेसाहेबांच्या कल्पनेला बाधक आहे. या निमित्तानें रामायणांतील श्रावणवधाची कथा त्यांनीं अवलोकन केली असती, तर त्यांनीं हें प्रमाण पुढें आणिलें असतें किंवा नाहीं, ही शंका आहे. कारण श्रावणवध सरयूतीरीं झाल्याचे दशरथाचे भाषणावरून स्पष्ट होत असून त्यांत सरयूचा उल्लेख तीन वेळां ( २।६३।२०, ३६; २।६४।१४ ) आलेला आहे. सरयू नदी अयोध्येच्या जवळ असून ती प्रयागाचे पुष्कळ उत्तरेकडे भागीरथीला मिळते; आणि राम तर प्रयाग सोडून पुष्कळ दक्षिणेकडे आलेला; मग तेथें सरयू कोठें असणार ? लौकिक कथा रामायणाचे विरुद्ध असल्याचें उघड दिसतें. लौकिक कथेंत कांहीं वेगळा इतिहास असल्यास आम्हांला माहीत नाहीं; तो तसा वेगळा असेल व त्यांत रामायणाशीं संगति लावण्यास वाव असेल, तर कळत नाहीं.

( ७ ) येथें भारहूत नांवाचा स्तूप असल्याचें किबेसाहेबांनीं लिहून तो किष्किंधेच्या स्मरणार्थ उभारलेला नसेल ना, अशी शंका त्यांनीं दिली आहे. ही केवळ शंका आहे व इतर प्रमाणें मिळाल्यास तिचा विचार करावयाचा आहे; अन्यथा तिला तादृश्य महत्त्व नाहीं व त्यांनींहि तें दिलें नाहीं.

( ८ ) सुग्रीवानें वानरांना सीताशुद्ध्यर्थ पाठविलें, त्यांत दक्षिणेकडील भूगोलवर्णन करितांना विंध्याद्रि सांगितला आहे व हनुमानहि पुढें निघाला तो याच पर्वतावर प्रथम आल्याचें वर्णन रामायणांत आहे. या दोनहि गोष्टींवरून,

दंतकथा सांगते त्याप्रमाणें लंका समुद्राचे पलीकडे नसून, विंध्याद्रीचे दक्षिणेकडे पायथ्याशीं असलेल्या समुद्रांत होती हें सिद्ध होतें, असा किबेसाहेबांनीं एक सिद्धान्त दिला आहे. यांतील प्रमाण महत्त्वाचें आहे, यांत शंका नाहीं. विंध्याद्रीविषयीं रामायणांत कशी भूल झाली आहे व त्यामुळें वाचकांचा कसा घोंटाळा होतो, हें आम्हीं मागें दाखविलें आहे; तथापि आमची कल्पना तूर्त बाजूला ठेवून त्यांच्या दृष्टीनें विचार केला, तरी येथें कित्येक शंका उपस्थित होतात. सुग्रीवाचे भाषणांत दक्षिणेकडे विंध्याद्रि सांगितला आहे, हें खरें आहे; पण त्याबरोबर आणखी देश व नद्या त्याचे भाषणांत आहेत, त्यांची वाट काय? त्यांनीं आपल्या निबंधांत हें सर्व भूगोलवर्णन अवतरिलेलें असून त्यांत किष्किंधेचे दक्षिणेकडे विंध्य, नर्मदा, कृष्णवेणी महानदी, मेखल व उत्कल देश, दशार्ण देशांतील नगरें, आम्रवती व अवंती या नगरी, विदर्भ, ऋष्टिक, माहिषक, मत्स्य, कलिंग, कौशिक हे देश, दंडकारण्य, गोदावरी, आंध्र, पुंड्र, चोल, पांड्य, केरल, अयोमुख, कावेरी, मलयपर्वताचे अग्रभागीं अगस्त्याश्रम, ताम्रपर्णी, पांडवदेशाचें द्वार, समुद्रांत महेंद्रपर्वत, इतके देश, पर्वत व नद्या असल्याचें लिहिलें आहे. यापुढील श्लोक किबेसाहेबांनीं अवतरिलेला नसून त्यांत "महेंद्रपर्वताचें एक टोंक समुद्रांत गेलें आहे व त्याचे पलीकडे एक द्वीप असून तीच रावणाची लंका होय." (४।४१।२०-२३) असें सुग्रीवानें सांगितलें आहे. किष्किंधेचे दक्षिणेकडे विंध्याद्रि सुग्रीव सांगतो व त्याप्रमाणें त्यांनीं तो मान्य केला आहे. पण विंध्याद्रीचे दक्षिण बाजूचे पायथ्याशीं समुद्र आहे असें त्यानें कोठें सांगितलें आहे? त्यांच्या या विधानाला कल्पनेवांचून आधार दिसत नाहीं. उलट दाक्षिणेकडील प्रसिद्ध नद्या कृष्णा, कावेरी, ताम्रपर्णी त्याचे भाषणांत आल्या आहेत; आणि यापुढें गेल्यावर महेंद्रपर्वत समुद्रांत असून त्यापुढें लंका असल्याचें तो सांगत आहे. याची किबेसाहेब संगति कशी लावणार? शिवाय विंध्याद्रीचे उत्तर उतरणीवर असलेल्या किष्किंधेंत राहणाऱ्या सुग्रीवानें विंध्याद्रीचे दक्षिणेकडील भूगोलाचें वर्णन परीक्षेकरितां घोकंपट्टी करून आलेल्या विद्यार्थ्याप्रमाणें सांगत सुटावें आणि श्रोत्या वानरांनीं स्वस्थपणें ऐकावें, हें दृश्य किती विचित्र आहे? सुग्रीवाचा हा व्याप किबेसाहेबांचे दृष्टीनेंहि अस्थानीं दिसत आहे. तसेंच सुग्रीवानें सीताशुध्यर्थ

दूरदूरचे जे वानर बोलावून आणिले त्यांतील एकालाहि विंध्याद्रीचे दाक्षिण पायथ्याला असलेला समुद्र माहीत नसावा हें तर विलक्षण आहे. किबेसाहेबांनीं तर पंपा ही दक्षिणेकडील मर्यादा ठरवून त्या पलीकडे वानरांची वस्ती होती, असें ठरविलें आहे; आणि पंपा व किष्किंधा हीं जवळजवळ असल्यामुळें विंध्याद्रीचे दाक्षिणेकडे वानरांची वसाहत असल्याचेंहि त्यांना मान्य आहे. मग विंध्याद्रीचे पायथ्याशीं असलेला समुद्र मात्र वानरांना माहीत नव्हता, हें कसें संभवेल ? सुग्रीवानें केलेल्या भूगोलवर्णनांत दक्षिणेच्या टोंकाला समुद्रांत महेंद्रपर्वत असल्याचें लिहिलें आहे, तिकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं; त्याप्रमाणें मारुतीनें लंकेंत जाण्याकरितां जें उड्डान केलें तें या महेंद्रपर्वतावरून केलें, इकडेहि त्यांनीं पाहिलें नाहीं. समुद्रावरून उडी मारावयाकरितां मारुतीनें महेंद्रावर आरोहण केलें, असें रामायणांत स्पष्ट सांगितलें असून ( ४।६७।४० ) या निमित्तानें या पर्वताचे उल्लेख अन्य स्थलींहि आले आहेत. ( ४।६७।३७, ४३; ५।१।८; ५।५७।३८; ५।५८।१; ५।६१।२ ) सुग्रीवाचे आज्ञेप्रमाणें सीताशुद्ध्यर्थ बाहेर निघणाऱ्या वानरांनीं त्यानें सांगितलेल्या स्थलीं तिचा शोध करणें हें तर त्यांचें कर्तव्य होतें व या दृष्टीनेंहि महेंद्रपर्वतापर्यंत त्यांना प्रवास करणें भाग होतें. मग विंध्याद्रीचे पुढें ते गेले नाहींत अशी कल्पना कशी करावयाची ? सुग्रीवानें त्यांना एक महिन्याची मुदत दिली होती, व तो काल भरून गेला तरी सीतेचा शोध लागला नाहीं म्हणून ते निराश झाल्याचें रामायणांत वर्णन आहे. ( ३।५०।३ ) तेव्हां सीताशुद्ध्यर्थ गेलेले हे वानर एक महिना प्रवास करूनहि त्यांना विंध्याद्रीपुढें जातां आलें नाहीं; तर ते घाण्याच्या बैलाप्रमाणें विंध्याद्रीचे भोंवतीं फिरत होते किंवा काय ? तेव्हां लंकेसंबंधीं त्यांच्या कल्पनेला त्यांनीं दिलेलें प्रमाण स्वभावतः निरुपयोगी आहे. रामायणांतील वर्णन त्याला उलट बाधक आहे.

( ९ ) पण विंध्याद्रीचे दक्षिणेकडे पायथ्याशीं समुद्र होता, हें किबेसाहेबांचें विधान वाचून आम्हांला जी शंका आल्याचें वर लिहिलें आहे, ती मनांत येऊन किंवा काय तें कळत नाहीं त्यांनीं तेथें एक तोड सुचविली आहे. ती अशी कीं, विंध्याद्रीचे पायथ्याशीं पाण्याचा मोठा सांठा असावा व तो त्यांना प्रथम समुद्र वाटला व तीच कल्पना पुढें दृढ झाली असावी. ही कल्पना वा-

चली म्हणजे " बुडल्याचा पाय खोलांत " या म्हणीची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. रामायणांतील वर्णनाची संगति लावण्याचा त्यांचा हेतु व प्रयत्न असतां स्वतांची कल्पना ते पुढें करावयास लागल्यामुळें पुढें त्यांना नवीन नवीन कल्पना करणें भाग पडलें आहे. प्रथम त्यांनीं विंध्याद्रीचे पायथ्याशीं समुद्रांत लंका असावी असें ठरविलें; व तेथें तर सध्यां समुद्र नाहीं आणि पूर्वीं होता असें म्हणण्यास प्रमाण नाहीं, असें त्यांच्या लक्षांत येतांच तेथें समुद्र नसून पाण्याचा सांठा असावा, असें त्यांनीं सुचविलें आहे. पाण्याचा सांठा असला, तरी रामायणांत तो समुद्र म्हटला आहे हें कसें, असें कोणी म्हणेल; तर तसा त्यांना भास झाला असावा व तो पुढें दृढ झाला असावा, अशी त्यावर त्यांनीं कल्पना केली आहे. त्या वेळीं नौकांचा व्यवहार केवढा होता व तो समुद्रावरूनहि होता, हें आम्हीं पूर्वीं दाखविलें आहे. मारुतीनें लंकेचें वर्णन रामाला सांगतांना तेथें समुद्रावर नौका चालू नाहींत, असें सांगितलें आहे. (६।३।२१) अर्थात् नौकांनीं तेथून जाण्याइतकें विपुल उदक तेथें असल्याचें त्यानें सुचविलें आहे. मग पाण्याचा सांठा पाहून तो त्यांना समुद्र वाटला, असें मानावयाचें म्हणजे नसता खुळेपणा त्यांच्या पदरांत बांधावयाचा, असें नाहीं कां होणार ? त्यांच्या या विधानावर अधिक चर्चा करावयाचें कारण आहे असें वाटत नाहीं.

( १० ) पूर्वींचे सर्व विवेचनाचा उपसंहार म्हणून पुढें किंबेसाहेब म्हणतात, " तर मग वरील विवेचनावरून हें सिद्ध होतें कीं, किष्किंधानगरी विंध्याचलाचे उत्तर उतरणीवर असून लंका त्याचे दक्षिणेस कांहीं अंतरावर एका विस्तीर्ण जलाशयाचे पलीकडे होती. तसेंच हीं दोनहि स्थानें विंध्याचलाचे पूर्वभागांत होतीं. कारण तीं चित्रकूटापासून फार दूर नाहींत, एवढेंच नव्हे तर बहुतेक अगदीं दक्षिणेस आहेत. " यांतील पुढील वाक्यांत नवीन भाग असून पूर्वापर संबंध वाचकांचे लक्षांत यावा म्हणून त्यासुद्धां हें अवतरण येथें घेतलें आहे. त्यांच्या या विधानांत कार्यकारण संबंध कसा जोडावा हें खरोखर आम्हांला कळलें नाहीं. पूर्वींचे विवेचनावरून काय निष्पन्न होतें तें त्यांनीं प्रथम सांगितलें आहे व त्यांचा सिद्धांत जरी आम्हांला मान्य नसला तरी त्यांच्या पूर्वींचे विवेचनाला तें धरून आहे. तसेंच चित्रकूटाहून हीं दोनहि स्थानें दक्षिणेस

होतीं या विधानाचाहि त्यांत समावेश होण्यासारखा आहे; परंतु तीं विंध्याचलाचे पूर्वभागीं होतीं या त्यांच्या विधानाला प्रमाण काय ? पूर्वीचे विवेचनावरून काय सिद्ध होतें हें त्यांनीं प्रथम दाखविलें आहे व पुढील विधान तर धडधडीत त्याचे विरुद्ध आहे. पूर्वीचे विवेचनांत विंध्याद्रीचे पूर्वभागीं हीं स्थानें असावीं अशी शंकाहि येण्यासारखें प्रमाण त्यांनीं दिलेलें नाहीं. लंका मध्यहिंदुस्थानांत असावी अशी जी त्यांची कल्पना तिला अनुसरून हें सर्व प्रतिपादन आहे. नवीन कल्पना कोणीं करूं नये असें आमचें म्हणणें नाहीं व तसें कोणी म्हणणारहि नाहीं; पण ती लोकांना पटवून द्यावयाची म्हणजे पूर्वीचे आधार धरून तेथपर्यंत यावें लागतें, हें विसरतां नये. त्यांचें पूर्वीचें प्रतिपादन याच धोरणानें आहे व तें येथपर्यंत सरळ आलें आहे; पण पूर्वीचे प्रतिपादनावरून किष्किंधेचा शोध विंध्याद्रीचे उत्तर उतरणीवर व लंकेचा शोध त्याचे दक्षिणेकडे पायथ्याशीं करणें त्यांना भाग होतें; आणि तें तर त्यांच्या इष्ट कल्पनेशीं जमेना. तेव्हां त्यांनीं आपल्या कल्पनेचा समावेश पूर्वीचे विवेचनावरून निष्पन्न होणाऱ्या सिद्धांतांत करून टाकिला आहे. प्रथमचे वाक्यांत ते किष्किंधा विंध्याद्रीचे उत्तरेकडील उतरणीवर व लंका त्याचे दक्षिणेला असल्याचें सांगतात व लागलींच पुढील वाक्यांत हीं दोनहि स्थानें विंध्याद्रीचे पूर्वभागांत आहेत असें म्हणतात, याचा मेळ कसा घालावयाचा ? लंका विंध्याद्रीचे पूर्वभागीं मानिली तर ‘ किष्किंधेहून निघालेल्या वानरांपैकीं अंगदादि वानर दक्षिणेकडे गेले,—दक्षिणेकडे जाण्यासाठीं सुग्रीवानें त्यांना पाठविलें ’ असें रामायणांत वर्णन असून किबेसाहेबांनीं तें पूर्वीं अवतरिलें आहे याची वाट काय ?

( ११ ) लंका चित्रकूटाचे जवळ होती असें दाखविण्याकरितां योगवासिष्ठांतील एका श्लोकाचा निर्देश किबेसाहेबांनीं टीपेंत केला आहे. ( पृ. ७ ) रामायणांतील स्थलनिर्णयाचे कामीं इतर ग्रंथांतील प्रमाण गौण म्हणून घ्यावयाचें, हें उघड आहे. तथापि प्रस्तुत प्रमाण त्यांनीं पूर्वापर ग्रंथ पाहूनहि घेतलें नाहीं, अशी शंका येते. पद्मासिंधुराजांमधील युद्धांत दोन पक्षांकडे साहाय्य करण्यास आलेल्या लोकांचीं नांवें देण्याचे निमित्तानें हिंदुस्थानांतील सर्व दिशांकडील

देश व पर्वत यांचा संग्रह या सर्गांत केला आहे. किबेसाहेबांनीं निर्देशिलेला श्लोक पुढीलप्रमाणें आहे–

**शिलाक्षारोद्भोनंदमर्दना मलयाभिधाः ।**
**ते चित्रकूटशिखगा लंकारक्षोगणाः स्मृताः ३।३६।३९**

यांत चित्रकूटाचीं तीन शिखरें सांगितलीं असून त्यांवर लंकेंतील राक्षस बसत होते असें वर्णन आहे व त्यावरून लंकेच्या अधिकारक्षेत्रांत चित्रकूट येत होता असा किबेसाहेबांचा तर्क आहे. राक्षसांचा उपद्रव पृथ्वीवरील सर्व लोकांत होत असे. अर्थात् त्यांची गति सर्वत्र होती, हें सांगावयास नको. तेव्हां चित्रकूटावर लंकेंतील राक्षस होते यांत तादृश महत्त्व नाहीं. दुसरें असें कीं, या सर्गांतील निरनिराळ्या दिशांकडील देश व पर्वत यांमध्यें मेळ नाहीं. याचे पूर्वींचे श्लोकांत–दाक्षिणेकडे म्हणून–चित्रकूटाबरोबर कोंकणाचें ( ३६।३७ ) नांव आहे. यांतील भूगोलाचें विचित्र वर्णन पाहून टीकाकारानें हें दुसऱ्या ब्रह्मांडांतलें असावें ( ब्रह्मांडांतरत्वान्न दोषः। ) अशी तोड सुचवून वाचकांचें समाधान केलें आहे ! तेव्हां मूळांतच विसंगत असलेल्या वर्णनांतील एक श्लोक रामायणांतील स्थलनिर्णयाचे कामीं प्रमाण म्हणून ग्राह्य धरितां येईल किंवा काय याचा वाचकांनींच विचार करावा. वरील विसंगतता पाहिल्यावर किबेसाहेबहि हें प्रमाण पुढें आणणार नाहींत अशी आमची समजूत आहे.

(१२) "लंकेला बेट म्हणून जरी म्हटलें असलें तरी" किबेसाहेब म्हणतात "रामायणांत कोणत्याहि ठिकाणीं तिचे समुद्रकिनाऱ्याचें वगैरे वर्णन दिलेलें नाहीं." येथें रा. ब. वैद्यांचे मताचें अवतरण स्वमताचे पुष्ट्यर्थ त्यांनीं दिलें आहे. समुद्राचे पलीकडे लंकाद्वीप असल्याविषयीं संपातीनें वानरांना जी माहिती सांगितली (४।५८।२०) तिचें अवतरण यापूर्वींच किबेसाहेबांनीं दिलें असून त्यापुढें हें विधान आहे. त्या अवतरणानें त्यांचें समाधान झालें नाहीं असें दिसतें. कांहीं असो. रामायणांत लंकेच्या समुद्रकिनाऱ्याचें वर्णन आहे का नाहीं तें पाहणें भाग आहे. मारुती लंकेंतून परत निघाला त्या वेळीं पुढील वर्णन आहेः—

**दक्षिणादुत्तरं पारं प्रार्थयँल्लवणांभसः ।**

**अधिरुह्य ततो वीरः पर्वतं पवनात्मजः ॥४।५६।४०॥**
**ददर्श सागरं भीमं भीमोरगनिषेवितम् ॥**

" समुद्राचे दक्षिणतीरावरून उत्तरतीराला येण्यासाठीं तो वायुपुत्र वीर पर्वतावर आरूढ झाला असतां भयंकर सर्प ज्यांत आहेत असा प्रचंड सागर त्याच्या दृष्टीस पडला."

**अपारमपरिश्रान्तश्चांबुधिं समगाहत ॥४।५७।६॥**

" तो हनुमान श्रांत न होतां अपार समुद्राचें उल्लंघन करूं लागला."

रामाची वानरसेना लंकेंत उतरल्यावर सेनेची पाहणी करण्याकरितां रावण प्राकारावर चढला व पाहूं लागला, त्यासंबंधाचें वर्णन पाहा:—

**पश्यमानः समुद्रं तं पर्वतांश्च वनानि च ।**
**ददर्श पृथिवीदेशं सुसंपूर्णं प्लवंगमैः ॥६।२६।७॥**

समुद्र, पर्वत व वनें अवलोकन करीत असतां सर्व भूप्रदेश वानरांनीं व्यापून टाकिला आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें."

सीतेला भिवविण्याकरितां रामाचे मृत्यूचें मिथ्या वृत्त सांगून रामाचे सेनेचा विध्वंस कसा झाला हें सांगतांना रावण म्हणतो:—

**सागरे पतिताः केचित्केचिद् गगनमाश्रिताः ।**
**ऋक्षा वृक्षानुपारूढा वानरैर्व्यतिमिश्रिताः ॥६।३१।३४॥**
**सागरस्य च तीरेषु शैलेषु च वनेषु च ।**
**पिंगलास्ते विरूपाक्षै राक्षसैर्बहवो हताः ॥३५॥**

" कांहीं ऋक्ष समुद्रांत पडले आहेत, कांहींना राक्षसांनीं आकाशांत फेंकून दिलें आहे आणि वानरांसहवर्तमान कांहींजण वृक्षांवर लपून बसले आहेत. कित्येक विरूपाक्ष राक्षसांनीं सागरांचीं तीरें, पर्वत आणि वनें यांमध्यें असंख्य वानर मारून टाकिले आहेत."

येथील सर्व निर्देश लंकेजवळचा समुद्र व समुद्राजवळचें लंकेचें तीर यां-संबंधाचे आहेत, ते वाचल्यावर लंकेजवळ समुद्र होता कीं नव्हता अशी शंका कोणाचे मनांत राहील, असें वाटत नाहीं.

(१३) सांप्रतचा अमरकंटक हा पूर्वीचा प्रस्त्रवण असावा अशी किबेसाहेबांची कल्पना आहे व येथून जवळच टेंकडीवर एक किल्ला असून ती पूर्वींची लंका आणि जवळचा दलदलीचा प्रदेश हा पूर्वी वानरांना भासलेला समुद्र असावा अशी उपपत्ति त्यांनीं लाविली आहे. गुहेंत अडकलेल्या वानरांना श्रमणीनें बाहेर आणिल्यावर त्यांना तिनें "हा नानाप्रकारच्या वृक्षलतांनीं सुशोभित असलेला विंध्याद्रि, हा प्रस्त्रवण व हा विपुल उदक असलेला सागर" (४।५२।२१) याप्रमाणें सांगून धीर दिला, असें रामायणांत वर्णन आहे व यावरून हे सर्व भाग दृष्टीचे टप्प्यांत असावे असें दिसतें आणि या दृष्टीनें संगति लावण्याचा हा किबेसाहेबांचा प्रयत्न आहे. रामायणांत वर्णिलेला समुद्र सांप्रत या प्रदेशांत दिसत नाहीं, यासाठीं सध्यां जवळच दलदलीचा प्रदेश आहे तेथें पूर्वी पाणी असावें व तो समुद्र असा भास झाला असावा अशी कल्पना त्यांनीं सुचविली आहे. या कल्पनेसंबंधानें आमचें म्हणणें काय आहे तें वर दिलें आहे. पण येथें त्यांनीं या कल्पनेच्या पुष्ट्यर्थ दानपत्राचें एक प्रमाण दिलें आहे. हें दानपत्र संवत् ८२३ मध्यें लिहिलेलें असून तें तांब्याचे पत्र्यावर कोरलेलें आहे. दानपत्राची भाषा संस्कृत आहे. यांत दोलपंचोल गांव एका ब्राह्मणाला दान केल्याचें लिहिलें असून गांवासंबंधीं इतर वस्तूंचा निर्देश करितांना "सहलवणाकरः" असे शब्द आहेत. लवणाकर म्हणजे खाण. दोलपंचोल गांव रीवासंस्थानांत आहे व अमरकंटक आणि त्याचे जवळ असलेली लंकेची टेंकडी हीं रीवासंस्थानाचे जवळ आहेत, म्हणून तेथें आसपास अशा मिठाच्या खाणी असाव्या असें अनुमान किबेसाहेबांनीं केलें आहे. त्यांचें हें अनुमान अयुक्त आहे असें नव्हे, पण संवत् ८२३ चे सुमारास तेथें मिठाची खाण होती असें मानिलें तरी रामायणकालीं त्याच स्थलीं विस्तीर्ण जलाशय आणि समुद्राचा भास होण्याइतकी त्याची विशालता हीं त्यावरून कशीं अनुमानावयाचीं, हें कळत नाहीं. हें अनुमान गृहीत धरिलें तरी पुढील कथाभागाची संगति लागत नाहीं ती नाहींच. समुद्र म्हणून भासलेल्या या जलाशयापासून मारुतीनें उडी मारिली असें किबेसाहेब म्हणतात व याच दृष्टीनें पुढील श्लोकाकडे वाचकांनीं एकदा पहावें:—

दक्षिणस्य समुद्रस्य समासाद्योत्तरां दिशम् ।
संनिवेशं ततश्चक्रुर्हरिवीरा महाबलाः ॥४।६४।४॥

"त्या महा बलाढ्य वानरवीरांनीं दक्षिण समुद्राचे उत्तरतीरावर जाऊन तळ दिला." संपातीनें वानरांना लंकेचा पत्ता सांगितल्यावर तिकडे जाण्याकरितां वानर निघाले, त्या वेळचें हें वर्णन आहे. ज्या जलाशयावरून मारुतीनें समुद्र समजून उडी मारिली, असें किबेसाहेब म्हणतात, तो हा होय. या जलाशयाचे उत्तरतीरावर वानर आले व येथून अलीकडे मारुतीनें उडी मारिली म्हणजे ती दक्षिणेकडे होय, हें सांगावयास नको. पेंडरा रोड स्टेशनजवळ जी एक टेंकडी असून तीवर एक किल्ला आहे व जेथें लंका होती अशी किबेसाहेबांची कल्पना आहे, ती टेंकडी किबेसाहेबांनीं पूर्वींचा प्रस्रवण म्हणून ठरविलेल्या सांप्रतच्या अमरकंटकाचे ईशान्येला आहे. अर्थात् हा जलाशय प्रस्रवणाचे अपेक्षेनें दक्षिणोदधि होणें शक्य नाहीं व पलीकडे मारुतीनें उडी मारावयाची म्हणजे ती रामायणवर्णित दिशेचे उलट उत्तरेकडे होणार आहे.

( १४ ) आतां एकच बाब राहिली व ती या प्रदेशाचे आसपास तेथील मूळचे रहिवासी लोक आहेत व ते आपणांस रावणवंशीय म्हणवितात, ही होय. हें प्रमाण ऐतिहासिक नाहीं आणि रामायणकालाकडे दृष्टि फेंकली तर तो इतका दूर आहे कीं, मधील कालांत तेथें बाहेरून येऊन राहाणाऱ्या लोकांनाहि आपण तेथील मूळचे रहिवासी असें सांप्रत म्हणवितां येईल. ते आपणांस रावणवंशांतले असें तरी म्हणवितात, पण आमच्या कोंकणांत रावण या आडनांवाचे लोक आहेत. हे जातीनें शूद्र आहेत. हे आपणांस रावणवंशांतील म्हणवीत नाहींत; पण त्यांच्या आडनांवावरून तसें अनुमान कां करूं नये ? दुसरें असें कीं, या रावणवंशीयांच्या सांगण्यावरून लंकेचा प्रदेश तेथें ठरवावयाचा, त्यापेक्षां लौकिक परंपरेला अनुसरून सध्यांचें सिंहलद्वीप लंका आहे, असें म्हणण्यास अडचण कोणती ? रामायणांतील वर्णनाशीं परंपरागत समजूत कशी जुळत आहे, हें आम्हीं पूर्वी दाखविलें आहे.

## आणखी प्रमाणें.

श्रीमंत किबेसाहेबांनीं रावणाची लंका मध्यहिंदुस्थानांत होती, असा सिद्धांत

ठरवून जीं प्रमाणें प्रथम पुढें आणिलीं, त्यांचा येथवर विचार केला. यानंतर त्यांना मागाहून आढळलेलीं प्रमाणें त्यांनीं एकत्र करून त्याविषयींचा आपला निबंध मद्रास येथें सन १९२५ मध्यें भरलेल्या " ओरिएन्टल कॉन्फरन्स " पुढें वाचण्याकरितां पाठविला. तेव्हां या नवीन प्रमाणांविषयीं आतां विचार करूं.

आपल्या कल्पनेला पोषक म्हणून जीं प्रमाणें किबेसाहेबांनीं दिलीं आहेत, त्यांत ग्रंथाधाराचें प्रमाण अवघें एक असून इतर सर्व प्रमाणें दंतकथा व नामसादृश्य यांवर प्राय: उभारलेलीं आहेत. रामायणांतील स्थलांचा निर्णय म्हटला म्हणजे प्राचीन ग्रंथ अथवा लेख यांतील आधार त्यांत दिले असतील, अशी आपण साहजिक अपेक्षा करितों; पण या दृष्टीनें पाहूं जातां वाचकांची निराशा झाल्यावांचून रहात नाहीं; तथापि मागील लेखाच्या परिशिष्टरूपानें हा लेख असल्यामुळें त्याविषयींची न्यूनता मूळ लेखानें भरून निघाली आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. आतां नवीन परिशिष्टापुरती मानिली तर ही न्यूनता आहे, त्यास उपाय नाहीं.

आपल्या कल्पनेला प्रो. जाकोबी यांनीं संमति दिल्याचें त्यांनीं प्रारंभीं सांगितलें असून याविषयीं त्यांच्या लेखाची त्यांनीं माहिती दिली आहे; आणि या त्यांच्या संमतींत त्यांनीं पुढें केलेला ग्रंथाधार अंतर्भूत झालेला आहे. प्रो. जाकोबी यांनीं यापूर्वी रावणाची लंका आसाम प्रांतांत ठरविली होती; परंतु किबेसाहेबांचा लेख पाहून त्यांची कल्पना त्यांना अधिक सयुक्तिक वाटली व त्यांनीं आपली कल्पना बाजूला ठेवून तिला आपला पाठिंबा दिला. प्रो. जाकोबी यांनीं किबेसाहेबांना संमति देतांना जें नवीन प्रमाण पुढें केलें आहे, तें एका जैनग्रंथाचें आहे. हा ग्रंथ म्हणजे एका जैनकवीनें रामायणाचें अर्धमागधींत केलेलें रूपांतर होय. हा ग्रंथ फार प्राचीन नसल्याचें स्वतां त्यांनीं सांगितलें आहे. या ग्रंथांत रावणाचे लंकेविषयीं " समुद्रांत राक्षसद्वीप म्हणून एक द्वीप असून त्याचे मध्यभागीं त्रिकूट म्हणून पर्वत असल्याचें सांगतात; हा पर्वत ९ योजनें उंच व ५० योजनें रुंद आहे. या पर्वताचे शिखराचे पायथ्याशीं लंकापुरी आहे. लंकेविषयीं लंकापुरी असाच सर्वत्र उल्लेख केलेला असतो. " याप्रमाणें माहिती आली आहे. या ग्रंथांत पर्वताची सांगितलेली उंची असंभवनीय म्हणून

ती राक्षसद्वीपाची लांबी असावी, असें किबेसाहेबांनीं ठरविलें आहे. अमरकंटकाच्या दक्षिणेला अशा प्रकारचें एक द्वीप समुद्रापर्यंत पसरलेलें प्राचीनकालीं होतें, असें त्या भागांत प्रचलित असलेल्या दंतकथांवरून दिसतें व तेंच येथें निर्देशिलेलें राक्षसद्वीप असावें, असें अनुमान यापुढें किबेसाहेबांनीं केलें आहे. या जैनग्रंथांतहि लंकेविषयीं द्वीप असा उल्लेख नाहीं, अशी माहिती त्यांनीं दिली असून, ती सांगण्यांत द्वीप ह्मटल्यानें भोंवतीं समुद्र असण्याची आवश्यकता पाठींपुढें आपल्या अनुमानाला बाधूं न देण्याचा त्यांचा उद्देश दिसतो.

किबेसाहेबांच्या एकंदर प्रतिपादनांत दंतकथांकडे असलेला त्यांचा ओढा दिसून येतो व ग्रंथांचा आधार म्हणून वर दिलेलें हें प्रमाणहि दंतकथांनीं अर्धें अधिक ग्रासलेलें आहे. जैन ग्रंथांत पर्वताची म्हणून सांगितलेली उंची व रुंदी त्यांनीं राक्षसद्वीपाची मानिली आणि यानंतर पुढील अनुमान दंतकथांवरून केलें आहे. आतां येथें असा प्रश्न उद्भवतो कीं, या अनुमानाकरितां जैन ग्रंथाची एवढा उलथापालथ करण्याचें कारण काय? आणि ती करून नवीन लाभ काय झाला? त्यांत सांगितलेली उंची असंभाव्य म्हणून जर सोडून देतां आली तर रामायणांतील लांबीरुंदीची त्यांना एवढी अडचण कोणती वाटली? बरें, जैन ग्रंथावरून त्यांना इष्ट असलेली लांबीरुंदी कळली तरी त्या द्वीपाचें स्थान अमरकंटकाचे दक्षिणेला मानण्याला त्या ग्रंथांत आधार कोणता आहे? दंतकथा हाच याला मुख्य आधार मानावयाचा ना? जैन ग्रंथांत राक्षसद्वीप असें नांव असल्याचें ते सांगतात, पण या नांवावरूनच तें समुद्रांत असल्याचें व्यक्त होतें, याची वाट काय? आणि लंकाद्वीप म्हणून त्यांत उल्लेख नाहीं असें ते सांगतात यांत अर्थ काय? दुसरें असें कीं, हिंदुस्थानाभोंवतीं असलेल्या समुद्रांत द्वीपाचा शोध करणाराला ग्रंथोक्त लांबीरुंदी वगैरेची अडचण वाटते तसा प्रकार किबेसाहेबांच्या कल्पनेमध्यें नाहीं. कारण समुद्रासंबंधाची अडचण त्यांनीं आधींच बाजूला केली असल्यामुळें त्यांच्या कल्पनेप्रमाणें अमरकंटकाचे खालचा रामायणांत सांगितलेल्या लांबीरुंदीचा प्रदेश लंकेकरितां तोडून दिला म्हणजे भागण्यासारखें आहे. तेव्हां ग्रंथाचा आधार केव्हांहि महत्त्वाचा मानिला जातो हें पाहून त्यांनीं हा आधार पुढें केला व प्रो. जाकोबी यांनीं तो पुढें केला असल्यामुळें

त्याला अधिक महत्त्व आलें याकरितां तो त्यांनीं प्रथम नमूद केला, यापलीकडे यांत अर्थ दिसत नाहीं. ग्रंथाचा आधार सोडून दिल्यावर दंतकथा तेवढया उरतात व त्यांवरच किबसाहेबांचा पुढील लेख उभारलेला आहे.

रामायणांतील कित्येक स्थलें व लोक यांविषयीं किबसाहेबांनीं ज्या कल्पना केल्या आहेत त्यांची प्रथम माहिती देऊन मग त्यांच्या प्रतिपादनाकडे वळूं. कांहीं कल्पना दुसऱ्या कोणा शोधकांनीं सुचविल्या असून स्वमताचे पुष्ट्यर्थ त्यांचीं नांवेंहि किबसाहेबांनीं त्या स्थलीं सांगितलीं आहेत.

१ बिलासपूर जिल्ह्याचे पूर्वभागांत एक रानटी जात ( Urao ) असून हेच पूर्वीचे वानर असावे. ( बाबू शरच्चंद्र राय यांचा ग्रंथ पहा. ) स्वतांला रावणवंशीय म्हणविणाऱ्या गोंड लोकांच्या शेजारींच यांची वस्ती आहे.

२ शबरीचें एक स्थान बिलासपूर जिल्ह्यांत लोक दाखवितात. शबरीनारायण म्हणून एक स्थान अमरकंटकापासून ७ मैलांवर आहे.

३ शबरीचे स्थानापासून दोन मैलांवर खरौद म्हणून एक खेडें आहे. हें खरदूषणांचें निवासस्थान होय.

४ छोटानागपूरमधील अर्पा नदी ही पूर्वींची पंपा होय.

५ चित्रकूटांत उगम पावणाऱ्या गोदावरीचे तीरीं रामाचें निवासस्थान होतें व तेथून रावणानें सीतेचा अपहार केला. येथून जवळच क्रेंजुऱ्या म्हणून पर्वत आहे, हाच पूर्वींचा विंध्याद्रीची शाखा म्हणून सांगितलेला क्रौंच पर्वत असावा. हा पर्वत बहुतेक रेवा संस्थानांत असून त्याचें एक टोंक मात्र संयुक्त प्रांतांत गेलेलें आहे.

६ येथून तीन मैलांवर मतंगाश्रम म्हणून स्थान आहे. बिलासपूर जिल्ह्याच्या उत्तरभागाला मातिन म्हणतात व हें नांव बहुधा त्यावरूनच त्या भागाला मिळालें असावें. संयुक्त प्रांतांतील एक प्रख्यात संशोधक रायबहादुर हिरालाल यांचें असें मत आहे कीं, या भागांत रानटी हत्ती पुष्कळ आहेत व त्यावरून ( मंतग=हत्ती ) तेथील ऋषींना त्यांचें नांव प्राप्त झालें असावें.

७ या मतंगाश्रमाला लागून पंपा असावयाची व त्यापुढें सुग्रीवाचें निवास-

स्थान ऋष्यमूक पर्वत येतो. आणि या धोरणानें किष्किंधा ही मातिन जिल्ह्यांत कोठें तरी असावी.

८ अमरकंटकाला आम्रकूट असेंहि एक नांव आहे. बालाघाटच्या एका शिखराचें नांव सालटेंकडी असें आहे. पूर्वीचा हा सालकूट असावा. मधुकूट हें नांव अशाच प्रकारचेंच आहे. तेव्हां आम्रकूट, सालकूट व मधुकूट या तिघांना त्रिकूट म्हणत असावेत असें वाटतें. रावणाचे वंशाला सालकटंकट असें नांव आहे, हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

किबेसाहेबांनीं केलेल्या अनुमानांविषयीं आतां क्रमानें विचार करूं. गोंड हे आपणांस रावणवंशीय म्हणवितात व त्यांचे शेजारीं असलेली एक रानटी जात हेच पूर्वींचे वानर असावेत असें किबेसाहेबांचें म्हणणें आहे. या जातीला सांप्रत ( Urao ) असें नांव असून हा शब्द वानर शब्दाचा अपभ्रंश असावा अशी त्यांची कल्पना आहे. वास्तविक हा मुद्दा गौण आहे. स्थलनिर्णय अन्य प्रमाणांनीं सिद्ध झाल्यावर असलें प्रमाण पुढें देतां येईल. परंतु तोंपर्यंत तें पुढें आणण्याच्या योग्यतेचें नाहीं. गोंडलोक रावणवंशीय म्हणवितात, हें येथें महत्त्वाचें आहे. पण त्याविषयीं आमचें म्हणणें मागें सांगितलेंच आहे.

शबरीचें स्थान विलासपूर जिल्ह्याचे पूर्वभागांत लोक दाखवितात व त्याचे जवळ दोन मैलांवर खरौद म्हणून गांव आहे, अशी माहिती किबेसाहेबांनीं दिली आहे खरदूषण जनस्थानांत रहात असून तेथें त्यांचा रामानें वध केला हें रामायणांत स्पष्ट लिहिलेलें आहे व तें प्रसिद्ध आहे. खरदूषणांचा वध झाल्यावर रावणानें त्यानिमित्त सीतेचा तेथें येऊन अपहार केला व त्यानंतर राम सीतेचा शोध करीत करीत किष्किंधेंत येऊन तेथें सुग्रीवाशीं त्याचें सख्य झालें आणि सुग्रीवाचे आज्ञेनें जे वानर सीतेचा शोध करण्याकरितां गेले त्यांना शबरी भेटली अशी मूळ कथा आहे. किबेसाहेबांनीं ठरविलेलीं स्थळें बरोबर मानिलीं तर खरदूषणांचे निवासस्थानापासून शबरीचा आश्रम दोन मैलांवर असल्यामुळें रामाचा मधील प्रवास व वानरचमूनें सीताशुद्ध्यर्थ एक महिन्याहून अधिक काल केलेलें भ्रमण अवघ्या या दोन मैलांत अंतर्भूत करावें लागणार आहे, याचा किबेसाहेबांनीं विचार केला आहे काय ?

आपण निश्चित केलेल्या स्थानांविषयीं किबेसाहेबांनीं संक्षेपानें निरूपण करितांना उत्तरेला चित्रकूट व दक्षिणेला पंपा असें सांगितलें आहे. ज्या गोदावरीचे तीरीं राम रहात होते व जेथून रावणानें सीतेचा अपहार केला ती नदी चित्रकूटाशीं असल्याचें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. राम पंचवटींत गोदातीरीं राहिले व सर्व भाग जनस्थानांत मोडत असून त्यांतच खरदूषणांची वस्ती होती, या गोष्टी रामायणांत स्पष्ट आहेत. ( ३।१३।१७, १८; ३।१७।२, ५ ) तेव्हां खरदूषणांचें जें निवासस्थान त्यांनीं ठरविलें आहे तें पूर्वींचें जनस्थान मानणें भाग आहे. हें गांव बिलासपूर जिल्ह्यांत असल्याचें त्यांनीं दिलेल्या माहितीवरून दिसतें. रामनिवासाचें व सीतापहाराचें स्थान त्यांनीं चित्रकूटाशीं ठरविलें आहे. आणि खरदूषणांचें स्थान ते बिलासपूर जिल्ह्यांत सांगतात. मूळ रामायणांत तर हीं स्थानें भिन्न दिसत नाहींत. आणि किबेसाहेबांच्या कल्पनेप्रमाणें या स्थानांचा निश्चय केल्यास हीं स्थानें भिन्न व एकमेकांपासून फार अंतरावर येऊन पडतात, यांची वाट काय ?

शबरीचें निवासस्थान बिलासपूर जिल्ह्यांत त्यांनीं सांगितलें असून शबरीनारायण अमरकंटकापासून ७ मैलांवर असल्याचें त्यांनीं पुढें म्हटलें आहे. हीं स्थानें भिन्न आहेत का एक आहेत, हें त्यांनीं तेथें स्पष्ट लिहिलें नाहीं; तथापि हीं स्थानें भिन्न असून यासाठींच त्यांनीं तीं अभेदानें दर्शविलीं नसतील, तर स्वभावतःच हें प्रतिपादन अयुक्त ठरत आहे. बरें, तीं एकच असतील तर त्यांचेच मताप्रमाणें खरदूषणांचें निवासस्थान तेथून दोन मैलांवर असल्यामुळें सीतेचा शोध करीत राम उत्तरेकडे गेले, असें धडधडीत रामायणाविरुद्ध मानण्याचा अनवस्थाप्रसंग येणार आहे.

छोटानागपूरमधील अर्पानदी ही किबेसाहेबांनीं पूर्वींची पंपा ठरविली आहे व सुग्रीवाची किष्किंधा ही बिलासपूरचे उत्तर भागांत—ज्याला मातिन म्हणतात त्यांत असावी, अशी नवीन कल्पना त्यांनीं सुचविली आहे. त्यांच्या पहिल्या लेखांत त्यांनीं विंध्याद्रीचे उत्तर उतरणीवरील कंधो म्हणून असलेलें गांव हीच पूर्वींची किष्किंधा ठरविल्याचें वाचकांच्या लक्षांत असेलच. मागाहून मिळालेल्या माहितीवरून जीं इतर स्थानें त्यांनीं ठरविलीं त्यांची संगति राखण्या-

करितां त्यांनीं किष्किंधेचें स्थान पश्चिमेकडून पूर्वेकडे आणिलें आणि यासाठीं तिचेविषयीं नवीन कल्पना असें आम्हीं वर म्हटलें आहे; पण या नवीन कल्पनेंत दुसरा अनवस्थाप्रसंग येत आहे, हें त्यांच्या मुळींच लक्षांत आलें नाहीं. त्यांच्या नव्या लेखामध्यें लंकेच्या स्थानाचा पुनरुच्चार केलेला नाहीं; तथापि तें स्थान ठरविण्याचा तर दोनहि लेख लिहिण्यांत त्यांचा उद्देश आहे. हें स्थान पेंडरारोड म्हणून जें स्टेशन आहे, त्यापासून दहा मैलांवर रेवासंस्थानच्या बंडवगड परगण्यांतील एका टेंकडीवर त्यांनीं ठरविलें आहे. म्हणजे विलासपूरच्या पश्चिमोत्तर दिशेकडे तें स्थान येतें. विलासपूरच्या उत्तरभागांत त्यांनीं किष्किंधा ठरविली आहे व विलासपूरच्या सीमेबाहेर पश्चिमोत्तर दिशेला तिला लागूनच लंका येत आहे. मग येथें असा प्रश्न उद्भवतो कीं, सीतेचा शोध करण्यास रामाला इतका अवधि कां लागावा ? सुग्रीवाला रावणाचें निवासस्थान सर्वथा अज्ञात कां असावें ? सीताशुद्ध्यर्थ दूरदूरचे वानर त्याला बोलावून आणण्याची आवश्यकता कां वाटावी ? अशा रीतीनें सीताशुद्ध्यर्थ वानरचमू बाहेर पाठविण्याची आवश्यकताच नसल्यावर सुग्रीवानें त्यांना भूगोलवर्णन तरी कसलें सांगावयाचें ? आणि हें भूगोलवर्णन—कीं ज्यावर किबेसाहेबांचें सर्व कल्पनामंदिर उभारलें आहे तें--लटपटल्यावर पुढील मंदिर तरी कसें टिकावें ? रावण सीतेला घेऊन जात असतां मार्गांत किष्किंधेजवळ ऋष्यमूकपर्वतावर बसलेल्या वानरपंचकांकडे तिनें अलंकार टाकिल्याची कथा आहे; अर्थात् जनस्थानांतून लंकेकडे येण्याचे मार्गावर किष्किंधा असल्याचें दिसून येतें; पण किबेसाहेबांचे कल्पनेप्रमाणें जनस्थानांतून लंकेकडे येतांना वाटेंत किष्किंधा किंवा ऋष्यमूक लागणार नाहींत, याची वाट काय ? अमरकंटकाचे दक्षिणेला राक्षसद्वीप प्राचीनकालीं होतें, असें त्या भागांत प्रचलित असलेल्या दंतकथांवरून किबेसाहेबांनीं ठरविलें असून जैनग्रंथांत लंकापुरी राक्षसद्वीपांत असल्याचें सांगितलें आहे हा ग्रंथाधार म्हणून त्यांनीं पुढें केला आहे. लंकेचें स्थान त्यांनीं पूर्वीचे लेखांत अमरकंटकाचे उत्तरेला ठरविलें आहे व नवीन लेखांत दक्षिणेकडे ठरविलें आहे, म्हणजे लंकेच्या स्थानाविषयीं विवेचन करणाऱ्या या दोन लेखांमध्यें सबंध अमरकंटकाइतकें अंतर पडलें आहे !

अमरकंटकाचें दुसरें नांव आम्रकूट असून त्यावरून त्रिकूटांच्या कल्पनेची किबेसाहेबांनीं जी जुळवाजुळव केली आहे, ती तर स्वभावतःच विसंगत आहे. राक्षसद्वीपाचे मध्यभागीं त्रिकूट असून त्यावर लंका असल्याचें जैनग्रंथावरून कळलें व त्यावर त्यांनीं राक्षसद्वीपाचें स्थान अमरकंटकाचे दक्षिणेला ठरविलें आणि अमरकंटकाचा समावेश ते मागाहून त्याच राक्षसद्वीपांत असलेल्या त्रिकूटांत करूं लागले! याला काय म्हणावें हें कळत नाहीं.

अशा रीतीनें किबेसाहेबांनीं नवीन म्हणून पुढें आणिलेलीं प्रमाणें विसंगत असून त्यांच्या सिद्धान्ताला पोषक नाहींत. कोठें दंतकथांच्या आधारावर तर कोठें नामसादृश्यावर त्यांच्या कल्पनांची उभारणी आहे; पण दंतकथांचा आधार घ्यावयाचा तर अमरकंटकाचे भागांतील प्रचलित कथाच या कामीं प्रमाण मानावयाच्या असा कांहीं दंडक करितां येणार नाहीं; व हा दंडक नसल्यावर इतर दंतकथाहि या कामीं विरोध करूं शकतील. शबरीचें स्थान ज्याप्रमाणें अमरकंटकाशीं असल्याचें तिकडील दंतकथांवरून दिसतें, तसें तें दक्षिणेकडे रामदुर्गाशीं असल्याचें तेथील दंतकथांवरून कळतें. तेव्हां कोठली दंतकथा आतां प्रमाण मानावयाची ? वास्तविक हा निर्णय करण्याचा मुख्य अधिकार रामायणाचा; त्यांत निर्णायक प्रमाणें मिळत नाहींत व यामुळें खटाटोप करावा लागतो, हें खरें; तथापि नवीन आधार घेऊन कल्पना करितांना त्याचा विरोध तरी न येईल, असें वागणें अवश्य आहे.

किबेसाहेबांच्या कल्पनेचा रामायणाशीं कसा विरोध येतो, हें आम्हीं जेथें तेथें दाखविलेंच आहे. नामसादृश्यावर स्थलनिर्णयाचा प्रयत्न करणें हें तर अगदीं निरर्थक आहे. किष्किंधेचें स्थान विंध्याचे उत्तर उतरणीवर ठरवितांना तेथील कंधो नांवाचे गांवाशीं त्याचें सादृश्य असल्याचा आधार किबेसाहेबांनीं प्रथम घेतला आहे व पुढें त्यांना इतर स्थानें त्याचे अगदीं उलट दिशेला असल्याचें वाटूं लागल्यावर त्यांनीं तो प्रयत्न सोडून दिला आहे; आणि अशा रीतीनें नामसादृश्यावर अनुमान करणें कसें अयुक्त ठरतें, हें त्यांचें त्यांना पटल्याचें त्यांनीं अव्यक्तपणें लिहूनच ठेविलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे किबेसाहेबांचा मुख्य भर दंतकथा व नामसादृश्य यांवर आहे; पण हीं प्रमाणें

गौण असून रामायणांतील वर्णनाशीं संगति लावून दाखविण्याचा भार स्थलनिर्णय करितांना आपणास संभाळला पाहिजे याची जाणीव त्यांनीं ठेविली नाहीं, असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें.

## लंका आणि सिंहलद्वीप एक का दोन ?

रामायणांत सांगितलेल्या स्थलांचे निर्णयाचे कामीं नंतर झालेल्या ग्रंथांचें तादृश महत्त्व नाहीं हें पूर्वीं सांगितलें आहे व याकरितां अशा ग्रंथांविषयीं आम्हीं विचार केलेला नाहीं. पण लंकानिर्णयाचे कामीं एक प्रश्न या ग्रंथांतील उल्लेखांवरून उपस्थित झाला असून त्याचा विचार करणें भाग आहे. सांप्रत ज्याला सीलोन किंवा सिंहलद्वीप म्हणतों त्यालाच पूर्वीं लंका म्हणत असत, असें आम्हीं पूर्वीं दाखविलें आहे. रामायणांत या द्वीपाला लंका हें एकच नांव दिलेलें आढळतें. सिंहलद्वीप हें नांव रामायणांत दिसत नाहीं. नंतरच्या ग्रंथांत सिंहल आणि लंका असे दोन भिन्न प्रदेश आढळतात. सध्यांचें सीलोन हीं प्राचीन लंका असें रामायणावरून सिद्ध करतां आलें तरी सांप्रत त्याला सिंहलद्वीप हेंहि नांव आहे आणि मधील कालांत हे प्रदेश भिन्न दिसतात. अर्थात् त्या कालांत तरी लंकेचें स्थान कोणतें मानीत असत, असा प्रश्न उपस्थित झाल्यावांचून रहात नाहीं. प्रसिद्ध कवि राजशेखर [ इ. स. चें नववें शतक ] याचें बालरामायण म्हणून एक नाटक आहे. त्यांत त्या कवीनें रावणापुढें सीतास्वयंवर नाटक करून दाखविल्याचा प्रसंग कल्पिला आहे. यानिमित्त जनक राजाच्या मिथिला नगरींत नाना देशांचे राजे जमले असल्याचें कवीनें वर्णिलें आहे. त्यांत सिंहलद्वीपाचा राजा राजशेखर तेथें आल्याचें सांगितलें आहे व त्याचा आणि रावणाचा संवाद त्यानिमित्तानें कवीनें तेथें गोंविला आहे. लंकाधिपति रावण व सिंहलपति राजशेखर असे भिन्न राजे सांगितल्यामुळें त्यानिमित्त त्यांचे सत्तेखालचे देश भिन्न असल्याचें राजशेखराचे वेळीं मानीत असावे असें यावरून अनुमान होतें.

वराहमिहिराचे बृहत्संहितेंतील चौदाव्या अध्यायांत भारतवर्षांतील स्थलांची गणना केली आहे. यांत सिंधु नदीजवळचे प्रदेशापासून पूर्वेकडील कुरुक्षेत्रासुद्धां सर्व प्रदेश मध्य कल्पून त्याचे आठहि दिशांना असलेल्या देशांचीं नांवें

दिलेलीं आहेत. हीं नांवें देतांना तीं क्रमानें सांगितलेलीं नाहींत व यामुळें स्थल-निर्णयाचे कामीं वरील मध्याचे अपेक्षेनें त्यांची दिशा कळण्यापलीकडे त्याचा उपयोग नाहीं. दक्षिणेकडील देश सांगतांनाः—

**अथ दक्षिणेन लंका, कालाजिन, सौरिकीर्णतालिकटाः ।**
**गिरिनगर, मलय, दुर्दर, महेंद्रमालिंद्यभरुकच्छाः ॥**

या आर्येत लंकेचा उल्लेख आहे आणि यापुढें तीन आर्यांनंतरः—

**तुंबवन, कार्मणेयक, याम्योदधि, तापसाश्रमा ऋषिकाः ।**
**कांची, मरुची, पत्तन, चेर्यार्यक सिंहला ऋषभाः ॥ १६ ॥**

ही आर्या असून वराहमिहिरानें येथें लंका व सिंहलद्वीप हे दोन भिन्न देश दक्षिणेकडे दिले आहेत.

आतां महाभारताकडे वळूं. यांतील भीष्मपर्वांत भारतांतील नद्या व देश यांचा संग्रह केला आहे. यांतील नांवें क्रमानें सांगितलीं नसून त्यांत लंका किंवा सिंहलद्वीप यांपैकीं एकाचेंहि नांव नाहीं. मात्र भारतांतील म्हणून देश सांगतांना यवन, चीन, कांबोज, हण, पारसिक यांचे देशांचा त्यांत समावेश केलेला आहे व शेवटीं " उद्देशमात्रेण संकीर्तिताः " असें म्हणून ठेविलें आहे.

सभापर्वांत पांडवांचे दिग्विजयाचे निमित्तानें देशांचे नांवांचा संग्रह करण्यांत आला आहे. पांडवांपैकीं चार बंधु चार दिशांला गेले होते व त्यांपैकीं सहदेव दक्षिणेकडे गेला होता. त्याचे दिग्विजयांत लंकेंत बिभीषणाकडे दूत पाठवून त्यानें त्याजकडून कर घेतला, असें वर्णन आहे. [ ३२।७३, कुंभघोणप्रत ]

पुढें वनपर्वांत कर्णानें केलेल्या दिग्विजयाचे निमित्तानें भारतांतील देश सांगितले आहेत. त्यांत लंका किंवा सिंहलद्वीप सांगितलेलें नाहीं. आश्वमेधिक-पर्वांत अश्वमेधाचे निमित्तानें पांडवांनीं केलेल्या दिग्विजयांतहि हाच प्रकार आहे.

भागवतपुराणांत जंबुद्वीपाचे विभाग सांगितलेले आहेत, त्यांत सिंहल आणि लंका यांची गणना पृथक् केली आहे. पुढील श्लोक पहाः—

**स्वर्णप्रस्थश्चंद्र शुक्र आवर्तनो रमणको**
**मंदरहरिणः पांचजन्यः सिंहलो लंकेति** ॥ ५।१९।३७ ॥

प्राचीन ग्रंथांत आलेल्या या वर्णनांवरून सिंहल आणि लंका हे देश भिन्न

असल्याचें उघड दिसून येतें. तेव्हां या भिन्न नांवांनीं विवक्षित असलेले प्रदेश सध्यां कोठें आहेत हें प्रथम पाहणें अवश्य आहे.

सध्यां ज्याला आपण सीलोन अथवा सिंहलद्वीप म्हणतों व जी प्राचीनकालची लंका असें आम्हीं रामायणांतील प्रमाणांवरून ठरविलें आहे, तीहून महाभारतांत उल्लेखिलेली लंका भिन्न नाहीं अशी आमची समजूत आहे. महाभारतांत सहदेवानें केलेल्या दिग्विजयाचे निमित्तानें लंकेविषयीं जे उल्लेख आले आहेत त्यांवरूनच असा आमचा ग्रह झालेला आहे. त्यानें लंकेंत बिभीषणाकडे जो दूत पाठविला तो दुसरा तिसरा कोणी नसून भीमसेनाचा पुत्र घटोत्कच होता. यासंबंधीं भारतांतील अवतरण आमचा मुद्दा वाचकांस पटवून देण्यापुरतें येथें उद्धृत करितों:--

ताम्रपर्णीं ततो गत्वा कन्यातीर्थमतीत्य च।
दक्षिणां च दिशं सर्वां विजित्य कुरुनंदनः ॥२।३२।७५॥
उत्तरं तीरमासाद्य सागरस्योर्मिमालिनः।
चिंतयामास कौन्तेयो भ्रातुः पुत्रं घटोत्कचम् ॥७६॥

प्रययौ दक्षिणं कृत्वा सहदेवं घटोत्कचः।
लंकामभिमुखो राजन् समुद्रं स व्यलोकयन् ॥२।३४।१४॥
स दृष्ट्वा रामसेतुं च चिंतयन् रामविक्रमम्।
गत्वा पारं समुद्रस्य दक्षिणं स घटोत्कचः ॥१६॥
ददर्श लंकां राजेन्द्र नाकपृष्ठोपमां शुभाम्।

"नंतर सहदेव ताम्रपर्णीला जाऊन कन्यातीर्थी आला व (याप्रमाणें) दक्षिण दिशेकडील देश जिंकल्यावर तो मोठमोठ्या लाटा असलेल्या समुद्राचे उत्तरतीरीं आला आणि तेथें त्यानें भीमसेनाचा पुत्र घटोत्कच याचें स्मरण केलें."

"तो आला (व लंकेंत जाण्याविषयीं सहदेवानें त्याला आज्ञा केल्यावर) घटोत्कचानें त्याला उजवी घातली व तो दक्षिणेकडे जाण्यास निघाला. लंकेच्या समोर तो आला असतां त्याला समुद्र दिसूं लागला. (मार्गांत) रामाचा सेतु पाहून त्याला रामाचे पराक्रमाचें स्मरण झालें. तो थेट दक्षिणेला समुद्राचे पलीकडे गेला असतां स्वर्गाप्रमाणें सुंदर असलेली लंका, हे राजा, त्यानें अवलोकन केली."

येथें रामायणाप्रमाणें दक्षिण दिशा, दक्षिणेकडील समुद्र व त्यांत लंका आहे असें सांगितलें आहे व यावरून भारतांतील लंका रामायणाहून वेगळी म्हणतां येणार नाहीं,

वर दिलेल्या भारतांतील देशवर्णनांत सिंहलद्वीपाविषयीं वेगळा उल्लेख नाहीं. तथापि तो दुसऱ्या स्थलीं आला आहे. राजसूयाचे निमित्तानें पांडवांना ज्यांनीं करभार दिला, त्यांत लंकाधिपतीचा उल्लेख वर दिला आहे; तथापि यज्ञसमारंभाला तो स्वतां आल्याचें तेथें सांगितलेलें नाहीं; आणि यज्ञाला आलेल्या राजमंडलांत सिंहलाधिपतीचें नांव सांगितलेलें आहे.

**द्राविडाः सिंहलश्चैव राजा काश्मीरकस्तथा ॥ २।३७।१५ ॥**

पुढें पांडव अरण्यांत गेल्यावर श्रीकृष्ण त्यांना भेटावयास आले असतां त्यांनीं पांडवांच्या ऐश्वर्याचें वर्णन केलें, त्यांत राजसूयाचे वेळीं मोठमोठ्या देशांचे अधिपति वगैरे वाढप्यासारखीं कामें करीत असत, असा गौरवपूर्ण उल्लेख आला असून त्या निमित्तानें कांहीं देशांचीं नांवें आलीं आहेत. त्यांत—

**सिंहलान् बर्बलान् म्लेंच्छान् ये च लंकानिवासिनः ॥ २।४८।२३ ॥**

याप्रमाणें लंका व सिंहल असे पृथक् निर्देश आहेत. लंकाधिपति बिभीषणानें आपला प्रतिनिधि समारंभाकरितां पाठविला असावा असें यावरून अनुमान होतें.

रामायणांतील व भारतांतील लंका याप्रमाणें एक असल्याचें दाखवितां आलें तरी भारतांतील सिंहलद्वीप कोणतें आणि सध्यांचे लंकेला सिंहलद्वीप कधीं म्हणूं लागले हे प्रश्न सोडविल्यावांचून लंकानिर्णयाला पूर्तता येणार नाहीं. रामायणांत सिंहलद्वीपाचें नांव नाहीं व भारतादि ग्रंथांत तें लंकेला म्हणून योजिलेलें नाहीं, हें निर्विवाद आहे. सध्यांचे सिंहलद्वीपाचा इतिहास पाहूं गेल्यास ह्युएनत्संगचे प्रवासवृत्तांत त्याला हें नांव असल्याचें दिसून येतें. विजयनामक एका राजानें बुद्धाचा जन्म झाला त्या दिवशीं ( इ० स० पूर्वी ५४३ ) हें तेथील राजापासून घेतलें व त्याला आपला पिता सिंहल याचें नांव दिलें अशी एक कथा आहे. बौद्धांच्या "महावंसो" या ग्रंथामध्यें "वंगदेशांतील एका राजकन्येला सिंहापासून मुलगा झाला, त्याला लोक सिंहल म्हणूं लागले व त्यानें आपल्या अनुयायांसह येऊन येथें वसाहत केली" अशी एक कथा सांगितलेली आहे. तथें

सध्यां असलेल्या लोकांतहि, आपले पूर्वज ओरिसा प्रांतांतून वरील सिंहलाबरोबर आले, अशी समजूत आहे. लंकेला प्राचीन कालीं सिंहलद्वीप हें नांव नव्हतें, हें आपण पूर्वीं पाहिलेंच आहे आणि वरील दंतकथांवरून ऐतिहासिक काल कळला नाहीं तरी कोणातरी सिंहलनामक राजाचे निमित्तानें त्याला हें नांव प्राप्त झालें, असें अनुमान करण्यास अडचण नाहीं. ग्रीक लोकांनीं लंकेचा उल्लेख ताम्रमर्ण म्हणून केला आहे. त्यांनीं आपल्या भाषेंत त्याचें नांव टॅप्रोबेन असें दिलें आहे. व ध्वनिसादृश्यावरून मूळ शब्द ताम्रपर्ण असावा असें अनुमित होतें. लंकेला सिंहलद्वीप हें नांव या कालानंतर मिळालें असलें पाहिजे. आमचेकडील प्राचीन ग्रंथांत लंकेला हें नांव असल्याचें आढळत नाहीं. रत्नावलि नाटिकेंत लंकेचा सिंहलद्वीप म्हणून उल्लेख आहे. अर्थात् बौद्धधर्मानुयायी लंकेंत गेले, त्यानंतर हें नांव तिला मिळालें असलें पाहिजे. वर दिलेल्या दंतकथेशीं हा अनुमित काल जुळत आहे. ताम्रपर्ण या नांवाविषयीं मात्र आमचे ग्रंथांत आधार मिळत नाहीं. सहदेवानें केलेल्या दिग्विजयांत ताम्रद्वीप जिंकल्याचा उल्लेख आला आहे. (२।३२।७०) हा देश दाक्षिणेकडील म्हणून सांगितला आहे व दक्षिणेकडे ताम्रपर्णी नामक नदी प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे. ताम्रपर्णीचे तीराजवळचा प्रदेश ताम्रद्वीप अथवा ताम्रपर्ण या नांवानें गणला जाणें संभवनीय आहे. मलबारकडील कित्येक राजांनीं लंकेवर स्वाऱ्या केल्याचे लंकेच्या इतिहासांत उल्लेख आहेत. तेव्हां तेथील कोणातरी राजानें जिंकल्यामुळें लंकेलाहि तें नांव मधील कालांत मिळालें असावें अशी कल्पना आहे. ओड्र आणि उत्कल हे देश भिन्न असून एकसत्तेखालीं आल्यामुळें एकरूपता पावल्याचें दिसून येतें. बृहत्संहितेंत यांची गणना वेगवेगळी केली आहे, आणि त्रिकांडशेषांत ओड्र याला उत्कल हा प्रतिशब्दच सांगितला आहे. तसा प्रकार लंकेला मिळालेल्या ताम्रपर्ण नांवासंबंधानें झालेला असावा, असें दिसतें. महाभारतांत उल्लेखिलेलें सिंहलद्वीप हें कोणतें तें आतां पाहूं.

वराहमिहिराचे बृहत्संहितेंत दक्षिणेकडील देशांत सिंहलद्वीप सांगितलें आहे व यावरून हा देश दक्षिणेकडील दिसतो. राजशेखराचे बालरामायणांत लंकेंतून

रामलक्ष्मणादि मंडळी विमानांत बसून अयोध्येकडे येत असून मधील प्रदेश सीतेला क्रमानें दाखविल्याची कल्पना केली आहे. त्यांत प्रथमच सिंहलद्वीपाचें वर्णन आहे. यावरून हें नांव हिंदुस्थानचे अगदीं दक्षिणेकडील प्रदेशाला होतें, यांत शंका नाहीं. वरील ताम्रपर्णाला हें दुसरें नांव असण्याचा संभव आहे. कांहीं असो; प्राचीन कालचें व सध्यांचें सिंहलद्वीप हीं भिन्न असलीं तरी तीं जवळजवळ होतीं हें निर्विवाद आहे. कदाचित् या सिंहलद्वीपाचे राजानें लंका जिंकून तिचा आपल्या राज्यांत समावेश केला असेल; किंवा कोणत्या तरी कारणानें लंकेंत जाऊन स्वतंत्र राज्याची स्थापना केली असेल. पहिल्यापेक्षां दुसरी कल्पना अधिक संभवनीय वाटते; कारण हिंदुस्थानांतल्या दक्षिणेकडील या प्रदेशाचें नांव मधील कालांत अगदीं लुप्त झालें असून तें लंकेला मिळून आतां अक्षय्य झालें आहे. अबूरिहान यानें आपल्या इतिहासांत यांचें नांव सिंगलदिव किंवा सिरिदिव असें दिलें आहे. कोठें कोठें सेरेंदिप, सिरिंधुइल असे त्याचे उल्लेख आहेत. टॉलेमीनें त्याचें नांव सलिक असें दिलें आहे. हे सर्व सिंहलद्वीप शब्दाचे अपभ्रंश होत. आरबी ग्रंथांत याचा उल्लेख झिलन असा मिळतो आणि त्याचेंच सांप्रतचें “सीलोन” हें अपभ्रष्टरूप होय. असो. भारतांतील सिंहलद्वीप कोणतें हें त्या व इतर ग्रंथांतील उल्लेखांवरून वर अनुमानानें ठरविलें आहे. आणि लंकेला सिंहलद्वीप हें नांव त्यावरून मिळालें असावें अशी कल्पना सुचविली आहे. अर्थात् या कामीं ऐतिहासिक आधार—साधक वा बाधक—मिळतील त्यावर याची निश्चितता अवलंबून आहे. भारतादि ग्रंथांत लंका व सिंहल असे निर्देश पृथक् असल्यामुळें लंकेचें स्थान निश्चित करितांना जो एक घोंटाळा होतो तो, पूर्वींच्या सिंहलाचें स्थान हिंदुस्थानांत दक्षिणेला असल्याचें तरी निश्चित झालें आहे यामुळें तूर्त दूर झाला आहे असें म्हणण्यास अडचण नाहीं.

## २६ मधुपुरी.

मधुनामक राक्षसाची पुरी म्हणून हिचें नांव मधुपुरी. याचा पुत्र लवण याचा वध करून शत्रुघ्नानें येथें राज्य केलें. मधुपुरी शब्दाचा अपभ्रंश होऊन

सध्यां मथुरा असें नांव मिळालें आहे. मथुरेच्या नैर्ऋत्येला पांच मैलांवर महोली म्हणून एक स्थान आहे. हें पूर्वीचें मधुवन होय असें म्हणतात.

## २७ श्रावस्ती.

इक्ष्वाकुवंशांतील आठवा पुरुष श्रावस्त यानें या नगरीची स्थापना केली. रामानें लवाची येथें योजना केली व रामाचे मागें अयोध्या ओस पडल्यावर हीच उत्तरकोसलाची राजधानी झाली. बौद्धवाङ्मयांत ही नगरी त्या वेळीं फार प्रसिद्ध म्हणून आलेली आहे. बुद्धाचे वेळीं तिचें हेंच नांव होतें. फाहिआन यानें अयोध्या व श्रावस्तीमधील अंतर आठ योजनें व ह्युएनसंग यानें पांचशें ली लिहिलें आहे. सध्यां अयोध्येच्या उत्तरेस रापती ( इरावती ) चे कांठीं साहेटमाहेट म्हणून जें एक गांव आहे तें हेंच होय, असें वरील अंतरावरून शोधकांनीं ठरविलें आहे. येथें एक मोठा बुद्धाचा पुतळा डॉ. कनिंगहॅम यांचे पहाण्यांत आला. त्यावर श्रावस्ती अशीं अक्षरें होतीं. यावरून येथेंच पूर्वीची श्रावस्ती होती, असें निश्चित होतें. येथें जुने अवशेष पुष्कळ आहेत. गौतम-बुद्ध येथें पंचवीस वर्षें असून यानें आपल्या धर्माचा उपदेश करण्यास येथें प्रारंभ केला आणि याकरितां बौद्धधर्मानुयायांचें तें एक यात्रेचें स्थान होतें. ह्युएनचे वेळीं तें अगदीं मोडकळीस आलें होतें. फाहिआननें तर तेथें केवळ दोनशें घरें असल्याचें सांगितलें आहे. सध्यां तर तेथें अरण्य आहे. साहेट हा श्रावस्तीचा अपभ्रंश दिसतो व माहेट हें उपपद होय.

## २८ कुशावती.

ही कुशाची राजधानी विंध्याचे पठारावर असल्याचें रामायणांत सांगितलें आहे. ( ७।१०८।४ ) सध्यां तेथें कोणतें गांव आहे याविषयीं विश्वसनीय माहिती मिळत नाहीं. पंजाबांत लाहोरच्या आग्नेय दिशेला सुमारें ३२ मैलांवर कुसूर म्हणून एक गांव आहे. रामाचा पुत्र कुश यानें स्थापन केल्यावरून याचें मूळ नांव कुशावर होतें, अशी आख्यायिका आहे. कुसूर हा कुशावरचा अपभ्रंश होय. तथापि कुशाची ज्या नगरींत रामानें स्थापना केल्याचें रामाय-णांत वर्णन आहे, ती ही नव्हे. मूळ नांव आणि स्थलवर्णन हीं अगदीं भिन्न आहेत. तेव्हां कुशावरचा संस्थापक कुश वेगळा असावा, असें वाटतें. कुशावर

येथें प्राचीन अवशेष फार आहेत. यावरून तें प्राचीन असावें यांत मात्र शंका नाहीं.

## २९ तक्षशिला.

भरताचा मामा युधाजित् यानें रामाकडे आपले पुरोहित गार्ग्य मुनि यांना पाठवून सिंधूचे तीरांवर असलेला गांधर्व देश जिंकून आपल्या सत्तेखालीं घेण्याविषयीं सुचविलें आहे. त्याप्रमाणें भरतानें सेनेसह तेथें जाऊन गंधर्वांशीं युद्ध करून त्यांना जिंकलें व दोन पुत्र तक्ष व पुष्कल यांची दोन नगरींत स्थापना केली. यांतील राजपुत्र तक्ष याची तक्षशिला ही नगरी चिनी प्रवाशांनीं सिंधूपासून तीन दिवसांच्या वाटेवर असल्याचें लिहिलें आहे. ही नगरी बौद्धधर्मियांचें पवित्र स्थान म्हणून प्रसिद्ध आहे. ह्युएन्संग येथें दोनदां आला होता. बुद्धानें आपल्या पूर्वींच्या १००० अवतारांत आपलीं एक हजार मस्तकें दिलीं अशी कथा आहे. त्यांतील एक मस्तक येथें दिलें असून त्यावर अशोकानें स्तूप बांधिला असल्याचें लिहिलें आहे. यापूर्वीं तेथें फाहिआन हा प्रवासी आला होता. ( इ. स. ४०० ) यानें वरील दंतकथेला अनुसरून या नगरीचें नांव तक्षशिर किंवा च्युतशिर असावें अशी व्युत्पत्ति सुचविली आहे; परंतु या नगरीचें तक्षशिर असें नांव असल्याचें आढळत नाहीं. कारण इ. सनाचे प्रारंभीं तेथें कनिष्क राजाचें राज्य होतें. या राजाचा एक ताम्रपट सांपडला आहे, त्यांत या नगरीचा “ तक्षशिला ” असा स्पष्ट उल्लेख आहे. चिनी प्रवासी यांनीं दिलेलीं अंतरें तपासून पाहून डॉ. कनिंगहॅम यानें ही नगरी कालकसराई नामक गांवाचे ईशान्येला सुमारें एक मैलावर शहाधेरी म्हणून गांव आहे त्याचेजवळ अटक् आणि रावळपिंडी यांचेमध्यें असावी असें ठरविलें आहे. येथें ५५ हून अधिक स्तूप, २८ विहार व ९ देवळें आढळल्याचें त्यानें लिहिलें आहे. शहाधेरीच्या नैर्ऋत्येला सुमारें ८ मैलांवर हसन अबदुल म्हणून एक गांव आहे. तेंच पूर्वींची तक्षशिला असावी असा सेंट मार्टिन यानें तर्क केला आहे. कथासरित्सागरांत ती वितस्ता नदीचे तीरावर असल्याचें वर्णन आहे. ग्रीक ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत हिचें नांव टाक्सिला असें दिलें आहे. हा “ तक्षशिला ” शब्दाचा अपभ्रंश होय. तक्षशिलेच्या वैभवाविषयीं ग्रीक व चिनी प्रवासी यांनीं पुष्कळ वर्णन केलें आहे.

## ३० पुष्कलावती.

भरतपुत्र पुष्कलाची ही राजधानी. अलेक्झांडरचे वेळीं ही गांधार देशाची राजधानी होती. त्यानें या देशावर स्वारी करून तो जिंकला असा इतिहास आहे. अलेक्झांडरचा चरित्रकार एरियन् यानें या नगरीचा उल्लेख " पुंकेलेई " असा केला आहे. हा ग्रीक ग्रंथकार इ. स. १५० च्या सुमारास होऊन गेला. पुष्कलावतीचें पालीमध्यें " पुक्कलाओती " असें रूप होतें. " पुकेलेई " हा त्याचा अपभ्रंश होय. पेशावराहून ह्युएन निघाला तो ईशान्येला १७ मैल गेल्यावर पुष्कलावती येथें आला. वाटेंत त्याला एक नदी लागली. ही नदी सध्यांची " काबूल अथवा कोफी " होय. त्यानें केलेल्या या वर्णनावरून सांप्रतचीं शहरें परांग आणि चरसद्दा येथें पुष्कलावती होती असें वाटतें. स्वात नदी काबूलला जेथें मिळते त्या स्थळाचे आसपास जे आठ गांव आहेत त्यांस अष्टनगर म्हणतात. अलेक्झांडरनें जेव्हां यावर स्वारी केली त्यावेळीं येथें अस्ति किंवा हस्ती नांवाचा राजा होता, असा इतिहास आहे व त्या राजाचे नांवावरून या नगराला हस्तिनगर असें नांव पडलें. अष्टनगर हा त्याचा अपभ्रंश होय. " आठनगर " असा त्याचा अर्थ नव्हे.

## ३१ अंगदीया.

लक्ष्मणाचा पुत्र अंगद याचेकरितां ही नगरी वसवून तेथें रामानें त्याची स्थापना केली असें रामायणांत वर्णन आहे. ( ७।१०२।८ ) ही नगरी " कारुपथ " नामक देशांत असल्याचें सांगितलें आहे. ( ७।१०२।५ ) तक्षशिलेच्या दक्षिणेला सिंधूचे तीरीं या नांवाचा देश प्राचीनकालीं होता असें इतिहासावरून दिसतें. अंगदीया नगरी मात्र कोठें होती याविषयीं कांहीं माहिती मिळत नाहीं.

## ३२ चंद्रकांत.

लक्ष्मणाचा दुसरा पुत्र चंद्रकेतु याचेकरितां ही नगरी रामानें मल्लभूमीमध्यें वसविल्याचें वर्णन आहे. अलेक्झांडरचे इतिहासकारानें मल्लदेश म्हणून सांगितला आहे, तो हाच होय. नगरीचें स्थान मात्र निश्चित कळत नाहीं.



# भाग १० वा.

## रामायणांतील पात्रांचें गुणदोषविवेचन.

रामायणाची योग्यता किती आहे, व ती त्याला कोणत्या निमित्तानें प्राप्त झाली, याविषयीं विवेचन प्रथम भागांत केलें असून त्यांत रामायणांतील मुख्य पात्र जो राम त्यानें केवढा स्वार्थत्याग केला, व त्यामुळें तो किती लोकप्रिय झाला, याचें प्रायः निरूपण केलें आहे; रामाच्या इतर गुणांविषयीं आणि रामायणांतील इतर पात्रांच्या गुणदोषांविषयीं त्यांत मुळींच विचार केलेला नाहीं. याचें कारण उघड आहे. रामायणाची महती व तिचें कारण यांविषयीं विवेचन त्यांत करावयाचें होतें व हा उद्देश तेवढ्या विवेचनानें सफल होण्यासारखा होता व तो तसा झाला. तेव्हां राहिलेल्या बाबींपुरतें निरूपण प्रस्तुत भागांत करावयाचा विचार आहे. रामायणांतील पात्रांच्या गुणदोषांविषयीं विवेचन करावयाचें म्हटलें म्हणजे त्यांत रामाचे स्वार्थत्यागाविषयीं त्याचे गुण सांगतांना प्रामुख्यानें लिहावयाचें; असें असतां द्विरुक्तिदोषास्तव तें आम्हांला या भागांत लिहितां येत नाहीं. अर्थात् प्रथम भागांतील या विषयींचें निरूपण येथें घेतल्यानें या विवेचनाला पूर्णता येणार आहे व हेंच आम्हांला येथें आमच्या वाचकांस सुचवावयाचें आहे.

### १ राम.

रामायणांतील मुख्य पात्र राम असून त्याचे गुणदोषांविषयीं प्रारंभीं विवेचन करणें प्राप्त आहे. हें विवेचन करावयाचें म्हणजे रामाविषयीं असलेली देवत्वाची भावना बाजूला ठेविली पाहिजे; नाहीं तर या भावनेनें पहावयाचें म्हटलें तर असें विवेचन करितां येणार नाहीं; व केलें तरी तें निर्दोष होणार नाहीं. प्रेम किंवा आदर यांचा पदर दृष्टीवर असला म्हणजे पलीकडील पदार्थ स्पष्ट दिसत नाहीं, याचा अनुभव आपण व्यवहारांत नेहमीं पाहतों. मातेला पुत्राचे दुर्गुण व्यक्त दिसत नाहींत व कोणीं दाखविण्याचा यत्न केला तर त्याचा प्रतिकार

केल्यावांचून ती रहात नाहीं. पतीचे दुर्गुणांचा अनुभव स्वतःला आला तरी पत्नीला त्याचें कांहीं वाटत नाहीं आणि गुणवर्णनप्रसंगीं ती त्यांकडे लक्ष देत नाहीं अथवा उच्चारहि करीत नाहीं. गुरूचे दोष शिष्याला दोष न वाटतां गुण वाटतात व गुण म्हणून त्यांचें तो वर्णन करितो. या सर्वांचें कारण प्रेम किंवा आदर हेंच. त्याच व्यक्तींना इतरांचे गुणदोष व्यक्त व यथास्थित दिसतात व त्यावरून त्यांचे दृष्टीची कार्यक्षमता स्पष्ट होते आणि म्हणून वरीलसारख्या प्रसंगीं त्यांचे दृष्टीवरील प्रेमादराचा पदर अनुमानितां येतो. यांत कांहीं अपूर्वता आहे असें नाहीं; हा मनुष्याचा स्वभाव आहे. गुणदोषविवेचनाचे वेळीं हा दोष राहूं नये, याकरितां हा पदर बाजूला करून आपण पाहिलें पाहिजे. मनुष्याचा स्वभाव यत्न केला तरी बदलतां येत नसतो; व हा दोष स्वभावांतील असल्यामुळें तो लागलीच दूर होतो असें नाहीं; तथापि यत्न तरी करून पहावा.

## अवतारमीमांसा.

रामाविषयीं जनतेच्या मनांत इतकें प्रेम व आदर वाटण्याचें कारण म्हणजे तो विष्णूचा अवतार होता, हें होय. रावणादिकांची पीडा होऊन धर्माला ग्लानि आली असतां विष्णूनें रामावतार धारण करून त्यांचा निःपात केला व यामुळें त्याविषयीं लोकांत आदर वाटणें सरळ आहे. परमेश्वराचे अवताराची कल्पना प्रायः प्रत्येक धर्मांत आहे व धर्माची स्थापना हें सर्वांचें कार्य एकच आहे. मात्र अवताराविषयींचा सर्वसामान्य नियम आमचे धर्माप्रमाणें इतर धर्मांत नाहीं. गौतमबुद्धानें त्यापूर्वीं हजार अवतार धारण केले अशी बुद्धधर्मानुयायांची समजूत आहे व महंमद पैगंबर व येशूख्रिस्त यांचे अवतार पुढें होणार असल्याचें त्यांचे अनुयायी मानीत असतात; व यावरून धर्मस्थापना हें सर्वांचें कार्य एक असलें तरी धर्माला ग्लानि आली असतां त्या त्या वेळीं परमेश्वर अवतार धारण करितो, अशी कल्पना त्यावरून कोणाला करितां येईल असें वाटत नाहीं. दोन कल्पनांचे मुळाशीं भेद महत्त्वाचा आहे व तो हा कीं, इतरांच्या अवताराचा काल निश्चित आहे व तो आमचेकडील कल्पनेंत नाहीं. अवतारकल्पनेला आधारभूत असलेल्या गीतेंतील प्रसिद्ध श्लोकयुग्मांत हा नियम

सांगितलेला असून त्यांत कालाविषयींचें हें सामान्य धोरण उघड दिसून येत आहे. अर्थात् अमुक वेळीं अवतार घ्यावयाचा असें देव आधीं ठरवीत नाहीं व तें सयुक्तिक आहे. एकादें मोठें यंत्र चालू असतें व हाताखालच्या कामकऱ्यांवर मुख्य चालक देखरेख करीत स्वस्थ असतो आणि ज्या वेळीं कोणत्या तरी करणानें यंत्रांत बिघाड होऊन कामांत व्यत्यय येणार असें दिसतें त्या वेळीं तो जातीनें काम करून सुधारणा करितो व यंत्र पूर्ववत् चालू झाल्यावर आपलें देखरेखीचें काम पुनः करूं लागतो. हाच प्रकार अवतारकार्याचा आहे. अवताराच्या आवश्यकतेविषयीं आधीं अनुमान करितां आल्यास तशी परिस्थिति उत्पन्न न होऊं देण्याचे उपाय योजणें अधिक सयुक्तिक असल्यामुळें तें परमेश्वराचें कर्तव्य ठरतें; तेव्हां अवताराविषयीं त्याला आधीं जाणीव असल्याची कल्पना करण्यांत नकळत आपण त्यावर कर्तव्यपराङ्मुखतेचा आरोप करितों, असें होत नाहीं काय? तेव्हां अवतार घ्यावयाची वेळ आधीं कळत नसून त्याची आवश्यकता वाटतांच परमेश्वरानें अवतार घ्यावयाचा, हें सरळ दिसतें. अर्थात् त्याचें ज्ञान मनुष्याला आधीं नव्हे, पण त्या वेळीं तरी कसें होणार? अवताराचे कार्याचें जें स्वरूप गीतेंत दाखविलें आहे, त्यावरून तें कार्य घडून आल्यावर जाणत्या मनुष्याला त्याचा तर्क व्हावयाचा आहे.

अवतार या शब्दाचा वास्तविक अर्थ "खालीं उतरणें" असा आहे व त्यांत परमेश्वर वर असल्याची कल्पना अंतर्भूत आहे. सृष्टींतील घडामोडी त्याचे प्रेरणेनें चालावयाच्या म्हटल्या म्हणजे तो सर्वांच्या वर आहे अशी आपली कल्पना होते, हें खरें; तथापि त्याची सर्वव्यापकता लक्षांत घेतल्यावर तो वर असून खालीं येत असल्याच्या कल्पनेला वाव उरत नाहीं. अर्थात् अवतार घ्यावयाचा म्हणजे त्याला खालीं यावें लागत नसून प्रकट व्हावें लागतें. सर्व सृष्टीला व्यापून असलेला परमेश्वर इष्टकार्यापुरता विशिष्ट स्थलीं प्रकट होतो व त्यासच आपण अवतार झाला, असें समजतों. कांहीं पुराणांतून अवतारवर्णन करितांना जन्मकथनाचे प्रसंगीं अशा प्रकारें प्रकट झाल्याचें निरूपण केलेलें असतें, पण त्यांतील हेतु वेगळा आहे. परमेश्वराचा अवतार; तेव्हां इतर प्राण्यांप्रमाणें त्यानें स्त्रीचे उदरांत राहून योनिद्वारा बाहेर पडणें चमत्कारिक वाटतें व

याकरितां परमेश्वरी आवीर्भावाची कल्पना त्यांत आलेली असते. अवताराविषयीं आम्हीं जी कल्पना वर सांगितली आहे ती या दृष्टीनें नसून, परमेश्वराच्या सर्व-व्यापकतेच्या दृष्टीनें होय. या सर्वव्यापकतेपुढें पुष्कळ शंका निरस्त होतात. अवताराचें वास्तविक स्वरूप 'प्रकट होणें' हें असल्यामुळें, विशिष्ट स्थलीं त्याचें अयोनिसंभवत्व मानण्याचें कारण राहात नाहीं; कारण प्रकट होणें म्हणजे जन्म घेणें इतकाच अर्थ नव्हे. जन्म घेणें हा एक त्यांतला प्रकार होय. प्रकट होण्याला जन्म घेण्यापासून सर्व संस्कार झाले पाहिजेत असें नाहीं. त्याची व्याप्ति सर्वत्र असल्यामुळें कार्यापुरतें त्याला कोठेंहि अचानक प्रकट होतां येण्यासारखें आहे. अवताराचें हें स्वरूप लक्षांत घेतलें म्हणजे अवतारी पुरुषांत गुण-दोषांचें मिश्रण कधीं आढळल्यास त्याविषयीं चकित व्हावयास नको; आणि अंशावतार व पूर्णावतार असा भेद करावयास नको. कार्याच्या लहान व मोठ्या स्वरूपावरून हे भेद करीत असतात; परंतु कोठें झालें तरी कार्य त्याचेंच आहे.

दुसरें असें कीं, 'अवतार' या शब्दांत आमची वरील कल्पना स्वभावतः आली आहे. 'अवतार' या शब्दाचा वास्तविक अर्थ 'खालीं उतरणें' असा वर दिला आहे. अर्थात् परमेश्वर अवतार घेतो म्हणजे आपली उच्च कोटि सोडून खालच्या कोटींत येतो, हें उघड आहे. तो नामरूपातीत व सर्वव्यापी असतां त्यानें रूप धारण करणें म्हणजे खालची कोटि आपण होऊन पत्करणें आहे. तेव्हां अशा रीतीनें खालची कोटि त्यानें—लोककल्याणासारख्या उच्च हेतूनें कां होईना—पत्करिल्यावर त्याचें मूळच्या स्वरूपांतील दोषराहित्य त्यानें आपण होऊन सोडल्यासारखें झालें नाहीं काय? विशिष्ट रूपानें प्रकट होण्यांत तर त्याचें सर्वव्यापित्व प्रथमच सुटतें. तेव्हां खालच्या कोटींत येऊन त्याबरोबर प्राप्त होणारे दोष त्यानें स्वतां पत्करल्यावर उच्च कोटींतील त्याच्या दोषराहित्याची आपण त्याचे ठायीं अपेक्षा कां आणि कशी करावयाची?

अवताराविषयीं वरील प्रमाणें मीमांसा करून आम्हांला हेंच दाखवावयाचें आहे कीं, अशा पुरुषांविषयीं गुणदोषनिरीक्षणपूर्वक विवेचन करण्यांत दोष नाहीं. त्यांच्या इष्टकार्याकडे पाहून आपण त्यांचें अवतारित्व अनुमानीत असतों व असें कार्य दिसूं लागेपर्यंत ते सामान्य व्यक्तींतच मोडत असतात.

अवतारकार्याविषयीं निर्देश करून अवतारी पुरुष ओळखण्याचें साधन ज्या श्रीकृष्णांनीं सांगितलें, त्यांच्या चरित्राकडे पाहिलें तर आपणांस हें उघड दिसून येईल. अर्जुनाला विश्वरूपदर्शन करवीपर्यंत श्रीकृष्ण आपला सवंगडीच वाटत होता व हें त्यानें विश्वरूपदर्शन होतांच बोलूनहि दाखविलें आहे. अक्रूर हा श्रीकृष्णाचा महाभक्त असें आपणांला वाटतें; परंतु स्यमंतक मण्यासंबंधानें जी कथा भागवतांत आली आहे, ती वाचली असतां त्याचा श्रीकृष्णाविषयीं खरोखर आदर कितपत होता, याविषयीं संशय येतो. सामान्य व्यवहारांत लबाड्या करितात व त्या करणारांची सामान्य पुरुषांत गणना करीत असतों; आणि अक्रूरानें तर श्रीकृष्णाशीं या प्रसंगीं लबाडी आणि उद्दामपणा प्रकट केला आहे. श्रीकृष्णचरित्रांत त्याचे बरोबरीच्या पुरुषांच्या या व्यवहारावरून त्याविषयीं त्यांची काय भावना होती, ती उघड दिसून येते. त्या वेळीं त्यांची अशी भावना असणें यांत त्यांजकडे दोष नसून हा मनुष्यस्वभाव आहे आणि वास्तविक दोष असेल, तर त्यांच्या या नैसर्गिक भावनेविरुद्ध त्याच्याविषयीं कल्पना करण्यांत आहे.

## रामावताराविषयीं रामायणांतील भावना.

श्रीकृष्णाच्या चरित्रांतील कांहीं भागावरून वरीलप्रमाणें अनुमान करितां आलें तरी स्वतां श्रीकृष्णाचा पुष्कळ व्यवहार परमेश्वरी अवतार या नात्यानें चालला होता, यांत संशय नाहीं. गीतेंतील उपदेश तर याच भावनेनें केला आहे. राम व कृष्ण यांच्या चरित्रामध्यें या बाबतींत स्पष्ट भेद दिसून येतो. रामायणांत रामाचा विष्णूचा अवतार म्हणून निर्देश फार थोडा आहे व जेथें तो आहे तो भाग अन्य कारणांनीं प्रक्षिप्त दिसत आहे. रामजन्मापूर्वीं दशरथानें पुत्रीया इष्टि केल्याचें वर्णन असून त्यांत सर्व देव तेथें येऊन त्यांनीं रावणवधाकरितां अवतार घेण्याविषयीं विष्णूला विनंति केली आहे व स्वतांचे चार भाग करून त्यानें अवतार धारण केल्याचें सांगितलें आहे. ( १।१५।१६ ) रावणवधानंतर ( ब्रह्मदेवादि ) देव ( सीतेनें दिव्य केलें तेव्हां ) तेथें आले त्यांत ब्रह्मदेवकृत स्तुतींत रामाविषयीं ' विष्णूचा अवतार ' म्हणून उल्लेख आहे. ( ६।११७ ) अयोध्याकांडाचे प्रारंभीं उपक्रमाचे श्लोकांत ( २।१।७ ) असा उल्लेख आहे. हे सर्व भाग प्रक्षिप्त असल्याचें अन्यत्र दाखविलें आहे. रामाचे

योग्यतेविषयीं कितीहि वर्णन असलें तरी त्याचें सर्वसाधारण धोरण विष्णूचा अवतार म्हणून सांगण्याकडे नाहीं. रामायणाचे प्रारंभीं नारदवाल्मीकींचा जो संवाद आहे, त्यांत वाल्मीकींचे प्रश्नास उत्तर देतांना नारदाचे तोंडीं—

**विष्णुना सदृशो वीर्ये सोमवत् प्रियदर्शनः ॥ १।१।१८ ॥**

"तो पराक्रमामध्यें विष्णूची बरोबरी करणारा असून चंद्राप्रमाणें त्याचें दर्शन सर्वांला प्रिय आहे."

असें वचन आहे. उपमा द्यावयाची ती दोन भिन्न पदार्थांतील सादृश्य दाखवावयाचें असतां देत असतात व यावरून विष्णु व राम यांचें ऐक्य नारदाला अभिमत नाहीं, असें दिसतें. रावणाशीं रामाचें जें शेवटीं युद्ध झालें त्या प्रसंगाचें वर्णन करितांना रामलक्ष्मण रावणासमोर रणांगणीं उभे असतां कसे दिसले हें सांगण्याच्या निमित्तानें विष्णु व वामन यांच्या जोडीची उपमा दिलेली आहे. (६।९९।१२) हें वर्णन स्वतां कवीच्या हातचें आहे. ताटकावधाचे वेळीं स्त्रीवर प्रहार कसा करावा अशी रामाला शंका आली असतां विश्वामित्रांनीं विष्णूनें भृगुपत्नीचा वध केल्याची कथा निरूपण केली आहे. (१।२५।२१) सिद्धाश्रमांत गेल्यावर तेथें पूर्वीं विष्णूनें तपश्चर्या केल्याची कथा सांगितली आहे. (१।२९।२) म्हणजे स्वतां रामाला विष्णूचा अवतार समजून विश्वामित्राची येथील वागणूक दिसत नाहीं. यौवराज्याभिषेकापूर्वीं राजा दशरथानें जो दरबार भरविला त्यांत रामाचें गुणवर्णन करितांना "तो उत्तमोत्तम भाषण करण्यांत बृहस्पतीप्रमाणें वक्ता आहे व त्याच्या भिंवया सुंदर असून विशाल व आरक्तवर्ण नेत्र यांचे योगानें तो विष्णूसारखा दिसतो," (२।२।४३) असें सांगितलें आहे. अर्थात् प्रजाजनांचा व्यवहार रामाविषयीं सामान्य मनुष्य या नात्यानें चालत होता, हें उघड आहे व असें असणें स्वाभाविक आहे. खरादिकांचा रामानें अल्पकालांत निःपात केला त्या वेळीं देवांनीं त्याचेवर पुष्पवृष्टि केली व रामाच्या पराक्रमाचें कौतुक करीत ते म्हणतात "पराक्रमानें विख्यात झालेल्या या रामाचें काय हो तरी हें कर्म! अहो, याचें वीर्य व धैर्य विष्णूप्रमाणें दिसत आहे." (३।३०।३२) विष्णूला अवतार घेण्याविषयीं देवांनीं विनंति केल्याचा जो भाग बालकांडांत असल्याचें वर सांगितलें आहे तो प्रक्षिप्त न मानिल्यास देवांचे

वरील उद्गार अगदीं विसंगत होतील. देवांना राक्षसादिकांचा उपद्रव फार होत असे, याकरितां त्यांनीं रामाचें अभिनंदन करणें साहजिक आहे; परंतु उपमा देतांना त्यांनीं नेमकें विष्णूचें नांव घेतलें व तें घेऊनहि आपल्या प्रार्थनेप्रमाणें विष्णुच रामरूपानें अवतीर्ण झाला आहे याचें त्यांना स्मरण राहिलें नाहीं, हें संभवनीय नाहीं; स्वतां विष्णु व रावण यांचें युद्ध झाल्याचें कोठें वर्णन नाहीं. परंतु मारुतीनें रावणाचे वाड्यांत प्रवेश केल्यावर रावणाला त्यानें अंतःपुरांत स्वस्थ निजलेला पाहिला. या प्रसंगीं त्याचें स्वरूप वर्णन करण्याचे निमित्तानें त्याचे बाहूविषयीं "विष्णूच्या चक्राचे योगानें पडलेल्या क्षतांच्या खुणा त्यावर असल्याचें" (५।१०।१३) सांगितलें आहे. तसेंच रावणाकडे शूर्पणखा भेटावयास गेली त्या वेळीं त्याचें वर्णन करितांना "देवांशीं झालेल्या युद्धामध्यें विष्णूच्या सुदर्शनचक्रांचे शेंकडों प्रहार त्याचे अंगावर झालेले होते,"(३।३२।१०) असें लिहिलें आहे. रामायणांतील या दोन निर्देशांवरून या युद्धाची कल्पना होते. असो. मारुती हा शंकराचा अवतार म्हणतात; तेव्हां रामाविषयीं त्यानें काढिलेल्या उद्गारांनाहि महत्त्व आहे. अशोकवनिकेंत सीतेला आश्वासन देतांना मारुती म्हणतो "हे वैदेहि, दैत्यवधार्थ उद्युक्त झालेल्या विष्णूप्रमाणें रावणवधार्थ उद्युक्त झालेल्या रामाला लक्ष्मणासहवर्तमान तूं आजच अवलोकन करशील." (५।३७।२४) रावणानें धरून आणिल्यानंतर त्याच्या सभेंत मारुतीनें त्याला उद्देशून जें भाषण केलें त्यांत "देव, दानव इत्यादिकांमध्यें विष्णुतुल्य पराक्रमी रामाशीं सामना करणारा कोणी नाहीं." (५।५१।४२) असें सांगितलें आहे. पर्णशालेंत सीता दिसेना असें पाहून राम विलाप करूं लागला असतां लक्ष्मण म्हणतो—"हे महाबुद्धिमान् रामा, महापराक्रमी विष्णूला ज्याप्रमाणें बलीला बद्ध केल्यावर ही पृथ्वी प्राप्त झाली त्याप्रमाणें जनककन्या सीता तुला प्राप्त होईल." (३।६१।२४) मारुती व लक्ष्मण या दोहोंच्या उद्गारांवरून रामाविषयीं त्यांची भावना काय होती, हें स्पष्ट करून सांगावयाचें कारण नाहीं. तसेंच सीतेचे पुढील उद्गार पहा. अशोकवनिकेंत राक्षसी सीतेला भिववूं लागल्या असतां ती विषण्ण होऊन म्हणते—"ज्या अर्थी मला हें अत्यंत दारुण व घोर दुःख

प्राप्त झालें आहे त्या अर्थी माझ्या हातून जन्मांतरीं कसलें बरें महापातक घडलें आहे ? ” (५।२५।१८)

पुढें ती म्हणते “ज्याचे नेत्रप्रांत आरक्तवर्ण आहेत असा राम दृष्टीस पडत नसल्यामुळें अत्यंत दुःखित झालेली मी पतीवांचून लवकरच यमधर्माला अवलोकन करीन. खरोखर माझ्याच शोकामुळें तो वीर राम भूतलावर देह टाकून तेथून देवलोकीं चालता झाला आहे. ”(५।२६।३४,३६)

रावणवधानंतर सीतेला तें आनंदवृत्त कळविण्याकरितां मारुती तिजकडे गेला; त्या वेळीं तिचेभोंवतीं ज्या राक्षसी होत्या त्यांनीं पूर्वीं तिला फार पीडा दिली होती याकरितां त्यांला चांगली शिक्षा करण्याचें मारुतीनें ठरवून सीतेची अनुज्ञा मागितली. तेव्हां ती म्हणाली “दुर्दैवामुळें व पूर्वसंचित पातकामुळें मला हें सर्व प्राप्त होत आहे; कारण स्वतांच्या कर्माचें फल स्वतांलाच भोगावें लागतें. तेव्हां असें बोलूं नको. हा सारा दैवाचा खेळ आहे.” (६।११३।३७,३८) लक्ष्मणानें गंगेच्या पलीकडे तपोवनांत गेल्यावर सीतेला पतीनें तिचा त्याग केल्याचें सांगितलें. तें ऐकून ती म्हणते–“ खरोखर हे लक्ष्मणा, माझा देह त्या सृष्टिकर्त्यानें दुःख भोगण्यासाठींच निर्माण केलेला आहे; आणि तदनुरूपच आज माझेवर हा दुःखाचा प्रसंग आला आहे. मीं पूर्वीं काय बरें पाप केलें असेल ? कोणाची त्याचे स्त्रीशीं ताटातूट तर केली नाहीं ना ? कारण ( या वेळीं ) माझें आचरण शुद्ध असूनहि राजानें माझा त्याग केला आहे.” (७।४८।३,४)

सीतेच्या तोंडचे जे उद्गार येथपर्यंत दिले आहेत, त्यांवरून स्वतांविषयीं तिची भावना कळते व पतीविषयींची त्यावरून अनुमानितां येते. अवतार घेतल्यानंतरहि त्यांनीं लोकव्यवहाराला अनुसरून वागणें साहजिक आहे, व हा आक्षेप आमचे वरील अनुमानावर येण्याचा संभव आहे; परंतु थोडा विचार केल्यास त्याचें निरसन होईल. रामादिकांनीं लोकांशीं व्यवहार सामान्य व्यक्तींप्रमाणें करावा, हें युक्त होय; तथापि विष्णूचा अवतार म्हणून आलेल्या रामानें स्वतांचे साहाय्यार्थ म्हणून अवतरिलेल्या देवांशीं असा व्यवहार करण्याचें कारण काय ? वरील अवतरणांतील बहुतेक उद्गार अशा प्रकारें आपापसांतील भाषणांतले आहे–समाजांतील नाहींत.–तेथें अशा प्रकारें व्यवहार का

असावा ? लक्ष्मण तर विष्णूनें स्वतांचे चार करून जे अवतार घेण्याचें योजिलें त्यांपैकीं एक होय; असें असतां त्यानें रामाशीं सीतावियोगानंतर बोलतांना त्याला विष्णूची उपमा, जवळ दुसरें कोणी नसतां कशी दिली ? लक्ष्मण मूर्च्छित पडला असतां रामानें केलेल्या विलापांतील पुढील उद्गार तर अवतारकल्पनेला अगदीं विरुद्ध आहेत. तो म्हणतो, "बांधवांनीं केलेली निंदा ऐकून घेण्यापेक्षां येथेंच मरण येईल तर बरें होईल. माझा धर्मनिष्ठ भ्राता माझ्यासमोर वध पावून पडावा, असें कोणतें बरें दुष्कर्म मीं जन्मांतरीं केलें आहे ?" (६।१०१।१८) अवतारकल्पनेला जन्मान्तराची येथील कल्पना बाधक आहे, हें सांगावयास नको. दुसरें असें कीं, लोकांमध्यें त्यांची वागणूक लोकव्यवहारानुरूप होती, हा आक्षेप एक प्रकारें इष्ट आहे. लोकव्यवहारानुरूप त्यांची सर्व वागणूक होती, हेंच नाहीं तरी आम्ही दाखवीत आहों. तसे ते लोकांत वागत होते व म्हणून लोकांची त्यांविषयींची भावना अवतार म्हणून नव्हती. स्वतां वाल्मीकींनीं रामाचें चरित्र—विष्णूचा अवतार म्हणून नव्हे, तर एका थोर गुणशाली पुरुषाचें म्हणून—काव्यांत ग्रथित केलें. इतकें वाचकांस पटल्यावर आम्हांला तरी वेगळें कोठें सांगावयाचें आहे ? लोकव्यवहारांत वागतांना व्यक्त झालेल्या अलौकिक गुणांचे योगानें लोकांची एकाद्या पुरुषाविषयीं अवतार म्हणून भावना झाली तर त्यांत नवल नाहीं व अवतारभावनेची परंपरा अशा प्रकारची असणें हेंच सरळ होय. राज्याभिषेकाच्या ऐन वेळीं वनवासाचा प्रसंग आला असतां धैर्यानें तो सहन केला; व रावणासारख्या लोककंटक व पराक्रमी पुरुषांना अजिंक्य झालेल्या राक्षसाधिपतीचा निःपात केला; या अलौकिक गुणांचे योगानें रामाविषयीं लोकांचे मनांत अवतारभावना उत्पन्न झाली व पुढें कालांतरानें ती दृढमूल होत गेली, अशी कल्पना होते. सामान्य जनांपर्यंत अशी भावना दृढ होण्यास कितीतरी काल लागतो. रावणवधानंतर राम राज्य करीत असतां सामान्य जनांत सीतेविषयीं कशी कुजबूज चालू होती ती पाहिली म्हणजे रामाविषयीं लोकांत अवतार अशी भावना कितपत होती, याचा उलगडा होतो. अशी भावना प्रथम गुणग्राही थोर पुरुषांत उत्पन्न होते. रावणवधानंतर मंदोदरीनें जो विलाप केला, त्यांत रामाचा पराक्रम पाहून तिनें हा विष्णु अवतीर्ण झाला, अशी

कल्पना केली आहे. पुढें पुढें ही भावना वाढत जाऊन रामाबरोबर सर्व प्रजांनीं सरयूप्रवेश करण्यांत तिचें पर्यवसान झालें. अवतारभावनेचा हा रामायणांतील अनुमानिलेला इतिहास पाहिला म्हणजे अवतारभावना बाजूला ठेवून गुणदोष-विवेचन करणें अनुचित नव्हे, हें कोणाचेहि लक्षांत येईल; किंबहुना रामाविषयीं अवतारभावना लोकांमध्यें प्रथम कां उत्पन्न झाली, त्याचेंच हें विवेचन व्हावयाचें आहे.

## धैर्य आणि धर्मपरता.

रामाचे चरित्राविषयीं विचार केला असतां तें सर्व संकटमय होतें, असें दिसून येईल; आणि अशा या संकटांनीं ग्रासलेल्या साऱ्या आयुष्यांत त्याचें धैर्य आणि त्याची धर्मपरता हे गुण उत्कटत्वानें दिसून येतात. या गुणांचें अनुपम संमिश्रण रामाचे चरित्रांत झालेलें आहे. अंगीं धैर्य असलेला पुरुष धर्मशील असतो, असा नियम नाहीं; आणि धर्मशील पुरुषाचे अंगीं धैर्य असतें, असाहि नियम नाहीं. अंगांत धैर्य आहे पण धर्मशीलता नाहीं, तर त्याच्या धैर्यमय चरित्राचा प्रकाश पडणार नाहीं. धैर्याचें कार्य संकटसमयीं व्हावयाचें, हें उघड आहे. नित्याच्या दिनचर्येंत धैर्य फार तर बोलण्यांत दाखवितां येईल. चालू असलेल्या सुखमय राहणींत संकट येऊन जेव्हां फेर पडूं लागतो, तेव्हां मनुष्याचे धैर्याच्या परीक्षेची वेळ येते. वैद्याची परीक्षा खरूज किंवा खोकला बरा करण्यांत होत नसून संनिपाताचे वेळीं होते. तसेंच मंत्र्याचें खरें चातुर्य शत्रूचा हल्ला झाला असतां त्याशीं, आपलें वर्चस्व ठेवून, संधि करण्यांत आहे; नाहीं तर प्रजांकडून कर उकळून राज्याची भरभराट दाखविणारे मंत्री काय थोडे आहेत ? अस्तु.

धर्मशील पुरुषाचे अंगीं धैर्य नसेल, तर संकटकालीं तो चिरडून जाऊन त्यांत त्याचा अंत होतो. रामाचे दोनहि गुण सारखे असल्यामुळें तो सर्व संकटांतून निभावून गेला पुष्कळ वेळां असेंहि होतें कीं, या धर्मशीलतेमुळें संकटें नवीननवीन ओढवतात. रामाच्या चरित्रांत याचा अनुभव सर्वत्र येतो. वनवासाचा पहिला प्रसंग त्याच्या धर्मपरतेमुळें त्याजवर आला, असें ह्मणण्यास अडचण नाहीं. स्वतांचें व पित्याचें वचन सत्य करण्याकरितां त्यानें वनवास पत्करिला. हीं वचनें दोघांनींहि

त्यांनिमित्त आपणांवर येणाऱ्या पुढील प्रसंगाची कल्पना करून दिलेली नव्हती व केवळ त्यांच्या पालनाकरितां अर्थात् त्यांच्या धर्मशीलतेकरितां त्याजवर हा प्रसंग आला. अरण्यांत गेल्यावर ऋषींचें राक्षसांपासून रक्षण करण्याचा त्यानें प्रयत्न केला. रक्षण करण्याची विनंति करण्याकरितां त्याजकडे एक ऋषींचें मंडळ आलें होतें व त्याचें रक्षण करण्याचें त्यानें त्यांना वचनहि दिलें होतें. पण त्यांना वचन दिलें ह्मणून नव्हे, तर तें न देतांहि त्यांचें पालन करणें आपलें कर्तव्य आहे अशी त्याची भावना होती. आर्त होऊन ओरडण्याचा प्रसंग लोकांवर येऊं नये याचसाठीं क्षत्रियांनीं धनुष्य धारण करावयाचें असतें हें तो जाणून होता ( ३।१० ) आणि अरण्यांत गेल्यावर त्यानें हें कार्य पूर्वीप्रमाणें चालविलें. सीतेचा रावणवधानंतर एकदम स्वीकार न करण्यांत आणि अयोध्येंत आल्यावर प्रत्यक्ष त्याग करण्यांत लोकापवाद टाळण्याचा हेतु होता, हें तर उघड आहे. पण त्याबरोबर अशा प्रसंगीं लोकांनीं कसें वागावयाचें हें त्यांना दाखवावयाचें होतें. प्रजांना स्वधर्मपालनाचें शिक्षण राजानें द्यावयाचें असतें, व हा त्याचा स्वधर्म होय, याची त्याला जाणीव होती व तीच त्याच्या निष्ठुर वर्तनाला कारण झाली. धर्मपर राहून वागण्यांत धर्मावरील विश्वासाबरोबर धैर्याची आवश्यकता असते व ती सीतात्यागाचे प्रसंगीं रामाचे चरित्रांत स्पष्ट पटते. प्रसंग येऊं नये यासाठीं झटावयाचें, पण तो एकदां आला म्हणजे त्याला धैर्यानें तोंड द्यावयाचें हें रामचरित्राचें खरें रहस्य आहे. वनवासाला जाण्याचें एकदां ठरल्यावर त्यानें परत येईपर्यंत आपल्या मंडळीची व्यवस्था कशी ठेवावयाची या उद्योगाला एकदम प्रारंभ केला आणि इतकें कार्य एका दिवसांत केलें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. लक्ष्मण व सीता हीं त्याचे बरोबर आपण होऊन आलीं हा भाग वेगळा. पण सीतेकडे जाऊन याविषयीं निश्चय होईपर्यंत तो एकटाच जाण्यास सिद्ध झाला होता व या दृष्टीनें त्यानें आपण वनांत गेल्यावर तिनें कसें वागावयाचें याचा तिला उपदेश केला. वनांत गेल्यावर ज्या वेळीं त्याला परत आणण्याकरितां भरत तेथें गेला त्या वेळीं त्याच्या या दोन गुणांची परीक्षा झाली. कारण ज्याला राज्य मिळावें म्हणून कैकेयीनें हा एवढा व्यूह रचिला होता, तो भरत आपण होऊन रामाला

बोलावण्याला आलेला व प्रजा तर पूर्वीपासून अनुकूल; अशा स्थितींत राज्योपभोगाच्या मोहानें कोणास अडविलें नसतें? परंतु स्वतांचें व पित्याचें वचन पाळण्याकरितां त्यानें आपल्या स्वीकारिलेल्या व्रताची मध्येंच समाप्ति केली नाहीं. यांत त्याची धर्मपरता व धैर्य दोनहि दिसून येतात. रामाच्या धैर्याच्या परीक्षेचा महत्त्वाचा प्रसंग रावणाशीं युद्ध चालू असतां आला. रावणानें लक्ष्मणावर शक्ति फेंकली व ती वक्षःस्थलीं लागून त्याचें हृदय विदीर्ण झालें व तो मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. लक्ष्मणावर त्याचें अत्यंत प्रेम व तोहि केवळ त्याजबरोबर प्रेमानें आलेला; व तोच मूर्च्छित होऊन पडल्यामुळें पुढें उद्योग काय करावयाचा असा विषाद वाटण्यासारखा तो प्रसंग होता. राज्याचा त्याग, वनवास, प्रियपत्नीचा अपहार इतके प्रसंग त्यावर आलेले व या प्रसंगांशीं तोंड देण्याचे कामीं ज्यानें मनापासून साहाय्य केलें तो बंधु मूर्च्छित होऊन पडलेला! रामाला या वेळीं या सर्वांचें स्मरण होऊन तो खिन्न झाला, पण त्यानें थोडा वेळ विचार करून शोक करावयाची ही वेळ नव्हे, असें मनाशीं ठरविलें व प्रथम ती शक्ति बाहेर काढण्याचा त्यानें यत्न केला. वानरांना रावणानें बाणांनीं जर्जर करून टाकिलें असल्यामुळें त्यांपैकीं एकालाहि शक्ति उपटून काढण्यांत यश आलें नाहीं. राम शक्ति उपटून काढीत असतां रावण त्यावर बाण सोडीतच होता. शक्ति उपटून काढल्यावर लक्ष्मणाचे संरक्षणाकरितां वानरांची योजना करून राम रावणाशीं युद्ध करण्याकरितां क्रुद्ध होऊन व पूर्वींहून अधिक उत्साहानें निघून गेला. (६।१००) रामानें रावणाशीं कांहीं वेळ युद्ध केल्यानंतर तो परत लक्ष्मणाकडे आला व त्या वेळीं त्यानें निराश होऊन पुष्कळ शोक केला, पण प्रारंभींची परीक्षेची वेळ त्यानें सांभाळली यांत शंका नाहीं!

## आत्मविश्वास.

धैर्याचे योगानें प्रसंगीं संकटाशीं तोंड देतां येतें व आत्मविश्वासाचे योगानें तें द्विगुणित होऊन आंगचें सामर्थ्य त्याबरोबर वाढतें. रामाचे आंगीं धैर्याप्रमाणें आत्मविश्वास भरपूर होता व त्यास अनुसरून प्रत्येक वेळीं त्यानें आपण त्या प्रसंगांतून पार पडूं असे उद्गार काढिले आहेत. विश्वामित्र दशरथाकडे राजपुत्राला मखरक्षणार्थ मागण्याकरितां आले त्या वेळीं रावणादि राक्षसांचें नांव घेतांच

तो घाबरून गेला व राजपुत्रांना पाठविण्यास अनुमान करूं लागला. राजाची ही स्थिति रामानें अवलोकन केली होती व ती जाणूनहि ज्या वेळीं राजानें जाण्यास संमति दिली त्या वेळीं त्याच्या मनांत कसें जावें असा विचार पडला नाहीं. आणि खरोखरच त्यानें पुढील कार्य निःशंकपणें उरकलें. नाहीं तर त्याचे वयाकडे पाहिलें तर आतांच्या नियमाप्रमाणें तो वयांत यावयाचा होता. वनवासास निघते वेळींहि कैकेयीनें दिलेली मुदत भरल्यानंतर आपण परत येऊं असा त्याचा विश्वास होता. कैकेयीच्या हेतूकडे पाहिलें तर रामानें अरण्यांत जाऊन परत यावें असा तो नव्हता. अरण्यांत वास करावयाचा म्हणजे तेथें क्रूर श्वापदें व राक्षस असंख्य आहेतच. तेव्हां कोणाच्या तरी तावडींत सांपडून रामाची समाप्ति तेथेंच होणार आणि ती तशी व्हावी म्हणून तिनें ही मुदत दिली होती. यदाकदाचित् ही मुदत भरून तो परत आला तरी तोंपर्यंत भरतानें राज्यकारभार चालविला असल्यामुळें प्रजाजनांचें प्रेम त्यावर बसून राज्याला दृढता आली असेल, मग रामाला राज्य कशानें मिळणार ? असा विचार करून ही दुहेरी योजना मंथरेनें तिला सुचविली होती. हे दोनहि हेतु रामाच्या लक्षांत आले, तरी त्यांतूनहि आपण पार पडूं असा विश्वास त्याला वाटत होता; व तोच खरा ठरला. कैकेयीच्या कल्पनेप्रमाणें त्याजवर असे प्रसंग पुष्कळ आले व सीताहरणाच्या प्रसंगानें तर सर्वांवर कळस चढविला! सीता आश्रमांत दिसत नाहीं असें पाहिल्यावर रामानें "हे सुमित्रापुत्रा लक्ष्मणा, सीतेकरितां मला मरण येऊन तूं एकटा अयोध्येंत परत गेल्यावर तरी त्या कैकेयीचे मनोरथ परिपूर्ण होऊन ती सुखी होईल काय ?" (३।५८।७) असे उद्गार काढिले आहेत व त्यावरून कैकेयीच्या हेतूविषयीं रामाचे मनांत कशी स्पष्ट कल्पना आली होती तें व्यक्त दिसत आहे.

## पितृभक्ति.

रामानें पित्याला वचनांतून मुक्त करण्याकरितां वनवास पत्करिला, यांत त्याची पितृभक्ति व्यक्त झाली आहे; पण या भक्तीचें खरें स्वरूप वनवासाला जाण्याचें ठरल्यावर त्यानें काढिलेल्या उद्गारांत अधिक स्पष्ट दिसून येतें. पित्याच्या वचनानिमित्त हा प्रसंग आपणावर आला आहे, हें कळल्यावर तो वनांत

जाण्यास सिद्ध झाला, तरी त्याची त्याविषयीं असलेली पूज्यबुद्धि तिळभरहि ढळलेली नाहीं आणि यामुळें वनवासाला न जातां ज्या कित्येक तोडी कोणीं सुचविल्या त्यांकडे त्यानें मुळींच लक्ष दिलें नाहीं. आपला विरह राजाला सहन होणार नाहीं व यामुळें लवकरच त्याला मृत्यु येणार असे उद्गार त्यानें मृत्यूची वार्ता प्रत्यक्ष कळेपर्यंत वारंवार काढिले आहेत. कौसल्येला राम वनांत जाणार असल्याचें जेव्हां कळलें तेव्हां ती त्याचेबरोबर वनांत येण्यास सिद्ध झाली असतां त्यानें तिला पतीची सेवा करण्याचा उपदेश करून निवृत्त केलें व शेवटीं सांगितलें कीं, " मी गेल्यावर राजा पुत्रशोकानें विव्हल होणार नाहीं अशी व्यवस्था तूं दक्ष राहून ठेव. हा शोक फार भयंकर आहे. तेव्हां त्याच्या योगानें त्याचे जिवाला धोका येणार नाहीं अशा प्रकारें तूं स्वस्थ चित्तानें त्याचें हित करीत जा." ( २।·४।२४,२५ ) राम यानंतर सीतेकडे गेला. तेथेंहि त्यानें तिला आपण वनांत गेल्यावर कसें वागावयाचें याचा उपदेश करितांना प्रातःकालीं उठून देवांची पूजा केल्यावर पित्याला वंदन करावयास सांगितलें आहे. ( २।२६।३० ) रामाला अरण्यांत पोंचवून सुमंत्र परत अयोध्येकडे यावयास निघाल्यावर त्याला त्यानें " राजाचे सर्व मनोरथ भग्न झाले असून तो वृद्ध व शोकाकुल झाला आहे. तेव्हां कैकेयीचा प्रिय मनोरथ सिद्धीस नेण्याकरितां तो जी जी आज्ञा करील ती ती निःशंकपणें करीत जा."(२।५२।२३,२४) असें सांगितलें आहे. त्याच्या यापुढील व्यवहारावरून पित्यानिमित्त त्याला वनवास भोगावा लागणार असें दिसत असलें तरी त्यावरील त्याची निष्ठा पूर्ववत् होती. त्याची ही निष्ठा दशरथ जाणून होता व कैकेयीनें ज्या वेळीं दोन वरांविषयीं त्याजकडे गोष्ट काढिली त्या वेळीं त्यानें "माझा पुत्र माझ्याशीं दुसरें भाषण करणारच नाहीं. 'वनांत जा' असें म्हटलें असतां तो 'ठीक आहे' असेंच म्हणेल" ( २।१२।८५ ) असे उद्गार काढिले आहेत.

## कुटुंबांतील वागणूक.

अविभक्त कुटुंबांतील एक व्यक्ति या नात्यानें राम कसा वागत असे हें त्याच्या वागणुकीवरून कळणार आहे. त्याच्या सार्वजनिक वागणुकीपुढें घरगुती वागणुकीचें महत्त्व तें कसलें, असें येथें कोणाला वाटेल; परंतु रामाच्या या वागणु-

कींत अंतर झालें असतें तर रामायणाचें सगळें स्वरूप बदललें असतें, इतकें त्याला महत्त्व आहे. महाभारतांतील मुख्य कथा पाहिली तर ती कौरवपांडव यांच्या केवळ गृहकलहाची आहे. आपापसांतील हा कलह, त्याला सार्वजनिक स्वरूप नाहीं, असें म्हणून जर त्याविषयींची कथा काढून टाकूं म्हटलें तर महाभारतांत काय राहणार आहे ? इतर आनुषंगिक कथाहि या कथेवर अव-लंबून आहेत. कुटुंबांतील कलह विकोपास गेले असतां कोणत्या थराला जातात याचें महाभारत हें उत्तम निदर्शन असून हे गृहकलह होऊं न देण्यास मुख्य पुरुषानें कसें वागलें पाहिजे याचें निरूपण रामायणांत आहे. विचार केला तर गृहकलहाचा संभव कौरवपांडवांचे कुलापेक्षां दशरथाचे कुलांत अधिक होता. पांडवांचा राज्यावरील अधिकार काढून घेऊन स्वतां राज्य बळकावण्याची दुर्यो-धनाची इच्छा व प्रयत्न कलहाला कारण झाले. इकडे रामायणांत ज्येष्ठपुत्र या नात्यानें रामाचा राज्यावर अधिकार व कैकेयीच्या पित्याला दिलेल्या वचना-प्रमाणें भरताचा अधिकार अशी स्थिति होती. कैकेयीनें वर मागितल्यामुळें रामाला वनांत जावें लागलें, हें खरें आहे; परंतु तिला पित्याचें हें कारस्थान माहीत असतें तर तिला एवढा खटाटोप करावयास नको होता व यामुळें तिचे नांवावर लागलेला हा अक्षय्य कलंक लागला नसता. कलहाचें हें बीज खरोखर दशरथानेंच पेरून ठेविलें. एका पुरुषाच्या दोन स्त्रिया व त्यांची संतति म्हटली म्हणजे कलहाला वेगळें बोलावणें पाठवावें लागत नाहीं. अशा संबंधांत कलह इतका नैसर्गिक असतो कीं, सापत्नभाव व शत्रुत्व हे अगदीं प्रतिशब्द होऊन राहिले आहेत. दशरथाला तर स्त्रिया अनेक होत्या; पण रामायणांत इतरांचा केवळ संख्यानिर्देश असून मुख्य स्त्रियांचीं मात्र नांवें आलीं आहेत. या स्त्रिया तीन व त्यांचे पुत्र चार आणि रामायणांत यांचेंच चरित्र आलें आहे.

अशा रीतीनें रामाचे कुटुंबाची विशालता पाहिली म्हणजे त्याच्या वागणु-कीचें महत्त्व कसें आहे याची कल्पना करितां येईल. अविभक्त कुटुंबाची पद्धति कालानुरूप बहुतेक मोडत चालली आहे. नवें चौथें माणूस घरांत यावयाचें व नवी चूल घालावयाची यांचा काल बहुधा एक असतो—मग तो कलहा-निमित्त असो वा उदरभरणानिमित्त असो.—यामुळें अविभक्त कुटुंबें आतां फार

दृष्टीस पडत नाहींत. कुटुंब अविभक्त राहावयाचें म्हणजे तशी खरी इच्छा त्यांतील प्रत्येक व्यक्तीची असावी लागते व तीस अनुसरून तिचें वर्तन असावें लागतें; आणि यांत कोठें न्यूनता असल्यास ती भरून काढणें मुख्य पुरुषाचे कर्तृत्वशक्तीवर अवलंबून असतें. अविभक्त कुटुंबाचा व्यवहार कांहींसा कंपनीच्या व्यवहारासारखा असतो; आणि कंपनीची भरभराट ज्याप्रमाणें मॅनेजिंग डायरेक्टरवर असते, त्याप्रमाणें अविभक्त कुटुंबाचें अस्तित्व मुख्य पुरुषावर असतें. मात्र कंपनीचे कारभार, डायरेक्टरनें वार्षिक सभेचे वेळीं सर्व भागीदारांचा विश्वास संपादन केला असला म्हणजे पुन: वर्ष भरेपर्यंत त्याचे तंत्रानें चालणार असतात, तसें कुटुंबामध्यें नसून त्यांतील सर्व व्यक्तींची दृष्टि मुख्य पुरुषावर निरंतर असते हें यांत विशेष आहे. तसेंच कुटुंबांतील कारभार मुख्य पुरुष करीत असला तरी त्यांतील कांहीं कामांची उरक त्यांतील इतर व्यक्तींना करावी लागते. अर्थात् सर्व कारभाराचें धोरण मुख्य व्यक्तीचे तंत्रानें चालतें असें नाहीं आणि इतरांच्या तंत्रानें चालतें असेंहि नाहीं. मुख्य व्यक्तीच्या धोरणाला अधिक महत्त्व असतें व हें साहजिक आहे. तथापि त्याची बजावणी इतरांनीं करावयाची असते व त्या कामीं त्यांतील कोणाची संमति नसल्यास व्यंग राहातें व तें भरून काढणें अथवा तें क्षुद्र असल्यास तिकडे दुर्लक्ष करणें हें मुख्य पुरुषाकडे असतें. आणि कुटुंबांतील कारभार मुख्य पुरुष करीत असला तरी त्याचें धोरण सर्वत्र सारखें अमलांत येत असतें असें नाहीं. याचें कारण याप्रमाणें आहे. कुटुंबाचें कल्याण ही दृष्टि सर्वांची असावी लागते व हें काय तें यांत मुख्य आहे. अशा रीतीनें मुख्य पुरुषाचे हातीं सर्व कारभार असला तरी अविभक्त कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीला सहनशील असावें लागतें; आणि मुख्य पुरुष तर पूर्ण सहनशील असावा लागतो. वैयक्तिक हिताकडे अथवा संबंधाकडे कुटुंबांतील व्यक्तीची दृष्टि जाऊं लागली आणि विशेषत: हा प्रमाद मुख्य पुरुषाचे हातून झाला म्हणजे कुटुंबाचा ऱ्हास होण्यास वेळ लागत नाहीं. कुटुंबाचा सर्व भार मुख्य पुरुषावर असतो व तो तसा असला तरी तो उचलण्यास त्याला इतरांनीं यथाशक्ति साहाय्य केलें पाहिजे हें विसरतां नये. या कामीं त्यांचे हातून कसूर झाल्यास तो भार मुख्य पुरुषाला झेपेनासा होऊन

जातो आणि पुष्कळ कर्ते पुरुष अशा भाराखालीं दडपून गेल्याचें इतिहासांत ऐकूं येतें. अविभक्त कुटुंबपद्धतींत इतर व्यक्तींच्या कर्तृत्वास वाव मिळत नाहीं, असा तीव्र एक आक्षेप ऐकूं येतो; व मोठ्या वृक्षाचे सावलींत लहान झाडांची वाढ होत नाहीं असा अनुभव आहे, त्यास अनुसरून त्यांत कांहीं सत्यांशहि आहे. तथापि हें सारें मुख्य पुरुषावर अवलंबून आहे. या गोष्टीकडे त्याचें लक्ष गेल्यास, वृक्षाचे आश्रयानें लता वाढते त्याप्रमाणें त्याची कर्तृत्वशक्ति वाढूं शकते हें नाकारितां येत नाहीं. कुटुंबपोषणाचा सर्वभार मुख्य पुरुषावर असतो, व आवश्यक असेल तेथें तर इतर व्यक्तींना त्याचा अंश उचलावा लागतो; तथापि सर्व भार एकाचे माथीं बसत नाहीं. व कर्तृत्वशक्तीचे विकासाचे दृष्टीनें त्याला हा लाभ होतो असें म्हटलें पाहिजे. अविभक्त कुटुंबामध्यें मुख्य पुरुषाचें कार्य कोणतें व इतरांचें कोणतें, आणि तें अविच्छिन्न राहाण्यास त्यांची वागणूक कशी असावी लागते, याची कल्पना वरील विवेचनावरून अंशतः तरी वाचकांला येण्यास अडचण नाहीं. पुढील विवेचन समजण्यास तिची आवश्यकता असल्यामुळें येथें याचा इतका विस्तार करावा लागला.

रामाची कुटुंबांतील वागणूक कुटुंबांतील मुख्य पुरुष व सामान्य व्यक्ति या दोनहि नात्यांची रामायणांत पाहावयास सांपडते. यौवराज्याभिषेकाचा विचार पुढें येईपर्यंत कुटुंबांतील एक व्यक्ति या नात्यानें तो वागत होता. विवाहानंतर तो राज्यकारभार थोडथोडा पाहूं लागला होता; पण कुटुंबांतील त्याची वागणूक त्या पूर्वीपासून शेवटपर्यंत एका धोरणाची होती. कौसल्या व कैकेयी यांमध्यें सवतीमत्सर रीतीप्रमाणें होता; पण रामाला मात्र त्याचा स्पर्श झालेला नव्हता. रामाला वनवासाला पाठविण्याचा वर ज्या वेळीं कैकयीनें राजाकडे मागितला, त्या वेळीं त्याचें त्याला आश्चर्य वाटलें व तो म्हणाला " हे शुभलोचने, तुझ्या शुश्रूषेमध्यें तत्पर असणाऱ्या मनोहर रामाला अरण्यांत हांकून देणें तुला कसें रुचत आहे ? भरतापेक्षां रामच तुझी नेहमीं शुश्रूषा करीत असतो. त्या रामापेक्षां भरताचा तुझ्या ठिकाणीं कांहींहि गौरव दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. सेवा, बहुमान, विश्वास आणि सांगितलेलें करणें या गोष्टी पुरुषश्रेष्ठ रामाहून अधिक कोण करणार आहे ? अनेक हजारों स्त्रियांमध्यें रामाची निंदा कोणीहि करीत

नाहीं आणि अनेक सेवकांमध्येंहि रामावर कोणाचा अपवाद नाहीं." (२।१२। २४-२७) दशरथाचे मृत्यूनंतर भरत अयोध्येला आला तेव्हां त्याला रामाचे वनवासाचा वृत्तांत समजला. या वेळीं त्यानें आपल्या मातेची जी निर्भर्त्सना केली तींत तो म्हणतो "खरोखर वडिलांशीं कसें वागावें हें त्या धर्मात्म्या रामाला चांगलें कळतें व त्याप्रमाणें तो तुझ्याशीं कौसल्येप्रमाणें उत्कृष्टपणें वागत होता." (२।७३।९) स्वतां रामानेंहि आपण सर्व मातांशीं कसे वागत असतों हें एकदां व्यक्त करून सांगितलें आहे. कैकेयीच्या कारस्थानानिमित्त रामाला राज्यत्याग व वनवास भोगावा लागणार असें जेव्हां लक्ष्मणाला कळलें तेव्हां राजाचा व सर्व विरुद्धपक्षीयांचा निग्रह करून सर्व राज्य स्वाधीन करून घ्यावें अशी योजना लक्ष्मणानें रामाला सुचविली. या वेळीं लक्ष्मणाची ही योजना धर्मविरुद्ध कशी आहे, आणि हे सर्व प्रकार दैवानें घडून आले आहेत असें त्याला समजावून सांगून राम म्हणतो-"हे सौम्या लक्ष्मणा, सर्व मातांचे ठिकाणीं माझी अंतःकरणवृत्ति सारखी आहे हें तुला माहीत आहे व तीहि मला व भरताला सारखे मानिते. तेव्हां माझ्या अभिषेकाला विघ्न करून मी वनांत जावें म्हणून ती कठोर बोलली, हा सर्व दैवाचा खेळ आहे, असें मी समजतों. नाहीं तर तशा प्रकारचे गुण असलेली ती राजकन्या एकाद्या सामान्य स्त्रीप्रमाणें आपल्या पतीसमोर स्वतां सत्वशील असतांना असें कशी बरें बोलेल ?" (२।२२।१६-१९) भरत रामाला परत आणण्याकरितां आला त्या वेळीं आपल्या मातेचें कारस्थान भरताला रुचलें नसून तो तिजवर संतप्त झाला आहे, असें रामाच्या लक्षांत आलें. या प्रसंगीं भरत परत निघत असतां राम त्याला म्हणतो-"बा भरता, प्रेमामुळें अथवा राज्यलोभामुळें असो, तुझ्या मातेनें जें हें तुझ्याकरितां केलें आहे तें मनांत न ठेवितां मातेप्रमाणेंच तूं तिच्याशीं आपलें वर्तन ठेवीत जा." (२।११२।१९) तसेंच पुढें तो शत्रुघ्नाला आलिंगन देऊन म्हणाला, "कैकेयी मातेचें रक्षण कर; तिच्यावर क्रोध करूं नको. हे रघुनंदना, तुला माझी व सीतेची शपथ आहे." (२।११२।२८) वरील सर्व अवतरणांतून प्रायः रामाचें कैकेयीशीं वर्तन कसें असे हें दिसून येत असून त्याचें इतर मातांशीं वर्तन कसें होतें हें प्रारंभींच्या दशरथाच्या भाषणाचे

अवतरणावरून कळून येणार आहे. दशरथ या वेळीं गादीवर असला तरी त्याचे मागें रामाला गादी मिळावयाची अशी लोकांची समजूत होती व ती कालांतरानें खरीहि ठरली आणि राम राज्यकारभारांत लक्ष घालूं लागला होता. अर्थात् अशा रीतीनें सर्व परिस्थिति रामाला अनुकूल असतां रामाचें वर्तन सर्व मातांशीं सारखें होतें, हें यांत विशेष आहे.

दुसरें असें कीं, दशरथाचे सर्व पत्न्यांमध्यें आपापसांत स्वभावतः संभवणारा सवतीमत्सर होता; आणि विशेषतः कैकेयीशीं कौसल्या व सुमित्रा यांची स्पर्धा अधिक होती व ही सर्व परिस्थिति पाहत असतां रामाची सर्वांशीं वागणूक सारखी होती. कैकेयीचा रोष होऊं न देतां कौसल्येचें प्रेम राखावयाचें कार्य रामापुढें होतें; अर्थात् तारेवर करावयाच्या कसरतीप्रमाणें दोहों बाजूंला त्याला तोल सांभाळावयाचा होता. दशरथाचें प्रेम एकटया कैकेयीवर होतें व यामुळें कौसल्या ज्येष्ठ पत्नी असतांहि तिला मान मुळींच नसून उलट अपमान मात्र प्रामुख्यानें होत असून, कैकेयी तर तिला वारंवार मर्मभेदक भाषणांनीं दुःख देत असे. राजकृपा ही ऐहिक सुखाची परमावधि समजून ती संपादण्याकरितां श्रम करावयाचे व ती संपादन करून तिचा उपयोग दुसऱ्याला--विशेषतः शत्रूंना दुःख देण्यांत करावयाचा हा मनुष्यस्वभाव त्रिकालाबाधित आहे. कैकेयीवर राजाची कृपा असल्यामुळें तिची कृपादेखील सेवकजनांना संपादन करण्याची आवश्यकता वाटत होती आणि याकरितां कौसल्या आणि तिचा परिवार यांशीं द्वेष करणें हा तिची कृपा संपादन करण्याचा मार्ग होता. राजवाड्यांतील या परिस्थितीला अनुसरूनच कौसल्येनें रामाशीं "जो माझी सेवा करीत असतो किंवा जो कोणी माझ्या मनाप्रमाणें वागत असतो तो सुद्धां कैकेयीचा पुत्र आलेला पाहून माझ्याशीं बोलेनासा होतो" (२।२०।४३) असे उद्गार काढिले आहेत. रामाला वनवासाला पाठविण्याचें कारस्थान लक्ष्मणाला कळतांच त्यानें रामाला वनांत न जातां राज्य स्वतः बळकावण्याचा उपदेश केला. त्यांत त्याचे तोंडीं "भरताच्या पक्षाचा अथवा त्याचें हित इच्छिणारा जो कोणी असेल त्या सर्वांचा मी वध करीन. कारण मऊ सांपडलें म्हणजे लोक कोपरानें खणूं लागतात" (२।२१।११) असें वाक्य आहे व त्यांतहि राजवाड्यांतील मित्याच्या

परिस्थितीचें प्रतिबिंब आहे. रामाला कसल्या परिस्थितींत वागावयाचें होतें त्याची यावरून वाचकांस कांहीं कल्पना करितां येई". रामाची वागणूक सर्वांशीं नम्र-पणाची होती व यामुळें कौसल्या व कैकेयी यांमध्यें कलह होता तरी रामा-विषयीं कैकेयीच्या मनांत द्वेष नव्हता. रामाच्या यौवराज्याभिषेकाची वार्ता तिला प्रथम मंथरेनें कळविली त्या वेळीं तिला ती पारितोषिक म्हणून दिव्य आभरण देऊं लागली, ( २।७।३२ ) यावरून त्यापूर्वीं रामाविषयीं तिची भावना काय होती तें दिसून येतें. हा केवळ रामाच्या सौम्य वर्तनाचा परिणाम होय. नाहीं तर सवतीच्या मुलावर प्रेम करण्याइतकी ती कांहीं भोळी नव्हती.

रामाची वागणूक सर्व मातांशीं सारखी होती, तथापि त्यावरून कैकेयीचा स्वभाव आणि योग्यता त्याला कळत नव्हती, असें मात्र कोणीं समजूं नये. तिच्या निमित्त आपल्या मातेला होणारा त्रास त्याला कळत होता, तथापि त्या वेळीं त्याच्या प्रतिबंधाकरितां उपाय योजावयाचे म्हणजे परंपरया पित्याला त्रास व्हाव-याचा व तें इष्ट नव्हतें हें लक्षांत आणून रामाची वागणूक स्वस्थपणाची होती. कुटुं-बांतील व्यवस्थेवर सत्ता सर्वथा राजाची व अशा स्थितींत रामानें आपल्या मातेकरितां म्हणून प्रयत्न केला असता तरी त्याचा उपयोग न होतां तो अधिक त्रासाला कारण झाला असता. रामाचें हें धोरण रामायणांत स्पष्ट लिहिलें नसलें तरी तें अनु-मानिल्यावांचून रामाचे वागणुकीची संगति लावितां येत नाहीं. कैकेयी ही वृद्ध राजाची तरुण स्त्री व तिनें त्याला मोहून टाकिलेला. ही अनिष्ट स्थिति रामाला दिसत होती. लक्ष्मणाशीं भाषण करितांना वनवास हें केवळ दैवाचें दुर्विलसित आहे अशी जरी त्यानें त्याची समजूत घातली, तरी त्याला खरें कारण कैके-यीच आहे असें त्यानें मनांतहि आणिलें नाहीं असें नाहीं. त्या वेळीं त्यानें असें बोलून दाखविलें असतें तर त्याचा प्रतिकार करण्यास लक्ष्मण सिद्धच होता. तेव्हां पित्याला वचनांतून मुक्त करण्याकरितां वनांत जाणें हें कर्तव्य आहे, हें त्यानें एकदां आपल्या मनाशीं ठरविलें, व त्या धोरणानें लक्ष्मणाची, त्याजकडून होणारा पुढील बखेडा टाळण्यासाठीं त्यानें वरीलप्रमाणें समजूत घातली. गंगापार झाल्यावर तेथें रामानें जो मुक्काम केला त्यांत रात्रीं निजतेवेळीं त्यानें लक्ष्मणाला तेथून परत फिरावयाचा उपदेश केला. लक्ष्मण त्याप्रमाणें

परत गेला नाहीं हा भाग वेगळा; पण या प्रसंगीं राम, त्यानें परत कां जावें हें सांगतांना म्हणतो, "हे सौम्या, दशरथाचे मृत्यूकरितां, मला हांकून लावण्याकरितां आणि भरताला राज्य प्राप्त करून देण्याकरितां कैकेयीचा अवतार आहे, असें मला वाटतें. पति आपल्या मुठींत आहे अशा अभिमानानें ती अगदीं भांबावून गेली आहे, आणि (मला वाटतें) ती माझेकरितां अजूनहि कौसल्या व सुमित्रा यांना पीडा देईल. हे धर्मज्ञ लक्ष्मणा, ती क्षुद्र मनाची आहे व याकरितां ती कोणतेंहि पाप करण्यास पाठीं येणार नाहीं. द्वेषबुद्धीनें ती माझ्या मातेला विषहि घालील." ( २।५२।१४, १५, १८ ) तसेंच आश्रमांत सीता दिसत नाहीं असें पाहून रामानें जो विलाप केला त्यांत प्रथम "हे लक्ष्मणा, सीतेकरितां मला मरण येऊन तूं एकटा अयोध्येमध्यें परत गेल्यावर तरी त्या कैकेयीचे मनोरथ परिपूर्ण होऊन ती सुखी होईल काय?" (३।५८।७) याप्रमाणें, व नंतर "हाय! हाय! हे देवि! आज माझ्या कैकेयीचा मनोरथ पूर्ण होईल" (३।६२।१०) असे उद्गार काढिले आहेत व त्यावरून वनवासाचें खरें कारण त्याला कोणतें वाटत होतें हें कळून येणार आहे. मात्र सर्व रामायणांत कैकेयीविषयीं तुच्छतेचे असे रामाचे उद्गार एवढेच आहेत व ते शोकाच्या पहिल्या वेगाबरोबर आले असल्यामुळें रामाचें अंतरंग त्यांनीं उघडें केलें आहे. अन्य प्रसंगीं त्यानें स्वतां तिची निंदा केली नाहीं अथवा दुसऱ्याला करूं दिली नाहीं. तथापि तिचें अंतरंग रामानें ओळखिलें होतें, याविषयीं वरील उद्गारांवरून शंका राहात नाहीं. मात्र आपणाला असलेली ही जाणीव त्यानें स्वतां धोरणानें वागून कोणाला कळूं दिलेली नाहीं.

वनांत निघते वेळीं सीता बरोबर येण्याचें निश्चित होण्यापूर्वीं तिनें आपण वनांत गेल्यावर कसें वागावें याविषयीं रामानें तिला जो उपदेश केला आहे त्यांत त्याच्या वागणुकीचें धोरण अंशतः आलें आहे. कैकेयीला मिळालेल्या वरांचा वृत्तांत सांगितल्यावर राम म्हणतो, "भरताजवळ माझी तूं कधींहि प्रशंसा करीत जाऊं नकोस. कारण वैभवसंपन्न पुरुषांना दुसऱ्याची स्तुति सहन होत नाहीं. तस्मात् भरतापुढें तूं माझ्या गुणांची प्रशंसा करीत जाऊं नकोस. भरताच्या मर्जीप्रमाणें वागून त्याच्या समीप राहणें तुला शक्य आहे." ( २।२६

२४-२६ ) असाच निरोप सुमंत्राबरोबर रामानें आपल्या मातेला पाठविला आहे. "हे देवि, (श्रेष्ठपणासंबंधाचा) अहंकार व मान सोडून देऊन इतर मातांशीं तूं वागत जा. आणि जिच्या मर्जीप्रमाणें राजा वागत आहे त्या कैकेयीशीं, हे माते, विरोध करूं नको. राजकुमार भरताशीं तूं राजाप्रमाणेंच वागत जा. कारण, राजे वयानें जरी लहान असले तरी ते पूज्यच आहेत. पाहिजे असल्यास तूं राजधर्माचें स्मरण करून पहा." (२।५८।१९,२०)

सीतेशीं केलेल्या वरील भाषणांत भरताविषयीं रामाची दिसत असलेली साशंक वृत्ति वनांतून परत येईपर्यंत होती, असें दिसतें. अशी साशंक वृत्ति असणें मनुष्यस्वभावाला धरून आहे, हें सांगावयास नको. रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें ठरलें त्या वेळीं भरताला आजोळाहून परत न आणविण्यांत राजाची त्याविषयींची साशंकवृत्ति व तदनुरूप धोरण हींच दिसून येतात. रामाला यौवराज्याभिषेक करावयाची वार्ता त्याला कळवितांना दशरथानें हें स्पष्टपणें सांगितलें आहे. " भरत नगरांतून बाहेर गेला आहे, तोंच तुझ्या अभिषेकाचा योग्य काल आहे, असें मला वाटतें तुझा भ्राता भरत सज्जनांप्रमाणें वागणारा, ज्येष्ठ भ्रात्याच्या--तुझ्या--अनुरोधानें असणारा, धर्मात्मा, दयाळु व जितेंद्रिय आहे, तरी हे राघवा, धर्मात्म्या सज्जनाचेंहि चित्त विकारवश होत असल्याचें दिसून येतें. त्यापक्षीं मनुष्याचें चित्त एकंदरींत अनित्य आहे, असें मला वाटतें." (२।४।२५।२७ ) येथें राजानें भरताविषयीं शंका स्पष्टपणें प्रदर्शित केली आहे. या वेळीं रामानें राजाशीं या भाषणावर कांहीं चर्चा केली नाहीं किंवा राजाच्या मनांत आलेली शंका अस्थानीं असल्याचें त्याला सांगितलेंहि नाहीं; यावरून रामाला ती सुयुक्तिक वाटली, हें उघड आहे. लक्ष्मणानें ज्या वेळीं रामाजवळ त्याबरोबर आपण वनांत येत असल्याचें सांगितलें, त्या वेळीं त्यानें त्याला प्रथम संमति दिली नाहीं व आपण वनांत गेल्यावर कौसल्या व सुमित्रा यांचें रक्षण करण्यासाठीं तेथेंच राहण्याची सूचना केली. लक्ष्मणानें तेथें राहणें कां अवश्य आहे, हें सांगतांना राम म्हणतो, " अश्वपतिकन्या कैकेयी हें राज्य प्राप्त झाल्यावर दुःखानें गांजलेल्या आपल्या सवतींना चांगलें पाहणार नाहीं. भरताला राज्य प्राप्त झाल्यावर तो कैकेयीच्या धोरणानें वागणारा असल्यामुळें

त्याला कौसल्येचें अथवा अत्यंत दुःखित झालेल्या सुमित्रेचें स्मरण देखील होणार नाहीं." ( २।३१।१३-१४ ) येथें तर रामानें भरताला कैकेयीच्या धोरणानें वागणारा ( कैकेय्यां पर्यवस्थितः ) असें स्पष्ट म्हटलें आहे. भरताविषयींची ही रामाची साशंक वृत्ति वनांतून परत येऊन भेट होईपर्यंत तशी होती. कारण अयोध्येला परत येते वेळीं रामानें मारुतीला भरताकडे आधीं जाण्यास सांगितलें. या वेळीं राम म्हणतो, " हे सौम्या, मी जवळ आल्याचें तूं भरताला निवेदन कर आणि हें श्रवण केल्यावर भरताची मुद्रा कशी काय होते, हें लक्षपूर्वक पहा व भरताच्या मुखावरील कांति, त्याची दृष्टि व भाषणाचा रोंख, यांवरून सर्व वृत्तांत व त्याच्या मनांतील इंगित समजून घे. कारण सर्व भोग्य वस्तूंनीं परिपूर्ण आणि गज, अश्व व रथ यांनीं गजबजलेलें व वाडवडिलांपासून चालत आलेलें राज्य प्राप्त झाल्यावर कोणाच्या मनाला बरें लोभ वाटणार नाहीं ? संगतीमुळें श्रीमान् भरताला कदाचित् स्वतां राज्य करण्याची इच्छा झाली असेल, तर सर्व पृथ्वीचें पालन तो रघुनंदनच करूं दे." ( २।१२५।१४-१७ ) रामाच्या भाषणावरून भरताविषयींच्या त्याच्या साशंकवृत्तीबरोबर त्याचें धोरणहि दिसून येतें. तसेंच भरताला राज्याभिलाष वाटत असल्यास त्यालाच राज्य करूं देण्याचें सांगण्यांत रामाची निरभिलाषवृत्ति व्यक्त झाली आहे. रामाच्या या साशंक वृत्तीला एकदां मात्र अपवाद आढळतो. भरत सर्व सेनेसह रामाला परत आणण्याकरितां वनांत गेला. त्या वेळीं सैन्याचा ध्वनि ऐकून रामाच्या आज्ञेवरून लक्ष्मण साल वृक्षावर चढून टेहळणी करूं लागला व त्याला सैन्य अयोध्येंतील आहे असें वाटून, भरत आपला घात करून राज्य निष्कंटक करण्याकरितां येत असल्याची त्याला शंका आली. लक्ष्मणाची ही शंका येथें रामाला पटली नाहीं व त्यानें भरत आपणाला परत बोलावून राज्य देण्याकरितां येत असल्याचें आपलें अनुमान त्याला सांगितलें. इतकेंच नव्हे तर उलट लक्ष्मणाला तो म्हणतो, " जर राज्याकरितां असें तूं बोलत असशील तर भरत दृष्टीला पडतांच मी ' या लक्ष्मणाला राज्य अर्पण कर ' असें सांगेन व हे लक्ष्मणा ' याला राज्य अर्पण कर ' असें मीं त्याला सांगितलें असतां ' ठीक आहे ' असेंच

तो म्हणेल. " ( २।९७।१७;१८ ) भरताविषयीं रामाच्या मनांत इतका भरंवसा या वेळीं कां उत्पन्न झाला याचें कारण त्याचे भाषणांत आलेलें नाहीं किंवा पूर्वापर ग्रंथांत सांगितलेलें नाहीं. उलट लक्ष्मणाची शंकाच सयुक्तिक वाटते. भरद्वाजमुनि ( २।९०।३ ) व निषादाधिपति गुह ( २।८५।७ ) यांनाहि अशी शंका येऊन ते त्याला रामाचें निवासस्थान कोठें आहे हें सांगत नव्हते; तेव्हां भरतानें त्यांची शंका निरस्त केल्यावर त्यांनीं राम चित्रकूटीं राहात असल्याचें त्याला सांगितलें. अर्थात् लक्ष्मणाची शंका अस्थानीं नव्हती हें सांगावयास नको. रामाला मात्र या वेळीं भरताविषयीं कांहीं शंका आली नाहीं, हें खरोखर विचित्र दिसतें. बाकी वनांतून परत आल्यावर भरताविषयीं रामाला शंका आली ती युक्त होती, व तिचें कारणहि त्यानें तेथें व्यक्त केलें आहे. रामाचे मनांत याप्रमाणें शंका जागृत असतांना तो त्याशीं प्रेमानें वागला व त्यामुळें त्याविषयीं भरताचे मनांत आदर वाटत होता, हें येथें आम्हांला मुख्यतः दाखवावयाचें होतें व तें वरील विवरणावरून स्पष्ट होत आहे.

रावणानें सीताहरण केलें व त्याला आश्रमांतून लक्ष्मण गेल्यावर सीता एकटी असल्यामुळें हें शक्य झालें. वास्तविक मायामृगाविषयीं लक्ष्मणाला प्रारंभींच शंका आली होती व मारीचाचे कपटशब्द ऐकतांच लक्ष्मणानें सीतेला त्याचें खरें स्वरूप समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. या वेळीं सीतेनें मर्मभेदक भाषण केल्यामुळें लक्ष्मण निरुपाय होऊन सीतेला आश्रमांत एकटी ठेवून रामाचे शोधार्थ बाहेर निघून गेला. सीतापहाराचे कामीं खरा दोष कोणाचा हें यामुळें ठरविणें कठीण आहे. लक्ष्मणाला सीतेच्या रक्षणार्थ आश्रमांत राहण्याविषयीं रामाची आज्ञा होती व याकरितां त्याला आपणाकडे येतांना पाहतांच रामानें त्याला दोष दिला व हें साहजिक झालें. तथापि येथें रामाचे वागणुकींतील महत्त्वाचा गुण म्हटला म्हणजे त्याचे मतें लक्ष्मणाकडे सारा दोष येत असतां त्यानें यानंतर त्याचा पुनः उच्चार केला नाहीं, हा होय. सीतेकरितां त्यानें यापुढें पुष्कळ विलाप केला, परंतु सर्व वेळीं त्यानें आपल्या प्रारब्धावर दोष दिला आहे ! नाहीं तर सर्व दोष त्याचेवर ठेवून सामान्य

जनाप्रमाणें राम प्रत्येक वेळीं त्याला त्याचें स्मरण देत राहिला असता तर लक्ष्मणाच्या वनवासाचे आपत्तींत ही नवी भर पडली असती !

रामाला राज्याभिषेक झाल्यानंतर व सर्व बंधूंना पुत्र होऊन ते मोठे झाल्यानंतर त्यानें त्या सर्वांची स्वतंत्र प्रांतांवर नेमणूक करून तेथील व्यवस्था त्यांजवर सोंपविली. रामाची ही योजना उघडपणें दूर धोरणाची आहे. या वेळीं कुटुंबाचा विस्तार मोठा झाला होता व यामुळें कोसलादि देशांचा कारभार चालविण्यास आवश्यक असलेल्या पुरुषांहून अधिक संख्या कुटुंबांत झाली होती. सामान्यतः लोकांमध्यें कुटुंब मोठें झालें व कुटुंबाचे निर्वाहाचें साधन म्हणून चालू असलेला व्यवसाय करण्यास आवश्यक असलेल्या मंडळींहून अधिक मंडळी कुटुंबांत झाली म्हणजे कांहींना तरी निरुद्योगी राहाण्याची पाळी येते व ही मंडळी फावल्या वेळांत कलहाचें बीज पेरूं लागते. निर्वाहाचा भार त्यांजवर नसला तरी द्रव्यार्जनाच्या कोणत्या तरी उद्योगांत त्यांना गुंतविणें हें धोरण अशा वेळीं मुख्य पुरुषानें सांभाळावयाचें असतें. अंगावर निर्वाहाचा भार नाहीं व दुसरा उद्योग नाहीं, म्हणजे अशीं माणसें प्रायः व्यसनी होतात व त्यानिमित्त म्हणा किंवा दुसरें कांहीं निमित्त होऊन म्हणा, कुटुंबाच्या चालू व्यवसायांत मुख्य पुरुषाला अडथळा करितात व येथून कलहाला प्रारंभ होऊन सर्वांचे नाशांत त्याची समाप्ति होते. रामानें वरील योजना कां केली हें रामायणांत सांगितलेलें नाहीं हें खरें; तथापि कुटुंबाचे परिस्थितीवरून हें धोरण अनुमानितां येतें. राजपुत्रांच्या नेमणुकी प्रांतांवरून करिते वेळीं त्यांजवरहि रामानें सर्व कारभार एकदम सोंपविला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तरुण वय व कारभाराचा अनुभव नाहीं, अशा स्थितींत सर्वाधिकार प्राप्त झाल्यावर राजपुत्रांना विविध विलासांवांचून दुसरें काय सुचावयाचें? विलासामागून प्रजांना आपोआप पीडा होते. तेव्हां रामानें या राजपुत्रांबरोबर त्यांचे पित्यांना—अर्थात् आपल्या अनुभवी बंधूंना—देऊन तेथें कांहीं काल त्यांजबरोबर राहाण्याची आज्ञा केली आणि तेथील कारभाराचें वळण पुत्रांना लाविल्यावर ते परत आले. प्रांतांवर राजपुत्रांच्या स्वतंत्र नेमणुकी केल्या तरी सार्वभौम सत्ता अयोध्येची होती, हें सांगावयास नको; अर्थात् पूर्वींचे मांडलिकांत ही नवी भर पडली. राजपुत्रांना

प्रांतांवर अधिकार देऊन नेमणें व विभक्त होणें यांत वास्तविक अंतर काय आहे ? कांहीं नाहीं. मात्र यांत दोनहि पक्षांचें सख्य आहे व त्यांत कलह आहे. विभागणी तरी वडिलोपार्जित द्रव्याची करावयाची असते आणि तें नसेल तर हा प्रश्नच संभवत नाहीं. नाहीं तर सोदर बंधु असले तरी जन्मतःच विभक्त असतात. विभागणीची मुख्य दृष्टि काय ती आपल्या संपत्तीवर असते. द्रव्याचें संपादन व संरक्षण करण्याचें बल अंगांत असल्यावर, आयतें मिळावें अशी इच्छा कोणाला होत नाहीं व त्यावर दृष्टि लावून राहण्यापेक्षां त्याला स्वतंत्र मार्गच बरा वाटतो; आणि अशा रीतीनें तो या मार्गाला लागल्यावर विभक्तपणाचा वेगळा विधि असत नाहीं; पण रामाचे दूरदर्शीपणामुळें व प्रेमळ वागणुकीमुळें हा प्रसंग उद्भवला नाहीं आणि उलट त्याच्या योजनेमुळें राजपुत्र व प्रजा या दोघांनाहि सुखप्राप्ति झाली.

## व्यावहारिक धोरण.

रामाच्या घरगुती वागणुकींत जसें त्याचें धोरण दिसून येतें, तसेंच तें व्यवहारांत दिसून येतें. राजकारण हा विषय तर असा आहे कीं, त्याचा धोरण हा सारा आधार आहे. धोरणी पुरुषावांचून राजकारण चालणें शक्य नाहीं. प्रजापालन हें राजाचें कर्तव्य म्हणून राजकारणाचें मुख्य ध्येय असून इतर विषय त्याचे अनुषंगानें आहेत. तथापि राजकारणी पुरुषाचें कौशल्य या आनुषंगिक विषयांत अधिक प्रकट होत असल्यामुळें त्यांना अधिक महत्त्व आलें आहे. प्रजांपासून करभार घेऊन त्याचे योगानें त्यांचें संरक्षण करावयाचें हा काय तो राजाचा मुख्य व्यवहार; परंतु करभार योग्य प्रमाणांत घेऊन त्यानिमित्त आपणावर येणारा संरक्षणाचा भार दक्षतेनें व प्रामाणिकपणें पाळावयाचा म्हणजे त्यांत कौशल्य लागतें. प्रजाजन संतुष्ट व सर्व प्रकारें समृद्ध असणें हें राजाच्या कर्तव्यपरतेचें गमक असून रामाच्या राज्यांतील प्रजांच्या स्थितीचें रामायणांतील वर्णन वाचलें असतां राजकारणाच्या या अंगांतील रामाचें कौशल्य कळून येणार आहे. राम अरण्यांत निघाला असतां प्रजा त्याचे मागून अरण्यांत जाऊं लागली यांत प्रजांचें त्याजवरील प्रेम उघड दिसून आलें आहे. प्रजाजन बरोबर येत असले तरी त्यांना आपणाबरोबर अरण्यवास भोगावयास लागणें रामाला युक्त वाटलें

नाहीं. तथापि त्यांना विनंति करूनहि ते परत जात नाहींत असें पाहून या प्रसंगीं रामानें त्यांना न दुखवितां परत लावण्याची युक्ति योजिली. अरण्याकडे जातांना रामाचा पहिला मुक्काम तमसातीरीं होता व बरोबर आलेले प्रजाजनहि तेथें उतरले होते. सकाळीं उठल्यावर रामानें सर्व मंडळी निजलेली पाहून लक्ष्मणाला सांगितलें, " हे सुमित्रानंदना लक्ष्मणा, घराचीहि पर्वा न करितां आमचीच अपेक्षा धरून वृक्षांच्या मुळाशीं पडलेले हे लोक सांप्रत अवलोकन कर. मला परत फिरविण्याकरितां हे लोक कसा प्रयत्न करीत आहेत, हें मी समजत आहे. हे प्राणसुद्धां देतील, परंतु आपला निश्चय सोडणार नाहींत. याकरितां हे गाढ निद्रेमध्यें आहेत तोंच आपण हलकेच उठून रथावर आरूढ होऊं आणि निर्भय मार्गाला चालते होऊं." ( २।४६।१९-२१ ) याप्रमाणें राम खरोखर रथावर बसून प्रजाजनांना आपला माग काढितां येऊं नये म्हणून प्रथम उत्तरेकडे जाऊन मग पुनः रथ फिरवून दुसऱ्या मार्गानें पुढें निघून गेला. राजा व प्रजा यांमधील अत्युत्कट प्रेम येथें दिसून आलेंच, पण त्यापेक्षांहि प्रजांना त्रास होऊं नये म्हणून रामानें स्वीकारिलेलें धोरण अधिक व्यक्त झालेलें आहे.

अरण्यांत गेल्यावर रामानें सुमंत्राला रथावरून परत जाण्यास सांगितलें असतां तोहि, आपण बरोबर अरण्यांत येतों असें सांगूं लागला. रामानें आपणास संमति द्यावी, म्हणून त्यानें त्याची परोपरीनें विनंति केली; तथापि राम त्याला संमति देईना; शेवटीं त्यानें, येण्याला संमति न दिल्यास मी रथासह अग्निप्रवेश करीन, असा अगदीं सत्याग्रह केला; तेव्हां रामानें त्याला परत पाठविण्याचा आपला हेतु स्पष्ट करून सांगितला. तो म्हणाला, " हे राजनिष्ठा, तुझी उत्कृष्ट भक्ति मी समजून आहें; परंतु मी तुला कशाकरितां अयोध्यानगरीमध्यें परत पाठवीत आहें, तें ऐकून घे. तूं नगरीमध्यें परत गेलास म्हणजे तुला पाहून कैकेयी मातेला " राम खरोखर वनांत गेला, असा विश्वास वाटेल. " ( २।५२।६०, ६१ ) रामाच्या या भाषणानें सुमंत्र निरुत्तर झाला व त्याला मुकाट्यानें परत नगरींत जाणें भाग पडलें.

सुमंत्र परत जाऊं लागला असतां त्याबरोबर घरच्या सर्व मंडळींना उद्देशून त्यानें वेगवेगळे निरोप पाठविले. या प्रसंगीं त्यानें कैकेयीलाहि आपलें वंदन

कळवून भरताला आपल्या मातेकडे नीट लक्ष ठेवण्याविषयीं सांगितलें. तसेंच भरताला आजोळाहून आणवून यौवराज्याभिषेक करण्याची व्यवस्था करण्याविषयीं राजाला कळविण्याबद्दल सांगून भरताला विशेष म्हणून राम म्हणतो, " तूं यौवराज्याचा स्वीकार करून मुख्य राज्यावर असलेल्या पित्याचें परिपालन कर. राजाचें वय होऊन गेलें असल्यामुळें त्याला तूं राज्यावरून पदच्युत करूं नकोस. त्याच्याच आज्ञेनें व्यवहार चालवून तूं यौवराज्यावर संतोषानें राहा. " ( २।५८।२२; २३ ) पूर्ण अधिकार आपणाकडे असावा, अशा इच्छेनें वृद्ध पित्याला गादीवरून काढून टाकण्याचा मोह भरताला होऊं नये, यासाठीं रामाचा हा उपदेश आहे. रामाला अरण्यांत जातेवेळीं पोंचविण्यास आलेले अयोध्यावासी प्रजाजन परत फिरत नाहींत, असें पाहून रामानें त्यांना जो उपदेश केला, त्यांत त्यानें आपल्यावर असलेलें त्यांचें प्रेम व त्यांजकडून आपणाला मिळणारा मान यापुढें त्यांनीं भरताला द्यावा असें सुचवून, भरत वयानें लहान असला तरी ज्ञानानें वृद्ध आहे, असें म्हणून त्याचा गौरव केला आहे. (६।४५। ६–१० ) या वेळीं त्यानें वनांतून परत आल्यावर राज्यकारभार करूं वगैरे आश्वासन देण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. भरताला राज्याचा अभिलाष आहे का नाहीं हें तोंपर्यंत समजलें नव्हतें आणि कैकेयीच्या वराप्रमाणें अरण्यवासाची मर्यादा पुरी झाली तरी त्यानंतर रामाला राज्य मिळावें, असा त्यांत वाव ठेविलेला नव्हता. अर्थात् हें सारें भरताच्या सौजन्यावर अवलंबून होतें व याकरितां रामानें याविषयीं मुळींच भाषण केलें नाहीं.

बिभीषण रावणाला सोडून रामाकडे आला असतां त्याला आपल्या पक्षांत घ्यावा किंवा कसें, याचा विचार चालू झाला. रामाकडील सर्व प्रमुख मंडळींना बिभीषणाविषयीं, तो शत्रुपक्षाकडील हेर असावा असा संशय होता, आणि याकरितां अमात्यांसह त्याला शिक्षा करावी, असें त्यांचें मत होतें व त्याप्रमाणें त्यांनीं तें बोलून दाखविलेंहि. सर्वांचे विचार कळेपर्यंत रामानें आपलें मत बोलून दाखविलें नव्हतें; तथापि त्याला शिक्षा करण्याविषयीं सर्वांची एकवाक्यता दिसूं लागल्यावर रामानें तें व्यक्त केलें. इतरांना बिभीषणाविषयीं जी शंका

होती, तिचें निरसन करण्यासारखें प्रमाण रामापाशीं नव्हतें व तसें असणें शक्य नव्हतें. तेव्हां मित्रभावानें आपणाकडे आलेल्याचा त्याग सज्जनांनीं निंद्य मानिलेला आहे, याकरितां बिभीषणाचा आपण त्याग करणार नाहीं, असें त्यानें सांगितलें. रामाचा हा निर्धार पाहून सुग्रीव चकित झाला व रामाला निरुत्तर करण्याकरितां म्हणाला, " हा राक्षस दुष्ट असो वा सुष्ट असो; पण आपल्या भ्रात्यावर संकट आलें असतां त्याचा त्याग करण्यास जो ( आज ) सिद्ध झाला, तो ( यापुढें ) कोणाचा त्याग करणार नाहीं ? " ( ६।१८।६ ) सुग्रीवाचें म्हणणें असें कीं, आतां याचा मित्रभावानें स्वीकार केल्यास आपणांवर संकट आलें असतां हा आपला त्याग करून पुनः शत्रूला जाऊन मिळणार नाहीं कशावरून ? रावण हा त्याचा प्रत्यक्ष बंधु आणि आपण तर त्याचे कार्यापुरते चिकटलेले स्नेही; तेव्हां हें बंधन त्याहून अधिक लवकर सोडण्याजोगें, हें उघड आहे. सुग्रीवाची शंका ऐकून रामानें त्याच्या बुद्धिमत्तेचा प्रथम गौरव केला; पण स्वतांच्या मताचें समर्थन करण्याकरितां तो म्हणाला, " बाबारे ! सर्वच बंधु भरतासारखे असतात, असें नाहीं. " ( ६।१८।१५ ) हें वाक्य बोलून गेल्यावर रामाला वालिसुग्रीवांच्या संबंधाचें स्मरण झालें; अर्थात् सुग्रीवानें आपल्या प्रत्यक्ष बंधूचा घात रामाकडून करविलेला असल्यामुळें या प्रसंगीं रामानें भरताच्या बंधुप्रेमाची आठवण त्याला करून देण्यांत सुग्रीवाला लाजविल्यासारखें झालें व हें तर अनिष्ट होतें. म्हणजे बिभीषणाला जोडूं पाहाण्यांत सुग्रीवाला तोडण्याचा प्रसंग आला. " आजोबा मेला आणि नातु जन्मास आला," अशाप्रमाणें झालें. बोलून गेलेले शब्द परत घेतां येत नव्हते आणि तेंच वाक्य सुधारण्याकरितां म्हणून त्यांत अपवादाचा समावेश करून पडलेली बाजू सांवरून घेऊं लागल्यास त्यांस यश येणें बाजूला राहून तें अधिक हास्यास्पद झालें असतें. अशा प्रसंगीं लहान मुलें हट्ट धरून बसलीं असतां करावयाचें त्याप्रमाणें विषयांतर करून तिकडे प्रतिपक्ष्याचें लक्ष वेधणें हा उत्तम उपाय असतो व तोच रामानें योजिला. वरील वाक्य बोलून गेल्यावर राम लागलींच म्हणतो, " सर्वच पुत्र माझ्यासारखे असतात, असें नाहीं; आणि सर्वच सुहृद् तुमच्यासारखे असतात, असें नाहीं. " या भाषणांत त्यानें प्रथम स्वतांचा दृष्टांत देऊन

विषयांतर केलें व लागलींच पुढील वाक्यांत सुग्रीवाचा स्वतां गौरव केला. बोलतांना सावधपणें बोलण्यांत जें कौशल्य लागतें, त्याहून अधिक कौशल्य बोललेलें सांवरून घेण्यांत लागतें, हें उघड आहे.

रामाला युद्धांत साहाय्य करण्याकरितां इंद्रानें आपला रथ व सारथि मातलि यांना त्याजकडे पाठविलें होतें. शेवटच्या युद्धांत रावण क्रोधानें रामावर चालून आला. या वेळीं तो समोर दिसूं लागला असतां राम आपल्या सारथ्याला म्हणतो. " हे मातले, मेघ आकाशांत उत्पन्न झाले असतां वायु ज्याप्रमाणें त्याला उडवून देतो त्याप्रमाणें हा रथ उडवून देण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां खिन्न न होतां, गोंधळून न जातां, चित्त व दृष्टि दुसरीकडे व्यग्र होऊं न देतां आणि रश्मीसंबंधीं अव्यवस्था होऊं न देतां माझा रथ सत्वर पुढें ने. " ( ६।१०६।१२-१३ ) रावण क्रोधानें आलेला व यासाठीं त्याला असें सांगणें एका प्रकारें आवश्यक होतें. आणि रथ व सारथि दोनहि इंद्राकडून आलेलीं यासाठीं त्यांचा उपयोग करून घ्यावयाचा म्हणून दुसऱ्या प्रकारें तें अनवश्यक होतें; या दोनहि बाजूंची रामाला जाणीव होती व म्हणून वरीलप्रमाणें सांगितल्यावर तो लागलीच मातलीला म्हणतो-" इंद्राच्या रथाची तुला नेहमींच संवय असल्यामुळें खरोखर मीं म्हणजे तुला कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं; तथापि रावणाशीं युद्ध करण्यास मी एकटा सज्ज झालों असल्यामुळें सारथ्यकर्माची मी तुला आठवण करीत आहें. सारथ्यकर्मासंबंधानें तुला कांहीं शिकविण्याचा माझा उद्देश नाहीं. " ( ६।१०६।१३, १४ ) रामाच्या या भाषणानें मातली खरोखरच संतुष्ट झाल्याचें रामायणांत लिहिलें आहे. युद्धामध्यें रथ्याप्रमाणें सारथ्यालाहि उत्साह वाटावा लागतो व याचसाठीं रामानें मातलीला आज्ञा करितांना प्रथमच " खिन्न न होतां " रथ नेण्यास सांगितलें आहे; आणि या धोरणानें प्रथमच्या भाषणानें विषाद वाटण्याचा संभव लक्षांत घेऊन तो पुढील भाषणानें दूर केला आहे.

रावणवधानंतर बिभीषणानें रामाची संमति घेऊन सीतेला शिबिकेंत बसवून रामाकडे आणविली. रामाच्या वानरसेनेनें एवढा जो खटाटोप केला तो केवळ सीतेला परत आण याकरितां व यामुळें तेथें असलेल्या सर्व मंडळींचें लक्ष साह-

जिकपणें ती येत असलेली कळतांच तिजकडे गेलें; आणि होतां होतां तिला पाहाण्याकरितां आलेल्या वानरांची व राक्षसांची शिबिकेभोंवतीं गर्दी होऊन पुढें जाण्यास प्रतिबंध होऊं लागला. तेव्हां बिभीषणाचे सेवक गर्दी मोडण्याचा प्रयत्न करूं लागले व त्यामुळें एकदम मोठा गोंगाट होऊं लागला आणि तो रामापर्यंत जाऊन पोंचला. रामानें शोध केल्यावर या गोंगाटाचें कारण त्याला कळतांच त्यानें मंडळींची गर्दी मोडण्याचें काम बंद करविलें व तो म्हणाला—" माझी पर्वा न करतां या लोकांना तूं त्रास कशाकरितां देत आहेस? हे लोक माझे आहेत, ( तेव्हां ) यांना त्रास देण्याचें बंद कर. गृहें, वस्त्रें, कोट, लोकांना बाजूला सारणें व राजसत्कार हें स्त्रियांचें आवरण नसून त्यांचें शील हेंच त्यांचें खरें आवरण होय. तेव्हां शिबिकेंतून उतरून ती पायांनींच इकडे येऊं दे आणि माझ्याजवळ येऊन ती या वानरांच्या खुशाल दृष्टीला पडूं दे."( ६।११४।२६, २७, ३० ) ज्यांच्या साहाय्यानें सेतुबंधापासून रावणवधापर्यंतचीं सर्व कार्यें सिद्धीला गेलीं त्या वानरांना कार्यसिद्धि झाल्यावर त्रास देणें रामाला उचित वाटलें नाहीं. तेव्हां तो बंद करण्याकरितां आणि एवढा खटाटोप स्त्रीकरितां नसून आपल्या कुलाला आलेला कमीपणा दूर करण्याकरितां आपण केल्याचें सर्वांसमक्ष तिला सांगावयाचें असल्यामुळें सर्व मंडळी तेथें जमण्याचा योग आयता जुळून यावा म्हणून रामानें वरील भाषण केलें व त्याप्रमाणें पुढील योगहि जुळून आला.

## वाक्चातुर्य.

रामाच्या व्यावहारिक धोरणाविषयीं निरूपण करितांना त्याचें वाक्चातुर्य कांहीं स्थलीं साहजिक व्यक्त झालें आहे; तथापि हा गुण स्वतंत्र आहे व याकरितां त्याविषयीं पृथक् निरूपण करावयाचें आहे. रामायणांत कोणत्याहि तत्त्वाचें प्रतिपादन नाहीं व तें करण्याचा कर्त्याचा उद्देशहि नाहीं. तेव्हां रामाचें वाक्चातुर्य प्रकट होण्यासारखे प्रसंग त्यांत फार आलेले नाहींत, यांत आश्चर्य नाहीं. त्याच्या सर्व चरित्रांत मुख्य कार्यें धैर्य, स्वार्थत्याग, स्थितप्रज्ञता, कार्यनिष्ठा इत्यादि गुणांचीं आहेत. त्याचें वाक्चातुर्य प्रकट होण्यास यांत अवसर मिळण्यासारखा नाहीं. या गुणांविषयीं त्यानें कोणतेंहि निरूपण केलें नसून

त्याचें चरित्र हेंच त्या गुणांचें निरूपण होय. आणखी असें आहे कीं, वरील सर्व गुण असले तरी त्याचे अंगीं वाक्चातुर्य असतें असा नियम नसतो, आणि ते गुण व्यक्त होण्यास त्याची आवश्यकताहि नसते. दुसरे कोणतेहि गुण अंगीं नसतां वाक्चातुर्य असल्यास वस्तुस्थिति लोकांना कळेपर्यंत त्याची प्रशंसा होत राहिली तरी शेवटीं तो उपहासास पात्र होतो. अर्थात् हा गुण इतरांना भूषणावह आहे. हा गुण इतरांप्रमाणें नैसर्गिक असून तो नवीन संपादितां येण्यासारखा नाहीं. रामाचें वाक्चातुर्य प्रकट होण्यासारखे प्रसंग रामायणांत फार थोडे आहेत. पित्याला वचनमुक्त करण्याकरितां वनांत जावयाचें असें एकदां आपल्या मनाशीं ठरविल्यानंतर त्याला कित्येकांनीं निरनिराळीं कारणें सांगून विरोध केला, त्या सर्वांना योग्य कारणें सांगून त्यानें निरुत्तर केलें. या वेळीं त्याचें वाक्चातुर्य प्रकट झालें आहे. रामाला विरोध करणारांमध्यें कौसल्या व लक्ष्मण हीं प्रमुख होतीं. कौसल्येनें रामाला माता या नात्यानें, वनांत न जातां आपल्या रक्षणाकरितां तेथें राहण्याची आज्ञा केली व लक्ष्मणानें "वृद्ध राजाला मोह झाल्यामुळें त्याची बुद्धि फिरली आहे व तो कांहींतरी बडबडूं लागला आहे, तेव्हां त्याची आज्ञा पालन करण्याचें कारण नाहीं." वगैरे सांगून रामाला आपल्या साहाय्यानें त्याचा निग्रह करण्याची सूचना केली. दोघांनाहि शोक व संताप झाला होता, तथापि लक्ष्मणाचे भाषणांत संताप अधिक व्यक्त झाला आहे. या दोनहि भाषणांना रामानें आपल्या वाक्चातुर्यानें तत्काल निरुत्तर केलें आहे. यानंतर भरत रामाला परत आणण्याकरितां वनांत गेला, त्या वेळीं त्यानें तर रामाला राज्यकारभार पाहाण्यास आपण असमर्थ असून पित्यानें आपणाला दिलेलें राज्य परत अर्पण करीत असल्याचें सांगितलें आहे. दोनहि स्थलीं मुद्दा एक असला तरी त्यांवर रामानें दिलेलें उत्तर मूळांत वाचण्यासारखें आहे. जाबालीनें मात्र या वेळीं राम परत येत नाहीं असें पाहून "पिता हें प्राण्याचें निमित्त कारण आहे. दशरथ तुझा कोणी नव्हे, तूं त्याचा कोणी नव्हेस" वगैरे प्रतिपादन करून निःशंकपणें राज्य करण्याचा उपदेश केला; आणि तो ऐकून रामानें क्रुद्ध होऊन त्याला उत्तर दिलें. "राजानें असत्य मार्गाचें अवलंबन केल्यास लोकहि असत्य मार्गानें जाऊन अनर्थ होईल" असें येथें रामानें सांगितलें. वसिष्ठांनीं ज्येष्ठ

पुरुषाला राज्य प्राप्त होत असल्याची वहिवाट, इक्ष्वाकुकुलाची परंपरा सांगून रामाला दाखविली. वसिष्ठांच्या मधुर प्रतिपादनाला रामानें मधुरच उत्तर दिलें. शेवटीं भरतानें रामाला परत न आल्यास आपण प्रायोपवेशन करणार असें सांगून तो रामासमोर दर्भास्तरणावर बसला; त्यालाहि रामानें अशा रीतीनें धरणें धरून बसणें क्षत्रियांना शास्त्रसंमत नसल्याचें सांगून निरुत्तर केलें. या सर्व वेळीं प्रसंगानुरूप कोटिक्रम करून प्रतिपक्ष्याला रामानें गप बसविलें व यांतच त्याचें वाक्चातुर्य व्यक्त झालें आहे. या त्याच्या गुणाला अनुसरून रामाला " संभाषण करणारांमध्यें श्रेष्ठ " ( वाक्यविदां श्रेष्ठः ) असें पुष्कळ स्थळीं म्हटलें आहे. या कामीं मारुतीनें रामाविषयीं जे उद्गार काढिले आहेत ते येथें दिल्यास पुरे आहेत. मारुती म्हणतो " आपण समर्थ असून बुद्धिमंतांमध्यें व वक्त्यांमध्यें श्रेष्ठ आहां. बृहस्पति बोलूं लागला तरी त्यालाहि आपल्यापेक्षां अधिक चांगलें भाषण करितां येणार नाहीं. " (६।१७।५१).

## मनुष्याची परीक्षा

निरनिराळ्या स्वभावांच्या व निरनिराळ्या शीलांच्या मनुष्यांशीं व्यवहारांत नित्य संबंध येत असतो; त्यांच्या गुणांची पारख करून त्यांशीं पुढील व्यवहार करणें उचित असतें; आणि अशा रीतीनें खरी पारख होऊन व्यवहार झाल्यास तो उभयपक्षांस सुखावह होतो. परीक्षेकडे दुर्लक्ष करून प्रथमच्या भेटींत प्रामाणिक समजून पुष्कळ मनुष्यें व्यवहार करितात व फसगत झालेल्यांचीं चरित्रें पाहिलीं तर त्यांत प्रायः ही भूल आढळते. आणि कित्येक वेळां परीक्षा करणारालाहि ती नीट झालेली नसते; पण असे प्रसंग थोडे असतात. परीक्षा न करितां विश्वासानें व्यवहार करणारे फार असतात. सामान्य व्यवहारांत अशी फसगत झाल्यास होणारी हानि वैयक्तिक असते, तर राजकारणांत ती झाल्यास त्याचा संबंध राज्याशीं येऊन पोंचतो. राजकारणांत या गुणांची आवश्यकता फार असते व त्याचें कारण हें आहे. रत्नादिकांची परीक्षा करावयाची म्हणजे त्या कामीं त्याचें तेज, वजन पाहणें वगैरे ठरीव प्रमाणें असतात; तसें मनुष्याची परीक्षा करावयाचें ठरीव प्रमाण नाहीं. कारण मनुष्याची परीक्षा त्याचे देहाची किंवा स्वरूपाची करावयाची नसून अदृश्य अशा त्याच्या अंतःकरणाची करा-

वयाची असते. अर्थात् त्याच्या बाह्य व्यापारावरून ती करितांना फसगत होते, यांत नवल नाहीं. हा गुण अंगीं नैसर्गिक असावा लागतो. सुग्रीवानें ज्या वेळीं रामलक्ष्मणांना पंपातीरीं आल्याचें पाहिलें तेव्हां त्याला त्यांविषयीं संशय आला व त्यानें मारुतीला त्यांजकडे शोध करण्याकरितां पाठविलें. रामलक्ष्मण सुग्रीवाच्या शोधांत होते व यामुळें त्या वेळीं त्यांना त्याविषयीं शंका घेण्याचें कारण नव्हतें. तथापि त्याकडून रामाकडे आलेला मारुती त्यांना अपरिचित होता. त्यानें रामाची गांठ घेऊन प्रथमच जें भाषण केलें त्याचे योगानें रामाला अत्यंत संतोष होऊन तो म्हणाला " याचे भाषणांत उगीच पाल्हाळ नाहीं. तें संदिग्ध नाहीं. श्रोत्याला कंटाळा अथवा त्रास वाटण्यासारखें नाहीं. ऊर, कंठ व शिर या तीनहि ठिकाणीं अभिव्यक्त होणाऱ्या या अद्भुत वाणीनें कोणाचें अंतःकरण प्रसन्न होणार नाहीं ? शत्रु तलवार उगारून अंगावर येत असला तरी तोहि प्रसन्न होऊन जाईल. " ( ३।३।३१, ३३ ) मारुतीविषयीं त्याच्या संभाषणावरून रामानें केलेली परीक्षा अगदीं बरोबर ठरली. बिभीषण बंधूशीं कलह होऊन ज्या वेळीं रामाकडे आला त्या वेळीं त्याची परीक्षा राम व मारुती या दोघांनीं मात्र बरोबर केली. सुग्रीवप्रभृति वानरांनीं तो शत्रूकडील हेर असावा असें ठरविलें. होतें. परंतु मारुतीनें बिभीषणाची मुद्रा प्रसन्न असलेली पाहून व तो बोलूं लागला असतां त्याचे भाषणांत दुष्टपणा दिसून येत नाहीं इकडे लक्ष देऊन त्याचा स्वीकार करावयास आपली संमति दिली. रामानेंहि त्याच्या मनांत कपट नसल्याचें अनुमान त्याचे भाषणावरून केलें, व हें अनुमान बरोबर असो वा नसो, त्याला राज्याचा अभिलाष आहे आणि याकरितां तो हेर म्हणून येण्यापेक्षां राज्यलालसेनें येण्याचा अधिक संभव आहे असें सांगून त्याचा स्वीकार केला. बिभीषणानें आपली ही लालसा बोलून दाखविली होती व तिला दृढता येण्याकरितां रामानें याच वेळीं त्याला राक्षसांचा राजा म्हणून लक्ष्मणाकडून अभिषेक करविला. अर्थात् रावणाचा वध होऊन रामाला जय प्राप्त होणें त्याला सर्वथा इष्ट झालें; कारण उलट बाजू होण्यांत त्याचा सर्वस्वी घात व्हावयाचा, हें उघड आहे. मात्र यापूर्वी रावणाच्या बलाविषयीं सर्व माहिती रामानें त्याला विचारून समजून घेतली. बिभीषणाविषयीं शंका घेणाऱ्या सुग्रीवानेंहि मागाहून

त्याच्या बोलण्याचालण्यावरून वगैरे तो शुद्ध भावानें आला असावा असें अनुमान केलें व रामाला आपली संमति दिली. रामानें केलेली परीक्षा त्याला मागाहून पटली इतकेंच. आणि चतुर पुरुष व सामान्य व्यक्ति यांमध्यें हाच भेद असतो. मारुती अशोक वनिकेंत गेल्यावर त्याची व सीतेची गांठ पडली त्या वेळीं तिलाहि हा कोणी राक्षस असावा अशी शंका आली; तेव्हां तिला रामनामी आंगठी दाखवून व कांहीं खुणेच्या गोष्टी सांगून स्वतां रामाकडील दूत असल्याविषयीं त्यानें तिला पटवून दिलें. मारुती रामाचा दूत आहे असें पटल्यावर सीता म्हणाली " तो अजिंक्य राम परीक्षा केल्यावांचून आणि पराक्रम पाहिल्यावांचून विशेषतः माझ्याकडे कोणाला पाठविणार नाहीं. " (५।३६।११) सीतेच्या या भाषणांत रामाचा नवपरिचितांची परीक्षा करण्याचा प्रघात व त्याविषयींचें कौशल्य या दोहोंची एकत्र नोंद झाली आहे.

## युद्धकौशल्य.

रामाच्या युद्धकौशल्याविषयीं लोकांत नित्य प्रचारांत असलेल्या " रामबाणाच्या " उपमेची आठवण दिल्यानें कांहीं कल्पना सहज करितां येणार आहे. शत्रूच्या मर्माचा भेद करून त्याचा निःसंशय नाश करणारा रामाचा बाण होता व त्याच्या उपपत्तीप्रमाणें वास्तविक त्याचा उपयोग शस्त्राची अमोघता प्रदर्शित करितांना व्हावयाचा; परंतु आमच्या दुर्दैवानें रोगांचा प्रसार देशांत फार झाल्यामुळें औषधांचें रोगपरिहारांचें सामर्थ्य व्यक्त करण्याचे कामीं याचा उपयोग प्रायः होत असतो. कोणातरी वैद्याच्या कल्पकतेनें ही रामबाण उपायाची कल्पना अगदीं रूढ झाली आहे. आतां तर निःशस्त्र झाल्यावर मूळ उपपत्ति तरी कशानें लक्षांत येणार ? + दृष्टांतांत दृढ झालेल्या रामबाणाच्या अमो-

---

* शस्त्रांशीं परिचय नसल्यामुळे त्यांविषयीं भलती कल्पना कशी वाटत असते, याचें प्रत्यंतर रविवर्म्याचे शिवधनुर्भंगाचे चित्रांत पहावयास मिळतें. जनकाकडे यज्ञ पाहाण्यास राम गेला असतां तेथें असलेलें शिवधनुष्य राजानें त्याला दाखविलें आणि प्रत्यंचा चढवीत असतां त्याचा भंग झाला अशी कथा आहे. धनुष्याची प्रत्यंचा त्याचे एका अग्राला घट्ट बसवून दुसऱ्या अग्राकडे गुळखी करून अडकविलेली असावयाची. अर्थात् ती सैल असावयाची आणि बाण सोडते वेळीं धनुष्य वांकवून त्याचे दुसऱ्या अग्राकडे प्रत्यंचा घेऊन तेथें घट्ट करावयाची व असें करावयाचें यालाच धनुष्य सज्ज करावयाचें म्हणतात.

घतेचा उगम रामाच्या हस्तकौशल्यांत आहे. विश्वामित्राचे यज्ञाचें संरक्षण करण्यासाठीं तो सध्यांच्या आमच्या समजुतीप्रमाणें वयांत येण्यापूर्वीं गेला व त्याच वेळीं त्यानें प्रथम आपलें कौशल्य प्रकट केलें. सीतेनिमित्त पुढें राक्षसांशीं झालेल्या युद्धांत मुख्य कामगिरी राम व लक्ष्मण यांचीच आहे. राक्षस व वानर ही दोन पक्षांकडील मंडळी बहुतेक शिलावृक्षादिकांनीं लढत होती. अर्थात् त्या युद्धांत तादृश कौशल्य नाहीं व महत्त्वहि नाहीं. दोनहि पक्षांकडे युद्धाचीं साधनें हींच असल्यामुळें तें कांहीं दिवस चालू राहिलें. तथापि रामपक्षाकडे या दृष्टीनें न्यूनता होती; कारण रावणपक्षाकडे सेनापति वगैरे शस्त्रांचा उपयोग करणारे वीर रामपक्षाहून अधिक होते. संख्याबलाकडून येणारी ही न्यूनता रामाचे कौशल्यानें भरून निघाली. रावणाशीं शेवटीं झालेल्या युद्धांत रामानें हस्तलाघव कसें दाखविलें याचें थोडक्यांत वर्णन पुढीलप्रमाणें रामायणांत केलें आहे. "मेघ ज्याप्रमाणें आकाशामध्यें सूर्यासमीप जाण्यास समर्थ होत नाहींत, त्याप्रमाणें सैन्यामध्यें प्रविष्ट होऊन बाणरूप अग्नीनें राक्षससैन्य दग्ध करीत सुटलेल्या रामासमीप जाण्यास महाघोर राक्षस समर्थ झाले नाहींत. ....रामाच्या योगानें छिन्नभिन्न होऊन त्याच्या बाणांनीं दग्ध व पराजित झालेलें आणि त्याच्या शस्त्रांनीं जर्जर झालेलें सैन्य मात्र राक्षसांच्या दृष्टीला पडलें; चलाखीनें युद्ध करीत असलेला राम कांहीं त्यांच्या दृष्टीला पडला नाहीं. इंद्रियांचे ठिकाणीं असलेला भूतात्मा ज्याप्रमाणें लोकांना दृग्गोचर होत नाहीं, त्याप्रमाणें शरीराचे ठिकाणीं प्रहार करीत असलेला राम त्या राक्षसांना दृग्गोचर झाला नाहीं." ( ६।९३।१९, २२, २३ ) या वेळीं राम अदृश्य झाला नव्हता, हें सांगावयास नको; पण राक्षससेनेवर तो बाण सोडीत असतां त्याजकडे कोणाला पाहतां येईना. राक्षस पडतांना पाहून बाण कोठून येतो, म्हणून

---

"सज्ज" या शब्दावरूनहि हें कळून येईल. शिवधनुष्याचा त्या वेळीं जो भंग झाला तो अशा रीतीनें प्रत्यंचा चढवीत असतां झाला. धनुष्य वांकविण्यास शरीरसामर्थ्य लागतें व बाण सोडण्यास हस्तकौशल्यादि लागतें, इतका दोहोंमध्यें भेद आहे. रविवर्म्याचे चित्रांत राम प्रत्यंचा चढवीत असल्याचें मुळींच दाखविलेलें नसून उलट ती चढविलेली दाखविली आहे. प्रत्यंचा चढवून झाल्यावर धनुष्याचा भंग केव्हां आणि कसा होणार? शरसंधान करावयाचें तेथें कारण नव्हतें व तसें दाखविलेलेंहि नाहीं.

तिकडे पहावें तों त्याजवर बाण येऊन पडे; मग पाहाण्यास अवसर कोणता ? खरादिकांचा वध झाल्यावर शूर्पणखा रावणाकडे जाऊन त्याविषयींचा वृत्तांत सांगतांना म्हणते, " संग्रामामध्यें हा बलाढय राम बाण घेतो केव्हां, सोडतो केव्हां व धनुष्य ओढतो केव्हां, हें मला तर आढळण्यांत आलें नाहीं. शेतांत चांगलें पीक आलें असतां त्यावर इंद्रानें पाषाणांची वृष्टि करून त्याचा फडशा करावा, त्याप्रमाणें बाणांची वृष्टि होऊन राक्षसांचा वध होत आहे, इतकें मात्र मला दिसून आलें."(३।३४।७;८) राक्षस क्रूरपणानें अरण्यांत संचार करून आश्रमवासी ऋषिजनांना पीडा देत असत; तथापि त्यांतील फार थोड्यांच्या अंगीं युद्धाचें कौशल्य होतें. शारीरिक बलावर त्यांचे सर्व पराक्रम अवलंबून होते. अरण्यांत रामानें प्रवेश केल्यावर राक्षसांच्या या क्रूर कृति त्याचे कानीं आल्या व कित्येक त्यानें स्वतां पाहिल्या. तेव्हां ऋषिजनांचे रक्षणाकरितां प्रयत्न करण्याचें त्यानें ठरविलें. रामाचा पराक्रम व दृढनिश्चय राक्षसांना कळला असल्यामुळें तो अरण्यांत आल्यावर त्यांना भीति वाटून तो ज्या आश्रमांत राही, तेथें त्यांचा उपद्रव होत नसे. अशा रीतीनें रामाचा वनवास ऋषिजनांना संरक्षकच झाला. रामाचे पराक्रमाची दहशत राक्षसांचे मनांवर केवढी बसली होती हें मारीचाकडे रावण साहाय्य मागण्याकरितां आला त्या वेळीं त्यानें त्याला जें उत्तर दिलें त्यावरून कळून येणार आहे. राम दंडकारण्यांत आल्यावर एकदां मारीच आपल्या दोन सोबत्यांसह मृगरूप धारण करून त्याकडे आला व त्यानें त्यावर एकदम हल्ला केला. त्यावेळीं रामानें त्यावर तीन बाण सोडले पण मारीच ते चुकवून तेथून पळाला व त्याचे सोबती मरण पावले. हा सर्व वृत्तांत रावणाला निवेदन करून मारीच म्हणतो " रामाचे बाणाचे तावडींतून मी कसा तरी निभावून सुटलों व येथें येऊन सर्व दुराचरणाचा त्याग करून स्वस्थपणानें तपश्चर्या करीत राहिलों. ( तेव्हांपासून ) प्रत्येक वृक्षावर, वल्कलें व कृष्णाजिन धारण करून हातांत धनुष्य व बाण घेतलेली रामाची मूर्ति हातांत पाश घेऊन आलेल्या मृत्यूप्रमाणें मला ( निरंतर ) दिसत आहे. हे राक्षसा, मी भयभीत झालों असून हजारों राम मला दृष्टीस पडत आहेत. हें सर्व अरण्य मला राममय होऊन गेलें आहे. राम जवळ नसतांहि हे राक्षसराजा, मला तो सर्वत्र दिसत असतो. ( केव्हां केव्हां ) मला स्वप्ना-

मध्यें तो दिसतो व मीं भिऊन जागा असल्याप्रमाणें ओरडूं लागतो. (फार काय सांगावें,) रामाची दहशत माझे मनावर इतकी बसली आहे कीं, रत्नें, रथ वगैरे रकारादि नांवांचेंहि मला भय वाटतें." (३।३९।१४–१८) रामाच्या हस्तलाघवाचे योगानें राक्षसांना दहशत बसल्यामुळें दंडकारण्यांतील ऋषिजनांची वस्ती सुरक्षित झाली व रावणवध करून राम अयोध्येंत परत आल्यावर पुढें युद्धाचे प्रसंग फारसे उद्भवले नाहींत.

## गुणसंग्रह.

रामाचे गुणांचें वर्णन पूर्वी "रामायणाची योग्यता" सांगण्याचे निमित्तानें व येथें क्रमप्राप्त म्हणून केलें. त्याचे गुणांविषयीं चर्चात्मक लिहूं लागलें, तर तेंहि एक रामायण होऊं लागेल; तथापि रामायणांत रामाचे गुणांचा निर्देश प्रसंगवशात् संग्रहबुद्धीनें केला आहे, त्याचा अनुवाद येथें केल्यास आमचा उद्देश बराचसा सफल होईल, असें वाटतें. या गुणसंग्रहाला दुहेरी महत्त्व आहे. एक तर तो रामायणांतील पात्रांचे तोंडचा आहे; आणि दुसरें असें कीं, तो मूळ काव्यांत ग्रथित झालेला आहे; अर्थात् विष्णूचा अवतार म्हणून त्याविषयीं सर्व गुणसंपन्नतेची व दोषरहिततेची श्रद्धा उत्पन्न होण्यापूर्वीं तो केलेला आहे. रामाचे काळीं ज्या गुणांविषयीं त्याची लोकांत प्रशंसा होऊं लागली होती, त्यांचा यथातथ्य संग्रह यांत असावयाचा, हें उघड आहे. रामायण वाचून त्यावरून अशा गुणांचा संग्रह करण्यांत न्यूनाधिक्य होणें अपरिहार्य आहे, पण हा दोष त्यांत असणें संभवत नाहीं; याकरितां त्यांचा येथें एकत्र निर्देश करूं. रामायणाचे प्रारंभीं नारदवाल्मीकिसंवादांत असा एक गुणसंग्रह असून तो प्रथमच असल्यामुळें पुष्कळ वाचकांना परिचित असण्याचा संभव आहे; तेव्हां त्याचा येथें केवळ उल्लेख करून प्रासंगिक गुणसंग्रहाकडे वळूं. कैकेयीनें वरयाचनेच्या निमित्तानें रामाला वनांत पाठविण्याची मागणी केल्यावर ती ऐकून राजा दशरथ तिला म्हणतो, "सेवा, बहुमान, विश्वास आणि सांगितलेलें करणें या गोष्टी पुरुषश्रेष्ठ रामाहून अधिक कोण करणार ?....पुरुषश्रेष्ठ राम शुद्ध प्रेमानें सर्व प्राण्यांचें सांत्वन करीत असतो आणि आणि देशांत राहाणाऱ्या लोकांस प्रिय असेल तें करून वश करून घेत असतो. आपल्या सच्छीलपणाचे योगानें

त्यानें सर्व लोकांवर वर्चस्व मिळविलें आहे. दानाचे योगानें ब्राह्मण त्यानें वश करून घेतले आहेत; शुश्रूषेस्तव गुरुजन त्यानें आपलासा केला आहे आणि युद्धामध्यें आपल्या धनुर्बलावर त्यानें शत्रुवर्ग जिंकला आहे. सत्यवचन, दान, तपश्चर्या, स्वार्थनिरपेक्षता, मित्रता, शुचिर्भूतपणा, सरलता, विद्या आणि गुरुशुश्रूषणा हे गुण रामाचे ठिकाणीं अचल आहेत." ( २।१२।२६-२८-३० ) रामाला यौवराज्याभिषेक होण्यापूर्वीं म्हणजे त्याचे हातीं अधिकार प्राप्त होण्यापूर्वीं स्वतांच्या गुणांच्या योगानें त्यानें लोकांवर केवढा अधिकार संपादन केला होता, त्याची कल्पना राजाचे या भाषणावरून सहज होण्यासारखी आहे.

वनाला जाण्यास निघतांना राम राजाकडे आशीर्वाद घेण्याकरितां गेला. त्या वेळीं लक्ष्मण व सीता हीं त्याजबरोबर असून त्यांना पाहून त्यांविषयीं प्रजाजन आपापसांत बोलतात, "अहिंसा, दया, अध्ययन, सुस्वभाव, इंद्रियदमन व मनोनिग्रह हे सहा गुण पुरुषश्रेष्ठ रामाला शोभा देत आहेत." ( २।३३। १२ ) लोकांना अनुभवावयास मिळालेल्या गुणांचा संग्रह येथें आहे, हें उघड आहे. रामाचा गौरव करून येथें प्रजाजनांना कांहीं लाभ संपादावयाचा नव्हता व हें सर्व भाषण तर त्यांचें परस्परांमध्यें झालें आहे; तेव्हां यांत कृत्रिमतेचा संभवहि नाहीं.

अशोकवनिकेंत सीता व मारुती यांची भेट झाल्यावर सीतेनें मारुतीला त्वरा करून आपली मुक्तता करण्याविषयीं रामाला सांगावयास सांगितलें. आपला अंतरात्मा शुद्ध असून आपल्या मुक्ततेचा हा मनोरथ पूर्ण होण्यासारखे गुण पतीचे अंगीं आहेत, असें म्हणून ती मारुतीला सांगते, "हे वानरा, उत्साह, उद्योग, बल, दया, कृतज्ञता, शौर्य आणि प्रभाव हे गुण राघवाचे ठायीं आहेत." ( ५।३७।१५ ) सीतेच्या त्या वेळच्या परिस्थितीला अनुसरून तिला इष्ट असलेल्या गुणांचा संग्रह तिनें करणें साहजिक आहे. तिची मुक्तता करण्यास राम दयाळु व कृतज्ञ असल्यामुळें प्रवृत्त व्हावयाचा व बलादिकांच्या योगानें त्याला त्याचे प्रयत्नांत यश यावयाचें आणि या दृष्टीनें तिनें हा गुणनिर्देश केला आहे. अध्ययन, सुस्वभाव, तपश्चर्या, इंद्रियनिग्रह इत्यादि गुण रामाचे अंगीं असलेले

तिला माहीत नव्हते, असें नाहीं; परंतु तिची मुक्तता होण्यास त्याच्या अध्ययनाचा आणि इंद्रियनिग्रहाचा तिला काय उपयोग ?

रामाच्या अंगीं याप्रमाणें अत्यंत दुर्लभ गुण असूनहि राजवैभवाबरोबर येणारी स्तुतिप्रियता त्याचे ठायीं नव्हती. गुण अंगीं असो वा नसो, त्याचें अस्तित्व गृहीत धरून केलेली स्तुतिहि कोणाला अप्रिय वाटत नाहीं, मग असलेल्या गुणांचें वर्णन कोणीं केल्यास तें अप्रिय कसें व्हावें ? हा सामान्य मनुष्याचा स्वभाव आहे. थोर पुरुषांचें अलौकिकत्व अशा प्रसंगीं व्यक्त होत असतें. राजाचे पदरीं केवळ स्तुति करणारे बंदिजन म्हणून सेवक असत व त्याप्रमाणें ते दशरथाचे वाड्यांत होते. प्रातःकालीं राजाला त्याची स्तुति करून उठविण्याचें काम त्यांजकडे असे. त्यांच्या सेवाधर्माला अनुसरून ते नसत्या गुणांचाहि आरोप करून राजाला संतुष्ट करीत असत. नसत्या गुणांचा आरोप वारंवार कानीं पडल्यानें ते गुण अंगीं यावे, निदान विरुद्ध मार्गाकडे तरी पाऊल पडूं नये, असें त्याला वाटूं लागेल, या हेतूनें कदाचित् हा प्रघात प्रारंभीं पडला असावा. रामाची मात्र अशा स्तुतीकडे उदासीनपणें पाहाण्याची पद्धति होती. वनांत जाण्यापूर्वी राम दशरथाकडे जात असतां मार्गांत स्वतांविषयीं लोकांमध्यें चाललेली प्रशंसा त्याचे कानीं आली; तथापि तो स्तुतीविषयीं उदासीन वृत्तीनें मार्ग चालत होता असें रामायणांत स्पष्ट लिहिलें आहे. ( २।१७।१३ )

येथवर रामाचे अंगच्या गुणांविषयीं विचार केला. आतां दुसरीकडे वळूं.

## दोषदर्शन.

रामाचें सर्व चरित्र संकटांनीं ग्रस्त असून अशा स्थितींत त्याचे हातून प्रमाद होणें संभवनीय असतां झाले नाहींत, हें खरोखर कौतुकावह होय; तथापि अपवाद प्रत्येक गोष्टीला असतात त्याप्रमाणें त्याचे चरित्रालाहि आहे. रामचरित्रांतील दोषांचें परिगणन भवभूतीचे उत्तर रामचरित्राचे पांचव्या अंकांत लवाचे तोंडीं आलें आहे.

**वृद्धास्ते न विचारणीयचरितास्तिष्ठन्तु किं वर्ण्यते ।**
**सुन्दस्त्रीदमनेऽप्यखंडयशसो लोके महान्तो हि ते ॥**

**यानि त्रीण्यकुतोभयान्यपि पदान्यासन् खरायोधने ।**
**तद्वत्कौशलमिन्द्रसूनुनिधने तत्राप्यभिज्ञो जनः ॥**

यांत ताटकावध, खरादिकांशीं युद्ध करितेवेळीं तीन पावलें मागें घेणें आणि वालिवध इतक्यांचा निर्देश आहे. यांपैकीं ताटकावधाविषयीं तो करितेवेळीं रामाला शंका आली होती, परंतु त्याच वेळीं विश्वामित्रांनीं गोब्राह्मणप्रतिपालनाकरितां व देशाचे कल्याणाकरितां तिचा वध करण्यांत दोष नसून उलट तो पुण्यकारक आहे असें रामाला सांगितलें व रामाची शंका दूर होऊन तो तिला मारण्यास उद्युक्त झाला. अर्थात् रामाची कृति निर्दोष असल्याचें विश्वामित्रासारख्या थोर ऋषींच्या मतें सिद्ध झालें; आणि विचार केला तर यांत त्याचे हातून दोष घडला असें कोणी म्हणणारहि नाहीं. कारण स्त्रीवधाचा दोष शास्त्रांत सांगितलेला असला तरी तो स्त्रीजातीची स्वसंरक्षणाविषयींची असमर्थता लक्षांत घेऊन त्या दृष्टीनें आहे हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. हा भेद शास्त्रांत केलेला नाहीं व याकरितां रामाचें मन त्या वेळीं साशंक झालें होतें; आणि अरण्यांत शूर्पणखेचे नाक-कान कापून तिला रामानें विरूप केलें तें केवळ हा दोष टाळण्यासाठीं होय. ताटकेच्या उपद्रवामुळें त्या प्रदेशांतील मनुष्यवस्ती उठून जाऊन तो प्रदेश निर्मनुष्य झाला, होता आणि तिचा वध झाल्यावर तो वस्ती करण्यास पात्र झाला इकडे लक्ष दिल्यास तिचा वध करण्यांत दोष झाला नाहीं, असें विश्वामित्राप्रमाणें कोणीहि विचारी पुरुष मान्य करील.

आतां दुसरा दोष म्हटला म्हणजे खराशीं युद्ध करितांना तीन पावलें मागें घेण्याचा. याविषयीं रामायणांत मूळचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे——

**विफलः स कृतो बाणैः खरो रामेण संयुगे ।**
**मत्तो रुधिरगंधेन तमेवाभ्यद्रवद् द्रुतम् ॥३।३०।२२॥**

---

वृद्धांचीं चरितें असोत कशिंही तेथेंच साधू रते ।
केला स्त्रीवध, जाहलें यश महा, लोकीं खरे थोर ते ।
मागें तीन पदें दिलीं खर-रणीं, आश्चर्य वाटे मना ।
केलें कौशल वालिच्याहि निधनीं तें ठावकें या जना ॥१७॥

—परशुरामपंततात्या गोडबोलेकृत मराठी भाषांतर.

**तमापतन्तं संक्रुद्धं कृतास्त्रो रुधिराप्लुतम्।**
**अपासर्पद्द्वित्रिपदं किंचित्त्वरितविक्रमः ॥२३॥**

"संग्रामामध्यें आपल्या बाणांच्या योगानें रामानें खराला अगदीं विकल केलें होतें, तरी रक्ताच्या गंधानें तो मत्त होऊन पुनरपि रामावरच धांवला. तेव्हां रक्तानें भरून गेलेला तो क्रुद्ध राक्षस अंगावर चालून येत आहे असें पाहातांच सत्वर पराक्रम करणारा तो अस्त्रवेत्ता राम दोनतीन पावलें मागें सरला."

या वेळीं रामानें जो बाण मारला त्यानेंच तो राक्षस पतन पावला. रामानें तीन पावलें मागें घेतल्याची कथा याप्रमाणें आहे. मूळ कथा वाचूं लागलें असतां रामाकडे यांत दोष येत आहे किंवा काय असा संशयहि मनांत येत नाहीं. युद्ध करीत असतां पाठीं परतणें क्षत्रियाला दोषावह आहे हें खरें; तथापि येथें राम परत फिरला तो भीतीनें किंवा स्वसंरक्षणासाठीं नसून युद्धाचें काम चालू ठेवण्यासाठीं होय व हें त्याच्या पुढील पराक्रमावरून कळून येत आहे. राक्षस अंगावर चालून येत आहे असें पाहून बाण घेतां यावा म्हणून बहुधा तो थोडा मागें सरला असावा. कारण उभा असलेल्या जागीं राहून बाण मारावयाचा तर तो राक्षस अगदीं जवळ आला होता; तेव्हां युद्धाचे सोयीसाठीं त्याला हें सर्व करावें लागलें. मूळांत हें स्पष्ट लिहिलेलें नाहीं. आणि रामाच्या या कृतीविषयीं वाल्मीकि महर्षींना शंकाहि आली नाहीं, त्याचें हेंच कारण असावें. युद्धापासून पराङ्मुख न होणें हें क्षत्रियांचें वर्णविहितकर्तव्य, व म्हणून धर्मदृष्ट्या काय तो येथें आक्षेपकांचा आक्षेप आहे. नाहीं तर नुकत्याच झालेल्या महायुद्धांत "आमच्या सैन्यानें मोठ्या शिताफीनें माघार घेतली" अशा प्रकारच्या तारा आपण वर्तमानपत्रांतून काय थोड्या वाचल्या? पळतां भुई थोडी झाली तर त्यांतहि आपली शिताफी असल्याचा देखावा दाखविण्याची शिताफी महर्षींच्या काव्यांत नाहीं, हें मात्र निश्चित आहे; आणि त्यांच्या या सरळपणामुळें आक्षेपकांना आक्षेप घेण्यास वाव राहिला आहे. बाकी येथें राम भीतीनें पाठीं फिरला नसल्यामुळें कोणत्याहि दृष्टीनें त्यावर आक्षेप येण्यासारखा नाहीं.

आतां तिसरा आक्षेप वालिवधावरील होय. वालिवधाची कथा प्रसिद्ध आहे, व वालीचा वध रामानें आड राहून केला हा आक्षेपांतील मुद्दा आहे. वाली पतन पावल्यावर राम त्याचे दृष्टीला पडला तेव्हां त्यानें त्याबद्दल स्पष्ट बोलून दोष दिला. वालीनें रामावर दोन प्रकारें आक्षेप घेतला आहे. ( १ ) आडून वध करण्यांत अधर्म घडला. ( २ ) व स्वतांची स्त्री परत मिळविण्याचे कामीं सुग्रीवाचें साहाय्य मिळावें या हेतूनें हा प्रयत्न रामानें केला, तो हेतु त्याचे-पेक्षां वालीचें साहाय्य त्यानें मिळविलें असतें तर अधिक लवकर सफल झाला असता. अर्थात् सुग्रीवाचें साहाय्य मिळविण्यांत त्याचें धोरण चुकलें. रामानें वालीचें निंदात्मक भाषण ऐकल्यावर त्याला जें उत्तर दिलें तें प्रथम पाहून मग त्याविषयीं विचार करणें युक्त होईल. याकरितां तसें करूं. सुग्रीव हा वालीचा कनिष्ठ बंधु आणि सुग्रीवाची स्त्री रुमा शास्त्रदृष्ट्या त्याला स्नुषेप्रमाणें असलेली, तिचा अभिलाष वालीनें केला, व या अधर्माकरितां राजसत्ताधारी या नात्यानें त्याला आपण देहान्तदंड केला असें येथें रामाचें म्हणणें आहे. राम राज्या-पासून भ्रष्ट झालेला, तेव्हां त्याला हा अधिकार कसा प्राप्त झाला, अशी शंका कदाचित् येथें कोणी घेईल, तर तिचाहि परिहार रामानें येथें केला आहे. सर्व पृथ्वीवर सत्ता भरताची असून धर्मरक्षणार्थ त्यानें आपली त्याप्रमाणें आणखीहि कित्येक राजांची योजना केली आहे व धर्मवृद्धीसाठीं आपण पृथ्वीवर संचार करीत असतों आणि अधर्मानें वागणारांचा निग्रह करीत असतों, असें येथें रामाचें म्हणणें आहे. वालीचा वध करून धर्मशास्त्राची आज्ञा आपण पाळिली असें येथपर्यंत प्रतिपादन करून या कामीं आपण कसे निर्दोषी आहों, हें दाख-विण्याकरितां रामानें आणखी दोन कारणें दिलीं आहेत. ( १ ) सुग्रीवाशीं आपलें सख्य असून वालीचा वध करण्याचें आपण वानरांच्या समक्ष त्याला आश्वासन दिलें होतें; व त्याप्रमाणें त्याचा वध करून आपण आपलें वचन पुरें केलें आहे. ( २ ) धर्मवेत्ते राजर्षि मृगया करितात, अर्थात् ती निर्दोष आहे; व मृगया करणारे लोक मृगाचा आडूनहि वध करितात. तेव्हां वाली शाखा-मृगांपैकीं एक असल्यामुळें त्याचा आडूनहि वध करण्यांत दोष नाहीं. रामाचें

याप्रमाणें स्वकृतीचें समर्थन ऐकून वाली निरुत्तर होऊन स्तब्ध झाला व त्यानें पूर्वी आपण केलेल्या अप्रिय भाषणाबद्दल रामाची क्षमा मागितली.

आरोपीनें अपराध केल्याचें मान्य करून क्षमा मागितल्यावर त्याविषयीं विचार करण्याचें कारण राहात नाहीं व त्याचा उपयोगहि नसतो; तथापि हा नियम सर्वसामान्य असला तरी येथें लावितां येण्यासारखा नाहीं. कारण रामचरित्र हें बोलून चालून असामान्य आहे व तें आदर्श म्हणून लोकांपुढें असल्यामुळें अशा आक्षेपाविषयीं तत्त्वदृष्ट्या विचार करणें अवश्य आहे. रामाचें भाषण ऐकून वाली निरुत्तर झाला खरा; पण त्यानें केलेल्या भाषणांत वालीच्या आक्षेपाला उत्तर आहे कोठें ? त्याचा आक्षेप आडून वध केल्याबद्दल आहे व रामाचें उत्तर वालीनें भावजयींशीं संबंध ठेविल्याबद्दल त्याला आपण शासन केल्याविषयीं आहे. शासन करण्याचें कारण रामानें सांगितलें तें ठीक, पण शासन करावयाचें तें आडून कां, याचें कारण रामानें सांगितलें नाहीं; व तें सांगतां येण्यासारखेंहि नाहीं. आडून शासन करण्यांत राजाची दुर्बलता व्यक्त होत नाहीं काय ? बरें, आड राहून वध करण्याचें समर्थन करण्यासाठीं रामानें मृगयेचें प्रमाण दिलें आहे, तें तर विलक्षण आहे. मृगयेच्या पशूंमध्यें वालीची गणना करणें उघडउघड अयुक्त आहे. स्वतां रामानें सुग्रीवाचे राज्यांत आपलें अरण्यवासाचें व्रत भंगूं नये म्हणून प्रवेश केला नव्हता व त्यावरून त्यांची गणना त्याचे मतें मनुष्यवर्गांत होत होती, यांत संशय नाहीं. आणि याविषयीं सविस्तर विवरण आम्हीं वानरांविषयींच्या स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे. अर्थात् या वेळेपुरतें त्याला शाखामृग म्हणून रामाला आपल्या कृतीचें समर्थन करितां येणार नाहीं व केलें तरी तें त्याच्या स्वतांच्या कृतीमुळेंच अयुक्त ठरतें. दुसरें असें कीं, मृगया करणारे लोक मृगांचा आडूनहि वध करीत असले तरी त्याविषयीं धर्माधर्मविषयक चर्चा कोणत्या मृगानें त्या वेळेपर्यंत केली होती ? अशी चर्चा करणारा हा पहिलाच मृग रामाला भेटला व यांतच त्याचें विशिष्टत्व सिद्ध झालें. मृग हा भक्ष्य म्हणून मारावयाचा ठरल्यावर त्याला निदान हाक मारून तरी मारूं नये असें फार तर या वेळीं एखादें "जीवदयाप्रसारक मंडळ"

असतें तर त्यानें म्हणावयाचें. स्वतां मृग चर्चा करावयास कोठचा येणार? वाली तर स्वतांला मृग समजून बोलत नसून एक प्रतिपक्षी योद्धा या नात्यानें त्यानें रामाला स्पष्टपणें सांगितलें आहे कीं, "हे राजपुत्रा, समरांगणामध्यें माझ्या दृष्टीं पडून जर तूं माझ्याशीं युद्ध केलें असतेंस तर आज माझ्या हातून वध पावून तुला यमाचें दर्शन घेण्याची पाळी आली असती." (४।१७।४७) वालीच्या या आव्हानाचा स्वीकार करणें त्या वेळीं शक्य नव्हतें; कारण वाली पतन पावल्यावर त्यानें तें केलेलें आहे. सुग्रीवाकरितां रामानें त्याला प्रारंभीं युद्धाला बोलावून त्याशीं दोन हात केले असते तर मात्र आक्षेपाला अवकाश राहिला नसता. सुग्रीवाला दिलेल्या आश्वासनाप्रमाणें आपण आपलें वचन पुरें केलें असें जें रामाचें म्हणणें आहे तें तर या कामीं कारण म्हणून पुढें आणण्यासारखें नाहीं. सुग्रीवाचें साहाय्य आपणास मिळावें म्हणून रामानें त्याला आधीं साहाय्य करण्याचें वचन दिलें व त्याप्रमाणें त्यानें वालीचा वध केला, हें खरें; तथापि यांत आड राहून वालीचा वध करण्याचें वचन कोठें दिलेलें आहे? आणि तसें दिलें असें मानिलें तर तें देण्याचा आणखी एक दोष मात्र येऊं लागेल; सात तालवृक्षांचा एका बाणानें भेद करून रामानें आपल्या सामर्थ्याचा सुग्रीवाला प्रत्यय आणून दिला व तो आल्यावर त्यानें किष्किंधेंत जाऊन वालीला आव्हान केलें. सुग्रीवाला रामाचे सामर्थ्याचा प्रत्यय आला, यांतच त्यानें समोर राहून युद्ध करावें अशी सुग्रीवाची इच्छा व रामाची सिद्धता हीं व्यक्त होतात. नाहीं तर आड राहून बाण मारावयाची योजना केल्यावर सामर्थ्याचा प्रत्यय पाहाण्याचें आणि तो दाखविण्याचें प्रयोजन काय? सात तालांचा रामानें भेद करितांच सुग्रीवाला विश्वास वाटून तो तर म्हणतो—"हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, ज्यानें प्रचंड सात तालवृक्ष, पर्वत आणि भूमि हीं एका बाणानें विदीर्ण करून टाकिलीं, त्या तुझ्याशीं समरांगणामध्यें कोण बरें सामना करणारें आहे?" (४।१२।९) अर्थात् येथें समरांगणामध्यें समोर राहून रामानें युद्ध करावें अशी सुग्रीवाची इच्छा व्यक्त होते. आडून बाण मारिला तरी मारणाराचे अंगीं सामर्थ्य नसेल तर तो प्रतिपक्ष्याला स्पर्श करून पडेल व वैरांत अधिक भर मात्र पडेल. तेव्हां त्यांतहि सामर्थ्याची आवश्यकता आहे; आणि वालीशीं प्रथम युद्ध झालें

त्या वेळीं रामादि सर्व मंडळी झाडींत लपून राहिली असल्याचें लिहिलें आहे. तेव्हां आड राहून बाण मारण्याची ही योजना आधींपासून होती असें मानणें भाग आहे, हें खरें. परंतु सामर्थ्याचा प्रत्यय आल्यावर अशी दुर्बलाप्रमाणें योजना करावयाचें कारण तरी काय? बरें, रामानें कशाहि प्रकारें वालीचा वध करण्याचें आश्वासन सुग्रीवाला दिलें व आपलें वचन पुरें केलें असें मानिलें तरी वालीला त्याचा वध करण्यास हें कारण कसलें सांगावयाचें?

रामानें वालीला कितीहि कारणें सांगितलीं असलीं तरी त्याचें भाषण ऐकून तो जो निरुत्तर झाला, त्याचें कारण शोधावयाचें तर तें एक आहे व तें त्याचा सुग्रीवाचे स्त्रीशीं असलेला संबंध होय. या वेळीं त्याला प्राणांतिक वेदना होत होत्या व त्यामुळें त्याला सर्व पापकर्में डोळ्यांपुढें दिसूं लागलीं होतीं. रामानें त्याच्या पापकर्माचा त्याचेसमोर उच्चार करून त्यानिमित्त देहान्त दंड केल्याचें त्याला बजाविल्यामुळें त्याचे पश्चात्तापांत अधिक भर पडली. अशा मन:स्थितींत रामानें सांगितलेल्या इतर कारणांविषयीं त्यानें साधकबाधक चर्चा न करितां क्षमा मागितली, हें साहजिक आहे. रामानें हें एकच कारण सांगून तो स्तब्ध झाला असता तरी याकरितां चालण्यासारखें होतें. परस्परांना मारक अशीं एकामागून एक कारणें सांगून आपल्या भाषणांत त्यानें घोंटाळा मात्र करून ठेविला आहे. त्याला प्रथम त्याच्या पापानिमित्त दंड केल्याचें सांगितलें व लगेंच मृगया करणारे आड राहूनहि मृगांचा वध करितात, त्याप्रमाणें त्याला आपण आड राहून बाण मारिला, असें सांगितलें. या दोहोंचा मेळ कसा घालावयाचा? वालीची पशूंत गणना केल्यावर त्याला विवाहासंबंधाचें बंधन कसलें राहाणार? आणि मग त्याला स्नुषागमनानिमित्त दंड कसा करावयाचा? अनिर्बंध व्यवहार हाच पशूंचा धर्म व त्याप्रमाणें वाली वागला दुसरें काय? बरें, ज्या पापाकरितां वालीचा वध रामानें केला, त्यासारखें पाप पुढें सुग्रीवानें केलें, त्याचें रामानें काय शासन केलें? सुग्रीवाची स्त्री रुमा वालीनें उपटिली तर सुग्रीवानें वालीची स्त्री तारा त्याचेमागें उपटिली. कनिष्ठ बंधूची स्त्री या नात्यानें रुमा ही वालीची सून होते, तर वालीची स्त्री तारा ही सुग्रीवाला मातेच्या स्थानीं होते. हा संबंध जमण्याला वालीचे मृत्यूनंतर फार दिवसहि लागले नाहींत. वर्षाकालाचा प्रारंभ

होण्यापूर्वीं वाली मृत झाला व तो काळ संपून शरदृतूचे प्रारंभीं सुग्रीवाला आपल्या प्रतिज्ञेचें स्मरण देण्याकरितां मारुती त्याजकडे गेला, त्या वेळीं तो अहोरात्र तरुण स्त्रियांशीं विलास करण्यांत गुंग होऊन गेला होता, असें लिहिलें असून तेथेंच त्याला वालीची स्त्री तारा प्राप्त झाल्याचें सांगितलें आहे. (४। २९।४) हा व्यवहार गुप्तपणें चालला होता व त्याची वाच्यता झाल्यास चित्रांतील विश्वामित्राप्रमाणें सुग्रीवानें तोंडावर हात धरून तें झांकून टाकिलें असतें, असें नसून, तो सर्वांस माहीत होता. सुग्रीवाला रामाचा तीव्र संदेश पोंचविण्याकरितां लक्ष्मण त्याकडे गेला, त्या वेळीं सुग्रीवानें बोलण्यांत चतुर म्हणून तारेला त्याजकडे पाठविलें. या वेळीं तारा लक्ष्मणाशीं भाषण करितांना म्हणते, "हे शत्रुतापना लक्ष्मणा, रामाच्या प्रसादामुळेंच कीर्ति, रुमा, मी आणि अक्षय्य वानरराज्य हीं सुग्रीवाला इहलोकीं प्राप्त झालीं आहेत." (४।३५।५) येथें तारेनें सुग्रीवाशीं जडलेला आपला नवा संबंध निःशंकपणें सांगितलेला आहे व बोलतांना त्याची कारणपरंपरा रामाशीं नेऊन भिडविली आहे. वालीला अगम्यागमनाबद्दल देहान्त दंड करणाऱ्या रामानें सुग्रीवाची त्याच प्रकारचें पापकर्म तो करीत असल्याचें कळल्यावर उपेक्षा कां करावी? पतीचे मागें अन्य पुरुषाशीं संबंध जोडण्याचा प्रघात वानरांमध्यें असावा किंवा काय हें निश्चितपणें कळण्यास मार्ग नाहीं. वालीनें प्राणोत्क्रमणापूर्वीं जें सांत्वनपर भाषण केलें, त्यांत सुग्रीवाला तारा ही राजकारणांत वगैरे चतुर असून तिच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचा उपदेश केला आहे. त्यावरून हा संबंध त्यानें अनुमानिलेला दिसत नाहीं; पण हा संबंध वाली जिवंत असतांच जडला असावा, असा अंगदाच्या भाषणावरून संशय येतो. सीताशुद्ध्यर्थ गेलेले वानर तिचा शोध न लागल्यामुळें निराश होऊन प्रायोपवेशनार्थ बसले असतां अंगद इतर वानरांना उद्देशून म्हणतोः—

**स्थैर्यमात्ममनःशौचमानृशंस्यमथाऽऽर्जवम् ।**
**विक्रमश्चैव धैर्यं च सुग्रीवे नोपपद्यते ॥४।५५।२॥**
**भ्रातुर्ज्येष्ठस्य यो भार्यां जीवतो महिषीं प्रियाम् ।**
**धर्मेण मातरं यस्तु स्वीकरोति जुगुप्सितः ॥३॥**

"स्थैर्य, मनाची शुद्धता, अहिंसा, सरळपणा, पराक्रम व धैर्य हे गुण सुग्रीवाचे ठायीं असण्याचा संभव नाहीं. अहो, ज्येष्ठ भ्रात्याची प्रिय भार्या जी पट्टराणी असून धर्मदृष्ट्या त्याची माता होते तिशीं तो जिवंत असतां ज्या पापी पुरुषानें संबंध ठेविला (त्याचे ठायीं हे गुण कोठले असणार?)" अंगदानें उल्लेखिलेला हा संबंध वालीशीं सुग्रीवाचा कलह होऊन सुग्रीवानें किष्किंधेंतून पळ काढण्यापूर्वींचा असावा; कारण नंतरचा रामायणांत वर्णिलेला संबंध वाली जिवंत असतांचा नव्हे, हें सांगावयास नको. सुग्रीव व वाली यांमधील कलहाचें कारण रामायणांत सांगितलेलें आहे, तें पाहिलें तर त्यांमध्यें इतका द्वेषभाव उत्पन्न होण्यास तें पुरेसें आहे असें वाटत नाहीं. वाली हा कितीहि मानी व तापट असला तरी सुग्रीवानें पायां पडून क्षमा मागितल्यावरहि त्यानें त्याला क्षमा न करितां एका वस्त्रानिशीं हाकून लावावा, याचा उलगडा रामायणांतील कथेवरून होत नाहीं. अंगदानें उल्लेखिलेला हा संबंध वालीनें मनांत ठेवून सुग्रीवाला या निमित्तानें हाकून तर लाविला नसेल ना, असा येथें तर्क होतो. असो. अंगदाच्या वरील भाषणावरून त्याला स्वतांच्या मातेचें दुर्वर्तन पाहून मनांत खंती वाटत होती असें दिसतें. वालिवधानंतरच्या संबंधाविषयीं तो येथें कांहींच बोलत नाहीं व हा संबंध उघडपणें आणि सर्वांना विदित असल्यामुळें त्याविषयीं त्याला बोलण्याची आवश्यकता वाटत नसावी अशी येथें कल्पना करितां येण्यासारखी आहे आणि यासाठीं त्यावरून त्यांच्या समाजांतील प्रघाताविषयीं कांहींच अनुमान करितां येत नाहीं. कदाचित् वाली जिवंत असतां सुग्रीवानें केलेल्या पापकर्माचें महत्त्व अधिक व याकरितां त्याचा उल्लेख अंगदानें करून पुढील संबंध सर्वांना माहीत असल्यामुळें त्याचा उल्लेख केला नसल्याचा संभव आहे. कांहीं असलें तरी पापकर्म दडत नाहीं आणि धर्मशास्त्रांची मोठी उलथापालथ केली तरी पापाचा पुण्यांत समावेश करितां येत नाहीं. रामानें वालीला दंड केला व सुग्रीवाची उपेक्षा केली ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी उघड आहे. तेव्हां वालीवधाचें समर्थन करितांना रामानें पुढें आणिलेलीं सर्व कारणें निरुपयोगी आहेत; आणि अशा रीतीनें वालीवधाचें दंड या नात्यानें समर्थन न होतां त्यानें अडून बाण मारिला हा दोष त्यामुळें अधिक दृढ झाला आहे.

वालीनें आपल्या भाषणांत रामाला, आपल्याशीं सख्य जोडिलें असतें तर आपण सीतेला लवकर आणून दिली असती, असें सांगितलें आहे व तें वालीचे पराक्रमाकडे पाहिलें तर असंभवनीय वाटत नाहीं. तसें झालें असतें तर रामाला परिश्रम कमी पडून कार्य सत्वर झालें असतें; परंतु सुग्रीवाशीं तरी रामाचें सख्य कबंधाचे सांगण्यावरून राम त्याचे प्रदेशांत त्याचा शोध करीत आला तेव्हां झालें. रामाला दोघांचीहि माहिती त्यानें सांगितली व सुग्रीवाशीं सख्य करण्याची सूचना केली, त्याप्रमाणें रामानें केलें. यामुळें वालीशीं सख्य करण्याची कल्पना रामाचे मनांत येण्यास त्याला संधिच मिळाली नाहीं. तथापि अन्यदृष्टीनें विचार केल्यास झालेला इतिहासच युक्त झाला असें म्हणावें लागतें. "इतिहास कधीं फिरवितां येत नाहीं" किंवा "भवितव्यता बलीयसी" असें म्हटलें म्हणजे पुढील चर्चाच आटोपली; पण आम्ही तशा भावनेनें या इतिहासाची युक्तता दाखवीत नाहीं व त्या भावनेनें चर्चा करण्यास लेखणी हातीं धरिली नाहीं. झालेल्या इतिहासाची युक्तायुक्तता तत्त्वदृष्ट्या आम्हांला पहावयाची आहे. सुग्रीवाहून वाली बलिष्ठ व याकरितां रावणाचा पराभव त्यानें लवकर केला असता हें खरें; पण या कामीं आवश्यक असलेलें रामाचें वालीशीं सख्य व्हावें कसें ? सुग्रीवाची स्त्री वालीनें पळविल्यामुळें त्याला स्त्री नव्हती व त्याचे भीतीमुळें ऋष्यमूक पर्वताबाहेर त्याला पाऊल टाकितां येत नव्हतें; आणि अशा रीतीनें सुग्रीव समदुःखी होऊन त्याला कोणाचे तरी साहाय्याची अपेक्षा उत्पन्न झाल्यामुळें त्याशीं रामाचें सख्य होण्यास वेळ लागला नाहीं. रामाशीं सख्य करण्यास सुग्रीवाप्रमाणें वालीचें काय अडलें होतें ? कबंधानेंहि हा विचार करूनच रामाला सुग्रीवाचें नांव सुचविलें. सुग्रीवाला कोणाचे तरी साहाय्याची याप्रमाणें अपेक्षा असतां रामाला त्याची किती मनधरणी करावी लागली ! रामलक्ष्मणांला पाहिल्यावर सुग्रीवानें त्यांचा शोध करण्याकरितां त्यांजकडे मारुतीला पाठविलें. या वेळीं मारुतीला लक्ष्मणानें सर्व वृत्तांत सांगितला व शेवटीं सुग्रीवाचें साहाय्य मिळावें म्हणून तो म्हणतो "जो माझा गुरु धर्मात्मा राघव शरण जाण्यास पूर्वी योग्य होता तो आज सुग्रीवाला शरण गेला आहे. शोकग्रस्त झालेला राम अगदीं शोकाच्या अधीन होऊन जर शरण

आला आहे तर सुग्रीवानें आपल्या सेनानायकांसहवर्तमान त्याच्यावर कृपा करणेंच योग्य आहे." ( ४।४।२०;२४ ) मानी राम व तापट लक्ष्मण या दोघांनींहि याप्रमाणें भाषा योजिलेली ऐकूनहि मनाला विषाद वाटतो व ती वाचवत नाहीं. मग वालीचें साहाय्य त्याला कसें मिळवितां आलें असतें ? वालीचें साहाय्य मिळवून त्याजकडून रामानें सीता परत मिळविली असती तर तें कार्य लवकर झालें असतें, हें खरें; परंतु बलिष्ठ वाली जिवंत राहून रावणाची कार्यें त्यानें पुढें चालविलीं असतीं असें त्याचे पूर्वचरित्रावरून अनुमान होतें. तेव्हां सुग्रीवाचें साहाय्य मिळविण्याचे अपेक्षेनें रामाचे हातून वालीचा वध झाला हें जगाच्या कल्याणाचे दृष्टीनें एकंदरींत युक्तच झालें. आड राहून बाण मारण्याविषयीं चर्चाहि रामानें त्या वेळीं स्वतांच्या कृतीचें समर्थन करण्याकरितां केली असल्यामुळें येथें करावी लागली. नाहीं तर ती करण्याचेंहि कारण नव्हतें; आणि वाली दुष्ट व पापकर्म करणारा याकरितां तो कोणत्याहि रीतीनें एकदां जगांतून गेला व त्याला रामबाण कारण झाला एवढी एकच गोष्ट रामाच्या या कृतींत समर्थनीय आहे.

रावणवधानंतर सीतेनें जें दिव्य केलें त्या वेळीं असाच एक अनुचित प्रकार रामचरित्रांत घडला आहे. सीता पुढें आल्यावर तिला उद्देशून रामानें जें भाषण केलें त्यांत त्यानें परगृहीं फार दिवस राहिल्यामुळें आपण तिचा स्वीकार करणार नाहीं, असें सांगितलें आहे. सीतेच्या पावित्र्याविषयीं वास्तविक रामाला पूर्ण विश्वास होता व पूर्वीचें भाषण त्यानें केवळ अपकीर्तिनिवारणार्थ केलें हें सर्वप्रसिद्ध आहे व तसें मागाहून रामानें बोलून दाखविलेंहि आहे. (६।११८।१६ ) या प्रसंगीं रामानें जें प्रथम भाषण केलें त्यांत सीतेला शेवटीं राम म्हणतो " हे भद्रे, मनाचा निश्चय करून तुला ही गोष्ट मीं सांगितली आहे. आतां तुझी इच्छा असल्यास लक्ष्मणापाशीं अथवा भरतापाशीं—जेथें तुला बरें वाटेल तेथें राहा. अथवा हे सीते, शत्रुघ्न, सुग्रीव अथवा राक्षस बिभीषण यांपैकीं कोणाजवळ किंवा तुला जेथें सुख वाटेल तेथें तूं राहा." ( ६।११५।२२–२३ ) सीतेशीं केलेलें हें भाषण त्यानें स्वतांविषयीं लोकांत अपकीर्ति होऊं नये एवढ्याकरितां केलेलें अर्थात् औपचारिक होतें; आणि हें खरोखरचें मानिलें तरी

त्याचा वरीलप्रमाणें उपसंहार करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. सीतेला तीव्र संताप येऊन तिनें अग्निशुद्ध व्हावें अशी रामाची इच्छा होती, असें मानिलें तरी तसा संताप तिच्यासारख्या मानी स्त्रीच्या ठायीं उत्पन्न करण्यास रामाचे पहिले वाक्प्रहार कांहीं असमर्थ नव्हते. सीतेला वाटेल तिकडे जा असें सांगतांना रामानें आपण होऊन लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, सुग्रीव व बिभीषण यांचीं नांवें सुचविलीं. हा प्रकार एकंदरींत अनुचित झाला. एक तर त्यांचीं नांवें सांगण्याची येथें आवश्यकता नव्हती; आणि दुसरें असें कीं, तीं सांगण्यामुळें त्यांचे चारित्र्यावर निष्कारण शिंतोडा उडविला गेला. सुग्रीवाचें चरित्र फार तर या कामीं अनुकूल म्हणतां येईल; पण बिभीषणाविषयीं असें कां म्हणावें? त्याचें चरित्र परिचित नव्हतें असें मानिलें तरी अपरिचिताविषयीं अनुचित विधान तरी एकदम कसें करावें? स्वतांच्या तीनहि बंधूंचीं निर्मल चरित्रें तर रामाचे दृष्टीपुढें होतीं. लक्ष्मण तर त्याला अत्यंत जिव्हाळ्याचा आणि परस्त्रीकडे अवलोकनहि करावयाचें नाहीं अशा निर्मल अंतःकरणाचा. मग त्याविषयीं रामानें असें विधान कसें करावें? रामानें येथें त्यांना कोणताहि दोष दिला नाहीं हें खरें; तथापि असें बोलण्यांत ती यांपैकीं कोणाशीं रहावयास गेली तर तो तिला आपल्यापाशीं ठेवून घेईल, असा जो ध्वनि निघत आहे तोच त्यांवरील दोषारोप होय आणि हा कारणावांचून रामानें केलेला आहे. यांतील तिघे तर हें भाषण चालू असतां तें तेथें ऐकत उभे होते. त्यांना हें ऐकून हा आरोप लक्षांत आल्यावांचून कसा राहील? आणि लक्षांत आल्यावर मनाला उद्वेग कां वाटणार नाहीं? श्रोत्याला न दुखवितां बोलण्याचा जो रामाचा निरंतरचा बाणा त्याला येथील भाषणानें विरोध येत आहे आणि रामाचे इष्ट कार्याचे दृष्टीनें त्याची तादृश आवश्यकता दिसत नाहीं.

## उपसंहार.

रामचरित्रांतील दोष, हातीं घेतलेल्या विवेचनांत अपूर्णता राहूं नये, याकरितां दाखविले आहेत; नाहीं तर ते त्याच्या गुणसमुच्चयामध्यें सहज विरून जाऊन अदृश्य होणारे आहेत. पित्याला वचनांतून मुक्त करण्याकरितां त्यानें राज्याचा त्याग करण्यांत दाखविलेला स्वार्थत्याग व लोककंटक रावणाचा निः-

पात करून संपादिलेली निर्मल कीर्ति हीं लोकांपुढें अक्षय्य उजळत राहाणारीं असून यांपुढें प्रेक्षकांचे नेत्र दिपून जाऊन त्यांना असले दोष दिसणारहि नाहींत. पौर्णिमेच्या विशाल चंद्रबिंबांत कलंक मधूनमधून दिसत असला, तरी त्याचे प्रकाशांत त्यामुळें थोडीच न्यूनता भासणार आहे? चंद्रिकेकडे पाहून कोणाचेंहि मन आनंदित होईल आणि त्या आनंदांत चंद्रावरील कलंकामुळें कांहीं उणीव भासणार नाहीं तेव्हां दुर्बीण घेऊन चंद्रावरील कलंक शोधीत राहाण्यापेक्षां चकोर होऊन चंद्रिका लुटीत राहाणें अधिक बरें नव्हे काय ? समुद्राची विशालता पाहावी, त्यानें पृथ्वीभोंवतीं कसें वेष्टण केलें आहे, त्याचें कौतुक करावें ! आणि देशोदेशीं होणारे विविध पदार्थ सर्वांना यथेच्छ पोंचविण्याचें कार्य तो अखंड करीत असल्याचें पाहून त्याला धन्यवाद द्यावा, हें युक्त होय; त्याचें उदक तोंडांत घालून त्याची रुचि पाहाण्यांत लाभ कोणता ? आपलें तोंड मात्र खारट व्हावयाचें. रामचरित्राकडे याच न्यायानें आपण पाहावयाचें आहे. त्याचा स्वार्थत्याग आपण डोळ्यांपुढें निरंतर ठेवावा; तो एका सार्वभौम राजाचा पुत्र असतां त्याची राहाणी किती साधी असे इकडे लक्ष द्यावें; लहान असतांहि विश्वामित्रांबरोबर यज्ञसंरक्षणाकरितां जाण्यांत त्यानें जी कर्तव्यपरायणता दाखविली तिचा आदर्श आपल्यापुढें ठेवावा; जनकाकडील धनुष्य मोठमोठ्या वीरांना सज्ज करितां आलें नाहीं, हें कळलें असूनहि तें सज्ज करण्याचा यत्न करण्यांत त्याचें जें धाडस दिसून येतें त्याची आठवण ठेवावी; राज्याभिषेकसमयीं वनवासाचा प्रसंग आला असतां सत्याकरितां तो पत्करिण्यांत त्याचें धैर्य, कर्तव्यनिष्ठा व स्थितप्रज्ञता वगैरे जे गुण व्यक्त होतात, त्यांचें चिंतन करावें; कुटुंबांतील व्यक्तींशीं व समाजाशीं वागतांना त्यानें जें धोरण ठेविलें त्याचें अनुकरण करावें; सीताहरणानंतर ती परत मिळण्याची आशा नसतां तिचा शोध काढून परत मिळविण्याचे कामीं त्यानें न थांबतां कार्यसिद्धीपर्यंत जे नेटाचे व अपूर्व प्रयत्न केले त्यांकडे कोणत्याहि कार्याला लागतांना पहावें, हेंच एकंदरींत युक्त होय. सीताहरणानंतर रामानें केलेल्या विलापाचें अनुकरण करण्यास कौशल्याची अपेक्षा नसते. तें कार्य पुढें आदर्श नसला तरी कोणालाहि करितां येतें. रामाच्या चरित्राचें रहस्य

त्याचे गुणसमुच्चयांत आहे. राम या नांवाला महत्त्व त्याच्या चरित्रानें आलें आहे. त्याचे पूर्वीं व त्याचे मागें राम या नांवाच्या व्यक्ति अनेक होऊन गेल्या. जामदग्न्य राम तर प्रसिद्ध आहे. ऐतरेय ब्राह्मणांत राम नामक एका ऋषीचा उल्लेख आहे; आणि असें, त्या कालीं प्रसिद्ध असलेल्या नांवांतीलच एक नांव दशरथानें आपल्या पुत्राला ठेविलें. * पण तीं सर्व नांवें त्या व्यक्तींबरोबर लुप्त होऊन गेलीं आणि आतां त्यांची माहिती मिळविण्याला कांहीं साधन राहिलें नाहीं. दाशरथि रामानिमित्त त्यांचा शोध तरी आम्हांला करावा असें वाटलें. तेव्हां त्याच्या चरित्राचें हें महत्त्व जाणून या गुणदोषविवेचनांतील दोषांसंबंधीचें विवेचन ते टाळण्यापुरतें वाचावें, अशी वाचकांस विनंति आहे. गुणविषयक विवेचनांत काय तो राम आहे, हें लक्षांत ठेवावें.

## २ लक्ष्मण,–रामाचा सहचर.

रामायणांतील सहा कांडांत किंबहुना मुख्य रामचरित्रांत राम व लक्ष्मण या जोडीनें सर्व काम केलें आहे व यामुळें रामाच्या गुणदोषविवेचनांत लक्ष्मणाचा उल्लेख वारंवार आलेला आहे. त्याचे गुणदोषांविषयीं तेथें अप्रस्तुत म्हणून विवेचन केलें नसलें तरी तें अंशतः होऊन गेलें आहे, हें सांगावयास नको. तो लहानपणापासून रामाशीं प्रेमानें वागत असे. "आपल्या शरीराची पर्वा न करितां रामाला प्रिय असलेली हवी ती गोष्ट तो वैभवशाली लक्ष्मण करीत असल्यामुळें तो त्या रामाचा बहिश्चर प्राण होऊन राहिला होता. त्या लक्ष्मणावांचून त्या पुरुषश्रेष्ठ रामाला निद्रा येत नसे व समीप आणिलेलें मिष्टान्नहि तो त्यावांचून भक्षण करीत नसे." ( १।१८।२९–३० ) रामावरील या प्रेमास अनुसरून तो कांहीं कारण नसतां रामाबरोबर वनवासार्थ गेला. वनांत गेल्यावर एका झाडाखालीं पहिला मुक्काम पडला असतां राम लक्ष्मणाला तेथूनच परत जाण्याविषयीं सांगूं लागला. या प्रसंगीं त्याचें सांगणें नाकारतांना लक्ष्मण म्हणतो,

---

* रामाचें लोकांमध्यें रामचंद्र असें नांव प्रसिद्ध आहे; परंतु संबंध रामायणांत या नांवाचा प्रयोग कोठें आढळत नाहीं. त्याला चंद्राची उपमा पुष्कळ वेळां दिलेली आढळते. एके स्थळीं मात्र "रामचंद्रमसम्" असा प्रयोग आहे; तेथेंहि उपमान म्हणूनच चंद्राचा प्रयोग केलेला आहे. उपमानोपमेयांचा बहुधा एकजीव होऊन हें नांव लोकांत रूढ झालें असावें.

" हे राघवा, उदकांतून बाहेर काढिलेले मत्स्य ज्याप्रमाणें जिवंत राहणें अशक्य आहे, त्याप्रमाणें तुझा वियोग झाला असतां सीतेला अथवा मला जिवंत राहणें अशक्य आहे. " [ २।५३।३१ ] येथें सीतेचें उदाहरण देऊन आपला निश्चय त्यानें रामाला सुचविला आहे आणि शेवटपर्यंत त्यानें तो तडीस नेला आहे. रामावरील लक्ष्मणाचें प्रेम अकृत्रिम होतें व वयानें त्याचे बरोबरीचा असतां आपल्या कनिष्ठपणाचा अधिकार जाणून तो वागत होता. राम मृगयेला गेला असतां त्याचे मागून त्याच्या रक्षणाकरितां लक्ष्मण धनुर्बाण घेऊन जात असे. [ १।१८-३१ ] व त्याच्या या नित्यक्रमास अनुसरून तो विश्वामित्राबरोबर यज्ञरक्षणार्थ गेला. वनवासाला निघतेवेळीं भरत व शत्रुघ्न तेथें नव्हते, परंतु विश्वामित्र आल्यावेळीं चारी राजपुत्र तेथें असतां हे दोघे मात्र त्याबरोबर गेले, यावरून लक्ष्मणाचें रामाशीं अखंड साहचर्य व्यक्त होतें.

## रामाला साहाय्य.

लक्ष्मणाला वनांत पाठविण्याची कैकेयीची अट नव्हती व तशी अट घालण्याचें तिला प्रयोजन नव्हतें. अशा स्थितींत तो रामाबरोबर अरण्यवासव्रत पत्करून गेला. सीतेप्रमाणें लक्ष्मणालाहि रामानें आपल्याबरोबर अरण्यांत येण्यास संमति दिली नव्हती; तथापि मागाहून दिली आणि खरोखर रामाबरोबर सीता यावयाची म्हटली म्हणजे लक्ष्मणासारखा जोडीदार बरोबर घेण्याची त्याला आवश्यकताच होती. राम एकटाच जावयाचा असता तर भाग वेगळा. प्रारंभीं सीता बरोबर होती म्हणून तिच्या संरक्षणाचे कामीं व पुढें तिचा अपहार रावणानें केल्यावर तिचा शोध करून परत आणण्याचे कामीं रामाला त्याचा उपयोग होऊन त्याला बरोबर आणल्याचें सार्थक झालें. तमसातीरीं पहिला मुक्काम पडला असतां सीतेच्या संरक्षणाकरितां कोणाला तरी बरोबर घेण्याची आवश्यकता होती, असें रामानेंहि बोलून दाखविलें आहे. तो लक्ष्मणाला म्हणाला, " हे पुरुषश्रेष्ठा, माझ्यामागून येऊन तूं एक कामच केलें आहेस. नाहीं तर सीतेच्या रक्षणाकरितां कोणाचें तरी साहाय्य घेणें भाग होतें." (२।४६।९) अरण्यांत येऊन आपण काय करणार हें लक्ष्मणानें रामाला निघते वेळींच सांगितलें आहे. तो म्हणाला, " प्रत्यंचेसह धनुष्य धारण करून आणि कुदळ

व परडी बरोबर घेऊन मी तुम्हांला मार्ग दाखविण्याकरितां तुमच्यापुढें जाणार. वनांतील मुळें, फळें व तपस्व्यांना होमकर्माकरितां लागणारे पदार्थ तुम्हांला नित्य आणून देत जाईन. तुम्ही पर्वतावर सीतेसहवर्तमान आनंदानें क्रीडा करीत जा. तुम्ही जागे असतां व निजल्यावरहि सर्व कांहीं मी करीन." (२।३१।२५,२७) लक्ष्मणानें आरंभीं याप्रमाणें काय काय करणार तें सांगितलें व तो त्याप्रमाणें शेवटपर्यंत वागत राहिला. अरण्यांत मार्गक्रमण करीत असतां प्रारंभीं सीता पुढें जाऊन तिचेमागून लक्ष्मण व राम अनुक्रमें जात असत व परस्परांचें रक्षण परस्परांना करितां यावें, याकरितां रामानें अशी योजना लक्ष्मणाला सांगितली होती. ( २।५२।९४–९६ ) चित्रकूट सोडून पुढें गेल्यावर मात्र हा क्रम बदलला. सीता पुढें चालली, यामुळें तिला विराध राक्षसानें एकदम पकडिलें; व तेव्हांपासून प्रथम राम, त्याचेमागें सीता व तिचे मागें लक्ष्मण अशा क्रमानें तीं जाऊं लागलीं. ( ३।११।१ ) येथील क्रमाचें तादृश महत्त्व नाहीं. सीता बरोबर असल्यामुळें तिच्या संरक्षणाकरितां रामाला लक्ष्मणाची अपेक्षा होती, हें आम्हांला येथें दाखवावयाचें आहे व त्याकरितां हा क्रम सांगितला आहे. खरादिकांशीं रामाचें युद्ध झालें, त्या वेळीं लक्ष्मण सीतेला घेऊन एका गुहेंत जाऊन बसला होता व मायामृगाचे शोधार्थ राम गेला त्या वेळीं पर्णशालेंत सीतेच्या रक्षणासाठीं रामानें लक्ष्मणाला राहाण्याची आज्ञा केली होती. सीतेनें त्याला फार दुरुत्तरें करून रामाकडे पाठविल्यामुळें निरुपाय होऊन तो बाहेर निघून गेला. अशा रीतीनें यदृच्छया लक्ष्मणाचें साहाय्य सुटलें व रावणाला सीतेचा अपहार करितां आला. राक्षसांचें तेथें असलेलें प्राबल्य व आपणावरील त्यांचा रोष लक्षांत आणून आणि कित्येक दुश्चिन्हें पाहून लक्ष्मणानें निघते वेळीं सीतेविषयीं हें भविष्य बोलूनच ठेविलें होतें, ( ३।४६।३५ ) तें तंतोतंत खरें ठरलें.

अरण्यामध्यें लक्ष्मण रामाची सर्व प्रकारें सेवा करीत असे. यमुनानदीवरून पलीकडे जातांना तेथें उतार नसल्यामुळें लक्ष्मणानें वृक्षाच्या फांद्या आणून व त्या बांधून एक तर केली व त्यावरून तीं पलीकडे गेलीं. चित्रकूटावरील पर्णशाला तर लक्ष्मणानें स्वतां बांधिली. पंचवटींतील पर्णशालाहि त्यानें बांधिली

असून ती बरीच मोठी असावी, असें वाटतें. अरण्यांतील फळें, कंद वगैरे तो आणून देत असे आणि होमकर्माकरितां लागणाऱ्या साहित्याची सिद्धता तोच करीत असे. चित्रकूटावरील आश्रमापासून उदक दूर असल्यामुळें अवेळीं उदक आणावें लागल्यास मार्ग लक्षांत यावा म्हणून मार्गांतील झाडांवर खुणेकरितां लक्ष्मणानें मधूनमधून वल्कलें बांधून ठेविलीं होतीं. ( २।९९।१० ) यावरून त्याचा व्यवस्थितपणा व्यक्त दिसून येतो.

लक्ष्मणानें याप्रमाणें अरण्यांत असतां रामाची उत्तम प्रकारें सेवा केली; पण यापेक्षांहि त्यानें रामाला प्रसंगीं बोध केला, त्याचें महत्त्व अधिक आहे. सीता आश्रमांत दिसत नाहीं व कोणीं तिचा अपहार केला हें कळत नाहीं, असें पाहून राम क्रुद्ध होऊन त्रैलोक्य दग्ध करण्यास उद्युक्त झाला असतां लक्ष्मण हात जोडून त्याचें सांत्वन करीत म्हणतो, "एकाच्या अपराधाकरितां सर्व लोकांचा नाश करणें आपणांस उचित नाहीं. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हें प्राप्त झालेलें दुःख जर तूं सहन करणार नाहींस तर कमी धैर्य असलेला कोणता बरें सामान्य पुरुष तें सहन करील ? हे पुरुषश्रेष्ठा, तूं धीर धर. हे राजा, कोणत्या प्राण्यावर संकटें येऊन तीं त्याला अग्नीप्रमाणें चटका लावीत नाहींत ?—आणि क्षणामध्यें नष्ट होऊन जात नाहींत ? हा जगताचा स्वभाव आहे. हे पुरुषश्रेष्ठा, प्राणी मोठे असले तरी ते अथवा देवही दैवाच्या कचाट्यांतून सुटत नाहींत, मग सामान्य देहधारी प्राण्याची गोष्ट कशाला ? हे रामा, नेहमीं सर्व गोष्टींकडे लक्ष पुरविणारे आणि कधींहि मुद्रा खिन्न न करणारे पुरुष मोठमोठीं संकटें आलीं तरी दुःख करीत बसत नाहींत." ( ३।६६।५,६,११,१४ ) यानंतर पंपातीरीं आल्यावर सीतेच्या शोधाविषयीं निराश होऊन रामानें हातपाय पुनः गाळले, तेव्हां त्याला लक्ष्मण म्हणतो "हे रामा, शोक आंवरून धर. हे पुरुषोत्तमा, दैव तुझें बरें करो. तूं शोक करूं नकोस. तुझ्यासारख्या निर्मल मनाच्या पुरुषाची मति अशी कधीं गुंग होत नाहीं. प्रिय वस्तूसंबंधानें वियोगजन्य दुःख अवश्य ठेविलेलें आहे हें लक्षांत आणून प्रिय जनाचे ठिकाणीं असलेलें प्रेम तूं आतां सोडून दे. कारण अतिस्नेहाचा संबंध झाल्यामुळें ओलीहि वात जळूं लागते." (४।१।१६,१७)

लक्ष्मणाचा हा उपदेश अमूल्य असून त्याचे भाषणांतील शेवटचें उत्तर तर सर्व संसारी जनांनीं हृत्पटलावर निरंतर कोरून ठेवण्यासारखें आहे; कारण संसारांतील आपत्तीचें मूळ त्यांत व्यक्त केलें आहे.

लक्ष्मणानें केलेल्या शुश्रूषेपेक्षां प्रसंगीं धीर देऊन सांत्वन करण्याचें जें साहाय्य तो करीत असे त्याचें महत्त्व अधिक होतें व याची जाणीव राम व सीता या दोघांनाहि होती. लक्ष्मण मूर्च्छित होऊन पडला असतां रामाला स्मरण होऊन तो म्हणतो "( हे लक्ष्मणा ) अरे ऊठ, आणि माझ्याकडे पाहा. असा कां निजला आहेस? मज दीनाकडे एकदां अवलोकन कर. हे पराक्रमी लक्ष्मणा, पर्वताचे ठिकाणीं मी शोकानें आर्त व व्याकुल होऊन मला भान राहिलें नसतां तूंच मला धीर देत होतास." (६।१०१।२१) तसेंच सीतेनें मारुतीपाशीं रामादिकांना आपणाकडून जे संदेश सांगितले त्यांत लक्ष्मणाच्या या थोर वागणुकीविषयीं तिनें गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. तिनें त्याला राजा दशरथाची उपमा दिली असून तो बरोबर असल्यामुळें रामाला आपल्या पित्याचें स्मरण होत नाहीं असें सांगितलें आहे. (५।३८।५९-६१) लक्ष्मणाला येथें त्याचे पित्याची उपमा देऊन प्रसंगीं रामाला योग्य उपदेश करण्याचा प्रघात तिनें व्यक्त केला आहे. लक्ष्मण व सीता हीं दोनहि रामाबरोबर वनांत आलीं खरीं; तथापि धर्मपत्नी या नात्यानें सीतेनें त्याजबरोबर येणें हें तिचें कर्तव्य होतें; परंतु कनिष्ठ बंधु म्हणून लक्ष्मणानें त्याजबरोबर वनवास पत्करण्याचें वास्तविक कोणत्याहि दृष्टीनें प्रयोजन नव्हतें. रामाचा जिवलग स्नेही या नात्यानें तो वनांत गेला व या नात्याची कामगिरी त्यानें उत्तम प्रकारें केली. नित्य साहचर्यामुळें लक्ष्मणाचें त्याजवर अत्यंत प्रेम होतें, तथापि तें आपत्कालीं टिकलें हें विशेष आहे. प्रारंभींप्रारंभीं रामानें त्याला परत जाण्याविषयीं पुष्कळ आग्रह करून पाहिला. कदाचित् हा परीक्षा पाहाण्याचा प्रयत्न असेल. परंतु त्याचा निश्चय फिरला नाहीं. उपहारगृहांतून सांप्रत शंकरपाळ्याच्या साक्षीनें पुष्कळ स्नेहबंधनाचे विधि होत असतात. पण तो स्नेहबंध साक्षीदार उठतांच तुटतो; यामुळें खऱ्या स्नेहाची कल्पना आपणांला यावयाची नाहीं. खरी मैत्री आपत्कालींहि टिकते व श्रेयस्कर मार्गानें नेणें व भूल पडल्यास सावरून घेणें

हें खऱ्या मित्राचें काम आहे. खरा मित्र या नात्यानें लक्ष्मणाचें चरित्र आदर्शभूत व अभिनंदनीय आहे, असें कोण म्हणणार नाहीं?

## गुणसंग्रह.

लक्ष्मणाच्या स्वभावाचा विशेष सांगावयाचा म्हणजे तो जास्त तापट होता, पण रामाच्या साहचर्यामुळें व त्याच्या आज्ञेंत राहावयाचें त्याचें व्रत असल्यामुळें त्याचे हातून अविचारीपणाची कृति घडली नाहीं. रामाला वनवासाला पाठविण्यांत राजाकडून अन्याय होत आहे असें कळतांच त्यानें रामाला राजाला एकदम अडकवून टाकून गादी बळकाविण्याची सूचना केली. या वेळीं रामानें खरा वृत्तांत साग्र सांगून त्याची समजूत घातली, तेव्हां तो जरा शांत झाला. सुग्रीवाकडे रामाचा तीव्र संदेश कळविण्याकरितां तो गेला असतां त्याचे धनुष्याचे टणत्काराचे योगानें सर्व वानर भिऊन गेले होते; परंतु तारेनें पुढें येऊन त्याची क्षमा मागतांच त्यानें आपला क्रोध आंवरला. सीतेनें ज्या वेळीं त्याला रामाचे संरक्षणाकरितां जाण्यास सांगितलें त्या वेळीं त्यानें ती राक्षसांची माया असल्याचें तिला सांगितलें व तो जात नाहीं असें पाहून ती त्याला फार कठोर बोलली. या प्रसंगीं तिचे रक्षणार्थ आश्रमांत राहण्याची रामाची आज्ञा व सीतेची त्याविरुद्ध आज्ञा अशा कचाट्यांत तो सांपडला. शेवटीं निरुपाय होऊन त्यानें तिचा धिक्कार केला व तो अरण्यांत निघून गेला. येथें त्यानें केलेल्या भाषणांत सर्वत्र रामाविषयींची त्याची निर्मळ श्रद्धा दिसून येते. येथें सीतेनें त्यावर कित्येक अन्यथा आरोप केले, हें खरें; तथापि तो स्वभावतः तापट, यामुळें पुढील संकटाविषयीं अनुमान करून तो आश्रमांतून बाहेर पडून जवळच राहिला असतां तरी चाललें असतें, तरी त्यानें तसें केलें नाहीं. सीतेच्या भाषणाचा सर्व वृत्तांत कळल्यावरहि रामानें त्याला जो दोष दिला, त्याचें कारण हें होय; परंतु या सर्व प्रकरणांत भवितव्यतेचे बलवत्तरतेवांचून दुसरें समाधान नाहीं. सुवर्णमृग पाहून त्याला धरण्याकरितां राम जात आहे, असें कळतांच लक्ष्मणानें हा मृग खरा नसून ती राक्षसी माया असल्याविषयीं आपल्याला संशय येत असल्याचें रामाला विदित केलें; तथापि रामाला त्याचे मागें जाण्याचा मोह कां व्हावा? राम आणि

लक्ष्मण या दोघांना बाहेर काढण्याची रावणानें केलेली योजना सफल व्हावी व त्यांना संशय येऊनहि त्यांची योजना निष्फल व्हावी, हा दैवयोग, दुसरें काय?

मायामृग ओळखण्यांत लक्ष्मणाचा जो धोरणी स्वभाव दिसून येतो, तो येथें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. भरत रामाला परत आणण्याकरितां अरण्यांत येत असतां लक्ष्मणानें त्याविषयीं संशय प्रदर्शित केला व येथील त्याचें धोरण चुकलें; तथापि हें त्याचें धोरण चुकलें नसून भरताचें वर्तनच अपूर्व होतें. कारण भरद्वाज-मुनींनाहि त्याविषयीं तसा संशय आला होता. तेव्हां त्या कामीं लक्ष्मणाकडे कांहीं दोष येत नाहीं. लोकापवादाचे भीतीनें रामानें सीतेचा त्याग केला, त्या वेळीं अरण्यांत तिला पोंचविण्यास लक्ष्मण तिजबरोबर गेला होता. तो परत आल्यावर त्यानें वाड्यांत प्रवेश केला आणि रामाची भेट घेतली. तो या वेळीं रामाकडे पाहतो तों तो दीन होऊन सिंहासनावर बसला आहे व नेत्रांतून अश्रुप्रवाह चालला आहे, असें त्याला दिसून आलें. रामाच्या हृदयांत या वेळीं काय कालवाकालव चालली होती, याची कल्पना करण्यास मोठ्या तर्काची अपेक्षा होती, असें नाहीं. सीता निर्दोष असल्याचें मनाला पटलें असून लोका-पवादाचे भीतीनें व ती गर्भिणी असतां तिचा त्याग करण्याचें धाडस त्यानें केलें; किंबहुना त्याला करावें लागलें. तथापि या प्रसंगीं शोक करणें उचित नव्हतें, हें उघड आहे. कारण तिकडे तिचा त्याग लोकापवादाचे भीतीनें करावयाचा आणि इकडे आपण शोक करावयाचा; म्हणजे पूर्वीचे अपवादांत ही नवी भर मात्र पडावयाची, दुसरें काय? रामाला शोक करितांना लोकांनीं पाहिलें असतें तर सीतेवर दोषारोप करण्यास कमी केलें असतें काय? "स्वतां राजाला शुद्धा-शुद्धता पाहाण्याची तादृश अपेक्षा नसून, तिचा त्याग करण्याचें हें ढोंग लोकां-करितां त्यानें केलें आहे," असें लोकांनीं म्हटलें असतें व "मनांतून जर तिजवर इतकें प्रेम आहे व तिचे विरहास्तव शोक करण्याची पाळी आली आहे, तर तिचा त्याग तरी कशाला केला?" असा उलट रामाला दोष दिला असता. हें सर्व लक्ष्मणाच्या लक्षांत आलें व तो रामाचें सांत्वन करीत म्हणतो, "हे पुरुषश्रेष्ठा, तूं शोक करूं नको. अशी ही कालाची गति आहे. तुझ्या-सारखे बुद्धिमान् व विचारी पुरुष शोक करीत राहात नाहींत. सर्व संचय

नश्वर आहेत; उन्नतीचा शेवट पतनांत, संयोगाचा वियोगांत व जीविताचा मरणांत व्हावयाचा, हें ठरलेलें आहे. याकरितां पुत्र, स्त्रिया, मित्र व संपत्ति यांचे ठायीं फार आसक्ति कधीं ठेवूं नये. कारण ( आज ना उद्यां ) त्यांचा वियोग व्हावयाचा, हें निश्चित आहे....तुझ्यासारखे पुरुषश्रेष्ठ अशा प्रसंगीं कधीं गोंधळून जात नाहींत; परंतु तूं जर शोक करूं लागलास, तर खरोखर तुझी निंदा मात्र होईल." ( ७।५२।१०,१२;१४ ) येथील लक्ष्मणाचें धोरण व रामाचें चरित्र निष्कलंक राहाण्याविषयीं त्याची दक्षता हीं वाखाणण्यासारखीं आहेत, हें सांगावयास नको. लक्ष्मणाच्या गुणांचें वर्णन सीतेनें मारुतीशीं अशोकवनिकेंत भाषण करितांनां पुढीलप्रमाणें केलें आहे. "तो वैभवशाली लक्ष्मण वृद्धांची सेवा करणारा असून समर्थ (परंतु) मितभाषी आहे. तो स्वभावानें सौम्य असून पवित्र आचरणाचा आहे; व सर्व कार्यांत दक्ष असून रामाला प्रिय आहे." ( ५।३८।५९–६२ ) लक्ष्मणाविषयीं भलती शंका घेऊन त्याला दुरुत्तरें केल्याचा परिणाम सीतेला या वेळीं भोगावा लागत होता व यासाठीं तिला अनुभूत झालेल्या गुणांचा तिनें येथें प्रांजलपणें निर्देश केला आहे. त्याचा मृदुस्वभाव, पवित्र आचरण, व मितभाषा या गुणांचे येथील निर्देश महत्त्वाचे आहेत. कारण याच बाबींविषयीं तिनें त्यावर आक्षेप घेतले होते. पुढें तर लक्ष्मण आपल्याशीं मातेप्रमाणें वागत असल्याचें स्पष्ट सांगून पर्यायानें आपले शब्दच परत घेतले आहेत. राम व लक्ष्मण पंपातीरीं आल्यावर सीतेनें आपल्या उत्तरीयांत बांधून टाकिलेले अलंकार वानरांनीं राखून ठेविलेले होते ते त्यांनीं त्याला दाखविले. या प्रसंगीं लक्ष्मणानें सीतेचीं नूपुरें तेवढीं ओळखीचीं असल्याचें सांगितल्याचा इतिहास सर्वतोमुखीं आहे. इंद्रजिताचे शरबंधांत लक्ष्मण बद्ध झाला असतां रामानें त्याविषयीं विलाप करितांना लक्ष्मणाची योग्यता थोडक्यांत सांगितली आहे. तो म्हणतो, "अहो, शोधूं लागलें असतां या मर्त्य लोकामध्यें सीतेसारखी स्त्री मिळणें शक्य आहे; परंतु युद्धामध्यें निपुण असून मंत्र्याचें काम करणारा लक्ष्मणासारखा भ्राता मात्र मिळणें शक्य नाहीं." (६।४९।६) रामाच्या या अभिप्रायाहून लक्ष्मणाच्या गुणांचें वर्णन अधिक तें काय करावयाचें ?

## ३ भरत.

समग्र रामायणांत भरताच्या चारित्राचा संबंध प्रायः अयोध्याकांडांत आहे. इतर कांडांत कोठेंकोठें त्याचे नांवाचा उल्लेख आहे, तथापि त्यांत त्याचें चरित्र आलेलें नाहीं; पण रामायणांतील सर्व पात्रांमध्यें आपल्या उच्च चारित्र्यानें भरतानें अग्रस्थान संपादिलें आहे, यांत शंका नाहीं. त्याचेंच चरित्र संक्षेपानें सांगावयाचें तर "त्याच्या मातेनें त्याला राज्यप्राप्ति व्हावी याकरितां रामाला वनांत पाठवून त्याला यौवराज्याभिषेक व्हावा अशी योजना केली असतां अधर्मतः प्राप्त झालेल्या राज्याचा त्यानें स्वीकार केला नाहीं व राम अरण्यांतून परत येईपर्यंत तो व्रतस्थ राहिला." याप्रमाणें सांगतां येईल व हेंच रामायणांत विस्तारानें आलेलें आहे. पण रामाच्या सप्तकांडात्मक चरित्रानें त्याला जें यश मिळालें तें भरताला त्याच्या एवढ्याशा चरित्रानें मिळालें आहे. त्यानें कोणाशीं युद्ध केलें नाहीं, अथवा पराक्रम दाखविला नाहीं; आणि रामायणांतील मुख्य विषय जें रामचरित्र त्यांत त्याचा संबंध या प्रसंगावांचून येत नाहीं, यामुळें त्याचें चरित्र रामायणांत अधिक नाहीं हें खरें; तथापि त्याचे चरित्रांत याहून सांगण्यासारखें कांहीं घडलेलेंहि नाहीं. तेव्हां त्याचे सारे गुणदोष याच चरित्रांत आपणांस पाहावयाचे आहेत.

### राज्यत्यागाची महती.

भरताच्या राज्यत्यागाचें महत्त्व रामाहूनहि अधिक आहे. कैकेयीनें केलेली योजना दुष्टबुद्धीची असली तरी तींत तिला यश मिळालें होतें, यांत शंका नाहीं. रामाला वनांत पाठविण्याचें ठरवून पुत्राचें राज्य निष्कंटक व्हावें अशी तिनें व्यवस्था केली होती आणि केवळ राज्याभिषेक व्हावयाचा तेवढा राहिला होता. बरें, या कामीं प्रजाजनांकडून विघ्न येईल असें म्हणावें तर तो संभवहि नव्हता. कारण प्रजांचें प्रेम रामावर होतें आणि भरतावर नव्हतें असें नाहीं. भरताची वागणूक रामाप्रमाणें होती व याकरितां त्यानें राज्याभिषेक करून घेतला असता तर सीतेच्या मुक्ततेबरोबर रामायणाची समाप्ति होऊन पुढील कांड आणि मागील अयोध्याकांड लिहावें न लागतां रामायण ग्रंथ पांच कांडांतच आटोपला असता. सीतात्यागानिमित्त वाल्मीकींची रामायण लिहिण्याकडे प्रवृत्ति झाली,

इकडे लक्ष दिलें तर रामायणाची रचना तरी मग झाली असती का नाहीं ही शंका आहे. तेव्हां भरतानें राज्याचा त्याग करण्यानें महत्त्वाचें कार्य त्या वेळीं केलें, एवढेंच नव्हे, तर स्वतांचे चरित्राबरोबर रामाचें उज्ज्वल चरित्र पुढील पिढ्यांपुढें येण्यास तो कारण झाला आहे. म्हणजे रामचरित्र लिहिणाऱ्या वाल्मीकींहूनहि भरताचे उपकार पुढील पिढ्यांवर अधिक झाले आहेत. रामानें राज्याचा त्याग त्या वेळीं केला असला तरी भरतानें केलेला त्याग कारणावांचून असल्यामुळें महत्त्वाचा आहे. पित्याला वचनमुक्त करण्याकरितां रामानें राज्यत्याग केला तर भरताला त्याच कारणाकरितां राज्याचा स्वीकार करण्याची सोय होती. म्हणजे राज्याचा उपभोग घ्यावयास मिळून पितृभक्तीचें श्रेय लाभलें असतें. मनुष्यस्वभाव कोणत्याहि कालांत झाला तरी सारखा असतो. स्वार्थाकरितां मनुष्य काय करण्यास प्रवृत्त होईल याचा नियम नाहीं, हें आपणांस पदोपदीं प्रत्ययास येत असून इतिहासांतील पुष्कळ कथा याविषयीं साक्ष देण्यास सिद्ध आहेत; किंबहुना अशा स्वार्थी पुरुषांशीं थोर पुरुषांनीं केलेल्या झगड्यांनींच सारे इतिहास भरलेले आहेत. कोणी लोकाग्रहास्तव, कोणाला मातापित्यांची आज्ञा पाळण्याकरितां, कोणाला पत्नीची अथवा मित्राची भीड पडून, तर कोणाला देशाचे कल्याणाकरितां आपण स्वीकारिलेल्या व्रतावर पाणी सोडण्याची पाळी येते. आणि येथें तर सार्वभौम राजाची सत्ता पुढें असून पित्याची आज्ञा त्याला अनुकूल; मग भरतानें या वेळीं राज्याचा त्याग केला, हें आश्चर्य नव्हे तर काय? स्वतां रामाला भरत राज्याचा त्याग करील असें वाटत नव्हतें; इतकेंच नव्हे तर परत आल्यावरहि भरताविषयीं त्याची कशी साशंक वृत्ति झाली होती हें मागें दाखविलें आहे. राम अरण्यांत गेल्यावर कौसल्येनें राजाशीं बोलतांना अशा प्रकारचेच उद्गार काढिले आहेत. ती म्हणते "पंधराव्या वर्षीं राम परत आला तरी भरत राज्य आणि कोश सोडून देईल असा संभव दिसत नाहीं." (२।६१।११) कौसल्येच्या उद्गारांत व रामानें अरण्यांतून परत आल्यावर मारुतीशीं काढिलेल्या उद्गारांत अंतर कोठें आहे? राजा दशरथाचें मत या कामीं निश्चित नव्हतें. कैकेयीनें वरांविषयीं त्याजवळ गोष्ट काढिली त्या वेळीं त्यानें तिला "रामावांचून भरत राज्यावर कधींहि बसणार नाहीं" (२।१२।६१)

असें स्पष्टपणें सांगितलें; तथापि राम वनांत गेल्यावर कैकेयीशीं बोलतांना तो म्हणतो "हें अक्षय्य राज्य प्राप्त झाल्यानें भरत जर संतुष्ट होईल तर मला पिता समजून माझ्या निमित्तानें तो जें कांहीं श्राद्ध वगैरे करील तें मला न पोंचो." (२।४२।९) राजानें नंतर काढिलेल्या उद्गारांत भरताविषयीं त्याचें कोणतेंच मत निश्चित दिसत नाहीं; तथापि येथील अनिश्चित मत व प्रारंभींचें निश्चित मत हीं एक केल्यास भरत राज्याचा स्वीकार करणार नाहीं असें सांगण्याकडे एकंदरींत त्याच्या मनाची प्रवृत्ति दिसते. पुरोहित वसिष्ठांना मात्र भरताच्या अंतःकरणाची बरोबर परीक्षा झालेली दिसते. सीतेला कैकयीनें वल्कलें परिधान करावयास दिलेलीं पाहून संतापानें ते म्हणतात—"ज्येष्ठ भ्राता राम वनामध्यें वास्तव्य करूं लागला असतां भरतहि शत्रुघ्नासहवर्तमान वल्कलें परिधान करून वनेचर बनेल आणि रामापाशीं राहील. ( हे कैकेयि, ) भरत जर खरोखर दशरथ राजापासून झालेला असेल तर पित्यानें न दिलेल्या पृथ्वीच्या राज्याची तो इच्छा करणार नाहीं किंवा पुत्राप्रमाणें तुझ्या समीप राहण्याचेंहि त्याच्या मनांत येणार नाहीं. फार कशाला, तूं या भूतलावरून जरी आकाशांत उडून गेलीस तरी पितृवंशांतील आचार जाणणारा तो भरत असें भलतेंच करणार नाहीं. तस्मात् पुत्राला राज्य प्राप्त होण्याचा अभिलाष धरून तूं खरोखर पुत्राला अप्रिय असलेलीच गोष्ट केली आहेस; कारण रामाला अनुसरून न वागणारा असा जगांत कोणीहि मिळणार नाहीं." (२।३७।२७,३०,३२) वसिष्ठांचें हें अनुमान शेवटीं सर्वथा खरें ठरलें. वसिष्ठांवांचून इतरांनीं केलेलें अनुमान सामान्य मनुष्यस्वभावावरून केलेलें होतें आणि यावरून त्याचें पुढील वर्तन असामान्य होतें, हें सांगावयास नको.

## रामाशीं तुलना.

भरतानें केलेल्या राज्यत्यागाचें महत्त्व रामाहून अधिक आहे, हें यावरून वाचकांच्या लक्षांत येईल; तथापि प्राप्त झालेल्या राज्याचा त्याग करण्यांत त्याचे अंगीं असलेलें धैर्य व धर्मपरता हे गुण कारण झाले असून ते दोघांचे ठायीं सारखे होते. पुढील संकटाची कल्पना दोघांनाहि नसतां तें त्यांवर येऊन कोसळलें आणि अशा प्रसंगीं काय करावें, हें ठरविण्यास अथवा कोणाचा विचार

घेण्यास कोणालाहि अवसर मिळालेला नाहीं. यामुळें दोघांनाहि आपला निश्चय एकदम व्यक्त करावा लागला. विचार केला तर रामापेक्षांहि भरतापुढें पडलेला प्रश्न अधिक बिकट होता. रामाला स्वार्थाचा अभिलाष नसल्यामुळें राज्यत्यागाचा निश्चय करण्यापलीकडे त्यापुढें प्रश्न नव्हता. भरताची निरभिलाष प्रवृत्ति रामाप्रमाणें उज्ज्वल होती, परंतु केवळ राज्यत्यागानें हा प्रश्न सुटत नव्हता. कैकेयीनें राजाशीं वरयाचना केली त्या वेळीं भरत तेथें नव्हता, व यामुळें या कामीं कैकेयीनें भरताची संमति गृहीत धरिली होती. दुसरें असें कीं, या संमतीच्या पायावर उठविलेला रामाचा वनवास भरताचें स्वतांचें मत बाहेर पडण्यापूर्वीं घडून आलेला होता आणि याकरितां रामाला परत आणण्याचा भार त्याजवर पडला होता. कैकेयीकडून सर्व वृत्तांत कळल्यावर भरतानें प्रथम रामाचे साहाय्यावांचून आपणास राज्याचा भार झेंपणार नाहीं असें सांगून, कदाचित् तो झेपतां आला तरी तें वर्तन धर्मविरुद्ध म्हणून आपण करणार नाहीं, असें तिला बजाविलें; व शेवटीं तो म्हणतो, " हे पापिणी, मी तुझी इच्छा कधीं पूर्ण करणार नाहीं. तूं मजवर जीविताचा अंत करणारें संकट आणिलें आहेस. " ( २।७३।२५ ) भरताला या वेळीं कोणत्या संकटाची भीति वाटली, याचें वर्णन तोच पुढें करितो—" तुझ्याकरितां माझा पिता मृत झाला व राम अरण्यांत गेला आणि यामुळें तूं माझी अपकीर्ति जगामध्यें केलेली आहेस..... ज्याच्याकरितां तूं हें पातक केलेंस, त्या माझे ठिकाणीं तें तुझें पातक फलद्रूप झालें आहे. " ( २।७४।६;११ ) धर्मविरुद्ध वर्तन व अपकीर्ति अशी दोन प्रकारची भीति त्याला वाटूं लागली. या पातकाचे निष्कृतीस्तव रामाला परत आणण्याचा त्यानें निश्चय केला व त्यानिमित्त त्यानें किती दीर्घ व चिकाटीचे प्रयत्न केले, तें इतिहासप्रसिद्ध आहे. भरताचें हें वर्तन पाहूनच बिभीषणसंग्रहाचे प्रसंगीं सर्व मंत्री त्याविषयीं साशंक असतां रामानें " सर्वच बंधु भरतासारखे असतात, असें नाहीं, " असे उद्गार काढून बंधुभावाचा आदर्श म्हणून भरताचें चरित्र सर्व लोकांपुढें ठेविलें आहे. त्याच्या प्रेमळपणाचें पर्यवसान शोक करण्यांत न होतां त्याचें नांव रामाबरोबर इतिहासांत अक्षय्य झालें, याचें कारण त्याची धर्मपर वृत्ति होय.

भरताच्या धर्मशीलतेविषयीं रामायणांत अनेक स्थलीं उल्लेख आहेत. भरत राज्याचा स्वीकार करील किंवा नाहीं यांविषयीं रामाचें मन साशंक होतें, हें खरें; तथापि त्याच्या धर्मपरतेविषयीं त्याला पूर्ण भरंवसा होता व याकरितां वनांत जाण्यापूर्वीं रामानें सीता व कौसल्या यांना आपल्या मागें कसें वागावें हें सांगतांना भरत गादीवर बसणार असें गृहीत धरून उपदेश केला आहे. सीतेला केलेल्या उपदेशाविषयीं निरूपण पूर्वीं आलेंच आहे. तिला केलेला उपदेश कुटुंबांतील तिच्या अधिकाराला अनुसरून आहे. कौसल्येला पित्याची शुश्रूषा करीत राहण्याविषयीं सांगतांना कैकेयीकडून तिला त्रास पूर्वींहून अधिक होणार असें दिसलें तरी भरताकडून तो होणार नाहीं असा भरंवसा त्यानें व्यक्त केला आहे. तो म्हणतो, "भरतहि धर्मात्मा असून सर्व लोकांशीं प्रिय भाषण करणारा आहे. तेव्हां तो तुझ्या अनुरोधानें वागेल. कारण तो नेहमीं धर्माविषयीं रत असतो." (२।२४।२३) भरताविषयींचा रामानें येथें व्यक्त केलेला अभिप्राय कौसल्येचें सांत्वन करण्यापुरता नसून तसें त्याला अंतःकरणापासून वाटत होतें. तमसातीरीं पहिला मुक्काम पडला असतां मातापित्यांचें स्मरण होऊन त्यानिमित्त बोलतांना राम लक्ष्मणाला म्हणतो, "धर्म हाच ज्याचा उद्देश आहे असा धर्मात्मा भरत इच्छेनुरूप माझ्या पित्याला व मातेला खरोखर धीर देईल. तेव्हां हे महापराक्रमी लक्ष्मणा, भरताच्या अक्रूरत्वाचा पुनः पुनः विचार केला म्हणजे पित्याबद्दल व मातेबद्दल मला वाईट वाटेनासें होतें." [ २।४६-७, ८ ] दशरथानें तर कैकेयीशीं बोलतांना रामाहूनहि भरताला आपण अधिक धार्मिक समजत असल्याचें सांगितलें आहे. [ २।१२।६२ ]

राम परत येत नाहीं असें पाहून भरतानें राज्याचा कारभार आपणाकडे रामाची ठेव म्हणून चालविला व तोंपर्यंत तो अयोध्येबाहेर नंदिग्रामीं राज्योपभोगाचा त्याग करून तापसवेषानें राहिला. यांतहि त्याची धर्मपरता व त्यागवृत्ति हीं व्यक्त होतात. त्याची नित्याची राहणी साधी असल्यामुळें त्याला हें व्रत तडीला नेतां आलें, हें उघड आहे. पंचवटींत असतां राम, लक्ष्मण व सीता गोदावरीवर स्नान करावयास जाते वेळीं लक्ष्मणानें "भरत या वेळीं आपल्या सचिवांसहवर्तमान सरयूवर स्नानाला जात असेल" अशी त्याची आठवण

काढिली आहे. [ ३।१६।२९ ] सरयूवर नित्य स्नान करण्याचा सर्व राजपुत्रांचा परिपाठ असावा असें यावरून वाटतें. स्नान घालण्याचा व्यवसाय करून निर्वाह करणारे कांहीं लोक त्या वेळीं होते, हें रामायणकालच्या व्यवसायांविषयीं जी माहिती पूर्वी दिली आहे, त्यावरून कळून येणारें आहे. राजाचे पदरीं असे लोक असावयाचे व धनिकांच्या विलासपरतेवरच असले व्यवसाय सर्वस्वीं अवलंबून असतात. अयोध्याधिपतीचे पदरीं असे लोक असले तरी त्यांचा उपयोग राजपुत्रांनीं करून घेतल्याचें दिसत नाहीं. साध्या राहणीचे बाबतींत सर्वच राजपुत्र सारख्या योग्यतेचे होते. भरताच्या स्वभावाविषयीं वगैरे रामायणांत अधिक माहिती प्रयोजनाभावीं आलेली नाहीं. तथापि वरील प्रसंगीं लक्ष्मणानें त्याविषयीं जो अभिप्राय व्यक्त केला आहे, त्यांत त्याचे स्वरूपाचें व स्वभावाचें चित्र रेखाटलें असून त्याचा अनुवाद केल्यावांचून त्याचे गुणवर्णनाला पूर्णता येणार नाहीं. यासाठीं तो करून दुसरीकडे वळूं. तो रामाला म्हणतो, “ त्या भरताचे नेत्र कमलाप्रमाणें असून वर्ण काळसर आहे. त्याचें स्वरूप भव्य व सुंदर आहे. त्याचें पोट सुटलेलें नाहीं. तो धर्मवेत्ता, सत्यवादी, निर्भीड ( ह्रीनिषेध ), जितेंद्रिय, गोड बोलणारा, सुंदर, आजानुबाहु व शत्रूचें दमन करणारा असा असून नानाविध सुखोपभोगांचा त्याग करून सर्वस्वीं तुमचें अनुकरण करीत आहे. तुम्ही अरण्यामध्यें असतांहि तुमच्या तापसधर्माचें तो महात्मा भरत अनुकरण करीत आहे. त्यापक्षीं [ खरोखर ] त्यानें स्वर्ग जिंकला आहे. ” [ ३।१६।३१-३३ ]

### ४ शत्रुघ्न.

रामाचा चौथा बंधु शत्रुघ्न याचें चरित्र रामायणांत नांवापुरतें आहे व त्या असलेल्या चरित्राचा रामायणाशीं संबंधहि नाहीं म्हटल्यास चालण्यासारखें आहे. उत्तरकांडामध्यें लवणासुराचा वध करून त्यानें मधुपुरीची स्थापना केल्याची कथा आहे. त्या दैत्यानें त्रास दिल्यामुळें कित्येक ऋषि रामाकडे आले त्या वेळीं त्या कामावर कोणाची योजना करावयाची याची वाटाघाट चालली असतां भरत पुढें आला होता; परंतु राम वनांत गेल्यावर त्यानें व्रतस्थ राहून राज्यकारभार चालविण्याची कामगिरी केली आहे तेव्हां त्याला आतां कष्ट पडूं नये

असें म्हणून शत्रुघ्नानें आपण होऊन हें काम अंगावर घेतलें. त्याच्या या वर्तनांत सौजन्य व लक्ष्मणानें रामाबरोबर वनवास पत्करण्यांत दाखविल्याप्रमाणें बंधुप्रेम हीं दोनहि व्यक्त झालीं. राम वनांत गेल्यावर त्याला परत आणण्याकरितां भरताबरोबर तो वनांत गेला होता. यानंतर मधील कालांत तो कोठें राहिला संबंधाचें वर्णन रामायणांत आलेलें नाहीं; तथापि त्याच्या वरील भाषणावरून तो अयोध्येंत राहिला असावा, असें दिसतें. लवणासुराचा वध करून त्यानें आपला पराक्रम सर्व लोकांस दाखविला. लवणवधाचें कार्य भरताला त्रास पडूं नये म्हणून त्यानें अंगावर घेण्यांत त्याचा त्याजकडे असलेला जो ओढा व्यक्त झाला आहे तो त्याच्या लहानपणापासूनच दिसत होता. (१।१८।३२) व यासाठीं विवाहानंतर भरताबरोबर तो त्याचे आजोळीं गेला; आणि इकडे रामाचे वनवासाचा प्रकार घडून आला. अशा रीतीनें त्याशीं सख्य असल्यामुळें तो लक्ष्मणाचा सहोदर बंधु असूनहि लौकिक समजूत त्याचे उलट आहे. लक्ष्मण व शत्रुघ्न यांचा हा संबंध लक्ष्मणाचें भाषणांत एके स्थलीं ओघाबरोबर ध्वनित झाला आहे. अरण्यांत गेल्यावर रामाचा पहिला मुक्काम एका वृक्षाखालीं झाला असतां लक्ष्मण रामाला म्हणतो “ हे शत्रुतापना रामा, तुझ्यावांचून मला आतां पिता, (बंधु) शत्रुघ्न व ( माता) सुमित्रा यांपैकीं कोणालाहि भेटण्याची इच्छा नाहीं; फार काय सांगू ? स्वर्गाचीहि मला इच्छा नाहीं. ” (२।५३।३२) येथें शत्रुघ्नाचें नांव सहोदर बंधु म्हणून घेतलें नसलें तरी त्याचें व मातेचें नांव निकटचे आप्त म्हणून एकदम घेऊन तें ध्वनित केलें आहे. त्याचा स्वभावहि लक्ष्मणाप्रमाणें तापट असल्याचें दिसून येतें. रामाचे वनवासाची वार्ता कळतांच लक्ष्मण ज्याप्रमाणें क्रुद्ध होऊन रामाला स्वतां राज्य बळकावावें असें सांगूं लागला, त्याप्रमाणें भरताबरोबर शत्रुघ्न परत अयोध्येला आला व इकडील वृत्तांत कळल्यावर भरत रामाला परत आणण्याकरितां वनांत जाण्याचा विचार करूं लागला, त्या वेळीं शत्रुघ्न त्याला म्हणाला “आपली गोष्ट पाहिजे कशाला ? परंतु दुःखसमयीं सर्व प्राण्यांना आधार असलेल्या धैर्यवान् रामाला स्त्रीनें वनांत हांकून दिलें (त्या वेळीं) बलाढ्य आणि धैर्यवान् अशा लक्ष्मणानें पित्याचा निग्रह करून रामाला कां सोडविलें नाहीं ? स्त्रीला वश होऊन जो राजा कु-

मार्गाला प्रवृत्त झाला त्याचा न्यायान्याय पाहून पूर्वींच निग्रह करणें योग्य होतें." (२।७८।२-४) शत्रुघ्न इतकें बोलून स्वस्थ राहिला नाहीं, तर त्यानें सर्व अनर्थाचें मूळ जी मंथरा तिला फरफटत ओढीत नेलें व तो तिला मारणार असें पाहून भरत मध्यें पडला व त्यानें "स्त्रीहत्येचा दोष लावून घेऊं नको" असें सांगून तिला सोडविलें. लक्ष्मण व शत्रुघ्न यांमधील हें स्वभावसादृश्य त्यांच्या सोदरसंबंधाला अनुरूपच आहे.

## ५ दशरथ.

दशरथ राजाचें चरित्र रामायणांत प्रारंभींच्या दोन कांडांत आलें असून तितक्यांत तो मरण पावल्यामुळें त्याचें सर्व चरित्र तेथेंच आटोपलें आहे. रामायणाचा उपक्रम करितांना अयोध्येचें वर्णन केलें असून तेथें राजा दशरथाविषयीं तो अतिरथि, यज्ञयाग करणारा, धर्मनिष्ठ, मनोनिग्रही, महर्षितुल्य व जितेंद्रिय असल्याचें (१।६।२-४) लिहिलें आहे. दशरथाचे हे गुण त्याचें चरित्र रामायणांत साकल्यानें आलें नसल्यामुळें व्यक्त झालेले नाहींत असें येथें म्हणतां येण्यासारखें आहे; तथापि येथें त्याविषयीं जितेंद्रिय म्हणून जें वर्णन आहे तें रामायणांत आलेल्या त्याचे चरित्रावरून पाहतां केवळ काव्यमय वाटतें. रामायणांत त्या संबंधानें आलेले कित्येक उल्लेख त्याच्या विलासपरतेचे द्योतक आहेत. रामाला वनवासाला जावें लागलें याचें कारण म्हणून कैकेयीकडे बोट दाखविण्यांत येतें व तिला मिळालेल्या वराच्या निमित्तानें पूर्वींचा युद्धाचा प्रसंग व त्यांत त्यानें केलेले पराक्रम व तिनें दाखविलेलें धाडस हीं पुढें आलीं आहेत; परंतु वास्तविक कैकेयीच्या पुत्राला राज्य मिळण्याची योजना तिनें केलेली नसून तिच्या विवाहाचे प्रसंगीं तिच्या पित्यानें केलेली होती व तिला दशरथानें मान्यता दिलेली होती, हें आम्हीं यौवराज्याभिषेकाची त्वरा कां करण्यांत आली? याविषयींचें विवेचन करितांना अन्यत्र दाखविलें आहे. दशरथानें कैकेयीशीं केलेला विवाह वृद्धपणीं केला होता व बहुधा तिचे सौन्दर्याला मोहून त्यानें पित्याची वरील मागणी मान्य केली असावी. दशरथाच्या विवाहित स्त्रिया ३५० होत्या, असें रामायणांत लिहिलें आहे व त्यांकडे पाहिलें म्हणजे कैकेयीच्या पित्यानें कोणतीहि अट न घालतां कन्या दिली असती तर

या संख्येंत भर घालण्यापलीकडे त्याला काय लाभ झाला असता ? वृद्ध पुरुष धनिक असतां त्याच्या विवाहाला फारसा वेळ लागत नाहीं व कन्येच्या पित्याला त्यानें द्रव्य दिलें म्हणजे त्याला जामाताचें वार्धक्य जाऊन तो च्यवनभार्गवाप्रमाणें तरुण दिसूं लागतो; याचा अनुभव व्यवहारांत आपणांला नित्य येतो, त्याहून यांत विशेष तें काय ? कैकेयीलाहि पित्याची ही योजना विवाहापूर्वी कळली नव्हती व विवाहानंतर ती पित्याकडे जाण्याचा योगच आला नसावा व यामुळें तिला ती कळली नसावी, अशी आमची समजूत आहे. हा विवाह वृद्धपणीं झाला होता व दोघांचेमध्यें अंतर फार होतें, यांत कांहीं शंका नाहीं. यौवराज्याभिषेकाचा विचार ठरल्यानंतर राजानें अंतःपुरामध्यें प्रवेश केल्याचें वर्णन करितांना दोघांचे वयांतील हें वैषम्य स्पष्ट सांगितलें आहे.

**स वृद्धस्तरुणीं भार्यां प्राणेभ्योऽपि गरीयसीम् ॥ ददर्श...**

"त्या वृद्ध राजानें प्राणाहूनहि प्रिय असलेली आपली तरुण भार्या अवलोकन केली."

येथील वर्णन राम सुमारें १७ वर्षांचा झाला त्या वेळचें आहे. राजाचे सर्व पुत्र एकाच कालीं झालेले; तेव्हां या वेळीं ती तरुण असावयाची म्हणजे हे पुत्र होण्यापूर्वी फार थोडा काल हा विवाह झाला असला पाहिजे हें निर्विवाद आहे. आपणाला वृद्धावस्था आली तरी पुत्र झालेला नाहीं यासाठीं त्यानें अश्वमेध केल्याचें बालकांडाचे प्रारंभीं सांगितलें आहे; व त्यापूर्वी थोडे दिवस हा विवाह झालेला; हें लक्षांत घेतलें म्हणजे या दंपत्याचे वयांत किती अंतर असावें याची कल्पना येईल. इतक्या वृद्ध राजाला कांहीं तरी विशेष लाभ दिसल्यावांचून कन्येचा पिता तरी आपली कन्या कशाला देईल ? एकंदरींत पुढील अनर्थाला राजाचा हा विवाह—त्याची विषयसक्ति—कारण झाली यांत शंका नाहीं.

राजाची ही विषयलंपटता सिद्ध करण्याकरितां प्रमाणें शोधीत बसावयाचें वास्तविक कारण नाहीं. त्याच्या पुत्रांचें याविषयीं एकमत दिसतें. राजा मरण पावल्यावर भरत अयोध्येंत आला व तो प्रथम पित्याची भेट घ्यावी या इच्छेनें आपल्या मातेच्या मंदिरांत गेला. तेथें त्याला राजा न दिसल्यामुळें तो मातेला म्हणतो "येथें मातेच्या अंतःपुरामध्येंच प्रायः राजा असतो; परंतु आज त्याचें

दर्शन घेण्याकरितां मी येथें आलों असतां तो कोठें माझ्या दृष्टीस पडत नाहीं." (२।७।१२) भरताचे या भाषणांत राजा कैकेयीच्या मंदिरांत नित्य असतो असें जें वर्णन आहे त्यावरून तो तिच्यावर किती आसक्त असे हें कळून येईल. भरत अयोध्येंत आला तो सूर्यास्तापूर्वीं आला होता व त्या वेळीं, अर्थात् दिवस असतां, राजाच्या नित्य व्यवहारावरून तो थेट आपल्या मातेच्या अंतःपुरांत त्याची भेट घेण्याकरितां म्हणून गेला, असा येथील प्रसंग आहे! याहून यावर अधिक विवरण करण्याची आवश्यकता आहे, असें वाटत नाहीं.

राम वनवासाला जाणार वगैरे वृत्तांत कळल्यावर लक्ष्मण कौसल्येला म्हणतो "विषयांच्या तावडींत सांपडलेला आणि बुद्धीला विपर्यास घडलेला हा विषयी व वृद्ध राजा [ कैकेयी ] प्रेरणा करूं लागली असतां कोणती बडबड करणार नाहीं? [ २।२१।३ ]

भरताचें वरील भाषण सामान्य आहे व लक्ष्मण तापट स्वभावाचा म्हणून येथील मत प्रमाणार्ह नव्हे असें येथें कदाचित् कोणाला वाटेल, तर विचारी व शांत म्हणून प्रसिद्ध असलेल्या रामाचें मत कळल्यावर तरी कोणाला शंका राहणार नाहींना? लक्ष्मण रामाला आपण वनांत येतों असें सांगूं लागला असतां रामानें प्रथम त्याला संमति दिली नाहीं. आपण दोघे वनांत निघून गेल्यास आपल्या मातांकडे कोणी लक्ष देणार नाहीं, असें म्हणून, या कामीं राजावर कां विसंबून राहतां येत नाहीं त्याचें कारण राम सांगतो—"पृथ्वीवर जलवृष्टि करणाऱ्या पर्जन्याप्रमाणें जो ( सर्वांवर ) मनोरथसिद्धीची वृष्टि करीत असतो, तो महातेजस्वी राजा तर कामपाशांत जखडून गेलेला आहे." [ २।३१।१२ ] यापुढील रामाचा अभिप्राय व्यक्त होण्याचा प्रसंग गंगापार झाल्यावर अरण्यांत पहिला मुक्काम झाला त्या वेळीं आलेला आहे. अनाथ, वृद्ध, माझा वियोग झालेला, आणि विषयलोलुप असल्यामुळें कैकेयीच्या तावडींत सांपडलेला पिता काय बरें करील? हें संकट आणि राजाच्या बुद्धीला पडलेला भ्रम यांचा विचार केला म्हणजे अर्थ आणि धर्म यांपेक्षां कामच प्रबल आहे असें मला वाटतें." [ २।५२।८, ९ ]

राजाच्या विषयलंपटतेचें वर्णन रामाला यौवराज्याभिषेक करावयाचा ठरवून

तो अंतःपुरांत गेला त्या निमित्तानें रामायणांत स्पष्टपणें आलें आहे. अयोध्येंत उत्पात होऊं लागलेले पाहून व ते आपले मृत्युसूचक आहेत हें लक्षांत आणून राजानें वरील विचार ठरविलेला, अर्थात् अशा प्रसंगीं तो चिंताग्रस्त असावयाचा, मग त्याला विलास कोठून सुचावयाचे? पण त्या वृद्ध राजाची वासना वृद्ध झाली नसून ती तरुणापेक्षां वाढतच होती. पुढील वर्णन पहा. "तो महाराज दशरथ समृद्ध अशा आपल्या अंतःपुरांत प्रविष्ट झाला असतां त्याच्या उत्कृष्ट शय्येवर त्याची स्त्री कैकेयी त्याला दिसली नाहीं. तेव्हां उत्कट कामवासना झाल्यामुळें रतिसुखाविषयीं ( रत्यर्थ ) उत्सुक झालेल्या त्या राजानें तिचा शोध केला व तो खिन्न होऊन गेला. कारण, यापूर्वीं राजपत्नीनें ती वेळ कधींहि चुकविली नव्हती. ( २।१०।१७–१८ ) राजा दशरथाविषयीं येथें केलेल्या वर्णनास अनुसरून त्यापुढील कथानिरूपण करितांनाहि त्याला कामबाणांनीं विद्ध झालेला, विषयवासनेच्या तावडींत सांपडलेला, [ २।११।१ ] कामी [ २।११।४ ] इत्यादि यथोचित विशेषणें योजिलेलीं आहेत. स्वतांचा मृत्यु जवळ आल्याचें मनांत भय वाटत असतांनाहि राजाचा हा व्यवहार पाहिला म्हणजे ज्ञानेश्वरींतील पुढील ओवीचें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं.

**दर्दुरु सापें गिळिजतु उभा। तो मासिया वेंटाळी जीभा॥**
**तैसे प्राणिये कवणा लोभा। वाढविती तृष्णा** ॥९।५०९॥

—धुळें प्रत.

राजाच्या या विषयलंपटेला अनुसरून त्यानें अनेक स्त्रियांशीं विवाह केले, यांत नवल नाहीं. राजवैभवाला भुलून कन्येच्या पित्यानें कन्या द्यावयाची यांत मनुष्यस्वभावाला सोडून काय आहे? मोंगल बादशाहांना कित्येक रजपूत राजांनीं आपल्या कन्या दिल्याचे जे इतिहास आहेत, त्याहून यांत धर्मलोप तरी कमी आहे. स्त्रियांची संख्या रामायणांत दिलेली प्रथम आम्हीं पाहिली, तेव्हां हें वर्णन इतर कांहीं स्थलीं असल्याप्रमाणें अत्युक्तिपूर्ण असावें, असा संशय वाटला; परंतु राजाच्या विलासी स्वभावाविषयीं असलेले उल्लेख जेव्हां अवलोकनांत आले, तेव्हां वरील संख्या संभवनीय आहे, असें आमचें आम्हांस वाटूं लागलें. कैकेयीशीं त्यानें अगदीं वृद्धपणीं विवाह केलेला व याकरितां तिच्या

विवाहाचे वेळीं तिचे पुत्राला यौवराज्य देण्याचें वचन त्याला तिचे पित्याला द्यावें लागलें आणि राजानें पूर्वपरंपरेला विरुद्ध असतांहि तें देण्याला मागें घेतलें नाहीं. त्यापूर्वीं राजाचे विवाह होण्याला वयाचीही अडचण येण्याचें कारण नसून उलट राजाची इच्छा व्यक्त होतांच, सध्यां एकादी जागा खालीं झाल्यावर ती आपणास मिळावी, म्हणून उमेदवारांकडून येणाऱ्या अर्जांच्या भेंडोळ्यांप्रमाणें कित्येक लोक आपापल्या कन्या घेऊन राजापुढें येणें अधिक संभवनीय होतें. कदाचित् एकादी सुंदर कन्या पाहूनहि राजा मागणी घालीत असावा आणि हें अधिक संभवनीय दिसतें. कारण राजाची विवाहित स्त्री जिवंत असल्यामुळें आपण होऊन आपली कन्या कोण आणून देणार? सवतीमत्सरानिमित्त येणाऱ्या संकटाची जाणीव स्वतां कन्येला व तिच्या पित्याला असणार आणि याकरितां त्या कन्येवर राजाचें प्रेम बसेल असा भरंवसा उभयतांना आधीं वाटणें या कामीं अवश्य आहे व तो राजानें मागणी घातल्यास पटण्याचा संभव आहे; पण अशा विलासी पुरुषांच्या मनाची एके ठायीं स्थिरता कशी राहाणार? विवाह होण्यापुरतीच ही स्थिरता असावयाची, हें उघड आहे. स्पष्ट बोलावयाचें तर राजानें इतक्या स्त्रियांशीं विवाह केले म्हणजे आपापल्या कन्या राजाला देणारे इतके पुरुष फसले, असें समजावयाचें आहे. पुरुष विलासी असला तरी त्याचे स्वभावावरून वरील सर्व अनुमानें करितां येणार नाहींत; कारण विलासपरता आणि अनेक स्त्रियांशीं विवाह अथवा संबंध यांचा अन्वयव्यतिरेकतः संबंध आहे, असें नाहीं; पण आमचें हें अनुमान राजाच्या विलासपरतेवर उभारलेलें नसून त्याला रामायणांत आधार आहे. अत्रिऋषींचे आश्रमांत राम गेल्यावर तेथें सीता व ऋषींची स्त्री अनसूया यांचा जो संवाद झाला, त्यांत अनसूयेनें सीतेला पतिनिष्ठ राहाण्याविषयीं उपदेश केल्यावर तो ग्रहण करून रामाचे गुणांची प्रशंसा करितांना सीता म्हणतेः—

> यां वृत्तिं वर्तते रामः कौसल्यायां महाबलः।
> तामेव नृपनारीणामन्यासामपि वर्तते। २।११८।५॥
> सकृद्दृष्टास्वपि स्त्रीषु नृपेण नृपवत्सलः।
> मातृवद्वर्तते वीरो मानमुत्सृज्य धर्मवित्॥ ६॥

" महाबलाढ्य राम कौसल्येशीं ज्याप्रमाणें वागतो त्याप्रमाणेंच इतरहि राज-स्त्रियांशीं वागतो. ( इतकेंच नव्हे तर उपभोग्य म्हणून ) ज्या स्त्रियांकडे राजानें एकदां मात्र पाहिलें आहे, त्या स्त्रियांशींहि हा नृपवत्सल धर्मवेत्ता राम अभिमान न धरितां आपल्या मातेप्रमाणें वर्तन ठेवीत असतो. "

सीतेच्या या भाषणांत दशरथाचे पत्नींविषयीं जें वर्णन आलें आहे, त्यावरून त्यानें कित्येक स्त्रियांचा एकदां उपभोग घेतल्यावर त्यांचें पुनः दर्शनहि घेतलें नाहीं, असें दिसतें. येथें पहिल्या श्लोकांत राजपत्नींचा उल्लेख असून दुसऱ्या श्लोकांत वर वर्णिलेल्या स्त्रियांचा उल्लेख आहे. येथील निर्देश पृथक् आहेत व यासाठीं विवाहित पत्नींवांचून अन्य स्त्रियांशीं त्याचा संबंध होता किंवा काय असा येथें संशय येतो. मात्र दुसऱ्या श्लोकांत पहिल्याचें विवरण केलें आहे असें मानिलें तर चालण्यासारखें आहे व म्हणून येथें निश्चित अनुमान करितां येत नाहीं. तथापि विवाहित स्त्रियांशींहि त्याचा असा व्यवहार असणें लांछनास्पद नव्हे असें कोण म्हणणार आहे? अरबी भाषेंतील गोष्टींत एका बादशहानें कित्येक स्त्रियांची व्यभिचाराकडे असलेली प्रवृत्ति पाहून नित्य नव्या स्त्रीशीं लग्न लावून दुसरे दिवशीं तिचा वध करावयाचा असा उपक्रम केल्याची एक कथा आहे, तिची आठवण या वेळीं कोणाहि वाचकाला झाल्यावांचून राहाणार नाहीं.

राजानें कैकेयीशीं विवाह करण्यापूर्वीं अशा प्रकारें व्यवहार केले असले तरी तिच्याशीं विवाह झाल्यानंतर तिच्या स्वरूपास भुलून जाऊन म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें म्हणा त्याच्या अनिरुद्ध संचाराला आळा बसला असें वाटतें. राजाच्या स्त्रिया अनेक असल्या तरी कौसल्येच्या भाषणांत कैकेयीविषयीं मत्सर फार दिवसांपासूनचा असल्याचें ( २।२०।४२ ) दिसतें व त्यावरून वरील अनुमान केलें आहे. तसेंच कैकेयी अंतःपुरांत दिसेनाशी पाहून तो खिन्न झाला व ती क्रुद्ध झालेली पाहातांच तिला प्रसन्न करण्याकरितां त्यानें वाटेल तें करण्याची तेथें जी प्रतिज्ञा केली ती वाचून आमचा ग्रह अधिक दृढ झाला आहे. त्यानें समरभूमीवर पराक्रम केल्याचे रामायणांत कित्येक उल्लेख असले तरी तिच्याशीं तो पराभव पावून शरण आलेल्या शत्रूपेक्षांहि भिऊन वागत असे. राम वनांत गेल्यावर राजा कौसल्येच्या मंदिरांत गेला व रामाला

अरण्यांत पोंचवून परत आलेला सुमंत्र राजाला भेटण्याकरितां तेथें गेला. रामाचा वृत्तांत ऐकून घेतल्यावर राजा कांहींच बोलला नाहीं, असें पाहून कौसल्या त्याला म्हणते " हे भूपते, जिच्या भीतीमुळें आपण रामाचा वृत्तांत सारथ्याला विचारीत नाहीं ती कैकेयी ( आतां ) येथें नाहीं; आपण त्याच्याशीं निर्भय-पणें बोला. " ( २।५७।३१ )

रामायणांत दशरथाचें चरित्र, तें सांगण्याचें प्रयोजन नसल्यामुळें, फार थोडें आहे आणि त्यावरहि कोणाचें फारसें लक्ष गेलेलें नाहीं; यामुळें व रामायणांत प्रसंगवशात: त्याविषयीं केलेल्या काव्यमय वर्णनामुळें त्याच्या वास्तविक स्वरू-पाविषयीं कोणाला कल्पना आलेली नाहीं. वरील विस्तृत विवेचन याकरितां करावें लागलें आहे. रामाचा जनक या नात्यानें तो लोकांपुढें आहे व त्यानिमित्त त्याविषयीं लोकांत पूज्यभाव आहे. वरील विवेचन वाचून त्याचें खरें स्वरूप कळल्यावर या पूज्यभावांत व्यत्यय येण्याचा संभव आहे. पण त्यास उपाय नाहीं. एकाद्या थोर पुरुषाचा वंश ज्याप्रमाणें त्यासारखा सद्गुणी निपजतो असा नियम नसतो, त्याप्रमाणें त्याचे पूर्वजांविषयीं समजावयाचें आहे. थोर पुरुषांच्या संबंधामुळें त्यांच्या दुर्गुणावर पांघरूण पडून त्यांचें खरें स्वरूप कांहीं काल लोकांना कळत नाहीं, हें खरें; तथापि केव्हांना केव्हां तें उजेडांत आल्यावांचून रहात नाहीं.

## ६ सीता.

रामपत्नी सीतेच्या गुणांविषयींचें निरूपण " रामायणाची योग्यता " सांग-तांना व रामाच्या गुणांविषयीं विवेचन करितांना ओघाबरोबर बरेंच येऊन गेलें आहे. तिचा मुख्य गुण जें पातिव्रत्य त्याचे योगानें तिला प्रसिद्ध पतिव्रतापंच-कांत स्थान मिळालें आहे व यावरून तिजविषयीं लोकांत असलेला आदर व्यक्त होत आहे. रामाचें चरित्र विपत्तींनीं व्यापिलेलें असून त्यांतील वाटा त्याची पत्नी या नात्यानें सीतेनें उचलणें साहजिक आहे. तथापि त्यांतल्या त्यांत विपत्तींचा भार सीतेवर अधिक पडला असल्याचें सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास कोणाच्याहि लक्षांत येईल.

## धैर्य आणि आत्मविश्वास.

पतीशीं विरह तिला असह्य वाटून तिनें वनवास पत्करिला. तथापि रावणानें तिचा अपहार करून तिला लंकेंत नेऊन ठेविलें, त्या वेळीं तिजवर आलेला प्रसंग फार कठीण होता. रामाला तिचा विरह सहन होत नसला तरी स्वतांचें संरक्षण करून सीतेला परत आणण्याची खटपट करण्यास तो समर्थ व स्वतंत्र होता व ती रावणाचे बंदिशाळेंत पडली होती. तिला वश करण्यासाठीं रावण नित्य येऊन तिचा छल करीत होता व तो सोशीत स्वतांचें पातिव्रत्य अभंग राखण्याचें बिकट काम असहाय स्थितींत तिला करावयाचें होतें. लंकेंत ती जवळजवळ एक वर्ष होती. रावणानें यापूर्वी अनेक स्त्रिया पळवून आणिल्या होत्या व त्यांतील कित्येक त्याचे वैभवाला भुलून तर कित्येक निरुपाय होऊन शेवटीं त्याला वश झाल्या. मारुतीची व तिची गांठ दहा महिन्यांनंतर पडली; तोंपर्यंत तिला कोणाचा आधार नव्हता किंवा पतीच्या सामर्थ्यावांचून त्याची भेट होण्याची तिला आशा नव्हती. तेव्हां अशा संकटाशीं तोंड देण्यास लागणाऱ्या धैर्याचे बाबतींत रामाशीं तुलना केल्यास सीतेचीच प्रशंसा अधिक करावी लागेल असें वाटतें. रावण पंचवटींत तिचा अपहार करण्याकरितां आला त्या वेळीं तिचे ठायीं जें धैर्य व जो आत्मविश्वास होता, तो तेथून तिची मुक्तता होईपर्यंत अढळ होता. तिचा अपहार करण्याचा रावणाचा विचार कळतांच त्याची निर्भर्त्सना तिनें केली, तींतील व अशोकवनिकेंत दहा महिने राहिल्यानंतर तिनें रावण आला असतां त्याला जें उत्तर दिलें, त्यांतील आवेश अगदीं सारखा आहे. पंचवटींतील भाषणांत ती म्हणते, " सिंहिणीची इच्छा धरणाऱ्या कोल्ह्याप्रमाणें तूं विनाकारण येथें माझी इच्छा करीत आहेस; परंतु मी तुला मिळणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे, तर ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रभेला त्याचेपासून पृथक् करून कोणाला स्पर्श करितां येणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें रामाचा वियोग करून मला तुझा स्पर्श होणें शक्य नाहीं. " (३।४७।२८) अशोकवनिकेंतील भाषणांत ती म्हणते, " हे राक्षसाधमा, ज्याच्या तेजाला अंत नाहीं अशा रामाच्या भार्येला उद्देशून ज्याअर्थी तूं पापाचा उच्चार केला आहेस, त्याअर्थी कोठें गेल्यानें तूं त्याचे हातून सुटणार

आहेस बरें ?...हे अनार्या, तूं माझ्याकडे निरखून पाहात आहेस, तर हे तुझे क्रूर, विकृत, कृष्ण व पिंगट वर्णाचे डोळे भूमीवर कसे गळून पडत नाहींत ? ( ५।२२।१५; १८ ) या दोन भाषणांत कालाचें अंतर आहे, परंतु आवेशांत अंतर मुळींच पडलेलें नाहीं, हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

युद्धसमाप्तीनंतर रामानें ज्या वेळीं तिला तिचा त्याग केल्याचें सांगितलें त्या वेळचा प्रसंग फार कठीण होता. पतीचें दर्शन एक वर्षांत झालें नसल्यानें ती आतां दर्शन होणार म्हणून आनंदांत होती; आणि रामाकडे ती येते तोंच त्यानें सर्व मंडळींच्या देखत तिचा एकदम अपमान केला. हा प्रसंग तिजवर अकल्पित होता, इतकेंच नव्हे, तर तेथें असलेल्या मारुतीप्रभृतींना—प्रत्यक्ष लक्ष्मणालाहि—त्याची कल्पना नव्हती. आपले श्रम ज्याकरितां झाले, तो पति-पत्नींचा समागम आज होणार म्हणून तेहि आनंदांत होते; पण रामाच्या भाषणानें सर्वांचा विरस होऊन गेला! लक्ष्मण तर अगदीं संतप्त होऊन गेला व त्याचा रामाला कांहीं तरी सांगण्याचा उद्देश होता. परंतु रामाकडे पाहातो तों त्या वेळीं त्याचे बरोबर भाषण करणेंहि शक्य नाहीं असें त्याला दिसून आलें. तेव्हां तो कांहीं बोलला नाहीं. या संकटाचे प्रसंगीं शेवटचा अग्निप्रवेशाचा उपाय तिनें योजिला. रावणानें तिला उचलून नेली व यानिमित्त परपुरुषाचा स्पर्श तिला झाला असला तरी तेथें तिचा उपाय नव्हता; पण यावांचून तिजवर रामाला कांहीं दोष ठेवितां येत नव्हता. याच दृष्टीनें रामानें तिला "रावणाच्या अंकाचा स्पर्श झालेल्या व त्यानें दोषदृष्टीनें अवलोकन केलेल्या तुझा कुलीन म्हणविणारा मी कसा बरें स्वीकार करूं ?" ( ६।११५।२० ) असा प्रश्न केला होता. या प्रश्नाला तिला उत्तर देतां आलें असतें व तें तिनें त्याप्रमाणें दिलें. पण यापुढें रामानें "दिव्य कांतीनें युक्त व मनोहर असून स्वगृहीं राहिलेल्या तुला अवलोकन केल्यावर रावण एक क्षणभरहि तुझी उपेक्षा करणार नाहीं." (६।११५।२४) असा जो तर्क केला त्याला ती काय उत्तर देणार? मात्र त्याला आलेला हा संशय त्यानें अवेळीं प्रकट केला, एवढा आक्षेप त्यावर घेतां येण्यासारखा होता. लंकेंत सीता दहा महिने राहिल्यानंतर मारुतीची व तिची भेट झाली. अर्थात् पुढील सर्व खटाटोप दोन महिन्यांत झाला. रावणाचे

गृहीं दीर्घकाल राहिल्यामुळें रामाला जर तिजविषयीं संशय आला, तर तो दीर्घकाल मारुतीची गांठ पडल्यानंतरचा नसून पूर्वीचा होता. अर्थात् संशय घेण्यास तो पूर्वींचा कालहि पुरेसा असल्यामुळें मनाच्या संशयित स्थितींत रामानें पुढील खटाटोप केला, हें उघड आहे. हें लक्षांत घेऊन सीतेनें त्याविषयीं मात्र त्याला स्पष्टपणें सांगितलें कीं, "हे राजा, ज्या वेळीं महावीर हनुमान माझ्या शोधाकरितां पाठविलांत, त्या वेळीं मी लंकेमध्यें होतें; तेव्हांच आपण "मीं तुझा त्याग केला आहे" असें कां कळविलें नाहीं? हे वीरा, या वानरानें मला तसें कळविलें असतें तर आपण माझा त्याग केल्याचें कळतांक्षणीं मीं जीविताचा त्याग केला असता; म्हणजे मग जीव धोक्यांत घालून आपणांला युद्धसंबंधीं व्यर्थ श्रम करावे लागले नसते व आपल्या सुहृज्जनांनाहि निष्कारण क्लेश झाले नसते." (६।११६।११-१४) आणि केवळ आत्मविश्वासाचे सामर्थ्यावर तिनें या वेळीं अग्निप्रवेश केला!

वनांतून परत आल्यावर रामानें जो तिचा त्याग केला तोहि तिनें धैर्यानेंच सहन केला. त्या प्रसंगीं आत्महत्या करावी असा विचार एकदां तिचे मनांत आला होता, परंतु भर्त्याचा वंश त्यायोगानें—ती गर्भवती असल्यामुळें—लुप्त होईल, तो होऊं नये यासाठीं तिनें तसा अविचार केला नाहीं.

पूर्वीं तिनें रामाबरोबर अरण्यवास पत्करिला होता, तथापि ती त्या वेळीं पतिसंनिध नित्य असल्यामुळें तिला त्याचें वाईट वाटलें नाहीं. या वेळीं पतीनें तिचा त्याग केला असल्यामुळें शारीरिक व मानसिक असे दोनहि प्रकारचे क्लेश तिला होत होते. आत्महत्या करावयाची नाहीं असा तिनें निश्चय केला होता, तथापि तेथें कोठें तरी राहावयाचें तर कोणीं विचारिल्यास त्याला काय सांगावयाचें हा प्रश्न तिजपुढें येऊन पडला. वाल्मीकि महर्षि तेथें आले व त्यांनीं आपणास सर्व वृत्तांत व तिची शुद्धता माहीत असल्याचें सांगून तिला आपल्या आश्रमांत ठेवून घेतली आणि तिजपुढें पडलेल्या बिकट प्रश्नाचें उत्तर स्वतां सांगण्याचा प्रसंग तिजवर येऊं दिला नाहीं, हें त्यांतल्या त्यांत बरें झालें!

## आचारनिष्ठा.

रामाच्या आचारसंपन्नतेविषयीं स्वतंत्र विवेचन केलें असल्यामुळें सीतेची

आचारसंपन्नता निरूपण केल्यासारखी झाली आहे. तिच्या आचारांविषयीं रामायणांत वेगळें वर्णन असण्याचा संभव नाहीं व तसें असण्याचें कारणहि नाहीं. अरण्यांत असतां ती रामाबरोबर असल्यामुळें तिचे धार्मिक आचार रामाबरोबर होत असल्याचें रामायणांत वर्णन आहे व त्याविषयीं चर्चा पूर्वी येऊन गेली आहे. वियुक्त स्थितींत तिच्या धार्मिक आचारांविषयीं वेगळें वर्णन असण्याचें कारण नाहीं. तथापि पतिव्रता या नात्यानें ती आपले आचार कसे पाळीत असे हें पाहण्यासारखें आहे. पंचवटींत रावण आला त्या वेळीं अतिथि समजून तिनें त्याचा सत्कार केला व त्यानें विचारल्यावरून तिनें सर्व वृत्तांत त्याला निवेदन केला; परंतु त्यानें तिला लंकेंत नेल्यावर प्रथम तो तिजकडे येऊन बोलूं लागला त्या वेळीं तो पापी दृष्टीनें पाहात आहे हें लक्षांत आल्यावर तिनें तोंडावर पदर घेतल्याचें वर्णन आहे. ( ३।५५।३२ ) या वेळीं ती अश्रु ढाळीत असल्यामुळें तिनें तोंडावर पदर घेतला असें मानिलें तरी पुढें ती त्याच्याशीं बोलूं लागली, तेव्हां ती तृण आड धरून बोलूं लागली ( ३।५६।१ ) असें लिहिलें आहे. अशोकवनिकेंत मारुतीनें प्रवेश केल्यावर तो पाहत असतां सीता व रावण यांच्या झालेल्या ज्या संवादाचें वर्णन रामायणांत आलें आहे, त्या वेळीं रावण येत आहे असें पाहून तिनें मांड्यांनीं उदर व बाहूंनीं स्तन झांकून घेतल्याचें लिहिलें आहे. ( ५।१९।३ ) येथेंहि तिनें केलेलें भाषण तृण आड धरून केलें आहे व पुढें तर तिनें त्याजकडे पाठ केली आहे. (५।२१।२) तृण आड धरिल्यामुळें तिजवरील संकट टळलें असें नाहीं किंवा ती त्याजबरोबर निर्भीड बोलत राहिली असती तरी तिच्या पातिव्रत्याविषयीं कोणाला शंका आली असती असें नाहीं; तथापि तिच्या हातीं होती तेवढी मर्यादा तिनें पाळिली हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रावणानें तिला उचलुन नेली व त्यानिमित्त तिला परपुरुषाचा स्पर्श झाला हें खरें; तथापि तिचा उपाय नव्हता. अशा स्थितींतहि तिला त्याविषयीं विषाद वाटत होता. मारुतीशीं अशोकवनिकेंत बोलतांना ती म्हणते, “हे वानरश्रेष्ठा, भर्त्याचे ठायीं अतिशय भक्ति असल्यामुळें त्या रामावांचून दुसऱ्या कोणाच्याहि शरीराला आपण होऊन स्पर्श करण्याची माझी इच्छा नाहीं. रावणाच्या शरीराचा स्पर्श मला झाला आहे खरा; परंतु तो माझ्या इच्छेविरुद्ध

झाला आहे. मी अनाथ, स्वतां असमर्थ आणि पराधीन असल्यामुळें करणार काय?" (५।३७।६२; ६३) मारुतीनें सीतेला "आपल्या खांद्यावर बसून येशील काय?" असा प्रश्न केला होता व त्याची विनंति नाकारतांना तिनें त्याला जीं कारणें सांगितलीं त्यांत हें एक कारण सांगितलें आहे. अशा रीतीनें मारुतीचे द्वारा हा वृत्तांतहि रामाचे कानावर जावा अशी तिची इच्छा होती. याप्रमाणें तिनें आपल्या उत्तरांत दोनहि कार्यें साधिलीं आहेत. युद्धसमाप्ती-नंतर तिनें दिव्य केलें; त्या वेळीं तिनें रामालाहि ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली आहे. (६।११६।८; ९)

## व्यावहारिक धोरण.

सीतेच्या अंगीं रामासारखा प्रशंसनीय गुण म्हटला म्हणजे तिचें धोरण होय. रावण तिला उचलून लंकेकडे घेऊन जात असतां तिनें आपले अलंकार आपल्या उत्तरीयांत बांधून ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीवादि वानर बसलेले पाहून त्यांनीं रामाला आपली वार्ता कळवावी, या हेतूनें टाकिले व हें कार्य रावणाच्या लक्षांत न येईल, अशा युक्तीनें तिनें बजाविलें. तिनें येथें रामाला वार्ता कळेल, अशी योजना केली व म्हणूनच रामाला तिची मुक्तता करण्यासाठीं पुढील उपाय योजितां आले. रावण सीतेला दक्षिणेकडे घेऊन गेल्याचें जटायूकडून रामाला कळलें व तेवढया माहितीवरून तो दक्षिणेकडे तिचा शोध करीत चा-लला होता. येथें आल्यावर व वानरांनीं ठेविलेले अलंकार पाहिल्यावर रावणा-नेंच तिला नेली आणि तेथून पुढें तो दक्षिणेकडे गेला, इतका निश्चय त्याला करितां आला. अलंकार पुढें पडलेले पाहातांच ते कोणी टाकिले, या जिज्ञासेनें वानरांचें लक्ष साहजिक तिजकडे गेलें व त्या वेळीं मारुतीनें तिला पाहिलें होतें, त्याचा उपयोग तो अशोकवनिकेंत गेल्यावर तिला ओळखण्याचे कामीं त्याला झाला. (५।१५।२८) तसेंच वृक्षाला अडकलेलें तिचें वस्त्र त्या वेळीं त्यानें पाहिलें होतें. अशोक वनिकेंत गेल्यावर सीतेनें नेसलेल्या वस्त्राकडे त्याचें लक्ष गेलें व तें पाहून पूर्वीं आपण पाहिलेल्या वस्त्राच्या सादृश्यावरून त्याला आप-णाला इष्ट असलेली सीता हीच असावी, असा निश्चय करितां आला. (५।१५।

४५–४७ ) पण हें सगळें सीतेनें अलंकार वानरांकडे टाकून जें धोरण सांभाळिलें, त्यामुळें घडून आलें.

मारुतीची गांठ पडल्यावर सीतेनें त्याची परीक्षा केल्यावांचून त्याशीं भाषण केलें नाहीं. आपण रामाचा दूत असल्याचें तो जरी सांगत होता, तरी तिनें रामाचे स्वरूपाविषयीं वगैरे खुणा त्याला विचारून घेतल्या व त्या पटल्यावर तो वानर रामाचा दूत असावा, असा तिला विश्वास वाटला. ( ५।३५।८५ ) रामनामांकित मुद्रिका त्यानें पुढें केल्यावर तर शंका घेण्यास अवसर राहिला नाहीं. ( ५।३६।४ ) परीक्षा केल्यावांचून आधीं विश्वासानें आपलें गुह्य प्रकट न करण्याचें सीतेचें धोरण येथें अगदीं रामाप्रमाणें असल्याचें दिसून येत आहे.

मारुतीनें सीतेला आपल्या खांद्यावरून घेऊन जाण्याची जी कल्पना सुचविली ती नाकारतांना परपुरुषाचा स्पर्श न होऊं देण्याचें जें एक कारण सांगितलें, त्याचा उल्लेख वर आला आहे. तिनें आणखी जीं कारणें सांगितलीं त्यांत तिचें व्यावहारिक धोरण दिसून येतें. मारुतीनें तिला खांद्यावरून न्यावयाची ती केवळ भूमीवरून नसून, विशाल सागराचें उल्लंघन त्याला करावयाचें होतें; व यामुळें त्या कामीं समुद्रांत पडण्याचें भय होतें. हा व्यवहार गुप्तपणें करावयाचा होता; पण तो उमगण्यांत आल्यास राक्षसांनीं त्याचा पाठलाग केला असता; व ते सशस्त्र आणि मारुती निःशस्त्र असल्यामुळें या झगड्यांत मारुतीची निभावणी लागणें कठीण होतें. अशा रीतीनें स्वतांचे मुक्ततेकरितां सीतेनें गुप्त कट चालविला आहे, असें उघडकीस आल्यानें रावणानें तिला अत्यंत गुप्त असें स्थान पाहून तेथें ठेविली असती. तेव्हां या खटपटींत जयापेक्षां अपजयाचा संभव अधिक व तो झाल्यावर सुटकेची आशा करावयास नको, अशी एकंदरींत पारिस्थिति होती. आपल्या मुक्ततेविषयीं ती अत्यंत उत्सुक असतां तिनें उतावळेपणामुळें मारुतीचे म्हणण्याला संमति दिली नाहीं. ( ५।३७ ) वरील सर्व कारणें तिनें सांगितलीं व तीं खरीं असलीं तरी त्यांत मारुतीचे सामर्थ्याविषयीं तिचा अविश्वास ध्वनित होत होता व त्याचे योगानें त्याचें मन उद्विग्न होण्याचा संभव आहे, हें लागलींच तिच्या लक्षांत आलें व आपल्या भाषणाचा उपसंहार करीत शेवटीं ती म्हणते, “ सर्व राक्षसांचा वध करण्यास खरोखर

तूंहि समर्थ आहेस; परंतु तूं राक्षसांचा वध केलास, तर रामाचा नांवलौकिक जाईल. ( रामाला स्वतांचे पराक्रमानें सीतेला परत आणितां आलें नाहीं, सुग्रीवाचा सेवक मारुती त्याला मिळाला, म्हणून त्याची स्त्री त्याला परत मिळाली, असें लोक म्हणूं लागतील, असा सीतेच्या म्हणण्याचा आशय आहे. ) राक्षसांसहवर्तमान रावणाचा वध राम येथें (येऊन) करील आणि मला घेऊन जाईल, तर तें त्याला शोभण्यासारखें होईल." (५।३७।५७; ६४ ) येथें तिनें प्रथम मारुतीचा गौरव करून त्याला संतुष्ट केला आहे व त्यालाहि मानवेल असें कारण सांगून तिनें आपलें चातुर्य प्रकट केलें आहे.

## मनाचा उदारपणा.

रावणवधानंतर मारुती सीतेला बोलावण्याकरितां अशोकवनिकेंत गेला, त्या वेळीं तेथें तिच्याभोंवतीं असलेल्या राक्षसींना पाहून मारुतीला त्यांनीं सीतेला दिलेल्या त्रासाचें स्मरण झालें व त्यानें त्या राक्षसींचा वध करण्याची तिजकडे अनुज्ञा मागितली. या प्रसंगीं मारुतीला तर त्यांची खोड जिरविण्याची उत्कट इच्छा झाली होती. त्याला सीतेनें दिलेलें उत्तर तिचे थोर स्वभावाला अनुरूप आहे. ती म्हणाली, " राजाच्या आश्रयाला असल्यामुळें त्याच्या अधीन असून, दुसऱ्याचे आज्ञेमुळें वाईट गोष्टी करणाऱ्या आणि सांगितलेलें काम करणाऱ्या ज्या दासी त्यांच्यावर हे वानरश्रेष्ठा, कोण बरें क्रोध करील ?........राक्षसानें आज्ञा केल्यामुळें राक्षसी मला दरडावीत असत, परंतु हे वायुपुत्रा, त्याचा वध झाल्यावर आतां मला त्या दरडावीत नाहींत. " ( ६।११३।३६; ४० ) राक्षसींनीं तिला दिलेल्या त्रासाचें वर्णन वाचलें तर तें वाचणाराला अजूनहि त्याची चीड आल्यावांचून राहात नाहीं; तेव्हां मारुतीला त्यांना पाहून चीड आली, यांत नवल काय ? परंतु सीतेनें असा अविचार न करितां त्यांना शिक्षा करण्याचें कारण नाहीं, असें मारुतीला वर लिहिल्याप्रमाणें सुचवून ती त्याजबरोबर निघून गेली.

## उपसंहार.

सीतेचें सर्व चरित्र संकटांनीं भरलेलें आहे व सज्जनांवर आलेल्या संकटांचे असे इतिहास वाचूं लागलें म्हणजे मन विषण्ण होतें; पण अशा प्रसंगीं सज्जन

कोणत्या मार्गानें गेले, हें आपणांस कळून एक प्रकारचें धैर्य आपणांस मिळतें, हें विसरतां येत नाहीं. संसाररूपी रथाचीं पति व पत्नी हीं दोन चक्रें आहेत व यासाठीं तीं दोन सर्वथा अनुरूप असलीं तर त्याला गति मिळते व त्यांत विषमता झाल्यास ती थांबते. राम व सीता यांचे चरित्रांत त्यांवर परस्परवियोगाचे प्रसंग आल्यामुळें तीं परस्परांपासून बाह्यतः दूर झालीं असलीं तरी अंतःकरणांतून त्यांचा संबंध अधिक दृढ होत होता. अर्थात् दोन चक्रांतील सादृश्याची आवश्यकता किमपि कमी झाली नव्हती. रामाचे अंगीं जे गुण उत्कटत्वानें वास करीत होते ते सीतेच्याहि अंगीं असल्यामुळें दोघांचा संसार वियुक्त स्थितींतहि अनुकरणीय झाला. राम वनांत जाण्यास निघाला असतां सीता वनांत त्याजबरोबर गेली; यांत पतिव्रता स्त्री या नात्यानें तिचें कर्तव्य तिनें केलें हें तर खरेंच; पण या प्रसंगीं रामाला कैकेयीकडून वरदानाचा वगैरे वृत्तांत कळतांच त्यानें कैकेयीला जितक्या धैर्यानें एकदम संमति दिली तितक्या धैर्यानें सीतेनेंहि रामाला आपण वनांत येणार म्हणून गळ घातली. वनवासांतील कष्टमय राहाणीची जाणीव असतांहि तिनें आपला सविनय आग्रह सोडला नाहीं. संकट आलें तर तें टाळण्यासाठीं हरप्रयत्न करणें हा मनुष्यस्वभाव आहे व या दृष्टीनें या वेळीं सीतेनें कैकेयीच्या वरप्रदानाचे बाबींत असतील तेवढ्या पळवाटा शोधून काढून तसें पतीला सुचविणें साहजिक होतें. सामान्य मनुष्यानें—मग तो पुरुष असो वा स्त्री असो—असेंच केलें असतें; पण अयोध्याकांडांतील राम व सीता या दोहोंच्याहि भाषणांत असा प्रयत्न एकानेंहि केल्याचें दिसून येत नाहीं. उलट अशा प्रयत्नाविषयीं उघडपणें मोठ्या मोठ्या मंडळीनें सुचविलें असतांहि रामानें तसें करण्याचें नाकारून प्रामाणिकपणें प्रतिज्ञापालन करण्याचें ठरविलें व सीतेनें त्याला असंमति दर्शविली नाहीं. पतिपत्नींच्या स्वभावांतील हें सादृश्य कोणाला बरें अभिनंदनीय वाटणार नाहीं ?

वियुक्त स्थितींत त्यांच्या परस्परांवरील प्रेमाच्या परीक्षेचा योग न बोलावितां आला. वैषयिक प्रेम संयुक्त स्थितींत अबाधित असतें, पण विषयसुख हा त्याचे मुळाशीं हेतु असल्यामुळें वियुक्तस्थितींत त्याचा अभाव होतांच प्रेमाचा झरा आटून जातो, हा जगाचा नित्याचा अनुभव आहे. रामानें सीतेकरितां पुष्कळ

विलाप केल्याचें आपण पाहिलें, म्हणजे सामान्य मनुष्याहून त्यामध्यें विशेष कांहीं होतें, असें वाटत नाहीं; पण या विशेषाचा प्रत्यय दोन वेळां त्यानें जो तिचा त्याग केला त्या वेळीं येतो. लोकापवादाकरितां त्यानें तिचा त्याग करण्यांत कठोरपणा दाखविला असें वाटलें तरी वैषयिक सुखलालसेनें संबद्ध झालेला कोणता पुरुष हा कठोरपणा दाखविण्याला तरी पुढें येईल? वैषयिक प्रेम असल्यास असें धैर्य कोणाला होणार नाहीं. त्यांमधील प्रेम निर्हेतुक असल्यामुळें ही गोष्ट शक्य झाली. वियुक्तस्थितींत दोघांची अवस्था सारखी झाली होती. अशा प्रसंगीं प्रत्येक व्यक्तीला आपल्या वियोगानिमित्त दुसऱ्याची अवस्था काय झाली आहे हें जाणण्याची अत्यंत उत्सुकता असते व वियोगामुळें आपल्याप्रमाणेंच दुसऱ्यालाहि कांहीं सुचत नाहीं, असें कळल्यास प्रत्यक्ष भेटीइतकें मनाला एक प्रकारचें समाधान वाटत असतें. सीतेनें याच दृष्टीनें रामाविषयीं मारुतीला प्रश्न विचारिले आहेत. तिचा एक प्रश्न तर स्पष्टपणें "राम दुसरें कांहीं चिंतन करीत नाहीं ना?" (५।३६।२०;२३) असा आहे व यावर मारुतीनें जेव्हां राम निजेंतून उठला तरी 'हा सीते' असें म्हणत उठतो असें सांगितलें, (५।३६।४४) तेव्हां तिचें समाधान होऊन तिला धीर आला आहे. मारुती परत आल्यावर रामानेंहि त्याला सीतेची अवस्था कशी आहे, वगैरे प्रश्न करून (५।६५।५) ती वियोगामुळें कृश झाल्याचें वगैरे त्याजकडून कळल्यावर त्याला बरें वाटलें आहे. (५।६७।७;८) वियुक्तस्थितींत दोघांची अवस्था अगदीं सारखी झाली होती व यामुळें परस्परांचे भेटीविषयीं आतुर होऊन रामाकडून ज्याप्रमाणें वालीवधाचे वेळीं दोष घडला त्याप्रमाणें सीतेकडूनहि लक्ष्मणाची निर्भत्सना करून त्याला रामाचे शोधार्थ पाठविण्यांत दोष घडला. मारीचानें रामासारखा शब्द काढल्यामुळें ती रामाचे जीविताविषयीं साशंक झाली व रामाचे सामर्थ्याविषयीं भरंवसा वाटूनहि तिला ते शब्द ऐकून धीर धरवला नाहीं. अर्थात् लक्ष्मणानें तिला धीर धरण्याविषयीं केलेला उपदेश व्यर्थ गेला व लक्ष्मण जात नाहीं असें तिच्या लक्षांत येऊन तिनें त्याची निर्भत्सना केली. या वेळीं तिजकडून अविचार झाला, हें खरें; तथापि वियुक्तस्थितींत

दोघांची आतुरता कशी सारखी होती, हें यांत दिसून येत आहे व हेंच आम्हांला दाखवावयाचें आहे.

पतिव्रता स्त्री या नात्यानें सीतेचें प्रेम रामावर होतें हें तर सरळ आहे, पण मोठ्या भाग्यानें आपणाला हा सद्गुणी पति लाभला आहे अशी तिच्या अंतःकरणांत दृढ भावना होती व अनसूयेनें ज्या वेळीं तिला पतिव्रताधर्माचा उपदेश केला त्या वेळीं तिला उत्तर देतांना तिनें ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली आहे. ती म्हणते, " आपण मला जें सांगत आहांत तें सदाचरणी स्त्रियांसंबंधानें पाहिलें तर अपूर्व आहे असें नाहीं. कारण स्त्रीचा पति गुरु हें आपल्या उपदेशाप्रमाणें मलाहि विदित आहे. पति जरी दुष्ट व दरिद्री असला तरी माझ्यासारख्या स्त्रीनें त्याच्याशीं एकनिष्ठेनें वागलें पाहिजे. तेव्हां गुणांमुळें प्रशंसेला पात्र, दयाळु, जितेंद्रिय, दृढप्रेम करणारा, धर्मात्मा आणि मातापित्यांप्रमाणें प्रिय असलेला अशा पतीशीं एकनिष्ठेनें वागणें आवश्यक आहे हें काय सांगावयाला पाहिजे ?" ( २।११८।२-४ ) येथें सीतेनें पतिव्रताधर्माला प्रथम मान्यता देऊन रामाचे गुणांची प्रशंसा करून त्याजवरील आपलें प्रेम निर्व्याज असल्याचें सूचित केलें आहे. रामाविषयीं आदरपूर्ण प्रेम व त्याचे पराक्रमावर भरंवसा तिचे अंतःकरणांत दृढ वास करीत असल्यामुळें अशोकवनिकेंत तिला रावणानें नेऊन ठेविल्यावर त्यानें चालविलेल्या छळाला भिऊन तिनें आत्महत्येचा अविचार केला नाहीं. आपण कोठें आहों हें रामाला कळलें नसल्यामुळें आपली मुक्तता होण्यास विलंब लागत आहे, याची जाणीव तिला होती व तीस अनुसरून तिनें राक्षसी तिचे भोंवतीं जमून तिला भिववूं लागल्या असतां त्यांना उत्तर देऊन गप बसविलें आहे. मारुतीची गांठ पडण्यापूर्वींचे तिचें हें भाषण असल्यामुळें त्यांत तिचा रामावरील भरंवसा व्यक्त झाला आहे. ( ५।२६ ) सीतेच्या योग्यतेविषयीं अगस्त्य ऋषींनीं ती पतीबरोबर वनवासांतील क्लेशाची पर्वा न करितां आल्याचें कळतांच जे उद्गार काढिले आहेत ते आतां देऊन आटोपतें घेऊं. ते म्हणाले, " हे रघुनंदना, पतीचें यथास्थित असलें म्हणजे त्याचें चित्तरंजन करावयाचें आणि त्याला विपन्नावस्था प्राप्त झाली असतां त्याची पर्वा करावयाची नाहीं, हा सृष्टीचे आरंभापासून स्त्रियांचा स्वभाव आहे. विद्युल्लतांचा चंच-

लपणा, शस्त्रांचा तीक्ष्णपणा व गरुड आणि वायु यांचीं त्वरा यांचें अनुकरण [ अनुक्रमें एके ठायीं न राहण्यांत, फार दिवसांचें प्रेमबंधन तोडून टाकण्यांत व निंद्य कर्म करण्याला प्रवृत्त होण्यांत ] स्त्रिया करीत असतात. परंतु या तुझ्या स्त्रीचे अंगीं हे दोष नाहींत व यामुळें देवांमध्यें ज्याप्रमाणें अरुन्धती त्याप्रमाणें ही प्रशंसेला पात्र असून पतिव्रता स्त्रियांमध्यें गणना करण्यास योग्य अशी आहे." ( ३।१३।५–७ )

## ७ कौसल्या.

रामाची माता कौसल्या हिचें चरित्र रामाचे वनवासाचे निमित्तानें काय तें रामायणांत आलें आहे. ही दशरथाची सर्वांत वडील स्त्री व अर्थात् ती वयाचे मानानें दशरथाप्रमाणें अगदीं वृद्ध झालेली होती. श्रावणवधाचे कथेंत दशरथानें तिच्याशीं विवाह होण्यापूर्वीं ती कथा घडल्याचें सांगितलें आहे. (२।६३।१४) कैकेयीशीं विवाह झाल्यानंतर राजाचें केकेयी हीच सारसर्वस्व होऊन बसली; व यामुळें इतर स्त्रियांच्या मनांत तिचेविषयीं द्वेषभाव वाढत होता. रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें राजानें ठरविल्यावर हें वृत्त राजाकडून रामाला व रामाकडून कौसल्येला कळलें; आणि कैकेयीला कळविण्यास मात्र राजा स्वतां गेला. या भेटींत पुढें काय निष्पन्न झालें, तें प्रसिद्धच आहे. राम कौसल्येचा पुत्र असून त्याचे राज्याभिषेकाचें वर्तमान तिला स्वतां कळविण्याची आवश्यकता राजाला वाटली नाहीं. या त्याच्या व्यवहारावरून त्यांमध्यें प्रेमभाव किती होता, तें दिसतेंच आहे. कैकेयी कांहीं ऐकत नाहीं, असें होऊन राम वनांत गेल्यावर मग राजाची स्वारी कौसल्येच्या मंदिरांत आली. कैकेयीशीं विवाह झाल्यानंतर राजाचें कौसल्येवरील प्रेम कमी झालें, असें नसून तिचेपूर्वीं ज्या अनेक स्त्रियांशीं त्यानें विवाह केले त्या सर्व स्त्रियांनीं हा प्रेमाचा वांटा थोडा थोडा उचलला होता. वृद्ध राजा तरुण स्त्रीशीं विवाह करून तिचे नादाला लागला यामुळें तिला जरी वैषम्य वाटलें, तरी आपला पुत्र राम सद्गुणी असून तो राज्यकारभार करणार या आशेनें पतीविषयीं ती पुढें पुढें सामान्यतः उदासीन होती. सांप्रतच्या तिच्या उदासीनतेला तिचें वार्धक्य हेंहि एक कारण होतें. राज्याभिषेकाचा विचार ठरला तोंपर्यंत तिची कैकेयीशीं वागणूक वडील बहिणीप्रमाणें होती. भरत

मातुलगृहाहून परत आल्यावर त्याला इकडील वृत्तांत जेव्हां कळला तेव्हां मातेची निर्भर्त्सना करितांना तो म्हणतो "ती दूरवर विचार करून पाहाणारी माझी ज्येष्ठ माता कौसल्याहि धर्माचें अवलंबन करून तुझ्याशीं अगदीं बहिणी-प्रमाणें वागत असते." (२।७३।१०) कौसल्येचा कैकेयीशीं तोंपर्यंत असलेला व्यवहार पाहून त्यावरून भरतानें ही उपमा दिली आहे. तथापि यावरून ती कैकेयीशीं प्रेमानें वागत होती, असें म्हणतां यावयाचें नाहीं. आपल्यावरील पतीचे प्रेमाचा वांटा सवतीनें उचललेला कळूनहि तिला वैषम्य न वाटणें मनुष्य-स्वभावाचे विरुद्ध आहे. कौसल्याहि त्याला अपवाद होती, असें म्हणण्याचें कारण तरी काय? निरुपाय म्हणून ती उदासीनवृत्तीनें वागत असे, व यामुळें तिचे अंतःकरणांतील खळबळ बाहेर पडत नसे. कांहीं असलें तरी द्वेषाचा अभाव म्हणजे प्रेम नव्हे. भरतानें तिचे उदासीनवृत्तीकडे पाहून तिचा गौरवपूर्ण उल्लेख केला, इतकेंच. कैकेयी किंवा तिचा परिवार यांकडून तिचा वारंवार अपमान होत असे, (२।२०।३९) व कैकेयी तिला मर्मभेदक शब्दांनीं टोंचीत असे (२।२०।४४). अशा परिस्थितींत तिची सर्व आशा पुत्रावर होती व त्या आशेची कैकेयीनें निराशा केल्यामुळें ती अगदीं घाबरून गेली. वनवासाची मुदत संपून राम परत येणार कसचा? परत आला तरी भरत त्याला राज्य देणार कसचा? (२।६१।११) असें तिला वाटूं लागलें व तिला असें वाटणें साहजिक आहे. राम तिजकडे अनुज्ञा मागण्याकरितां आला असतां लक्ष्मणानें पित्याचा निग्रह करून राज्य बळकावण्याचा उपाय सुचविला त्या वेळीं कौसल्येनें त्याला यासाठीं प्रच्छन्न संमतिच दिली आहे. (२।२१।२१) या वेळेपर्यंत या कामीं राजाची मनांतून संमति नाहीं, हें तिला कळलें नव्हतें व यामुळें यौवराज्याभिषेकाचे कामीं कैकेयीच्या सांगण्यावरून राजाचा विचार बदलला अशी तिची समजूत होती. पति किंवा पुत्र यांपैकीं कोणाकडूनहि सुख होण्याचा संभव नाहीं असें तिला कळून चुकलें व निरुपाय म्हणून तिनें लक्ष्मणाचे बोलण्याला मान डोलविली. या एकंदर परिस्थितीवरून दशरथाचें तिजवर कितपत लक्ष होतें हें कळून येईल. लक्ष्मण वनांत येतों असें सांगूं लागला

असतां याच दृष्टीनें रामानें त्याला आपण सर्वच वनांत गेल्यास आपल्या मातेची विचारपूस कोणी करणार नाहीं असें सांगितलें आहे. (२।३१।११)

याप्रमाणें कौसल्येचें अंतःकरण भोंवतालच्या परिस्थितींत अगदीं वैतागून गेलें होतें, तरी ती मनाची कोमल होती. लक्ष्मणाचे म्हणण्याला तिनें निरुपायानें संमति दिली असावी. राम वनांत गेल्यावर ती राजाला टोंचून बोलूं लागली असली तरी राजानें ज्या वेळीं अगदीं केंविलवाणा होऊन तिला हात जोडले त्या वेळीं ती भानावर आली व अश्रु ढाळीत म्हणाली–"आपण कृपा करा.....माझी प्रार्थना करण्याचा प्रसंग आपणांवर आला हा माझा घातच झाला आहे. आपण माझी क्षमा मागतां नये.....हे धर्मज्ञा, मला पातिव्रत्यार्थ अवगत असून आपण सत्यवचनी आहांत हें मी जाणत आहें. पुत्रशोकानें व्याकुल झाल्यामुळें तें मी कांहीं तरी बोलून गेलें." (२।६२।१२-१४)

रामाला परत आणण्याकरितां भरत सपरिवार अरण्यांत गेला, त्या वेळीं मार्गांत गुहाची गांठ पडून त्यानें रामाचा वृत्तांत त्याला सर्व निवेदन केला; तो श्रवण करून त्याचें देहभान नाहींसें होऊन तो मूर्च्छित होऊन पडला. या वेळीं कौसल्या कळवळून पुढें आली; तिनें त्याला पोटाशीं धरिलें व म्हणाली, "हे पुत्रा, तुला कांहीं व्याधि तर झाली नाहींना? अरे, आज या राजकुलाचें अस्तित्व तुजवर आहे. हे पुत्रा, भ्रात्यासहवर्तमान राम वनांत गेला असतां तुझ्याकडे पाहून मी प्राण धारण करीत आहें व राजा दशरथ मरण पावल्यावर आतां आमचें रक्षण करणारा तूंच आहेस." (२।८७।९; १०) दोनहि प्रसंगींच्या तिच्या वागणुकीवरून केव्हां केव्हां निरुपाय होऊन ती कठोरपणें बोलली तरी अंतःकरणाची ती कठोर नसून अल्पशा परदुःखानें तिला कळवळा येत असे, असें स्पष्ट दिसतें.

कौसल्येच्या विद्वत्तेविषयीं रामायणकालीन स्त्रियांविषयीं विवेचन करितांना निरूपण केलें असल्यामुळें येथें आतां अधिक लिहिण्याचें कारण नाहीं. पतिसुख नसून सवतींकडून जाच होत असतां ती उदासीन वृत्तीनें राहात असे व तिच्या या वृत्तीचा परिणाम रामचरित्रावर बराच झाला. कुटुंबांतील वागणुकीचा धडा रामाला प्रथम मातेकडून मिळाला व तोच रामानें अभ्यासाचे योगानें वाढ-

विला. लहानपणीं मुलाला जें वळण लागावयाचें तें प्राय: मातेकडून लागतें व त्याचा परिणाम शेवटपर्यंत टिकतो. वृद्धपणीं झालेले पुत्र या नात्यानें राजाचा सहवासहि त्यांना बराच असावयाचा, हें उघड आहे; तथापि त्याचे सहवासांत विद्या व व्यवहार यांचें शिक्षण मिळण्याचा संभव अधिक व त्याप्रमाणें त्यांना तें मिळालें; तथापि राज्यावर पाणी सोडण्याचा प्रसंग आला तरी त्यांत जर स्वधर्मपालन होत आहे, तर तें स्वसुखाविषयीं निरभिलाष होऊन करावयाचें हा जो रामाचा निर्धार अगदीं तरुणपणीं दिसून आला, त्याचें मूळ कौसल्येच्या वृत्तींतच आहे. राजा दशरथ पराक्रमी व व्यवहारचतुर होता आणि ते गुण रामाचे अंगींहि होते; तथापि रामाचे चरित्राला आलेलें महत्त्व या गुणांनीं आलेलें नसून तें त्याच्या धर्मपरतेनें आलें आहे. हा गुण दशरथाचे अंगीं नसून कौसल्येचे अंगीं होता व तोच रामाला तिचेकडून प्राप्त झाला. एकंदरींत कौसल्या ही रामाची केवळ माता म्हणूनच तिला महत्त्व आलें आहे, असें नसून रामाला आचरण सांगणारा त्याचा एक गुरु या नात्यानें तिचें चरित्र स्वभावत: महत्त्वाचें आहे.

## ८ सुमित्रा.

सुमित्रा ही लक्ष्मण व शत्रुघ्न यांची माता. लक्ष्मण रामाबरोबर वनांत गेला त्या वेळीं तिनें त्याला संमति दिली एवढाच काय तो रामायणांत तिचे चरित्राचा भाग आला आहे. तथापि हा उपदेश पाहिला म्हणजे तिच्या योग्यतेची तेवढ्यावरून कल्पना होते व तिचें साग्र चरित्र उपलब्ध नाहीं याचा खेद वाटूं लागतो. परिस्थितीविषयीं विचार केला तर कौसल्येपेक्षां तिची स्थिति बरी होती असें नाहीं. कैकेयीशीं राजाचा संबंध झाल्यापासून पतिसुखाला इतर सर्व स्त्रिया मुकल्या होत्या त्यांतच हिची गणना होती. आपल्या पुत्राचा राज्यावर अधिकार आहे याची जाणीव कौसल्येला होती व त्या आशेवर ती कालक्रमणा करीत असे. पण सुमित्रेला तीहि आशा नव्हती. वयानें ती कैकेयीपेक्षां मोठी होती, हें उघड आहे. तथापि कौसल्येहून फार लहान नसावी. पतिसुखाचा अभाव दोघींना सारखा असल्यामुळें या बाबीपुरती त्यांची स्थिति सारखी होती आणि यामुळें व व वयानेंहि बरोबरीच्या असल्यामुळें त्यांचें विशेष सख्य असावें असें वाटतें.

तिचें माहेर कोठें होतें वगैरे माहिती रामायणांत नाहीं व तें घराणेंहि मोठें दिसत नाहीं. कौसल्येला माहेराकडून एक हजार गांवांची देणगी मिळालेली होती तसा हिला माहेरचा कांहीं आधार होता असें वाटत नाहीं. आपण दोघेहि वनांत गेल्यास मातांची विचारपूस कोण करील? असा प्रश्न रामानें केला असतां लक्ष्मणानें कौसल्येला मिळालेल्या वरील देणगीचा उल्लेख करून ती स्वतांचें व आपल्या मातेचें पोषण करण्यास समर्थ आहे, असें सांगितलें आहे. ( २।३१-२२-२३ ) यावरून ती या कामीं कौसल्येवर अवलंबून होती हें उघड आहे. तिची अशी स्थिति असतां ती त्यामुळें उदासीन अथवा वैतागलेली नव्हती. कौसल्या आणि सुमित्रा यांचे स्वभावांतील हा भेद महत्त्वाचा आहे. वनांत जाण्यास अनुज्ञा मागण्यासाठीं त्यांचे पुत्र त्यांजकडे आले त्या वेळचीं दोघींचीं भाषणें एकत्र वाचावीं म्हणजे हा भेद लक्षांत येईल कौसल्येप्रमाणें सुमित्रेला आपला पुत्र वनवासाची मुदत संपून परत कसचा येणार अशी निराशा वाटली नाहीं. सवतीकडून—कैकेयीकडून—आपणाला त्रास होईल अशी शंका तिला आली नाहीं. वनांतील कष्टमय राहणीचा तिला बाऊ वाटला नाहीं. कैकेयीच्या वरप्रदानाप्रमाणें राम जावयाचा हें सरळ आहे, पण हें नसतें संकट आपल्या अंगावर घ्या कशाला? असा पोक्त विचार तिनें केला नाहीं. किंवा शत्रुघ्न तेथें नाहीं यासाठीं त्याचा विचार घेण्याचे सबबीवर ती कालहरण करीत राहिली नाहीं. तर लक्ष्मणानें ज्या तडफेनें रामाकडे आपण बरोबर येत असल्याचें सांगितलें, त्याच तडफेनें तिनें आपली संमति त्याला दिली. स्वतांच्या स्थितीची तिला जाणीव होती, पण त्याचविषयीं मनांत सदोदित विचार करीत राहून, ज्याविषयीं उपाय चालण्यासारखा नाहीं त्याविषयीं उगाच त्रास करून घेण्याची तिला संवय नव्हती. दोघींच्या स्वभावांतील या भेदामुळें एकाच परिस्थितींत एक उदासीन तर दुसरी उत्साही आहे. वनवासाचें व्रत पुरें करून राम व लक्ष्मण परत येणार असा तिचा दृढ विश्वास होता व कौसल्या ' पुत्राला वनांतील क्लेश कसे सहन होतील?' ( २।४३।८ ) वगैरे शंका घेऊन राजाशीं बसून शोक करीत असतां सुमित्रा तिचें सांत्वन करीत म्हणते, " आपली कीर्तिरूप पताका जो प्रभु या जगतावर निरंतर फडकावीत आहे, त्या तुझ्या धर्मस्वरूप व सत्यव्रत-

निष्ठ पुत्राला काय बरें प्राप्त होण्याचें राहिलें आहे? रामाचा उघड उघड असलेला निर्मलपणा व सर्वोत्कृष्ट मोठेपणा जाणून सूर्य त्याला आपल्या किरणांचे योगानें ताप देणार नाहीं. वनांतून वाहणारा व आवश्यक तितका शीत व उष्ण असलेला सर्व कल्याणकारक आणि सुखावह वायु रामाची सेवा करील. निष्पाप राम रात्रीं निजला असतां पिता जसा पुत्राला पोटाशीं कवटाळून धरितो त्याप्रमाणें संतापहारक व शीतल असा चंद्रमा आपल्या किरणांनीं स्पर्श करून त्याला आनंद होईल." ( २।४४।७, १० ) वनवास करावयाचा म्हणजे रामाला तेथें कसें रहावें लागणार याची दोघींची कल्पना अगदीं सारखी आहे. दिवसां त्याला उन्हांतून फिरावें लागणार आणि रात्रीं उघड्यावर निजावें लागणार, या त्याच्या स्थितीविषयीं दोघींचा मतभेद नाहीं. मात्र एकीनें राजवैभवाला अनुचित म्हणून तीविषयीं खेद व्यक्त केला आहे तर दुसरीनें तिचेंच रसभरित वर्णन करून तो खेद दूर करण्याचा यत्न केला आहे. प्राप्त परिस्थितींत समाधान मानून संकटाशीं टक्कर देत खऱ्या मार्गानें जाणें ही संसारांतील सुखाची गुरुकिल्ली असून ती सुमित्रेनें प्राप्त करून घेतली होती, असें यावरून उघड दिसून येतें.

## ९ कैकेयी.

कैकेयी ही दशरथाची सर्वांहून कनिष्ठ स्त्री. रामाचे वनवासाला कारण झाली यामुळें तिचें नांव सर्वतोमुखीं आहे. तिच्या दोघी सवतींप्रमाणें तिचे चरित्रांतील एवढाच भाग रामायणांत आहे. वृद्ध पुरुषाची तरुण स्त्री या नात्यानें तिचें चरित्र असावयाचें तसेंच आहे. राजा तिला अगदीं भुलून गेला होता व यामुळें सर्व वडील सवतींशीं ती अभिमानानें वागूं लागली. तिचे अभिमानाचें पर्यवसान परस्परद्वेषांत झालें. सर्व राजपुत्रांमध्यें प्रेमभाव असल्यामुळें वरील सवतीमत्सराला व्यक्तस्वरूप आलें नव्हतें. आणि राजाचे विचाराप्रमाणें रामाला युवराज करण्यांत आलें असतें तर तें कदाचित् पुढेंहि आलें नसतें. कैकेयीनें मध्यें विघ्न केल्यामुळें त्याला एकदम ऊत आला. भरद्वाज मुनींना आपल्या मातांची ओळख करून देतांना भरतानें तिचें वर्णन "क्रुद्ध, अविचारी, गर्विष्ठ, स्वतांला भाग्यवती मानणारी, ऐश्वर्यलुब्ध, दुर्जन असून सज्जनासारखी दिसत असलेली,

दुष्ट आणि पापबुद्धि " असें केलें आहे. ( २।९२।९६ ) भरताला तिचेविषयीं या वेळीं क्रोध आला असल्यामुळें त्यानें केलेल्या या वर्णनांत अत्युक्ति असण्याचा संभव आहे, हें खरें; तथापि तें सर्वथा असत्य नव्हे. एवढा सार्वभौम राजा, पण आपल्याकडे वरचेवर येतो, आपल्या मंदिरांत आशाळभूतासारखा पडलेला असतो, आपल्या तोंडांतून बाहेर पडेल तो शब्द झेलून धरितो इतकें तिचे मनाला पटल्यावर तिला तरी अभिमान कां वाटूं नये? अभिमान आला असतां त्याबरोबर त्याचे सवंगडी अविचार आणि क्रोध यावयाचे व यांचें मिश्रण झाल्यावर मनुष्याचे हातून पापकर्म होत जावयाचें, हें क्रमप्राप्त आहे. भरतानें केलेल्या वरील वर्णनाकडे पाहिल्यास त्यांत याहून अधिक काय मिळणार आहे? तिच्या अंगीं असलेले हे गुण राजाच्या मात्र मुळींच लक्षांत आले नाहींत. आणि याचें कारण उघड आहे. त्या गुणांची अभिवृद्धि होण्यास ही स्थितिच कारण होती. तिनें ज्या वेळीं राजाला वरदानाचे पेंचांत धरून रामाचे यौवराज्याभिषेकाला विघ्न आणिलें, त्या वेळीं आपण कोठें चुकलों हें राजाच्या लक्षांत आलें. " हे पापिणी, न कळत जसा एकाद्यानें आपल्या गळ्याला फांस लावून घ्यावा, तसें मीं पाप्यानें तुला खरोखर पुष्कळ दिवस जतन करून ठेविलें. हातानें कृष्णसर्पाला स्पर्श करणाऱ्या बालाप्रमाणें तुझ्यासहवर्तमान मी रममाण होत असतां तूं मृत्यु आहेस हें माझ्या लक्षांत आलें नाहीं. " ( २।१२।८०, ८१) याप्रमाणें राजानें अनुतप्त होऊन त्या वेळीं उद्गार काढिले! पण वेळ टळून गेल्यानंतर झालेल्या या ज्ञानाचा उपयोग काय?

कैकेयीच्या अंगीं वरील गुण उत्कटत्वानें वसत असून त्यामुळें जरी तिनें आपल्या पुत्राला राज्य प्राप्त व्हावें म्हणून खटपट केली, तरी ती कारस्थानी किंवा कुटिल होती, असें म्हणतां येत नाहीं. तिला राजमाता म्हणून मिरविण्याची महत्त्वाकांक्षा होती व राजाची आवडती स्त्री या नात्यानें तिनें आपल्या सवतींचा अपमान करण्यास कमी केलें नाहीं, हें खरें; तथापि या कामीं सिद्धि प्राप्त होण्यास आवश्यक असलेलें बुद्धिचातुर्य तिचे अंगीं नव्हतें. तिनें सर्व व्यवहार भाडोत्री सेवकाप्रमाणें केला. तिच्या विवाहाचे वेळीं तिचे पित्यानें वास्तविक या विषयींची योजना करून ठेविली असतां तिचा तिला मागमूसहि

नसावा यांतच तिचें बुद्धिमांद्य दिसून येतें. रामाचे यौवराज्याभिषेकाची वार्ताहि तिला मंथरेनें सांगितली तेव्हां कळली. राजा तिजकडे निरंतर येत असतां त्याचे बोलण्याचालण्यावरून तिला त्यासंबंधानें कांहीं सुगावा लागूं नये, हें आश्चर्य होय. कारण राजानें हा विचार रात्रीं ठरविला व उजाडल्यावर निश्चित केला, असें झालें नाहीं. त्याकरितां त्यानें मांडलिक, नागरिक वगैरे लोकांना बोलावून आणून त्यांची सभा भरविली व त्यांची संमति घेतली. अर्थात् त्या दिवसांत तो अयोध्येंतील लोकांच्या चर्चेचा विषय झाला असला पाहिजे. मग त्याचा प्रवेश कैकेयीचे मंदिरांत मात्र कां होऊं नये? अयोध्यानगरी अलंकृत केलेली पाहून मंथरेला शंका आली व तिनें शोध केल्यावर तिला त्याचें कारण समजलें, असें रामायणांत लिहिलें आहे. म्हणजे गांवांत उत्सव होऊं लागल्यावर मंथरेकडून ही वार्ता कैकेयीपर्यंत पोंचली. राजाला कैकेयीकडून विघ्न येण्यापेक्षां तिचे पित्याकडून तें येण्याची भीति होती व यासाठीं तिचे पित्यापर्यंत ही वार्ता जाऊं नये म्हणून त्यानें त्याला सभेकरितां बोलावणें पाठविलें नाहीं. कैकेयीपासून ही योजना गुप्त ठेवण्याचा त्याचा हेतु नव्हता व त्यास अनुसरून तो तिजकडे हें आनंदवृत्त कळविण्याकरितां म्हणून आला. मंथरेकडून तिला ही वार्ता कळल्या-वरहि तिनें तिला बक्षीस देऊं केलें. यावरून तोंपर्यंत तरी तिचे मनांत कपट नव्हतें, हें उघड आहे. मंथरेनें पुढील स्थितीचें चित्र रेखाटून तिचा बुद्धिभेद केला. स्वतां असलें कारस्थान करण्याइतकी तिला बुद्धिच नव्हती, हें यावरून वाचकांचे लक्षांत येईल. भरतानें तिची निर्भर्त्सना केल्यावर तिचा सारा व्यूह ढांसळला. राजा मरण पावल्यावर भरताला आपली योजना आपणाकडून आधीं कळविण्याची व्यवस्था करणें तिचे करस्थानाचे दृष्टीनें इष्ट होतें. तसें तिनें केलें नाहीं, हेंहि तिच्या बुद्धिमांद्याचें द्योतक होय. भरताचें प्रतिकूल मत कळल्यावर निरुपाय होऊन निदान ती उदासीनपणें वागावयाची, परंतु रामाला परत आणण्यासाठीं भरतानें सपरिवार वनांत जावयाचें ठरविल्यावर त्या मंडळींत ती आनंदानें समाविष्ट झाली. पुढील श्लोक पहा:—

**कैकेयी च सुमित्रा च कौसल्या च यशस्विनी ।**
**रामानयनसंतुष्टा ययुर्यानेन भास्वता ॥२।८३।६॥**

"कैकेयी, सुमित्रा व यशस्विनी कौसल्या रामाला परत आणावयाचें ऐकून संतुष्ट झाल्या व उज्ज्वल रथांत बसून निघाल्या."

एकंदरींत तिचे अंगीं अभिमानादि कित्येक अवगुण असले तरी रामाला वनांत पाठविण्याचे कामीं ती निमित्तमात्र झाली असून हा कांहीं तिचे स्वभावांतील उपजत दोष नव्हे.

## १०-११ सुग्रीव व बिभीषण.

रामायणांतील पात्रांचे गुणदोषांविषयींचें विवेचन येथपर्यंत केलेलें पाहिलें असतां यांत बहुतेक प्रमुख पात्रें येऊन गेलीं आहेत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. कांहीं पात्रें राहिलीं असलीं तरी त्यांचा संबंध रामायणांत त्यांनीं केलेल्या कार्यापुरता आला आहे व तीं कार्यें लोकांपुढें व्यक्त असल्यानें त्यांविषयीं अधिक विवेचन करावयाची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. हीं राहिलेलीं पात्रें म्हटलीं म्हणजे मारुती, सुग्रीव व बिभीषण हीं होत. यांपैकीं सुग्रीव व बिभीषण यांनीं उघडपणें मोबदला घेऊन रामाला साहाय्य केलें आहे. त्यांच्या साहाय्यामुळें रामाचें कार्य सत्वर झालें हें खरें; तथापि त्यांचें साहाय्य या कामीं झालें असा गौरवपूर्ण उल्लेख करण्यापलीकडे, तें सहेतुक असल्यामुळें, त्याला महत्त्व नाहीं. मारुतीनें सुग्रीवाचा सेवक या नात्यानें कामें केलीं, रामाशीं त्याचा स्वतंत्रपणें संबंध नाहीं; तथापि सुग्रीवाकडून मिळालेल्या साहाय्यांत त्याच्या कामगिरीचा अंतर्भाव करितां येण्यासारखा नाहीं आणि यासाठीं सुग्रीवाचें साहाय्य त्याचा उल्लेख करण्यापलीकडे महत्त्वाचें नाहीं, असें वर म्हटलें आहे.

रामायणांत बंधुबंधूंच्या तीन जोड्या आहेत व या तिघांच्या तीन तऱ्हा आहेत. राम व भरत ही जोडी ह्यांपैकीं एक असून प्रेम व स्वार्थत्याग या दोन गुणांत ते एकमेकांवर मात करीत आहेत. बिभीषण व रावण या दुसऱ्या जोडींतील रावण अत्यंत दुराचारी, पण पराक्रमी असून त्याचा बंधु बिभीषण त्याला सीता परत देण्याचा उपदेश करीत असतां तो ऐकत नाहीं असें पाहून त्यानें त्याचा त्याग केला आहे व तो उघडउघड शत्रुपक्षास येऊन मिळाला आहे. तिसरी जोडी वाली व सुग्रीव यांची. यांनीं एकमेकांच्या बायका उपटल्या व यांत वैर उत्पन्न होऊन वाढतां वाढतां त्याचें पर्यवसान एकाकडून दुसऱ्याचा

वध होण्यांत झालें. म्हणजे या तीन जोड्या अशा आहेत कीं, त्या एकमेकांशीं आणून त्यांची तुलना करावी अशी त्यांमध्यें पात्रताच नाहीं. वाली व सुग्रीव यांमधील द्वेष पूर्वीपासून तरी होता व त्या द्वेषानिमित्त सुग्रीवानें रामाचें साहाय्य घेऊन वालीचा सूड घेतला, असें म्हणतां येईल. रावण व बिभीषण यांमध्यें पूर्वी द्वेष नव्हता. पण रावण तर पूर्वीपासून दुराचाराविषयीं प्रसिद्ध होता; बिभीषण पूर्वीपासून त्याला उपदेश करीत होता किंवा काय हें कळत नाहीं आणि तो करीत असून तो ऐकत नसे असें मानिलें तरी याच वेळीं त्याचा क्रोध शत्रूला जाऊन मिळण्याइतका अनावर कां व्हावा, अशी शंका येते; व तिचा परिहार करण्यासारखें प्रमाण रामायणांत मिळत नाहीं. रावणाचे दुष्कृत्याचें पर्यवसान युद्धांत झालें व त्याचा परिणाम सर्वनाशांत होण्याचा संभव त्याला दिसूं लागला, तेव्हां असत्यपक्षाचा त्याग करण्याचे हेतू-पेक्षां स्वतांचें संरक्षण व्हावें या हेतूनें तो शत्रुपक्षाकडे आला. त्यानें स्वार्थाकडे लक्ष देऊं नये, किंवा तसें त्यानें लक्ष दिलें हा त्याचा अक्षम्य अपराध होय, असें येथें आमचें म्हणणें नाहीं; तर त्याचा खरा हेतु उघड करून दाखविणें हाच आमचा उद्देश आहे. रावणानें स्वतांचे वर्तनानें पुष्कळ शत्रु निर्माण करून ठेविले होते व असत्पक्ष सोडण्याची बिभीषणाची खरी मनीषा असती तर रावणाला सोडून या वेळेपर्यंत किती तरी काल निघून गेला असता! किंवा रावणाचे शत्रूंत गणना झाल्यामुळें कदाचित् इतरांबरोबर त्याचा नाश झाला असता. पण या वेळेपर्यंत रावणाचा त्याग न करण्यांत त्यानें स्वार्थाविषयीं जो सावधपणा दाखविला तोच त्यानें या वेळीं त्याचा त्याग करून शत्रूला मिळण्यांत व्यक्त केला. रावणाचा त्याग करून तो उदासीन राहिला असता तर स्वसंरक्षणा-हून त्याला अधिक लाभ झाला नसता. शत्रूला जाऊन मिळण्यानें युद्धांत त्याला जातीनें भाग घ्यावा लागला, पण त्याला त्यानिमित्त राज्यपदाची प्राप्ति झाली. त्यानें स्वार्थासाठीं मनुष्यस्वभावानुरूप करावयाचें तें वेळीं केलें व या दृष्टीनें त्याचा सावधानपणा युक्त होय. नीतिदृष्ट्या त्यानें प्रशंसनीय आचरण केलें असें वाखाणण्यासारखें मात्र त्याचे वर्तनांत कांहीं नाहीं.

## १२ मारुती.

मारुतीची कामगिरी मात्र याहून वेगळी आहे. सुग्रीव—आपला यजमान—याची वालीपासून मुक्तता व्हावी, या हेतूनें रामाचें साहाय्य मिळविण्यासाठीं तो रामाकडे आला. अर्थात् त्यांत त्याला स्वतांला कांहीं लाभ नव्हता. याच कामासाठीं सुग्रीवानें रामाला दिलेल्या वचनाप्रमाणें तो सीताशुद्ध्यर्थ गेला व सर्वांनीं हातपाय गाळले असतां त्यानें एकट्यानें, पूर्वीं त्यांचेपैकीं कोणीं न केलेलें समुद्रोल्लंघनाचें धाडस केलें. पुढें त्यानें युद्धामध्येंहि प्रामुख्यानें भाग घेतला; आणि अशा रीतीनें कामगिरी करून स्वतांसाठीं कांहीं लाभ जोडण्याची त्यानें अपेक्षा केली नाहीं व त्याला खरोखर कांहीं लाभ झाला नाहीं. सुग्रीव वालिवधानंतर कामोपभोगांत दंग होऊन त्याला प्रतिज्ञेचें विस्मरण झालें असतां त्याला सावधपणाची सूचना देऊन मारुतीनें मंत्री या नात्याची अभिनंदनीय कामगिरी बजाविली व या त्याच्या मंत्रिपदप्रात्रतेला अनुसरून पुढें कित्येक महत्त्वाचीं कामें रामानें त्यावर सोंपविलीं आणि तीं त्यानें पार पाडिलीं. या त्याच्या निर्हेतुक सेवेनिमित्त राम, लक्ष्मण व सीता या त्रयींच्या बरोबर त्याचा जयजयकार लोकांत होत असतो, तो सर्वथा युक्त होय. रामायणांतील वानरांविषयीं विवेचन कारितांना बरींच अनुमानें मारुतीचे कामगिरीवरून अथवा उद्गारांवरून केलीं आहेत व यासाठीं त्याविषयीं येथें स्वतंत्र विवेचन केलेलें नाहीं.

## १३ रावण.

आतां राहिलेलें प्रमुख पात्र रावण होय. त्याचे गुणदोष व चरित्र प्रसिद्ध आहे आणि यासाठीं त्याचे चरित्राविषयीं विवेचन करण्यापेक्षां त्याचा शेवट ज्या प्रकारें झाला, त्यावरून आपण काय बोध घ्यावयाचा, तें पाहणें अधिक इष्ट वाटतें. तो तपस्वी व पराक्रमी पुरुष असून त्यानें विपुल वैभव संपादन केलें होतें. किंबहुना त्या कालाचे दृष्टीनें त्यानें वैभवाचें शिखर गांठलें होतें, असें म्हणावयास अडचण नाहीं. व्यवहारामध्यें आपण पर्वतावर चढून गेलों व शिखरावर जाऊन बसलों म्हणजे त्यापुढें वर चढण्याचें राहिलें नाहीं, असा मनाचा निश्चय होऊन खालची शोभा पाहाण्याची इच्छा सहज होते; आणि त्याप्रमाणें शोभा पाहात तेथें कांहीं काल राहिलों, तरी स्थिरता हा स्वभावधर्म नसल्यामुळें चालू

लागलों असतां आल्या मार्गानें अथवा दुसऱ्या मार्गानें आपोआप खालीं येऊं लागतों. खालीं उतरतांनाहि मार्ग सांपडल्यास त्रास होत नाहीं आणि खालीं येण्याची इच्छा नसल्यास वर चढण्याचा प्रयत्न मधूनहि करितां येतो; आणि असा मार्ग न सांपडल्यास एकदम कडेलोट होऊन चुराडा होण्याची भीति असते. तोच प्रकार वैभवाचे कामीं अनुभवास येत असतो.

रावणाचा अधःपात अशा प्रकारचा झाला. त्याची तपश्चर्या, बुद्धिबल व पराक्रम पाहूं गेलें तर अपूर्व होते व त्यांस अनुसरून असें वैभव त्याला प्राप्त झालें होतें. या सर्वांना जर नीतिबलाची जोड मिळाली असती, तर त्याची अवतारी पुरुषांत गणना झाली असती; परंतु त्याला प्राप्त झालेल्या साधनांचा त्यानें दुरुपयोग केला. तपस्विजनांना त्रास देणें व स्त्रियांवर बलात्कार करणें यांत त्याचें पुढील सारें आयुष्य वेंचलें गेलें. त्याला राज्य प्राप्त झालें तें परंपरया त्याजकडे आलें नसून तें त्यानें पराक्रमानें मिळविलें व पुढें पुष्कळ राजांशीं त्यानें युद्धें केलीं. येथपर्यंत त्याचे प्रयत्न वैभवाप्रीत्यर्थ होते. यापुढील स्थिरतेच्या कालांत त्यानें वरील अनाचारांवांचून दुसरें कांहीं केलें नाहीं. आपल्यावांचून दुसरा कोणी पराक्रमी जगांत राहिला नाहीं, अशी त्याची भावना झाली व त्याची अत्याचाराकडे प्रवृत्ति होऊन तीच समूळ नाश होण्यास कारण झाली. कर्म केल्यावर त्याचें फल कधींना कधीं तरी भोगावें लागतें, हा निसर्गधर्म होय व त्याप्रमाणें रावणाला त्याच्या कर्माचें फल भोगावें लागलें, हें खरें; तथापि त्याचें कर्म अत्युत्कट झाल्यामुळें तें फल त्याला सत्वर प्राप्त झालें. इतर राक्षसांकडून अत्याचार होत होते आणि विषयलंपटता पाहिली तर राजा दशरथ कांहीं कमी होता, असें नाहीं; तथापि त्यांचे अत्याचार सौम्यस्वरूपाचे होते आणि त्यांच्या परिहारार्थ परमेश्वराला जातीनें खटपट करण्याची तादृश आवश्यकता वाटली नाहीं. रावणाच्या वर्तनानें सज्जनांना पीडा होऊं लागली व त्यांच्या रक्षणासाठीं परमेश्वराला तिकडे आधीं लक्ष द्यावें लागलें. त्याचे वर्तनाचे परिणाम सज्जनांना भोंवले नसते तर केवळ पापी म्हणून त्याचें शासन करण्यासाठीं परमेश्वराला पुढें येण्याचें कारण नव्हतें. त्याच्या पापाचें फल त्याला कालांतरानें मिळालें असतें. वेदवतीवर रावणानें बलात्कार केल्याची जी कथा उत्तरकांडांत आली

तीं पाहिली म्हणजे त्यानें त्यापुढें तरी तसले अत्याचार करूं नयेत अशी त्याला सूचना मिळाली होती असें म्हणण्यास अडचण नाहीं; तथापि तेवढ्यावर न उमजतां तिनें घातलेली मर्यादा संभाळून त्यानें आपला व्यवहार चालूच ठेविला. सीताहरणापर्यंत मधील कालांतील अशा अत्याचारांचा इतिहास रामायणांत दिला नसला तरी तो पूर्वापर संदर्भावरून अनुमानितां येतो. सीताशोधार्थ मारुती लंकेंत गेला असतां रावणाचे वाड्यांत त्यानें त्याचे भोंवतीं असलेल्या अनेक स्त्रिया पाहिल्याचें जें वर्णन आहे तें या अनुमानाला पोषकच आहे. असले अत्याचार असह्य होऊन ज्या वेळीं सज्जनांनीं परमेश्वराला हांक मारिली त्या वेळीं त्याला पुढें येणें भाग पडलें. सज्जनांचें रक्षण हा येथें मुख्य हेतु आहे. दुर्जनांची पीडा दुर्जनांला होऊं लागली व ती शिखरास गेली तरी त्या वेळीं परमेश्वर "पापाचें शासन परभारें चाललें आहे," असें म्हणून स्वस्थ बसेल. रावणानें तपस्वि पुरुषांचा छल केला व पतिव्रता स्त्रियांशीं तो बलात्कार करूं लागला, तेव्हां त्यांनीं केलेला धांवा परमेश्वरानें ऐकला, हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. संकटें आलीं असतां सर्वच परमेश्वराला शरण जातात, पण त्यांची हांक परमेश्वराला ऐकूं जात नाहीं. लहानथोर संकटाचें येथें महत्त्व नाहीं. देवाचे दरबारांत नीतिबलाचें पदक धारण केल्यावांचून प्रवेश नाहीं. हें पदक संपादिल्यावर मात्र देवाकडे हांक त्वरित जाऊन पोंचते. संकटें आलीं म्हणजे आपण देवाची करुणा भाकतों, पण ही पात्रता आपले अंगीं आहे किंवा नाहीं याचा आपण विचार करीत नाहीं आणि परमेश्वराला करुणा नाहीं म्हणून दोष मात्र देऊं लागतों. रावणाचे निःपातापासून शिकावयाचा तर हा धडा आपण शिकला पाहिजे. रावण मदांध झाला व त्याचे दुराचारामुळें तो आपोआप खालीं येऊं लागला असला तरी त्यानें सज्जनांना पीडा दिल्यामुळें परमेश्वरानें हा अधःपात सावकाश होऊं देण्याची वाट न पाहातां तो सत्वर घडवून आणिला इकडे आपण लक्ष दिलें पाहिजे; आणि असें दिलें असतां आपणाला दुष्टांपासून पीडा होत असल्यास त्याला आपली हांक लौकर ऐकूं जावी म्हणून आपणांस कोणती सिद्धता केली पाहिजे, तें कळून येईल. ही सिद्धता झाली म्हणजे हा बिनतारी

टेलिफोन हातीं आला, असें समजावें. याला नंबर नाहीं किंवा "अलौ" करावें लागत नाहीं.

रावणाचा निःपात हा त्या वेळच्या परिस्थितीचा विचार केल्यास खरोखर अलौकिक चमत्कार घडून आला व या अद्भुततेवरून परमेश्वरी अवतार म्हणून रामाविषयीं लोकांची श्रद्धा बसली. नाहीं तर एका पक्षाला अवघे दोन शस्त्रधर वीर व बाकी सारे निशस्त्र वानर आणि दुसऱ्या पक्षाला पुष्कळ शस्त्रधर राक्षस अशा स्थितींत जय कोणाला मिळावयाचा हें सांगावयास कोणी धूर्त पुरुष पाहिजे असें नाहीं. पण सज्जनांचें संरक्षण व दुष्टांचा निःपात करण्यास परमेश्वर पुढें आला म्हणजे त्याला शस्त्राची तरी अपेक्षा कशानें असणार ? आणि यासाठीं त्या वेळीं केवळ निःशस्त्र वानरांचें साहाय्य घेऊन देवानें पराक्रमी रावणाचा नाश करून आपलें अलौकिक बलच प्रकट केलें आहे.



# भाग ११ वा.

## रामायणाचे अवतार.

महर्षि वाल्मीकींनीं रामचरित्रावर काव्य लिहून त्याला व्यवस्थित स्वरूप दिलें असलें तरी त्यांत कित्येक प्रक्षेपकांनीं नवीन भाग घालून त्याचें मूळ स्वरूप विकृत केलें आहे. महर्षींनीं लिहिलेला मूळ कथाभाग कोणता तो वाचावयाच्या दृष्टीनें आपण रामायण वाचूं लागलों म्हणजे परस्परविरोधादि दोषांवरून हा भाग निवडून काढितां येतो व त्याप्रमाणें एका स्वतंत्र भागांत प्रयत्न केलेला वाचकांनीं पाहिला आहेच. तथापि मूळ काव्य विकृत करण्याचे हेतूनें प्रक्षेपकांनीं हे प्रक्षेप केले नाहींत हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. रामायणांतील प्रक्षिप्त भागांप्रमाणें दंतकथांचेहि योगानें रामचरित्रांत भर पडली आहे. यांतील कित्येक दंतकथा रामायणाशीं अगदीं विरुद्ध असल्या तरी एकंदरींत त्या रामकथेची लोकप्रियताच व्यक्त करीत आहेत. या कथेविषयीं लोकांत इतका आदर आहे कीं, मागाहून झालेल्या कित्येक पौराणिक व ऐतिहासिक ग्रंथांत कांहीं तरी निमित्तानें ही कथा ग्रथित केलेली आढळते. अशा कथांचें स्वरूप वाल्मीकींच्या आदिकाव्याहून लहान असणें साहजिक आहे. तथापि त्या स्वरूपांत मूळ कथा संक्षेपानें सांगितलेली असते असें नाहीं. त्यांतून कित्येक भाग नवीन असतात व कित्येक रामायणाशीं विरुद्ध असतात. महर्षींच्या आदिकाव्याचा निर्देश तर क्वचित् आढळतो. ही कथा आपण स्वतंत्रपणें सांगत असल्याचा पुष्कळांचा बाणा असतो. वाल्मीकींच्या काव्याचें स्वरूप पाहिलें तर त्यापूर्वी रामचरित्र कोणी सांगणें संभवनीय दिसत नाहीं. अर्थात् सर्वांना आधारभूत हेंच काव्य आहे. कित्येक ग्रंथांतून रामचरित्रांतील कोणते तरी कथाभाग प्रसंगानुरूप दृष्टांत देण्याचे हेतूनें सांगितले आहेत व तेहि मूळ रामायणाला सर्वथा धरून असतात असें नाहीं. यांतील कित्येक कथा तर अशा आहेत कीं, रामचरित्रांतील एकाद्या व्यक्तीचा त्यांत उल्लेख असून, त्यावांचून त्यांचा रामचरित्राशीं कांहीं

संबंध नाहीं. तसेंच कित्येक कवींनीं समग्र रामचरित्रावर तर कित्येकांनीं त्यांतील प्रसंगांवर स्वतंत्र काव्यें लिहिलीं आहेत. रामचरित्रांतील कित्येक प्रसंगांवर कांहीं नाटकें आहेत व त्यांनींहि रामचरित्रांत भर टाकिली आहे. मूळ कथानकांत सोयीसाठीं पात्रांच्या स्वभावास अनुसरून बदल करण्याचा नाटककारांस तर स्वयंभू अधिकार आहे. हे सर्व ग्रंथ मूळकाव्य ज्या भाषेंत आहे त्या संस्कृत भाषेंतील होत. देशी भाषांतून रामचरित्रावर अथवा त्यांतील प्रसंगांवर स्वतंत्र काव्यें व नाटकें झालीं आहेत तीं यांहून वेगळीं. हे सर्व ग्रंथ म्हणजे मूळ रामायणाचे अवतार होत. कथानकाचे स्वरूपास अनुसरून त्याचे पूर्णावतार व अंशावतार असे भेद करावे म्हणजे झालें. या सर्व ग्रंथांचे योगानें रामचरित्रांत बरीच नवीन भर पडली आहे. कित्येक दंतकथा व कांहीं प्रक्षिप्त भागांतील कथा या ग्रंथांत आढळून येतात. तथापि त्यांना या ग्रंथांचा आधार आहे का त्या ग्रंथांना यांचा आधार आहे हें निश्चयानें सांगतां येणें कठीण आहे. कित्येक वेळां तर अशा कथाच त्या ग्रंथांना आधारभूत असतात अशी बळकट शंका येते. पण या कामीं ग्रंथाचें प्रमाण मिळण्यासारखें नसल्यामुळें निर्णयाचें काम आम्ही आमच्या वाचकांचे भावनेवरच सोंपवितों. मात्र त्यांतील सादृश्य अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. अशा सर्व ग्रंथांचें वर्गीकरण करून कोणत्या ग्रंथांत काय फेरफार आढळून येतात याचें विवेचन करावयाचें म्हणजे तो एक स्वतंत्र ग्रंथ होईल. तेव्हां एवढ्या मोठ्या भानगडींत न पडतां कांहीं प्रमुख ग्रंथांपुरतें अशा प्रकारचें विवेचन करावयाचें प्रस्तुत योजिलें आहे.

## १ महाभारतांतील रामायणें.

महाभारतांत निरनिराळ्या प्रसंगांच्या निमित्तानें रामचरित्र एकंदर पांच वेळां आलेलें आहे. सभापर्व (अध्याय ५०), वनपर्व (अध्याय १४८ ते १५२ व २७४ ते २९३), द्रोणपर्व ( अध्याय ५९ ) व शांतिपर्व ( अध्याय २८ ) (कुंभकोणप्रत) येणेंप्रमाणें चार पर्वांत तीं आलीं असून त्यांपैकीं वनपर्वांत दुसऱ्यानें आलेलें रामोपाख्यान मात्र विस्तृत व स्वतंत्र उपपर्व म्हणून दिलेलें आहे. आतां यांचें क्रमानें निरीक्षण करूं.

१ सभापर्वांतील रामचरित्राची ग्रंथसंख्या ३९ आहे. शिशुपालानें श्रीकृष्णाची निंदा केली असतां भीष्मांनीं त्याचा निषेध केला; व नंतर श्रीकृष्णाचें माहात्म्य सांगण्याविषयीं युधिष्ठिरानें प्रार्थना केली असतां भीष्मांनीं विष्णूचे अवतार सांगितले, त्यांत ही कथा आहे. यांत युद्धानंतर रामाला राज्याभिषेक झाला येथपर्यंत रामचरित्र आलें असून राम राज्य करीत असतां लोकस्थिति कशी होती (रामे राज्यं प्रशासति) तें सांगून कथेची समाप्ति केलेली आहे.

२ द्रोणपर्वांतील रामचरित्राची ग्रंथसंख्या ३१ आहे आणि वरील सभापर्वांतील चरित्राशीं तें अगदीं समान असल्यामुळें आधीं घेतलें आहे. अभिमन्युवधानंतर युधिष्ठिर शोकग्रस्त झाला असतां व्यासांनीं त्याला नारदसृंजयसंवाद सांगून सांत्वन करण्याचा यत्न केला, त्यानिमित्त ही कथा आली आहे. नारद-सृंजयसंवादांत प्राचीन सोळा राजांचीं चरित्रें आलीं असून त्यांत रामाचा क्रमांक चवथा आहे. यांतहि अंतीं रामराज्यांतील लोकस्थितीचें वर्णन असून चरित्र राज्याभिषेकापर्यंत आहे.

३ शांतिपर्वांत पुनः षोडशराजोपाख्यान आलें असून त्यांत रामाचें चरित्र पांचवें आहे. यांतील ग्रंथसंख्या अवघी १२ आहे. युद्धसमाप्तीनंतर युधिष्ठिराचे शोकपरिहारार्थ अर्जुनाचे विनंतीवरून श्रीकृष्णांनीं त्याला षोडशराजोपाख्यान सांगितलें आहे. यांतील रामचरित्र अति संक्षिप्त असून त्यांत रामाचें सामान्यतः महत्त्व वर्णिलें आहे.

हीं तीनहि चरित्रें तत्त्वतः अगदीं सारखीं आहेत. चरित्राचा उपसंहार तर तीनहि आख्यानांत एक आहे. फेरफार केवळ शाब्दिक आहेत. या चरित्रांचा उपक्रम सभापर्वांत मात्र—

गाथामप्यत्र गायन्ति ये पुराणविदो जनाः ॥

"पुराणवेत्ते लोक याविषयीं गाथा गात असतात." असा केला आहे आणि दुसऱ्या दोन पर्वांत उपक्रमात्मक श्लोक न देतां पुढील श्लोक दिले आहेत.

सभापर्वः-- श्यामो युवा लोहिताक्षो मातंगानामिवर्षभः ॥ २३ ॥
द्रोणपर्वः-- श्यामो युवा लोहिताक्षो मत्तमातंगविक्रमः ॥ २७ ॥
शांतिपर्वः--युवा श्यामो लोहिताक्षो मातंग इव यूथपः ॥

आजानुबाहुः सुमुखः सिंहस्कन्धो महाबलः ॥
( सुभुजः-द्रोणपर्व ) ( महाभुजः-शांतिपर्व )
दशवर्षसहस्राणि दशवर्षशतानि च ॥
सभापर्वः— राज्यं भोगं च संप्राप्य शशास पृथिवीमिमाम् ॥
द्रोणपर्वः— सर्वभूतमतः कान्तो रामो राज्यमकारयत् ॥
शांतिपर्वः—अयोध्याधिपतिर्भूत्वा रामो राज्यमकारयत् ॥
रामो रामो राम इति प्रजानामभवत् कथाः ॥
रामभूतं जगदिदं रामे राज्यं प्रशासति ।
( जगद्भूत्-द्रोणपर्व )

यांतील शेवटचा श्लोक शांतिपर्वांत नाहीं. भारतांत विविध आख्यानांची भर पडून त्याचें महाभारत झालें हें खरें आहे; आणि यामुळें मूळ कोणतें व प्रक्षिप्त कोणतें, हें निवडणें फार कठीण झालें आहे. कांहीं असलें तरी वरील तीन आख्यानें एकाचे हातचीं आहेत, एवढें येथें आम्हांस दाखवावयाचें आहे व याकरितां वरील अवतरणें घेतलीं आहेत.

४ वनपर्वांत रामचरित्र दोन वेळां आलेलें असून त्यापैकीं प्रथमचें वरीलप्रमाणें संक्षिप्त आहे. पांडव नरनारायणाश्रमीं गेले असतां सौगंधिक कमल वाऱ्यानें वाहात येऊन पडलेलें पाहून आणखी तसलीं कमलें आणण्यासाठीं द्रौपदीनें भीमाला पाठविलें; त्याप्रमाणें कमलांचा शोध करीत भीम पर्वतावरून जात असतां वाटेंत त्याची व मारुतीची गांठ पडली. त्या वेळीं मारुती निजला होता, तो भीमाच्या गर्जनेनें जागृत झाला व आपणास जागृत केल्याबद्दल रागावला; आणि पुढें जाणें शक्य नाहीं, यासाठीं परत फिरण्यास सांगूं लागला. यानिमित्त त्यांमध्यें जो संवाद झाला, त्यांत भीमानें मारुतीच्या समुद्रोल्लंघनाचा दृष्टांत दिला. या प्रसंगीं मारुतीनें भीमाला संक्षिप्त रामचरित्र सांगितलें असून तें १५० वा सबंध अध्याय आहे. अध्यायाची ग्रंथसंख्या २२ असून पूर्वाध्यायीं उपक्रमाचे श्लोक ९ आहेत. म्हणजे ग्रंथसंख्येच्या दृष्टीनें वरील रामचरित्रें व हें यांत भेद नाहीं. मात्र समुद्रोल्लंघनाचे वेळचें आपलें विशाल स्वरूप मारुतीनें भीमाला त्याच्या प्रार्थनेवरून दाखविलें, हें यांत विशेष आहे. बाकीचें रामचरित्र राज्याभिषेका-

पर्यंत आहे. इतर पर्वांतील रामचरित्रांत उत्तरकांडांतील कथेचा निर्देश नाहीं. तो या पर्वांतील चरित्रांत मात्र मिळतो. रामाला राज्याभिषेक होऊन तो राज्य करूं लागल्यावर "रामकथा लोकांत प्रचलित असेपर्यंत आपण जिवंत राहावें," असा वर आपण रामाशीं मागितला व रामानें 'तथास्तु' म्हटलें, असें या चरित्राची समाप्ति करितांना मारुतीनें सांगितलें असून ही कथा उत्तरकांडांत (४०। १७।१९) व (१०८।३०।३३) येणेंप्रमाणें दोन स्थानीं आली आहे. उत्तरकांडांतील हे दोनहि भाग प्रक्षिप्त असल्याचें पूर्वीं दाखविलें आहे. तेव्हां त्याचें तादृश महत्त्व नाहीं. या कथेंत रामचरित्र सांगितलें आहे व त्याबरोबर "रामायण काव्याचा" प्रसंगवशात् निर्देश केलेला आहे आणि हा या कथेचा विशेष आहे.

या पर्वांत रामचरित्र आणखी एकदां जें आलें आहे, तें एक स्वतंत्र उपपर्व आहे. याचे अध्याय १९ असून ग्रंथसंख्या ७६९ आहे. यांत राज्याभिषेकापर्यंतच रामचरित्र सांगितलें आहे; तथापि तें इतर पर्वांतील चरित्रांहून विस्तृत आहे. याचा उपक्रम मात्र रावणादिकांचे उत्पत्तीपासून झाला आहे. पुढील सर्व कथा संक्षेपानें सांगितली असली तरी रामायणाप्रमाणें आहे. कित्येक स्थलीं तर हें सादृश्य इतकें पूर्ण आहे कीं, तें पाहून रामायण पुढें ठेवून हें आख्यान लिहिलें असावें असा संशय येतो. पुढील स्थलें पहा:—

| महाभारत. | विषय. | रामायण. |
|---|---|---|
| २७८ | दशरथाचें यौवराज्याभिषेकाविषयींचें भाषण. | २।२ |
| २७८।१८।१९ | मंथरेचें भाषण. | २।८।९ |
| २७८।२३,२४ | राजाचें कैकेयीला उद्देशून भाषण. | २।१०।३३ |
| २७८।२७,२८ | कैकेयीची मागणी. | २।११।२४, २६ |
| २७९।२६,२७,२८ | सीतेचें लक्ष्मणाला उत्तर. | ३।४५।२५,३७,३८ |
| २८०।९ | सीतेनें पर्वतशिखरीं वानरांकडे वस्त्र टाकिलें. | ३।५४।१–३ |
| २८२।१७ | तृण आड धरून सीतेचें रावणाशीं भाषण. | ३।५६।१ |

| | | |
|---|---|---|
| २८३।१० | सुग्रीवाला लक्ष्मणाबरोबर निरोप. | ४।३०।८१ |
| २८।४१,४२ | सेतूविषयीं समुद्राची सूचना. | ६।२२।४२,४३ |
| २९२।२५ | सीतेचें दुसरें दिव्य. | ७।९७।१५ |

दोन ग्रंथांतील महत्त्वाचीं सादृश्यें येथवर दाखविलीं व तीं मूळावरून ताडून पाहिलीं तर रामायणच या आख्यानांत अवतरिलेलें आहे, असें कळून येईल. पण या दोन ग्रंथांतील भिन्नताहि तशीच विलक्षण आहे. आख्यानाचा उपक्रम भिन्न असल्याचें पूर्वी सांगितलें आहे. इतर भिन्नता कोठें आहे, तें आतां पाहूं.

१ पायसविषयक कथा यांत नाहीं.

२ विश्वामित्रयज्ञसंरक्षण, सीताविवाह वगैरे कथा यांत नाहींत.

३ भरत मातुलगृहीं गेल्याचें यांत सांगितलेलें नाहीं.

४ रावण मारीचाकडे गेला, तो गोकर्ण येथें गेल्याचें यांत अधिक आहे.

५ सीतेला रावणानें रथांत बसवून नेल्याचें यांत नसून तो एकदम वर उडाल्याचें सांगितलें आहे.

६ वालिसुग्रीव यांचें युद्ध एकदांच झाल्याचें यांत सांगितलें असून, दोघे स्वरूपानें सारखे असल्यामुळें यांतील सुग्रीव कोणता हें रामाला ओळखितां यावें म्हणून निघते वेळींच मारुतीनें त्याचे गळ्यांत माला घातली आहे.

७ सीताशोधार्थ मारुती वगैरे गेले असतां त्यांना एक तापसी भेटल्याचें रामायणांत सांगितलेलें असून यांत तिचें प्रभावती असें नांव अधिक दिलें आहे.

८ नलानें सेतु बांधिल्याचें सांगितल्यावर हा "नलसेतु" या नांवानें अद्यापि प्रख्यात असल्याचा निर्देश यांत आहे.

९ युद्धवर्णनांत इंद्रजित्, कुंभकर्ण व रावण यांशीं युद्ध झाल्याचें मात्र वर्णन आहे.

१० इंद्रजिताचे शरबंधांत रामलक्ष्मण बद्ध झाले असतां बिभीषणानें प्रज्ञास्त्रानें त्यांना सावध केलें असें म्हटलें आहे.

११ कुबेराकडून आलेलें उदक नेत्राला लाविल्यावर सर्वांना अदृश्याचें ज्ञान होऊं लागल्याचें सांगितलें आहे.

१२ रावण ब्रह्मास्त्रानें दग्ध होऊन गेला; त्याची राखहि उरलेली नाहीं.

१३ युद्धसमाप्तीनंतर अविंध्य सीतेला रामाकडे घेऊन आला आहे.

१४ सीतेनें दिव्य केल्याचें यांत वर्णन नसून, ब्रह्मादिक देव व दशरथ यांनीं येऊन सीता शुद्ध असल्याविषयीं रामाला सांगितल्याचें वर्णन रामायणाप्रमाणें आहे.

वनपर्वांतील हें रामोपाख्यान सर्वांत मोठें आहे, हें वर सांगितलें आहे; पण तें मूळचें नसावें, असें वाटतें. इतर पर्वांतून आलेलीं रामचरित्रें प्रसंगानुरूप व संक्षिप्त आहेत. ज्या प्रसंगीं हें आख्यान सांगण्यांत आलें, तो जयद्रथकृत द्रौपदीहरणाचा प्रसंग होय; व हें आख्यान या प्रसंगास साजेसेंहि आहे; पण तें फार विस्तृत आहे. इतर पर्वांतील हें आख्यान श्रोत्याला माहीत असलेल्या रामचरित्राचें स्मरण देण्यापुरतें सांगितलें आहे, असें दिसतें. याच पर्वांत पूर्वीं आलेल्या रामचरित्राचा श्रोता जो भीमसेन त्यानें आपल्या भाषणांत चरित्र ऐकण्यापूर्वीं रामायणाचा उल्लेख केला आहे. अर्थात् यानंतर त्यानें जें रामचरित्राचें श्रवण केलें तें स्मृति जागृत होण्याकरितां होय, हें उघड आहे. भीमाचे भाषणांतील रामायणाचा उल्लेख पाहून रामायणाविषयींचें युधिष्ठिराचें अज्ञान आक्षेपार्ह वाटतें. युधिष्ठिरानें रामाचें नांव श्रवण करितांच "हा राम कोण? कोणत्या वंशांत उत्पन्न झाला? त्यानें पराक्रम कोणता केला? तसेंच रावण कोणाचा कोण?" वगैरे प्रश्न मार्कंडेय मुनींना केलेले आहेत. (२७४।४) युद्धकांडांतील एक श्लोक युद्ध करीत असतां प्रमाण म्हणून सात्यकीनें सांगितलेला द्रोणपर्वांत आला आहे व रामायण हा इतिहास असल्याचें सिद्ध करितांना हें एक प्रमाण आम्हीं पूर्वीं दिलें आहे. युद्ध झालें असतां एका वीरानें मधलाच श्लोक रणभूमीवर म्हटला, यावरून रामायणाची त्या वेळची लोकप्रियता, अध्ययन व प्रसार हीं कळून येतात व याकरितां युधिष्ठिरानें येथें केलेला प्रश्न अस्वाभाविक दिसतो. अर्थात् त्यानिमित्त मिळालेलें उत्तर त्याच्याच जोडीला जाऊन बसतें. मूळ रामायणाशीं याचें सादृश्य व विरोध कोठें येतो, याचें स्थूल स्वरूप वर दाखविलें आहे. कथानक योग्य स्थलीं असलें तरी त्याचा उपक्रम करण्यांत जी भूल झाली आहे व त्यानिमित्त कथेचा विस्तार झाला आहे, त्यावरून तें

मूळचें नव्हे, हें उघड आहे. सादृश्यास्तव तें रामायणावरून घेतलें असावें असें वाटतें; पण त्यानें केलेला विरोध दृष्टिआड करितां येत नाहीं. तेव्हां कोठल्या तरी दुसऱ्या ग्रंथावरून तें अनुवादिलें असावें, असा संशय येतो. मात्र या कथानकांत उत्तरकांडांतील कथेचा उल्लेख नसल्यामुळें हा प्रक्षेप उत्तरकांडांतील प्रक्षेपाहून प्राचीन असावा, असा तर्क होतो.

## २ ब्रह्मपुराणांतील रामायण.

या पुराणांतील रामायण तें सांगण्याचे हेतूनें सांगितलेलें नाहीं. कित्येक तीर्थांचें माहात्म्य सांगण्याच्या निमित्तानें दोन तीन स्थळीं मिळून आलें आहे. हें पुराण सूतशौनकादिसंवादरूपानें असून प्रस्तुत माहात्म्यें ब्रह्मदेव व भृग्वादि ऋषि यांच्या उपसंवादांत आलीं आहेत. प्रथम रामतीर्थाचें माहात्म्य सांगतांना ( अध्याय १२३ वा ) रामाचे अरण्यवासापर्यंत कथा आली आहे. दशरथ देवदानवांचे युद्धांत देवांचें साहाय्य करण्यास गेला असतां त्याचे रथाचा आंस मोडला व त्या वेळीं कैकेयीनें आपला हात तेथें घालून राजाला वांचविलें; आणि राजानें त्यानिमित्त तिला दोन वर देऊं केले; येथपासून कथेला प्रारंभ झाला आहे. यापुढें श्रावणवधाची कथा विस्तृत सांगितली असून त्याचे निष्कृतीकरितां राजानें अश्वमेध केला आहे. पुढें रामादि पुत्रचतुष्टयांचें जन्म सांगून वनवासापर्यंत कथा संक्षेपानें सांगितली आहे. दशरथ राजाला श्रावण व त्याचीं मातापितरें यांच्या मृत्यूनिमित्त तीन ब्रह्महत्यांचा दोष लागला व त्यानिमित्त तो नरकांत पडला होता. अरण्यवासाचे निमित्तानें फिरतां फिरतां राम गौतमीतीरीं आले, तेव्हां यमदूतांनीं त्याला बाहेर काढिलें. राजानें विचारिल्यावरून दूतांनीं वरील कारण त्याला सांगितलें व त्याबरोबर रामानें तेथें पिंडदान केल्यास पूर्णपणें मुक्तता होईल, अशी सूचना दिली. यमदूतांची अनुज्ञा घेऊन राजा पिंडदानाची सूचना रामाला देण्याकरितां स्वतां तेथें गेला. राजाचे सूचनेप्रमाणें रामानें पिंडदान केल्यावर तो मुक्त झाला. या वेळीं तेथें शंकरप्रभृति देव प्रकट झाले व शंकरांची रामानें स्तुति केली. गौतमीचे उगमाशीं जाऊन जेथें रामानें स्नान केलें, तें रामतीर्थ होय. या अध्यायाची ग्रंथसंख्या २१७ आहे.

पुढें १५४ व्या अध्यायांत सहस्रकुंडादि दशतीर्थांचें माहात्म्य सांगतांना

पुढील रामचरित्र आलें आहे. रावणवधानंतर सीतेनें दिव्य केलें असतां राम तिचा स्वीकार करूं लागला त्या वेळीं अंगद व हनुमान् यांनीं अयोध्येंत गेल्यावर स्वजनांसमक्ष तिनें दिव्य करून सर्वांना शुद्धता पटवावी, अशी सूचना केली; परंतु तिचा अनादर करू. रामानें सीतेचा स्वीकार केला. पुढें अयोध्येंत गेल्यावर लोकनिंदेची वार्ता रामाचे कानीं गेली असतां त्यानें सीतेचा त्याग केला. नंतर अश्वमेधाचे वेळीं सीतेच्या पुत्रांनीं रामायणाचें गायन केल्यावर रामानें त्यांचा स्वीकार केला. या वेळीं सीता तेथें येऊन तिनें दिव्य केल्यावर तिचा रामानें स्वीकार केला, असें यांत वर्णन नाहीं. नंतर यज्ञाकरितां अंगद व हनुमान् तेथें आले असतां त्यांना सीतेचा रामानें त्याग केल्याची वार्ता कळली व ते त्यामुळें विरक्त होऊन तपश्चर्येकरितां निघून गेले. त्यांचेमागून राम निघून गेला. त्या सर्वांनीं गौतमीतीरीं जेथें तपश्चर्या केली, तेथें वरील तीर्थ आहे. या तपश्चर्येचें फल त्यांना काय मिळालें किंवा पुढें काय झालें, तें यांत सांगितलें नाहीं.

अशा रीतीनें या पुराणांत दोन भागांनीं रामचरित्र आलें आहे. प्रथमभागांत दशरथाला ब्रह्महत्त्येचा दोष कसा प्राप्त झाला, हें सविस्तर कथन केलें आहे. येथील वर्णन रामायणांतून घेतलें आहे, हें उघड आहे. रामायणांतील वर्णन विस्तृत असून या पुराणांत त्याचाच संक्षेप केला आहे, असें भाषासादृश्यावरून दिसून येतें. श्रावणाचे अंध मातापित्यांकडे दशरथ गेला असतां त्याचे चाहुलीवरून त्यांना आपला पुत्र आल्याचा भास झाला व त्याला उद्देशून त्यांनीं जें भाषण केलें, तें रामायणांत पुढीलप्रमाणें आहे:—

किं चिरायासि मे पुत्र पानीयं क्षिप्रमानय ॥ २।६४।७ ॥
यद् व्यलीकं कृतं पुत्र मात्रा ते यदि वामया ।
न तन्मनसि कर्तव्यं त्वया तात तपस्विना ॥ ९ ॥
त्वं गतिस्त्वगतीनां च चक्षुस्त्वं हीनचक्षुषाम् ।
समासक्तास्त्वयि प्राणाः कथं त्वं नाभिभाषसे ॥ १० ॥

हें भाषण प्रस्तुत पुराणांत पुढीलप्रमाणें संक्षेपतः सांगितलें आहे:—

**कुतो वत्स चिरात् प्राप्तस्त्वं दृष्टिस्त्वं परायणम् ।**
**न ब्रूषे किं नु रुष्टोऽसि वृद्धयोरंधयोः सुतः ॥ ६८ ॥**

दोहोंतहि त्यांनीं " आम्हां अंधांचा तूं आधार आहेस; तेव्हां आमचे हातून कांहीं चुकलें असेल, तर तूं रागावूं नको, " हें सामान्यतः सांगितलें आहे. शब्दांतील सादृश्य लक्षांत यावें, यासाठीं अवतरणें दिलीं आहेत. रामायणांतून या पुराणांत ही कथा अवतरलेली आहे, हें याप्रमाणें सिद्ध झाल्यावर रामायणांतील पुढील श्लोकाची वाट काय ? मुमूर्षु श्रावण राजाला म्हणतोः—

**ब्रह्महत्याकृतं पापं हृदयादपनीयताम् ॥ २।६३।५० ॥**
**न द्विजातिरहं राजन् मा भूत्तेऽमनसो व्यथा ॥**

"हे राजा, ब्रह्महत्येचें पाप आपल्या हातून घडलें, अशी भीति मनांतून काढून टाक; मी ब्राह्मण नव्हें; तुला वाईट वाटूं देऊं नको. "

येथें राजाला ब्रह्महत्येचा दोष नसल्याचें स्पष्ट म्हटलेलें आहे; आणि या दोषाचे पायावर तर प्रस्तुत पुराणांतील कथेचा डोलारा उभारलेला आहे; पण पाया लटपटल्यावर वरील काम टिकावें कसें ?

सीतात्यागाचा पुढील कथेंत तर मेळ नाहीं. सीतेची शुद्धता रामाला पटल्यावर हनुमानानें त्याला नको म्हणणें हें रामायणांतील त्याचे पूर्वापर चरित्राचे विरुद्ध आहे. रामायणाचें गायन कुशलवांनीं केल्यावर त्यांचा रामानें स्वीकार केल्याचें पुढें सांगितलेलें आहे; मग या वेळीं सीतेचा स्वीकार करण्यास अडचण कोणती ? येथें कारण तर सांगितलेलें नाहीं आणि कथेची समाप्ति मुळींच केलेली नाहीं. एकंदरींत ही कथा रामायणाचे विरुद्ध आहे, इतकेंच नव्हे, तर स्वभावतः विसंगत आहे. रावणानें तपश्चर्या केल्याविषयींच्या वगैरे कथा यांत आलेल्या आहेत; परंतु त्यांचा रामचरित्राशीं तादृश महत्त्वाचा संबंध नसल्यामुळें त्याविषयींची चर्चा करण्याचें कारण नाहीं.

## २ पद्मपुराणांतील रामायणें.

या पुराणांत रामायणकथा चार वेळां आली आहे. त्यांपैकीं दोन वेळां पातालखंडांत असून एकदां उत्तरखंडांत आहे. पातालखंडाचे अध्याय ११७ असून त्यांपैकीं ६८ अध्यायांत " रामाश्वमेध " हें प्रकरण आलें आहे. या प्रकरणाची

ग्रंथसंख्या ४३२५ आहे व यावरून कथा किती विस्तृत आहे, हें लक्षांत येईल. रामाश्वमेध हें वास्तविक रामचरित्रांतील एक स्फुट प्रकरण आहे; परंतु संक्षिप्त रामकथा यांतच प्रसंगवशात् दोनदां गोंविलेली आहे, हा याचा विशेष आहे. रामायणांत रामानें अश्वमेध केल्याचा मोघम उल्लेख आहे व यांत त्या निमित्तानें रामाचे दिग्विजयाचें वर्णन आहे. कथानकाच्या दृष्टीनें हें रामायणाचें परिशिष्ट म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. पुराणाच्या पद्धतीप्रमाणें हें सूतशौनकांतील संवाद म्हणून सांगितलेलें असून सूतानेंहि शेषवात्स्यायनांतील संवाद म्हणून हें निरूपण केलें आहे. प्रथम रामाश्वमेधाची कथा संक्षेपतः सांगून मग त्यांतील रामचरित्राकडे वळूं.

## रामाश्वमेध.

रावणवधानंतर रामादि सर्व मंडळी पुष्पक विमानांतून अयोध्येकडे येण्यास निघाली, येथून कथेला प्रारंभ झाला आहे. राज्याभिषेक व राज्यांतील स्थितीचें वर्णन प्रथमचे ५ अध्यायांत असून सीतात्यागाचा मोघम उल्लेख आहे व त्यानंतर अगस्त्यऋषि भेटण्यासाठीं आले आहेत. अगस्त्यांनीं रावणवधानिमित्त रामाची स्तुति केली असून त्यांत रामाला विष्णूचा अवतार म्हटलें आहे व रावणाचा वध करण्यांत ब्रह्महत्या घडल्याचें सुचविलें आहे. या ब्रह्महत्येच्या दोषाचे परिहारार्थ अगस्त्यांनीं सांगितल्यावरून रामानें अश्वमेध केला आहे. अश्वाचे संरक्षणाकरितां शत्रुघ्न, भरतपुत्र पुष्कल व सीतेचा बंधु लक्ष्मीनिधि हे गेले असून आणखी आठ राजे बरोबर असल्याचें सांगितलें आहे. अश्वमेधाचा श्यामकर्ण अश्व अयोध्येहून निघाला तो पंचाल, कुरु, दशार्ण, श्रीविशाल (?), अदिच्छत्रा, गंगातीरीं च्यवनाश्रम, वाजीपुर(?), नीलपर्वत(?), सुबाहु राजाची नगरी(?), तेजःपुर, (येथें रावणाचा मित्र विद्युन्माली यानें अश्व चोरून नेल्याची व तो युद्ध करून परत आणिल्याची कथा आहे.) रेवातीरीं आरण्यकाश्रम,स्त्रीराज्य(?), देवपुर(?),हेमकूट(?), कुंडलनगर, वाल्मीकींचा आश्रम, इतक्या स्थानीं गेल्याचें व त्यानिमित्त कोठें युद्ध झाल्यावर तर कोठें आधीं सत्कार झाल्याचें वर्णन आहे. वाल्मीकींचे आश्रमांत आल्यावर तेथें लवानें तो अश्व धरिला. पुढें युद्ध झालें. त्यांत लवानें सेनापतीचा वध केला; व मग शत्रुघ्न पुढें होऊन त्याशीं युद्ध झालें, त्यांत लव

मूर्च्छित होऊन पडला आणि शत्रुघ्न त्याला रथांत घालून घेऊन गेला. आश्रमांतील बालकांनीं हा वृत्तांत सीतेला जाऊन सांगितला. या वेळीं कुश महाशिवरात्रीनिमित्त महाकालाची पूजा करण्याकरितां गेला होता. सीतेनें त्याचें स्मरण करितांच तो आला. कुशाला हें कळतांच तो रणांगणीं गेला. त्यानें युद्ध केलें. त्यांत शत्रुघ्न, पुष्कल, मारुती व सुग्रीव मूर्च्छित होऊन पडले. कुशलवांनीं राजाचा मुकुट वगैरे भूषणें काढून घेतलीं व सुग्रीवमारुतींचीं पुच्छें धरून त्यांना खेळण्याकरितां म्हणून ते आश्रमाकडे ओढीत घेऊन गेले. सीतेनें त्यांना पाहून आपल्या पुत्रांना त्यांना सोडून देण्याची आज्ञा केली. सीतेनें रामाचें स्मरण करून प्रार्थना केल्यावर सर्व सेना जिवंत झाली. अश्वहि तिनें सोडून देवविला. सर्व मंडळी तेथें गेल्यावर रामाला हा वृत्तांत कळला; वाल्मीकि यज्ञांत अध्वर्यु म्हणून काम करीत होते. त्यांना रामानें विचारल्यावरून त्यांनीं सीता व तिचे पुत्र यांचा वृत्तांत सांगितला. सीतेच्या पुत्रांना आपण भविष्यज्ञानसामर्थ्याचे योगानें केलेलें रामायण पढविलें असल्याचें सांगितलें. सीता शुद्ध असल्याविषयीं लोकपालादिकांचें मत महर्षींनीं रामाला कळविल्यावर त्यानें तिला आणण्याकरितां लक्ष्मणाला पाठविलें. या वेळीं सीतेनें परत येण्याचें नाकारून आपल्या पुत्रांना त्याचे बरोबर पाठविलें. सीता परत आली नाहीं, असें पाहून व तिनें पाठविलेला निरोप ऐकून रामाला मूर्च्छा आली. राम सावध झाल्यावर त्यानें लक्ष्मणाला पुनः तिजकडे पाठविलें. लक्ष्मण गेल्यावर वाल्मीकींनीं कुमारांकडून रामायणाचें गायन करविलें. मुनींनीं कुमारांना राम तुमचा पिता अशी ओळख करून दिल्यावर त्यांनीं रामाचे पाय धरिले. सीतेची शुद्धता सर्व सभासदांना पटली. इतक्यांत लक्ष्मणाबरोबर सीता परत आली. रामानें सुवर्णप्रतिमेचा त्याग करून तिचा स्वीकार केला. अश्वमेध पुरा करावयाचा म्हणून अश्वाचा छेद करणार तोंच तो मुक्त होऊन गेला. मग अश्वाभावीं ऋषींचे मताप्रमाणें रामानें कर्पूराचें हवन करून यज्ञाची समाप्ति केली. याप्रमाणें रामानें एकंदर अश्वमेध यज्ञ तीन केले. याप्रमाणें या प्रकरणाचें संक्षिप्त कथानक आहे.

## अश्वमेधकथेंतील पहिलें रामचरित्र.

या अश्वमेधप्रकरणांत दोन वेळां रामचरित्र आलें असून दोघांची कथा एक

असली तरी स्वरूपें अगदीं भिन्न आहेत. अश्व आरण्यक मुनींचे आश्रमीं आला असतां त्यांनीं विचारल्यावरून अश्वरक्षकांनीं तो रघुवंशीय नृपाचा असल्याचें सांगितलें व हें ऐकून "हरि-रघुनाथ यांची उपासना करावयाची सोडून हे नश्वर फळ देणारे याग कशाला?" असा मुनींनीं प्रश्न केला व या निमित्तानें त्यांनीं रामनाममाहात्म्य वगैरे सांगितलें. या माहात्म्याचे अनुषंगानें मुनींनीं आपणाला लोमशमुनींकडून कळलेलें रामचरित्र सांगितलें. यांत अहल्या शिला झाली होती (३६।१३) असें म्हटलें असून विवाहाचे वेळीं राम व सीता यांचीं वयें अनुक्रमें १६ व ६ वर्षांचीं सांगितलीं आहेत. विवाहानंतर अयोध्येंत बारा वर्षें त्यांनीं सुखोपभोग घेतला. २७ वे वर्षीं रामाचे यौवराज्याभिषेकाचा उपक्रम राजानें केला. यापुढील प्रसिद्ध इतिहास रायायणाप्रमाणेंच यांत आहे. राम वनांत गेल्यावर तीन दिवस जलाहार व चौथे दिवशीं फलाहार करून पांचवे दिवशीं चित्रकूट पर्वतावर गेला. वनवासाचे तेरावे वर्षीं रामानें शूर्पणखेला विरूप केलें. माघ वद्य ८ चे दिवशीं वृंद मुहूर्तावर रावणानें सीतेचा अपहार केला. वेदसंज्ञक मुहूर्त असा येथें एक पाठभेद आहे. परंतु वाल्मीकिरामायणांत विंदमुहूर्त सांगितला आहे त्याचे हे लोकप्रवादानें बनलेले पाठभेद असावे, असें वाटतें. यापुढील इतिहास क्रमानें तिथिवार सांगितला आहे.

| | |
|---|---|
| मार्गशीर्ष शुद्ध ९ | संपाती व वानर यांची भेट. |
| ,, ,, ११ | महेंद्रपर्वतावरून मारुतीचें उड्डान. |
| ,, ,, १२ | सीता व मारुती यांची भेट. |
| ,, ,, १३ | अक्षादिकांसह युद्ध. |
| ,, ,, १४ | इंद्रजित्कृत मारुतीचें बंधन व लंकादहन. |
| ,, ,, १५ | मारुतीचें महेंद्रपर्वतावर परत आगमन. |
| मार्गशीर्ष वद्य १–५ | किष्किंधेपर्यंतचा वानरांचा प्रवास. |
| ,, ,, ६ | मधुवनध्वंस. |
| ,, ,, ७ | मारुतीची रामाशीं भेट. [प्रयाण |
| ,, ,, ८ | उत्तरा फा. नक्षत्र असतां विजय मुहूर्तावर रामाचें |
| ,, ,, ८-३० | समुद्रापर्यंत रामादिकांचा प्रवास. |

| | | |
|---|---|---|
| पौष | शुद्ध १–३ | समुद्रतीरीं रामाचें सैन्यासह आगमन. |
| ,, | ,, ४ | बिभीषणसमागम. |
| ,, | ,, ५–९ | समुद्रतरणोपायचिंतन व रामाचें प्रायोपवेशन. |
| ,, | ,, १०-१३ | सेतुबंधन. |
| ,, | ,, १४ | सुवेलाचलीं गमन. |
| ,, | १५–वद्य २ | वानरसेनेचें सेतूवरून गमन. |
| पौष | वद्य ३–१० | सैन्यरचना. |
| ,, | ,, ११ | शुकसारणांचें आगमन. |
| ,, | ,, १२ | रामाची सैन्यगणना. |
| पौष | व॥ १३–३० | रावणाची सैन्यगणना. |
| माघ | शुद्ध १ | अंगदाचें दूतकर्म, सीतेला रामशिरोदर्शन. |
| ,, | ,, २–८ | राक्षस-वानर-युद्ध. |
| ,, | ,, ९ | रामलक्ष्मणांचें नागपाशबंधन. |
| ,, | ,, १० | गरुडाचे गमनानें नागपाशमोक्षण. |
| ,, | ,, ११-१२ | धूम्राक्षाशीं युद्ध व त्याचा वध. |
| ,, | ,, १३ | कंपनवध. |
| ,, | १४–वद्य४ | नीलकृत प्रहस्तवध. |
| ,, | वद्य २–४ | रामरावणयुद्ध व रावणपलायन. |
| ,, | ,, ५–८ | कुंभकर्णप्रबोधन. |
| ,, | ,, ९–१४ | कुंभकर्णाशीं युद्ध व त्याचा वध. |
| ,, | ,, ३० | युद्धविराम. |
| फाल्गुन | शु. १–४ | राक्षसपंचकवध. |
| ,, | ,, ५–७ | अतिकायाशीं युद्ध व त्याचा वध. |
| ,, | ,, ८–१२ | निकुंभकुंभवध. |
| ,, | १३–व. १ | मकरराक्षसवध. |
| ,, | वद्य २ | इंद्रजिताशीं युद्ध; लक्ष्मणाची मूर्छा. |
| ,, | ,, ३–७ | युद्धविराम व ओषध्यानयन. |

| | | | |
|---|---|---|---|
| फाल्गुन | वद्य | ८–१३ | इंद्रजिताशीं युद्ध व त्याचा वध. |
| ,, | ,, | १४ | रावणाचें दीक्षाग्रहण. |
| ,, | ,, | ३० | रावणाचें समरांगणीं आगमन. |
| चैत्र | शुद्ध | १–५ | रामरावणयुद्ध. |
| ,, | ,, | ६–८ | महापार्श्वादिवध. |
| ,, | ,, | ९ | शक्ति लागून लक्ष्मण मूर्च्छित होऊन पडला; रामानें रावणाला पळविलें; द्रोणाद्रि आणिला. |
| ,, | ,, | १० | युद्धविराम. |
| ,, | ,, | ११ | इंद्राकडून मातलि रथासह येतो. |
| ,, | ,, | १२–व.१४ | रावणाशीं युद्ध व त्याचा वध. |

एकंदर युद्धाचे दिवस ७२, युद्धविराम दिवस १५.

| | | | |
|---|---|---|---|
| चैत्र | वद्य | ३० | रावणाचे प्रेताला संस्कार. |
| वैशाख | शुद्ध | २ | बिभीषणाभिषेक. |
| ,, | ,, | ३ | सीताशुद्धि. |
| ,, | ,, | ४ | पुष्पकविमानांतून अयोध्येकडे प्रयाण. |
| ,, | ,, | ५ | भरद्वाजाश्रमीं गमन. |
| ,, | ,, | ६ | नंदिग्रामीं भरताशीं भेट. |
| ,, | ,, | ७ | राज्याभिषेक. |

सीता रावणाचे बंदींत ११ महिने १४ दिवस होती. राज्याभिषेकाचे वेळीं राम व सीता यांचें वय अनुक्रमें ४२ व ३३ असें होतें.

## २ अश्वमेधकथेंतील रामचरित्र, दुसरें.

कुशलवांनीं रामाचे दरबारांत रामायणाचें गायन केल्याची कथा ऐकून वात्स्यायनानें शेषाला तद्विषयक प्रश्न केला व त्यानिमित्त शेषानें रामायणाच्या रचनेचा प्रथम इतिहास सांगून त्यांतील कथा कांडांच्या क्रमानें पण संक्षेपानें निरूपण केल्या. रचनेचा इतिहास सांगतांना क्रौंचवधाची कथा सविस्तर आली असून रामायणांतील कांडें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत.

**षट्काण्डानि सुरम्याणि यत्र रामायणेऽनघ ।**
**बालमारण्यकं चान्यत् किष्किंधा सुंदरं तथा ॥६६।६२॥**
**युद्धमुत्तरमन्यच्च षडेतानि महामते ॥**

याप्रमाणें कांडांचीं नांवें सांगून पुढें कांडांतील कथा सांगितल्या आहेत. यांतील कथा रामायणाप्रमाणेंच असल्यामुळें त्या येथें न देतां प्रत्येक कांडांत कोठपर्यंत कथा सांगितली आहे, तें मात्र सांगतों. कारण कथा एक असली तरी तिची कांडशः केलेली विभागणी रामायणाहून वेगळी आहे. कांडांचीं जीं नांवें वर दिलीं आहेत त्यांत अयोध्याकांड मुळींच नसून सर्व कांडें सहा सांगितलीं आहेत व येथूनच भेदाला प्रारंभ झाला आहे.

**बाल**काण्ड– राम परत येत नाहीं असें पाहून भरत नंदिग्रामीं राहिला.

**अरण्य**कांड–पंपातीरीं रामाची मारुतीशीं गांठ पडली.

**किष्किंधा**काण्ड–मारुतीनें समुद्रोल्लंघन करून लंकेंत प्रवेश केला.

**सुंदर**काण्ड–रावणाकडून शुकसारण हेर म्हणून रामाचे सैन्यांत शिरले.

**युद्ध**काण्ड– रावणवध होऊन सीतेची भेट झाली.

**उत्तर**कांड– रामाचा ऋषींशीं संवाद व यज्ञाला प्रारंभ.

शेवटीं ग्रंथसंख्या रामायणाप्रमाणें २४००० सांगितली आहे. (६६।८१)

## ३ पद्मपुराणांतील रामचरित्र, पहिलें.

हें कथानक पद्मपुराणांतील पातालखंडाचे ११६ व्या अध्यायांत आलें असून ग्रंथसंख्या ३०५ आहे. हें बहुतेक गद्यात्मक आहे. अश्वमेधसमाप्तीनंतर रामाच्या दरबारांत जांबवानानें हें सांगितलें असून “अथ पुरातनं रामायणं कथयामि ।” (प्राचीन कालचें रामायण सांगतों,) असा त्याचा उपक्रम आहे. अयोध्यापति दशरथाच्या स्त्रिया चार असून त्यांचीं नांवें कौसल्या, सुमित्रा, सुरूपा व सुवेषा अशीं होतीं. राजानें पुत्रप्राप्त्यर्थ पुत्रकामेष्टि केली असतां यज्ञपुरुष माधव यानें आपण कौसल्येचा पुत्र होतों असें सांगून चरूंत प्रवेश केला. राजानें चरूचे चार भाग करून चौघी स्त्रियांना दिले व पुढें त्यांना चार पुत्र झाले. ब्रह्मदेवानें स्वतां येऊन त्यांचें नामकरण केलें.

उपनयन केल्यावर वसिष्ठांनीं राजपुत्रांना कोणतीं शास्त्रें शिकविलीं, त्यांचें परिगणन पुढीलप्रमाणें केलें आहे.

**वसिष्ठो वेदानध्यापयामास षडंगानि मीमांसाद्वयं नीतिशास्त्रं चाध्यापयामास ॥ ५८ ॥ अ० धनुर्वेदमायुर्वेदं भरतगांधर्ववास्तुशाकुनविविधयुद्धशास्त्राणि च ॥ ५९ ॥**

नंतर पुत्रांचा विवाह करावा असें मनांत आणून राजानें कन्या पाहाण्याकरितां नानादेशीं दूत पाठविले. एका दूतानें विदेहराजकन्या वैदेही रामाला योग्य असल्याचें सांगितलें. पुढें वसिष्ठादिक जाऊन वाङ्निश्चय करून आले. दशरथ पुत्रांसह मिथिलेला गेला. तेथें पुष्कळ राजे जमले होते. आदले दिवशीं नारद आले असतां जनकानें त्यांना विवाहसमारंभाकरितां राहावून घेतलें. येथें विवाहमुहूर्ताविषयीं नारद व गार्ग्य यांचा संवाद दिला आहे. क्षत्रियांना स्वयंवर विहित म्हणून जनकानें दशरथाचे संमतीनें कन्येचा स्वयंवर करावयाचें ठरविलें व राजांना निमंत्रणें केलीं. कन्या रामाला देण्याचा राजाचा हेतु होता; परंतु स्वयंवर करावयाचें ठरविल्यावर इतर राजांना युक्तीनें कसें टाळावें, याचा राजाला विचार पडला. रात्रीं त्यानें शंकरांची आराधना केली असतां ते प्रसन्न होऊन त्यांनीं त्याला धनुष्य दिलें व हें सज्ज करणाराला कन्या देण्याची प्रतिज्ञा सर्वांना कळवावी, अशी युक्ति सांगितली. राजानें त्याप्रमाणें आपला पण सर्वांना विदित केला. मारीच विप्रवेष धारण करून राजाकडे आला. जनकानें त्याचा सत्कार केला. भोजनसमयीं सीता त्याचे दृष्टीस पडली. तिचा अपहार कसा करावा, याचा विचार करीत तो निघून गेला. स्वयंवराला रावण आला होता; परंतु त्याला धनुष्य पेललें नाहीं. रामानें धनुष्य सज्ज केल्यावर सीतेशीं त्याचा विवाह झाला. राजा दशरथानें रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें ठरविलें असतां राजस्त्री सुवेषा हिनें कैकेयीप्रमाणें राजाशीं वर मागितले व राम, लक्ष्मण, सीता वनांत निघून गेलीं. यापुढील कथा बहुतेक रामायणाप्रमाणें आहे; तेव्हां भेदापुरता निर्देश करून आटोपतें घेऊं. वालिवधाविषयीं चर्चा झाली, त्या वेळीं तारेनें रामाला " दुंदुभीशीं वाली युद्ध करीत बिळांत गेला असतां सुग्रीवानें आपला व राज्याचा अपहार केला, तेव्हां त्याचा वध का

केला नाहीं ? " असा प्रश्न केला आहे. " हें युद्ध केव्हां झालें, " असा यावर रामानें प्रश्न केला असतां साठ हजार ऐशीं वर्षांपूर्वीं दशरथाला राज्याभिषेक झाला, त्या दिवशीं वाली बिळांतून येऊन त्यानें सुग्रीवाकडील राज्य व स्त्री परत घेतली आणि सुग्रीव पळून गेला, अशी तारेनें त्याला काळाविषयीं खुणा सांगितली. सुग्रीवादिकांसह राम एकदम समुद्रतीरीं गेल्याचें यांत सांगितलें असून शंकरांची आराधना केल्यावर त्यांनीं रामाला धनुष्य दिलें व त्यावर चढून सर्व सैन्य लंकेंत गेलें, असें वर्णन आहे. बिभीषणानें शिवालयाची स्थापना केल्याची कथा यांत आहे.

## ४ पद्मपुराणांतील रामचरित्र–दुसरें.

उमामहेश्वरसंवादरूपानें हें कथानक आलें आहे. "स्वायंभुव मनूनें पुत्रप्राप्त्यर्थ विष्णूची उपासना द्वादशाक्षरी मंत्राचा जप करून केली. विष्णु प्रसन्न झाल्यावर त्यानें त्याला तीन जन्मांमध्यें आपला पुत्र होण्याविषयीं प्रार्थना केली. या वराप्रमाणें प्रथम जन्मांत मनु दशरथ, दुसऱ्या जन्मीं वसुदेव झाला व पुढें तो कलियुगांत शंभलग्रामीं ब्राह्मण व्हावयाचा आहे. कथेचा उपक्रम याप्रमाणें आहे. रावणादि दैत्यांकडून पीडा झाल्यामुळें त्रस्त होऊन देवादिकांनीं विष्णूची प्रार्थना केल्यावर त्यानें आपण अवतार घेतों असें त्यांस आश्वासन दिलें व दशरथाला तीन स्त्रिया असून पुत्रप्राप्त्यर्थ त्यानें यज्ञ केला असतां विष्णु प्रकट होऊन त्याला पायस मिळालें, वगैरे कथा सांगितल्यावर रामजन्माचें वर्णन आहे. त्या वेळीं कौसल्येपुढें एकदम विष्णुमूर्ति प्रकट झाली असतां तिनें बालभाव धारण करण्याविषयीं प्रार्थना केल्यावरून त्याप्रमाणें विष्णूनें बालरूप धारण केल्याचें सांगितलें आहे. यांत अहल्या शिळा झाल्याची कथा आली असून उत्तरकांडांतील मृत ब्राह्मणपुत्राचें संजीवन वगैरे कथाहि आल्या आहेत. सीतेनें दिव्य केलें त्या वेळीं घेतलेली शपथ तर रामायणाप्रमाणें आहे. राज्याभिषेकानंतर रामानें सर्वांना विश्वरूप दाखविल्याची कथा यांत आहे. हें चरित्र पद्मपुराणांतील सहाव्या उत्तरखंडांत २४।४३।४४ या तीन अध्यायांत आलें असून ग्रंथसंख्या ७५० आहे.

## चरितचतुष्ट्याचें परीक्षण.

रामचरित्राचे बाबींत वाल्मीकींचा मूळ ग्रंथ प्रमाण होय, याविषयीं कोणाला शंका नाहीं व इतर ग्रंथांतील चरित्रांविषयीं विचार करितांना प्रमाणग्रंथ म्हणून तो करावयाचाहि नसतो. दंतकथादिकांचा उगम अशा ग्रंथांतून कधीं तरी मिळण्याचा संभव असतो व हाच हा भाग लिहिण्यांत आमचा हेतु असल्याचें प्रारंभीं आम्हीं सांगितलें आहे. परीक्षण करावयाचें तें मात्र अशा कथा स्वतांच कशा अप्रमाण ठरतात तें दाखविण्याकरितां करावयाचें असतें. असो. पद्मपुराणांतील पातालखंडांत रामाश्वमेध हें स्वतंत्र प्रकरण असून त्यांत रामचरित्र दोन वेळां आलेलें आहे. रामाश्वमेधाचा उपक्रम करितांना ऋषींनी सूताला "श्रीरामचरित्र" सांगण्याविषयीं प्रार्थना केली आहे. ( १।२ ) व याला उत्तर म्हणून शेषवात्स्यायनांतील संवाद त्यानें ऋषिजनांना निरूपण केला आहे. रामचरित्र सांगा म्हटल्यावर चरित्रांतील एक भाग सांगणें स्वभावतः विसंगत दिसतें. रावणवधानंतर राम पुष्पक विमानांतून निघाले, येथून कथेला प्रारंभ झाला असून पांचव्या अध्यायांत सीतात्यागानंतर अगस्त्यादि मुनि रामाकडे आले अशी कथा आली आहे. अर्थात् यापूर्वींचें रामचरित्र श्रोत्यांना माहीत असल्याचें वक्त्यानें गृहीत धरिलें आहे. पण लवानें अश्व धरल्याचें ऐकल्यावर वात्स्यायनानें शेषाला सीतेचा त्याग कां केला वगैरे प्रश्न विचारिले आहेत. ( ५५।१ ) सीतात्यागाचा निर्देश प्रथम आला त्या वेळीं श्रोत्याला डुलकी तर येत नव्हतीना !

सीतात्यागाची कथा सांगण्याचे निमित्तानें बालपणांतील तिची एक कथा व त्यांत वाल्मीकींनीं भविष्यरामायण केल्याचा निर्देश हीं गोवण्यांत आलीं आहेत. रावणाचे घरीं फार दिवस राहिलेल्या सीतेचा रामानें स्वीकार केला म्हणून लोकांमध्यें चाललेली निंदा चारांकडून रामाचे कानीं आली, हें वाल्मीकींचे रामायणांत आहे. ही कथा यांत जरा विस्तारानें सांगितली आहे. रामाकडे आलेल्या सहा चारांपैकीं पांचांनीं रामाला लोक सर्वत्र स्तुति करीत असल्याचें सांगितलें व सहावा स्तब्ध राहिला असतां रामानें आग्रह केल्यावरून त्यानें वरील वार्ता सांगितली. रामानें आपल्या बंधूंना क्रमानें बोलावून सीतेचा त्याग

किंवा शिरच्छेद करण्याची आज्ञा केली. ( ५६।६३ ) परंतु तें कोणी मान्य करीना. लक्ष्मणानें निरुपाय होऊन शेवटीं तिला नेऊन अरण्यांत सोडिली.

पतिव्रता सीतेवर असा अपवाद कां आला, याचें कारण म्हणून तिचे लहानपणाची एक कथा येथें सांगितलेली आहे. लहानपणीं ती उद्यानांत क्रीडा करीत असतां शुकपक्ष्यांचें एक जोडपें झाडावर बोलत असतां तिनें ऐकिलें. त्यांच्या बोलण्यांत "राम नांवाचा राजा पुढें होणार असून तो आपल्या सीता नामक स्त्रीसह अकरा हजार वर्षें राज्य करील" अशी कथा होती. त्या पक्ष्यांना धरून आणून सीतेनें त्यांना विचारिल्यावरून त्यांनीं "आपण वाल्मीकींच्या आश्रमांत असतों व त्यांनीं भविष्यकालीं होणाऱ्या रामराजाचें चरित्र केलें असून तें आपण तेथें नित्य ऐकतों व त्याचा येथें अनुवाद केला" असें सांगितलें. सीतेनें पुनः विचारिल्यावरून त्यांनीं रामचरित्रांतील आणखी कांहीं गोष्टी सांगितल्या. शेवटीं सीतेनें कथाविषयक सीता आपण असें सांगून रामाची भेट होईपर्यंत जाऊं देणार नाहीं असें त्यांना बजाविलें. शुकी गर्भिणी होती व यासाठीं प्रसूत होईपर्यंत ती तेथें राहाण्याचें मान्य करीना. तेव्हां सीता पक्षिणीला ठेवून घेऊन पक्ष्याला सोडूं लागली; तरी कोणालाहि तें पटलें नाहीं. तिच्या आग्रहामुळें कावून दोघांनीं गंगेंत जीव दिला. शुकीनें जातांजातां सीतेला गर्भिणी असतां पतीशीं वियोग होईल असा शाप दिला. हा शुकच पुढें रजक झाला व त्यानें आपल्या स्त्रीच्या निमित्तानें रामाची निंदा केली. ही निंदा वर लिहिल्याप्रमाणें चारांचे द्वारां रामाचे कानीं जाऊन ती सीतात्यागाला कारण झाली.

सीतात्यागाची येथील कथा कशी अस्थानीं आहे, हें वर दाखविलें आहेच. सीतात्यागाचें कारण सांगण्याचे निमित्तानें वाल्मीकींनीं रामजन्मापूर्वीं रामचरित्रावर काव्य लिहिल्याची येथें युक्तीनें नोंद केली आहे. शुकपक्ष्यांचें दंपत्य रामचरित्र गाऊं लागलें असतां सीतेनें तें त्यांना कसें कळलें असें विचारिलें. तेव्हां त्यांनीं उत्तर देतांना महर्षि तें काव्य आपल्या शिष्यांना नित्य पढवीत असल्याचें व तें ऐकून आपणांस तें पाठ झाल्याचें सांगितलें आहे. सीतेच्या विवाहापूर्वीं ती लहान असल्यावेळची ही कथा आहे. पक्ष्यांचे बोलण्यावरून हें काव्य पुष्कळ शिष्यांना त्यांनीं पढविल्याचें दिसतें व त्यांना पढवितांना ऐकून पक्ष्यांना

पाठ येऊं लागलें, या कथेनें या अनुमानाला पुष्टि मिळते. येथें अशी शंका येते कीं वाल्मीकींच्या शिष्यांचे द्वारा या काव्याची वार्ता अयोध्येपर्यंत कशी पोंचली नाहीं? शुकपक्षी तें पाठ करून आश्रमांतून मिथिलेपर्यंत जाऊन त्याचा प्रसार करितात; आणि आश्रमापासून इतक्या दूर अंतरावर वसलेल्या अयोध्येंत त्याची वार्ताहि नाहीं, याची संगति कशी लावावयाची? महर्षि निरिच्छ असले तरी कुशलवांकडून ज्या कर्तव्यबुद्धीनें त्यांनीं रामापुढें अश्वमेधाचे वेळीं काव्य गाव-विले ती बुद्धि दशरथानें पुत्रप्राप्त्यर्थ यज्ञ केला त्या वेळीं जागृत नव्हती काय? अश्वमेधाचे निमित्त अश्व बाहेर पडण्यापूर्वीं ते अयोध्येला आल्याचें येथें लिहिलें आहे. शुकाचे तोंडीं रामायणांतील म्हणून पुढील वाक्य आलें असून त्यांत राम पुढें होणार असें स्पष्ट लिहिलें आहे.

**रामो महीपतिर्भूमौ भविष्यति मनोहरः।**
**तस्य सीतेति नाम्ना तु भविष्यति प्रहेलिका ॥५७।९॥**

"या भूमीवर राम नांवाचा सुंदर राजा होईल. सीता नामक त्याची स्त्री होईल"

रामायणांतून शुकयुग्मानें उद्धृत केलेल्या या पंक्तींवरून वाल्मीकींच्या या काव्याचें स्वरूप कळून येतें. रामाचे दरबारांत याचें गायन कुशलवांकडून कर-विण्यापूर्वीं वाल्मीकींनींहि रामाला आपण भविष्यज्ञानाचे योगानें रामायण लिहि-ल्याचें सांगितलें आहे. (६६।१२) भविष्यज्ञान होऊन केलेल्या या काव्यां-तील कथा पुढें कांडशः संक्षेपानें सांगितल्या आहेत. त्यांतील बालकांडांतल्या संक्षेपाच्या पुढील पंक्ति पाहाः—

* **तत्र बाले तु संतुष्टः पुत्रेष्ट्या चतुरः सुतान्।**
**प्राप पंक्तिरथः साक्षाद्धरिं ब्रह्म सनातनम् ॥६६।६४॥**
**स कौशिकमखं गत्वा सीतामुद्वाह्य भार्गवम्।**
**आगत्य पुरमुत्कृष्टो यौवराज्य-प्रकल्पनम् ॥१६५॥**

---

* या अवतरणांत "भरत नंदिग्रामीं येऊन राहिला" येथपर्यंत रामायणांतील कथा क्रमानें संक्षेपतः सांगितली आहे व याकरितां अर्थ दिला नाहीं. सर्व कथांचा येथील निर्देश भूतकालांतील म्हणून आहे व ते कळण्यासाठीं अवतरण घेतलें आहे.

**मातृवाक्याद्वनं प्रागाद्गंगामुत्तीर्य पर्वतम् ।**
**चित्रकूटं महिलया लक्ष्मणेन समन्वितः ॥१६६॥**
**भरतस्तं वने श्रुत्वा जगाम भ्रातरं नयी ।**
**तमप्राप्य स्वयं नंदिग्रामे वासमचीकरत् ॥१६७॥**
**बालमेतत्—**

शुकमुखांतील रामायणांतल्या वर दिलेल्या पंक्तींहून यांचें स्वरूप अगदीं भिन्न आहे. हे ग्रंथ तर भिन्न मानितां येणार नाहींत; कारण शुकयुग्मानें भविष्यकालचें रामायण म्हणून त्यांतील पंक्ति म्हटल्या आहेत व रामाचे दरबारांत त्याचें गायन करितेवेळीं स्वतां वाल्मीकींनीं भविष्यज्ञान होऊन आपण ग्रंथ लिहिल्याचें सांगितलें आहे. अर्थात् ही विसंगतता त्यांच्या मूळ ग्रंथांतील नसून या कथेंतील होय व ती कथा रचणाराचे अनवधानतेची द्योतक आहे.

सीतात्यागाचें कारण म्हणून शुकयुग्माची कथा सांगतांना कवीनें एका मुद्याकडे तर अगदीं दुर्लक्ष केलें आहे. सीतात्याग हा रामचरित्रांतील एक भाग आहे व चरित्र संपूर्ण सांगावयाचें तर तो त्यांत वाल्मीकींनीं सांगितलेला असणें अवश्य आहे. सीतात्याग हें जर शुकयुग्माचा सीतेनें वियोग केल्याचें फल असेल तर तें पूर्वीं केलेल्या रामचरित्रांतहि या कारणासह यावयाचें, मग त्याचें ज्ञान आधीं झाल्यावरहि तें शुकयुग्म सावध कां राहिलें नाहीं? शुकयुग्माची कथा त्यांत सांगितली नसेल तर न सांगण्याचें कारण काय? आणि ती न सांगितल्यास त्याचें फल जें सीतात्याग त्याला पूर्णता कशी येईल? स्वतांचें भावी चरित्र समजून घेण्याच्या जिज्ञासेनें शुकयुग्माला ठेवून घेण्याचा यत्न या वेळीं सीतेनें केला, परंतु ही जिज्ञासा पुढें जागृत राहून तिनें त्याविषयीं अधिक प्रयत्न कसा केला नाहीं? असा यत्न संभवनीय नाहीं काय? व त्याला यश येऊन तिला सावध राहातां आलें नसतें काय? " भवितव्यता बलियसी " असें समर्थन कोणत्याहि गोष्टीचें करितां येईल, पण तें ती गोष्ट घडून आल्यावर निराशेनें करावयाचें असतें; भवितव्य कळल्यावर स्वस्थ राहाण्यासाठीं करावयाचें नसतें, हें विसरतां नये. पण ही अडचण कवीचे लक्षांत आली व त्यानें उत्तरकांडांतील कथांचा संक्षेप सांगतांनाः—

**उत्तरे ऋषिसंवादो यज्ञप्रारंभ एव च ॥ ६६।७९**

" उत्तरकांडामध्यें रामाचा ऋषींशीं संवाद व यज्ञाला प्रारंभ " इतक्या कथांचा निर्देश केला आहे व सीतात्यागाची कथा बुद्धया वगळली आहे. वाल्मीकिरामायणांत सीतात्यागानंतर अश्वमेधाला प्रारंभ केल्याचें सांगितलें व अश्वमेधप्रकरणाला प्रारंभ करितांना सीतात्यागाचा निर्देश केला असल्याचें सांगितलें आहे. म्हणजे अश्वमेधाचा उपक्रम केला असें सांगितल्यावर सीतात्याग केल्याचें सांगितल्यासारखें झालें नाहीं काय ?

वाल्मीकींनीं भविष्यरामायण केल्याचें निरूपण करितांना प्रथम क्रौंचवधाची कथा सांगितली आहे व त्या निमित्तानें ब्रह्मदेवांनीं येऊन महर्षींना केलेली आज्ञा पुढीलप्रमाणें दिली आहे—

**तस्मात् कुरुष्व रामस्य चरितं लोकविश्रुतम् ॥ ६६।६७ ॥**

" म्हणून लोकांमध्यें प्रसिद्ध असलेलें रामाचें चरित्र कथन कर. "

ब्रह्मदेवांनीं महर्षींना लोकविश्रुत रामचरित्र कथन करावयास सांगितल्यावर त्यांत अपूर्वता कसली ? आणि त्यांना भविष्यकालाचें ज्ञान आधीं झालें असें कसें म्हणावयाचें ?

अश्वमेधप्रकरणांत लोमश व आरण्यक यांच्या संवादाचे रूपानें जें रामचरित्र सांगितलें आहे, त्यांत भूतकालांतील व भविष्यकालांतील गोष्टींचा तर गोंधळ केलेला आहे. आरण्यकमुनीला रामाचे अश्वमेधाचा अश्व त्याचे आश्रमांत आल्यावर त्याबरोबर आलेल्या योद्धयांचा सत्कार करून व त्यांचेबरोबर अयोध्येंत जाऊन रामाचें दर्शन होतांच मोक्षप्राप्ति व्हावयाची असें ऋषींकडून पूर्वयुगीं कळल्याची कल्पना या कथेचे मूळाशीं आहे; परंतु या दृष्टीनें ग्रंथरचना करितांना लेखक अगदीं गोंधळून गेला आहे. रामाचें भाविष्यकालचें चरित्र आपणास पूर्वीं कळल्याचें तो सांगतो आहे व समग्र रामचरित्र घडून आलें या भावनेनें निरूपण करीत आहे; पण भविष्यज्ञानाचा त्याला स्पर्श नाहीं, हें लक्षांत येतांच " राम राज्य करूं लागल्यावर अगस्त्य मुनि येऊन त्याचे उद्देशावरून तो अश्वमेध करील " ( ३७।८० ) अशा प्रकारें पुढील कथेचा उपक्रम केला आहे. अर्थात् हा लेखकाच्या गोंधळलेल्या मनःस्थितीचा द्योतक आहे.

लोमशाकडून आरण्यकाला रामनामाचें माहात्म्य वगैरे कळलें असून रामाचे दर्शनानें मोक्षप्राप्ति व्हावयाची अशी त्याची श्रद्धा आहे, तर अश्वमेधाचा अश्व येईपर्यंत रामाचें दर्शन घेण्याचा प्रयत्न त्यानें आधीं कां केला नाहीं? इतकेंच नव्हे तर अश्वमेधाचा अश्व आल्यावर त्याच्या मुमुक्षेच्या दृष्टीनें तो कोणाचा वगैरे शोध करणें अवश्य असतां त्यानें अश्वाबरोबर असलेल्या योद्ध्यांपुढें रामनाममाहात्म्याचें व रामचरित्राचें लांबलचक पुराण सांगण्याला कांहीं कारण नसतां प्रारंभ केला आहे!

लोमशकथित रामचरित्र वाल्मीकिरामायणाशीं तोलून पाहतां त्यांतील कित्येक गोष्टी जुळत नाहींत व चरित्राचे विश्वासनीयतेच्या दृष्टीनें हें चिंत्य आहे. यांतील रामचरित्र तिथिवार आहे व हा त्याचा विशेष आहे, हें खरें; तथापि त्याला आधार कल्पनेवांचून दुसरा कसलाहि असेल असें वाटत नाहीं. राम व सीता यांचा विवाह झाल्यावर यौवराज्याभिषेकाची योजना होईपर्यंत बारा वर्षांचा काल मध्यंतरीं गेल्याचें या चरित्रांत सांगितलें आहे. या कालाला अरण्यकांडांतील सीतेच्या भाषणाचा एक आधार आहे; परंतु तो कसा निरुपयोगी आहे, याचें विवेचन आम्हीं अन्यत्र केलें आहे. हा काल एक वर्षाचा असल्याचें एका पाठभेदाच्या आधारानें तेथेंच आम्हीं दाखविलें असून रामायणांतील इतर वचनांशीं त्याचा मेळ पडत आहे. तेव्हां हा कालनिर्देश करितांना लेखक सर्वथा घसरले आहेत असें म्हणण्यास चिंता नाहीं. रामरावणयुद्धाचा काल त्यानें ७२ दिवसांचा सांगितला आहे. सीता व मारुती यांची भेट झाली त्यावेळीं रावणानें तेथें येऊन सीतेला दोन महिन्यांची मुदत दिल्याचें सुंदरकांडांत लिहिलें आहे. अर्थात् मारुती परत जाऊन व सेतु बांधल्यावर रामरावणयुद्ध होऊन सीता रामाला या मुदतींत परत मिळाली आहे. मग ही मुदत कशी भरायची? वनवासाची मुदत चैत्र शुद्ध ५ ला भरत असून त्या दिवशीं राम अयोध्येला परत आल्याचें रामायणांत लिहिलें आहे व या रामचरित्रांत युद्धाची समाप्ति चैत्र वद्य १४ ला झाली असून वैशाख शुद्ध ६ ला भरताची भेट झाल्याचें सांगितलें आहे. एतावता रामायणाहून या रामचरित्राला असलेली मितिवार निरूपणाची अपूर्वता खरोखरच अपूर्व आहे.

अश्वमेधप्रकरणांतील हीं दोनहि रामचरित्रें सांप्रत आपणांस उपलब्ध असलेल्या वाल्मीकिरामायणावरून लिहिलीं आहेत, याविषयीं मात्र, त्यांमध्यें किती विरोध असला तरी, शंका नाहीं. उत्तरकांडांतील अगस्त्य व राम यांमधील संवाद प्रक्षिप्त असल्याचें व तो महाभारतांतील रामोपाख्यानानंतर प्रक्षेपिल्याचें आम्हीं अन्यत्र दाखविलें आहे. या प्रक्षिप्त भागाचा उल्लेख वरीलपैकीं एका रामचरित्रांत स्पष्टपणें आला आहे. रामायणांत दीर्घच्छंदांत असलेले श्लोक प्रक्षिप्त मानणें अवश्य आहे, असें प्रक्षिप्त भागांविषयीं विवेचन करितांना आम्हीं दाखविलें असून, महर्षींनीं क्रौंचवधानिमित्त व्याधाला बोललेल्या श्लोकरूप शापोक्तीनिमित्त अशा प्रकारच्या छंदामध्यें—अर्थात् अनुष्टुप छंदामध्यें—सर्व रामायण काव्य रचण्याची त्यांनीं जी प्रतिज्ञा केली, ती याला कारण आहे. अश्वमेधप्रकरण लिहितांना लेखकाला ही प्रतिज्ञा व रामायणाचें सांप्रतचें स्वरूप यांतील विरोध लक्षांत आला व त्यानें हा अनवस्थाप्रसंग टाळण्यासाठीं रामायणरचनेचा इतिहास सांगतांना पुढील श्लोक दिला आहे:—

तदात्यंतं मुदं प्राप्तो रामायणमथासृजत् ।
मनोरमपदैर्युक्तं वृत्तैर्बहुविधैरपि ॥ ६६।१६१ ॥

" ( ब्रह्मदेवाची अनुज्ञा मिळाली, ) तेव्हां ( महर्षींना ) अत्यंत आनंद झाला व त्यांनीं सुंदर पदें योजून नानाविध वृत्तांमध्यें रामायणाची रचना केली." अर्थात् दीर्घच्छंदांत असलेल्या श्लोकांचा प्रक्षेप होऊन रामायणाची सध्यांची प्रत निर्माण झाल्यानंतर वरील चरित्राची रचना झाली असली पाहिजे. एक उपास्य दैवत अशा प्रकारची रामाविषयींची भावना रामायणांत दिसत नसून ती यांतील रामनाममाहात्म्यादि निरूपणावरून व्यक्त होत आहे. रत्नग्रीवराजाच्या आख्यानांत अयोध्या व सरयू यांचा अनुक्रमें क्षेत्र व तीर्थ या नात्यानें उल्लेख आला आहे. ( अ० १७ ) यांना रामाचे सहवासानिमित्त पवित्रता आली असून त्यापूर्वीं त्यांची तीर्थक्षेत्रांत गणना नव्हती. येथील तीर्थक्षेत्रांच्या संग्रहांत द्वारावतीचा उल्लेख आहे व हिची स्थापना तर श्रीकृष्णांनीं केली आहे. रामानंतर पुष्कळ कालानें झालेल्या व्यासमहर्षींचा उल्लेख रामानें अश्वमेधाकरितां बोलाविलेल्या ऋषिमंडळांत आला आहे. ( ९।३२ ) यापेक्षांहि या पुराणाच्या

अर्वाचीनपणाची द्योतक गोष्ट म्हटली म्हणजे त्यांतील भागवत पुराणाचा उल्लेख होय. अश्वरक्षणाकरितां शत्रुघ्न निघाला असतां त्याला रामानें जो उपदेश केला त्यांत पुढील श्लोक आहे.

**येषां प्रियं भागवतं येषां वै ब्राह्मणाः प्रियाः ।**
**वैकुण्ठात् प्रेषितास्तेऽत्र लोकपालनहेतवे ॥ १०।६७ ॥**

" ज्यांना भागवत प्रिय आहे व ज्यांचें ब्राह्मणांवर प्रेम आहे, ते ( पुरुष ) लोकांच्या रक्षणाकरितां वैकुंठाहून (विष्णूनें) येथें पाठविले आहेत, (असें समजावें.)"

भागवताचा उल्लेख या ग्रंथांत आहे, इतकेंच नव्हे, तर एके स्थलीं त्यानें त्याचें सर्वथा अनुकरण केलेलें आहे. अश्व च्यवनभार्गवांचे आश्रमीं आला असतां त्यानिमित्त शत्रुघ्नाबरोबर असलेल्या सुमतिनामक मंत्र्यानें ऋषींचा सविस्तर वृत्तांत सांगितला. त्यांत च्यवनभार्गव अश्विनीकुमारांचे प्रयत्नानें तरुण झाल्यावर त्यांनीं आपल्या तरुण स्त्रीसह जे विहार केले, त्यांचें वर्णन करितांना ( १५।६।२० ते २४ ) भागवतांतील कर्दमप्रजापति व देवहूति यांचे विहारांचें वर्णन ( ३।२३ ) उद्धृत* केलें आहे. भागवताचा काल अनिश्चित मानिला तरी रामायणाहून तें पुष्कळ नंतरचें, यांत शंका नाहीं. अर्थात् रामचरित्राचे कामीं रामायणापुढें त्याला प्रामाण्य कसचें मिळणार ?

पद्मपुराणांत तिसरें रामचरित्र अश्वमेधाचे वेळीं जांबवानानें सांगितल्याचें लिहिलें असून तें " पुरातन कालचें " असें तो सांगत आहे. म्हणजे ज्या रामाचे दरबारांत तें गाण्यांत आलें, त्याहून या पुरातन रामचरित्रांतील नायक भिन्न आहे, असें सांगण्याचा त्याचा उद्देश आहे. वाल्मीकींनीं पुढें होणारें रामचरित्र आधीं लिहून ठेविलें, असें सांगून भविष्यज्ञानाचें अलौकिक सामर्थ्य त्यांजवर लादण्याचा खटाटोप ज्याप्रमाणें कवीनें एकीकडे केला आहे, त्याच प्रकारचा हा खटाटोप असून यांत जांबवानाचें पुरातन कथा जाणण्याचें अलौकिक

---

* या कामाकरितां आम्हीं राजापुर संस्कृत पाठशाळेच्या संस्कृत पुस्तकसंग्रहालयांतील पद्मपुराणाची प्रत आणिली होती. हें पुराण वेंकटेश्वर छापखान्यांत छापिलेलें असून तें वे. शा. सं. वासुदेवशास्त्री कऱ्हाडकर यांनीं संस्थेला दिलेलें आहे वरील सादृश्य त्यांनींच पोथीच्या समासामध्यें दिलें आहे. अर्थात् हा शोध त्यांचा आहे.

सामर्थ्य व्यक्त करण्याचा त्याचा हेतु आहे. ज्या रामाचे अश्वमेधाचे वेळीं हें गाण्यांत आलें त्याचें या कवीनें लिहिलेलें हें चरित्र किती विश्वसनीय आहे, याचें उद्घाटन वर केलें आहे; व तें पटल्यावर त्यानेंच जांबवानाचे मुखानें पुरातन म्हणून वदविलेल्या या रामचरित्राविषयीं अधिक विवेचन तें कसलें करावयाचें?

चवथें रामचरित्र उत्तरखंडांत आहे. यांत तर पुढें होणार म्हणून श्रीकृष्णाचा उल्लेख आला आहे. गीतेंतील "परित्राणाय साधूनां" (४।८) हा अवतार-प्रयोजन-द्योतक प्रसिद्ध श्लोक यांत मनूला वर देतांना विष्णूचे तोंडीं आला आहे. रामजन्माचें निरूपण करितांना तर भागवतांतील श्रीकृष्णजन्मविषयक कथेचें उघडउघड अनुकरण केलें आहे. गीतेंतील विश्वरूपदर्शनाचा योग यांत साधून घेतलेला आहे. बाकी कथांच्या दृष्टीनें पाहिल्यास वाल्मीकिरामायणाचा हा संक्षेप आहे.

## ५ गरुडपुराणांतील रामायण.

सुतशौनकादिक ऋषींतील संवादरूपानें हें पुराण असून पूर्वखंडांतील १४३ व्या अध्यायांत रामचरित्र आलें आहे. पूर्वीचे अध्यायांत पतिव्रता म्हणून सीतेचा उल्लेख आला आहे व पुढें प्रस्तुत अध्यायांत रामचरित्र आलें आहे. ग्रंथसंख्या ५१ आहे. यांत रामायणाचा किंवा वाल्मीकींचा निर्देश नाहीं; परंतु कथा रामायणाचे क्रमानें सांगितली आहे. यांत अहल्योद्धाराची व पुढील उत्तरकांडांतील सीतात्यागाची कथा आलेली नाहीं; पण अगस्त्यादि मुनींकडून रामानें राक्षसांची उत्पत्ति श्रवण केल्याचा उल्लेख करून उत्तरकांडांतील प्रारंभींचा प्रक्षिप्त भाग सूचित केला आहे. अर्थात् कथेच्या या भेदाला महत्त्व नाहीं.

## ६ नारदपुराणांतील रामायण.

हें पुराण सूतशौनकादिकांतील संवादाचे रूपानें असून यांत रामचरित्र दोन वेळां आलें आहे. हनुमच्चरित्र सांगतांना त्याचें अंग म्हणून त्यांतील पहिलें चरित्र आलें आहे. याचे श्लोक अवघे १८ (पू. खं. ७९।७–२६) आहेत. व त्यांत राज्याभिषेकापर्यंत कथा आली आहे.

दुसरें रामचरित्र लक्ष्मणाचलमाहात्म्य निरूपण करण्याचे निमित्तानें आलें

आहे. ( उ. खं. अ. ७५, श्लोक ७७ ) यांत सीतेच्या भूप्रवेशापर्यंत सर्व चरित्र ५६ श्लोकांत आलें असून पुढें लक्ष्मणाचे देहविसर्जनाची कथा वाल्मीकिरामायणाप्रमाणेंच सांगितलेली आहे. यांतील रामचरित्र वाल्मीकिरामायणाप्रमाणें व अगदीं त्या क्रमानें आहे.

## ७ भागवतांतील रामायण.

भागवतांतील ९ व्या स्कंधाचे १० वा व ११ वा अशा दोन अध्यायांत रामचरित्र आलें असून ग्रंथसंख्या ८२ आहे. सूर्यवंशानुवर्णन चालू असतां प्रसंगानुसार आलेलें रामचरित्र केवळ नामनिर्देश न करितां येथें थोड्या विस्तारानें सांगितलें आहे. विष्णूनें अंशांशानें राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न असे अवतार धारण केले असें प्रथम सांगितलें असून पुढील रामचरित्र संक्षेपानें निरूपिलें आहे. वाल्मीकिरामायणाहून या चरित्रांत विशेष काय आहे तेवढें सांगितलें म्हणजे चरित्राचा अनुवाद वेगळा करण्याची आवश्यकता नाहीं. सीताविवाहाचा उल्लेख करितांना स्वयंवराचे वेळीं रामानें धनुर्भंग केल्याचें सांगितलें आहे. ( १०।६ ) रावणाचा वध झाला त्या वेळीं दहाहि तोंडांनीं तो रुधिर वमन करूं लागल्याचें ( १०।२३ ) वर्णन केलें आहे. यापेक्षांहि या रामचरित्राचा विशेष हा कीं, यांत सीतेनें एकहि दिव्य केलेलें नाहीं. सीतेविषयीं लोकांत पसरलेला अपवाद रामानें स्वतां (चारमुखानें नव्हे)श्रवण केल्याचें यांत सांगितलें असून त्यानिमित्त त्यानें तिचा त्याग केला आहे. (११।८।१०)सीता या वेळीं गर्भिणी असून तिला दोन पुत्र झाल्याची कथा यांत आहे; परंतु यांत पुढील दिव्य न सांगतां तिनें आपले पुत्र वाल्मीकींच्या स्वाधीन केले व विवरांत प्रवेश केला असें सांगितलें आहे. ( ११।१५ ) वाल्मीकिरामायणांतील सीतेच्या दिव्याचा प्रसंग यांत न आल्यामुळें रामाकडे त्याचे पुत्र कसे आले याचा उलगडा होत नाहीं व सीतेच्या विवरप्रवेशानंतर ती वार्ता श्रवण करून रामानें तिचे गुण आठवून शोक केल्याचें जें वर्णन केलें आहे, तें विसंगत दिसतें. कारण त्याग केल्यानंतर पुत्रांचे संस्कार मुनींनीं केल्याचें यांत सांगितलें आहे, म्हणजे तोंपर्यंत रामानें तिचा शोध केला नव्हता हें उघड आहे. मग या वेळीं तिची वार्ता ऐकून घेण्याचें आणि शोक करण्याचें कारण काय ? सीतेचें दिव्य न

झाल्यामुळें ती रावणाचे घरीं दीर्घकाल होती या तिजवरील अपवादाचें व तिचा संग्रह रामानें केल्यामुळें त्याजवरील अपवादाचें निराकरण झालेलें नाहीं, हें या चरित्रांत मोठें व्यंग आहे. सीतेचा त्याग राज्याभिषेकानंतर किती काल गेल्यावर केला हें यांत सांगितलें नाहीं, तथापि हा काल दीर्घ असणें संभवनीय नाहीं; आणि यासाठीं सीतेसहवर्तमान रामानें अनेक वर्षें ( ११।३५, ३६ ) विलास केल्याचें जें वर्णन केलें आहे, तें बरवर पाहिलें तरी विचित्र दिसतें.

## ८ अग्निपुराणांतील रामायण.

अग्नि व वसिष्ठ यांचे संवादरूपानें या पुराणाचें निरूपण असून प्रारंभीं सहा अध्यायांत ( ५ ते १२, ग्रंथसंख्या १८९ ) रामचरित्र आलें आहे. कथा वाल्मीकिरामायणाचे क्रमानें असून सात कांडांतील कथा सात अध्यायांत आणिली आहे. ही कथा नारदांनीं वाल्मीकींना सांगितली व ती ऐकून वाल्मीकींनीं काव्यरचना केली, अशी रामायणाची उत्पत्ति यांत सांगितली आहे. कांहीं अपराधानिमित्त रामानें मंथरेचे पाय धरून फरफटत ओढीत नेली व हा द्वेष मनांत धरून मंथरेनें यौवराज्याभिषेकाचे वेळीं विघ्न उपस्थित केलें अशी अपूर्व माहिती यांत दिलेली आहे. ( ६।८ ) बाकी सर्व रामचरित्र अगदीं रामायणाप्रमाणें आहे. लक्ष्मणाबरोबर रामाकडून सुग्रीवाला गेलेल्या निरोपाचा श्लोक दोहोंकडे अगदीं एक आहे. ( वा. रा. ४।३०।८१ व अ. पु. ८।६ ).

## ९ स्कन्दपुराणांतील रामायण.

हें पुराण सूतशौनकादिकांतील संवादरूपानें असून त्यांतील ब्रह्मखंड नामक तृतीयखंडांत धर्मारण्यखंड म्हणून जें दुसरें खंड आहे, त्याचे तिसाव्या अध्यायांत संक्षिप्त रामचरित्र आलें आहे. याचे श्लोक १०९ आहेत. धर्मारण्य या क्षेत्राचें माहात्म्य या खंडांत सांगितलें असून तदनुरूप खंडाची संज्ञा दिलेली आहे. सीतेला परत आणण्याचे निमित्तानें अनेक राक्षसांचा वध रामाला करावा लागला, तेव्हां त्यांच्या हत्येचा लागलेला दोष निरस्त व्हावा, म्हणून त्यानें वसिष्ठांच्या उपदेशाप्रमाणें या क्षेत्रीं सपरिवार गमन केलें, अशी येथें कथा आहे. रामचरित्र प्रथम सांगून पुढें त्याचा वरील माहात्म्यांत उपसंहार केला आहे. हें चरित्र वाल्मीकिरामायणांतील क्रमानें सांगितलें असून त्यांतील कांहीं भाग

तिथिवार सांगितला आहे. चरित्राचा हा विशेष पाहिल्यावर पद्मपुराणांतील रामाश्वमेधांत आलेल्या रामचरित्राचें स्मरण वाचकांस झाल्यावांचून राहाणार नाहीं. पद्मपुराणांतील रामचरित्राचा संक्षेप पूर्वी दिला आहे व दोन चरित्रांची तुलना करून पाहिली तर तीं बहुतेक शब्दशः एक आहेत, असें म्हटल्यास दोष येणार नाहीं. बहुतेक म्हणण्याचें कारण या पुराणांतील चरित्रांत कांहीं भाग अधिक आहे. सीताविवाहानंतर परशुरामाचा तेजोभंग, रामानें दंडकारण्यांत प्रवेश केल्यावर दशरथाचा मृत्यु, भरताचें अरण्यांत गमन व नंदिग्रामीं वास, सीताहरणाचे प्रसंगाची मायामृगाची कथा, जटायुवधानंतर सुग्रीवाशीं सख्य, वालिवध, सीताशुद्ध्यर्थ मारुतीचें प्रयाण, युद्ध चालू असतां मायासीतेचा वध, सीतेच्या दिव्याचे प्रसंगीं दशरथाचें आगमन इतक्या कथा पद्मपुराणांत नसून या पुराणांत आहेत व हा कथाभाग सोडल्यास बाकी चरित्र दोन ग्रंथांत सर्वथा एक आहे. इतकें सादृश्य पाहून साहजिक प्रश्न उद्भवतो कीं, यांत मूळचें कोणतें ? आणि अनुवाद कोणता ? पद्मपुराणांतील कथा कशी विसंगत आहे, हें आम्हीं दाखविलें असून, ती कथा प्राचीन नव्हे हें तिच्या स्वरूपावरूनच व्यक्त होत आहे. स्कन्दपुराणांतील रामचरित्रहि प्राचीन नसून युधिष्ठिराला हें माहात्म्य व्यासांनीं सांगितलें, असा याचा उपक्रम आहे. यांत प्रसंगानुसार द्वारकेचें माहात्म्य आहे व यावरून द्वारकेला तीर्थत्व प्राप्त झाल्यानंतरचें हें माहात्म्य आहे, यांत शंका नाहीं. तथापि त्यांतल्या त्यांत पद्मपुराणाहून यांतील चरित्र प्राचीन असावें, अशी आमची समजूत आहे. पद्मपुराणानें या चरित्राचा अनुवाद केला, असें त्यांतील कित्येक श्लोकांवरून स्पष्ट दिसतें. दोनहि ग्रंथांतील चरित्रें संक्षिप्त असल्यामुळें कोणती तरी कथा एकांत आहे व दुसऱ्यांत नाहीं, असें पाहून तेवढ्यावर निर्णय करितां येणार नाहीं. मात्र एवढें खरें कीं, या संक्षेपांतहि पद्मपुराणांत काय त्या कित्येक कथा आढळत नाहींत; पद्मपुराणांत सांगितलेली असून स्कन्दपुराणांत नाहीं, अशी एकहि कथा या चरित्रांत मिळावयाची नाहीं. तथापि हा संक्षेप करितांना पद्मपुराणांतील चरित्रकारानें जे प्रमाद केले आहेत, त्यांवरून त्यानें हें चरित्र स्वयंस्फूर्तीनें लिहिलेलें नसून तो स्कन्दपुराणाचा केवळ अनुवाद आहे, असें वाटतें. लक्ष्मण नागपाशांत गावला

असतां गरुड येऊन दशमीचे दिवशीं त्याची मुक्तता झाली, अशी कथा सांगितल्यावर स्कन्दपुराणांत पुढील श्लोक आहेतः—

**अवहारो माघशुक्लस्यैकादश्यां दिनद्वयम् ।**
**द्वादश्यामांजनेयेन धूम्राक्षस्य वधः कृतः ॥ ५८ ॥**
**त्रयोदश्यां तु तेनैव निहतोऽकंपनो रणे ।**

"(लक्ष्मण पडल्याची तिथि) माघ शु० १० व नंतर ११ याप्रमाणें दोन दिवस युद्धाचा विराम झाला; द्वादशीचे दिवशीं मारुतीनें धूम्राक्षाचा वध केला व त्रयोदशीला त्यानेंच रणांगणावर अकंपनाचा वध केला."

याचा अनुवाद करितांना पद्मपुराणांत पुढील श्लोक आहेतः—

**...गरुडागमनं ततः ।**
**एकादश्यां च द्वादश्यां धूम्राक्षस्य वधः कृतः ॥ ३६।५० ॥**
**त्रयोदश्यां तु तेनैव निहतः कम्पनो रणे ।**

"एकादशीचे दिवशीं गरुड आला (लक्ष्मणाची मुक्तता झाली;) व द्वादशीला धूम्राक्षाचा वध केला आणि त्रयोदशीला त्यानेंच रणभूमीवर कंपनाचा (अकंपनाचा) वध केला."

येथें धूम्राक्षाचा वध कोणीं केला, तें मुळींच सांगितलेलें नाहीं व पुढें अकंपनाचा वध केल्याचें सांगते वेळीं मात्र त्याचेकडे बोट दाखविलेलें आहे. अकंपनाचा कंपन झाला, हा लेखकप्रमाद असूं शकेल; परंतु वरील स्थलीं धूम्राक्षाचा वध कोणीं केला, हें सांगतांना एकादी पंक्ति राहिली असेल, असें म्हणतां येण्यासारखें नाहीं. अर्थात् स्कंदपुराणाचा अनुवाद करितांना पद्मपुराणांतील रामाश्वमेधाचे लेखकानें स्वतांचें वैशिष्टय राखण्यासाठीं म्हणून जे फेरफार केले, त्यांत वरील श्लोक आले आहेत व त्याच्या अनवधानतेमुळें त्याचे हातून मारुतीचा निर्देश राहून गेला आहे.

पुढें राम राज्य करूं लागल्याचें सांगितल्यावर रामराज्यांतील स्थितीचें वर्णन करून, एकदां रामाकडे वसिष्ठ ऋषि आले व त्यांना रामानें प्रश्न केल्यावरून त्यांनीं त्याला धर्मारण्याची यात्रा करण्याचा उपदेश केला, असें निरूपण करून रामकथेचा प्रस्तुत माहात्म्याशीं संबंध जुळवून घेतला आहे. पद्मपुराणांतील

रामाश्वमेधांत कवीला अश्वमेधाशीं संबंध जुळवावयाचा असल्यामुळें त्यानें वरील स्थलीं पुढील श्लोक दिला आहे:—

**राज्यं प्रकुर्वतस्तस्य पुरोधा वदतां वरः।**
**अगस्त्यः कुम्भसम्भूतिस्तमागन्ता रघोः पतिम्॥ ३३।७९.॥**

येथें श्लोकाचें प्रथमार्थ स्कन्दपुराणाप्रमाणें आहे व द्वितीयार्ध मात्र बदललेलें आहे; पण यामुळें झालें काय? राम राज्य करीत असतां त्याजकडे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असे त्याचे पुरोहित आले, असें दोनहि ग्रंथांत सारखें सांगितलें असून त्या पुरोहिताचें नांव मात्र स्कन्दपुराणांत वसिष्ठ असें दिलें आहे, तर पद्मपुराणांत अगस्त्य असें दिलें आहे. वसिष्ठ हे रामाचे पुरोहित होते, हें प्रसिद्ध आहे व यासाठीं कवीनें केलेला फेरफार चिंत्य होय.

रामाश्वमेधांतील वरील चरित्र निरूपण करितांना वक्त्यानें तें भावी चरित्र आपणांस पूर्वी कळल्याचें निरूपण केलें आहे; परंतु या भावी चरित्राचें मूळ प्रस्तुत पुराणांत मिळाल्यामुळें त्यांतील भविष्यज्ञानाच्या कल्पनेवर आयताच स्वच्छ प्रकाश पडला आहे. याच धर्मारण्यमाहात्म्यांत पुढें कुमारपाळ नामक प्रसिद्ध जैनधर्मानुयायी राजा राज्य करीत असल्यावेळची कथा आली आहे. हा राजा तर अकराव्या ( शा० श० ) शतकांत होऊन गेला आहे. तेव्हां प्रस्तुत माहात्म्य किती प्राचीन अथवा विश्वसनीय आहे, तें वाचकांनीं ठरवावें.

## १० वायुपुराणांतील रामायण.

सूतशौनकादिसंवादरूपानें हें पुराण असून त्यांतील उत्तरार्धाच्या २६ व्या अध्यायांत सूर्यवंशवर्णन करितांना रामचरित्र १३ श्लोकांत ( १८३–१९६ ) आलें आहे. रामादि बंधुचतुष्टयांनीं कोठें कोठें राज्यें केलीं, हें यांतच सांगितलें आहे. अर्थात् रामचरित्र नांवाचें आहे. यांत रामाचें माहात्म्य सांगितलेले पुढील श्लोक दिले आहेत:—

**गाथां चैवात्र गायन्ति ये पुराणविदो जनाः।**
**रामे निबद्धास्तत्त्वार्था माहात्म्यात्तस्य धीमतः॥ १९०॥**
**श्यामो युवा लोहिताक्षो दीप्तास्यो मितभाषितः।**

आजानुबाहुः सुमुखः सिंहस्कन्धो महाभुजः ॥१९१॥
दशवर्षसहस्राणि रामो राज्यमकारयत् ॥

येथें पुराणवेत्त्यांनीं गायिलेली रामाचे माहात्म्याविषयींची गाथा दिलेली आहे. महाभारतांतील तीन पर्वांत ही गाथा थोड्या फेरानें आली आहे व या दृष्टीनें तिचें महत्त्व आहे.

## ११ सौरपुराणांतील रामायण.

हें पुराण सूतशौनकादिसंवादरूपानें असून त्यांत ३० व्या अध्यायांत सूर्यवंशीय राजे सांगतांना रामचरित्र सांगितलेलें आहे. याचे श्लोक अवघे २१ (४८–६९) आहेत. जनकानें गौरीची आराधना केल्यावर तिच्या अंशानें सीता झाली, असें यांत सांगितलें आहे. तसेंच सेतूचे मध्यभागीं रामानें रामेश्वरनामक लिंग स्थापिल्याचें यांत वर्णन आहे. हें रामचरित्र येथें संक्षेपानें सांगितलें असून तेंच पुनः वाल्मीकींनीं विस्तारानें सांगितलें आहे, असें म्हणून समाप्ति केली आहे.

## १२ नारसिंहपुराणांतील रामचरित्र.

माघमासीं प्रयागावर स्नान करण्याकरितां सर्व ऋषि आले असतां तेथें सूताला भरद्वाजादिकांनीं प्रश्न विचारल्यावरून सूतानें हें पुराण सांगितलें आहे. यांत मार्कंडेय व सहस्रानीक यांचा उपसंवाद असून त्यांत हें चरित्र आलें आहे. याचे अध्याय ( ४७ ते ५२ ) सहा असून ग्रंथसंख्या ७८४ आहे. हें चरित्र वाल्मीकिरामायणाप्रमाणें असून फेरफार सामान्य आहेत. यांत अहल्या शिला झाल्याचें सांगितलें असून सुमित्रेनें लक्ष्मणाला केलेल्या उपदेशांतील प्रसिद्ध श्लोक ( रामं दशरथं विद्धि ) यांत अंत्यचरणावांचून रामायणाप्रमाणेंच आहे. अयोध्याकांडांतील ( कतकाची टीक नसल्यामुळें ) प्रक्षिप्त ठरलेल्या एका सर्गांत काककृत सीतास्तनविदारणाची कथा आहे. ती यांत त्याच स्थलीं आहे. सुतीक्ष्णाश्रमीं राम गेल्याचें सांगतांना तेथें ऋषींचें नांव तीक्ष्ण असें दिलें आहे. मायामृगाचे निमित्तानें राम व लक्ष्मण दोघेहि अरण्यांत गेले असतां संन्यासवेष घेऊन यांतील रावण सीतेकडे आला आहे व " अयोध्येहून भरत आला असून त्याची व रामाची गांठ पडली आहे व त्यानें तुला नेण्याकरितां मला विमान घेऊन पाठविलें आहे, तेव्हां या विमानांत बसून चल. " असें

सांगून तिला घेऊन एकदम लंकेंत गेला आहे. वालिवधाचा वृत्तांत सांगितल्या वर यांत पुढील श्लोक आहे.

**रणशौण्डं** ( अंगद ) **यौवराज्ये नियुक्त्वा राघवस्तदा ।**
**तां च तारां तथा दत्वा रामश्च रविसूनवे ॥** ५०।२७॥

" रामानें पराक्रमी अंगदाला यौवराज्याभिषेक करविला. तसेंच तारा सुग्रीवाचे स्वाधीन केली. "

येथें वालीची स्त्री तारा सुग्रीवाला रामानेंच दिल्याचें सांगितलें आहे. रावणवधानंतर अयोध्येला परत येऊन राज्याभिषेक होईपर्यंत पुढील कथा क्रमानें सांगितल्या आहेत. पुराणाचे एका प्रतींत रामानें सेतूचे मध्यभागीं शंकराचें लिंग स्थापिल्याचें सांगितलें आहे.

## १३ देवीभागवतांतील रामचरित्र.

देवीच्या नवरात्रव्रताचें माहात्म्य सांगतांना व्यासांनीं जैमिनीला सुशील नांवाचे वैश्याची कथा सांगितली आहे. हा कोसलदेशांत राहणारा. दारिद्र्यानें पीडित होऊन त्यानें एका ब्राह्मणाला विचारिलें असतां त्यानें त्याला हें व्रत सांगितलें व त्याप्रमाणें आचरण केल्यावर त्याचें दारिद्र्य दूर झालें, अशी ही कथा आहे. या व्रताचें माहात्म्य सांगतांना त्या ब्राह्मणानें त्या वैश्याला रामानें हें व्रत केल्याचें सांगितलें व त्यानिमित्त जैमिनीनें प्रश्न केल्यावरून व्यासांनीं रामचरित्र निरूपिलें आहे. वालिवधानंतर वर्षाकालीं राम किष्किंधेंत असतां सीताविरहानें एकदां शोकाकुल झाल्यावर लक्ष्मणानें त्याला धीर दिला. इतक्यांत तेथें नारद आले व त्यांनीं त्याला देवीचें हें व्रत सांगितलें व त्याप्रमाणें रामानें त्याचें अनुष्ठान केलें. अष्टमीचे रात्रीं देवी प्रसन्न होऊन तिनें स्वप्नांत दर्शन दिलें व रामाला तो नारायणाचा अवतार असल्याचें स्मरण दिलें. देवीचे वरप्रदानाप्रमाणें रामाला सीता व राज्य हीं लवकर प्राप्त झालीं. यांतील रामचरित्र ( स्कंद ३, अध्याय २८ ते ३०, ग्रंथसंख्या १८७ ) तीन अध्यायांत असून अति संक्षिप्त आहे. देवीचें माहात्म्य त्यांत गोंवलेलें आहे, याहून त्यांत अधिक कांहीं नाहीं.

## १४ अद्भुत रामायण.

या ग्रंथाचे सर्ग २७ असून ग्रंथसंख्या १३५३ आहे. यांतील कथा वाल्मीकि आणि भरद्वाज यांमधील संवादरूपानें सांगितली आहे. रावणवधानंतर राम अयोध्येंत परत आले असतां त्यांचें अभिनंदन करण्यास ऋषिमंडळी आली व त्यांनीं राक्षसांचे निःपाताबद्दल रामाची स्तुति केली. या वेळीं सीता हसूं लागली. तिला हसण्याचें कारण विचारितां तिनें " रामानें मारलेल्या रावणाचा एक बंधु सहस्रमुखी रावण पुष्करद्वीपांत असतो; त्याचा वध केल्यावांचून पृथ्वीला खरी स्वस्थता यावयाची नाहीं आणि त्याचें नांव कोणी घेत नाहीं. यामुळें आपल्याला हंसूं आलें, " असें सांगितलें. ही माहिती विवाहापूर्वीं माहेरीं असतां तिला तेथें आलेल्या एका अतिथीकडून कळली होती. नंतर रामानें या सहस्रमुखी रावणावर स्वारी केली. या वेळीं झालेल्या युद्धांत राम मूर्च्छित पडल्यावर सीतेनें स्वतां पुढें होऊन हातांत शस्त्र घेतलें व रावणाचा वध केला. या रामायणांतील मुख्य कथा याप्रमाणें आहे. कथेचें हें स्वरूप पाहिलें म्हणजे याला रामायण हें नांव देण्यापेक्षां सीतामाहात्म्य हें नांव अधिक शोभलें असतें, असें कोणासहि वाटेल. यांतील २५ व्या अध्यायांत रामानें सीतेची स्तुति केली असून पुढें तिचें सहस्रनाम गायिलें आहे. हें सर्व आमच्या वरील कल्पनेला पोषक आहे. ग्रंथाचे प्रारंभीं वाल्मीकि व भरद्वाज यांचा संवाद देऊन जें ग्रंथाचें प्रयोजन सांगितलें आहे, त्यांत स्वतां वाल्मीकीनें आपण यापूर्वीं गायिलेल्या रामचरित्रात्मक ग्रंथांत रामाचें मनुष्याप्रमाणें सामान्य चरित्रवर्णन केलें आहे; तेव्हां त्यांत न आलेलें " सीतामाहात्म्यसार " ( १।१० ) यांत निरूपण करावयाचें असें सांगितलें आहे. ब्रह्म हें जगताचें कारण व सीता ही मूळ प्रकृति होय व धर्मरक्षणाकरितां तिनें हा अवतार घेतला. राम व सीता यांचे जन्माविषयींच्या यांतील कथाहि विचित्र आहेत. अंबरीष राजाची कन्या श्रीमती हिला नारद व पर्वत या दोघांनीं मागणी घातली असतां राजानें त्या दोघांनाहि, दुसरे दिवशीं कन्येचें स्वयंवर करून ती ज्याला वरील त्याला तिला अर्पण करावयाची, असा आपला विचार सांगितला. दोघेहि विष्णूकडे वेगवेगळे जाऊन भेटले व स्वयंवराचे वेळीं दुसऱ्याचें मुख त्या कन्येला वानराप्रमाणें दिसावें,

अशी त्यांनीं त्याला विनंति केली. मात्र कन्येवांचून तसें दुसऱ्या कोणाला दिसूं नये असे प्रत्येकानें सांगितलें. दुसऱ्या दिवशीं स्वयंवराचे वेळीं हे दोघेहि वानरांसारखे दिसूं लागल्यामुळें राजकन्या कोणालाच वरीना. या वेळीं त्या दोघांच्या मध्यभागीं एक सुंदर मूर्ति मात्र तिला दिसूं लागली व तिला कन्येनें माळ घातली. ही मूर्ति अर्थात् विष्णूची होय. अशा रीतीनें आपणांस फसविल्याबद्दल क्रुद्ध होऊन दोघांहि ऋषींनीं विष्णूला " तुला पृथ्वीवर त्या कन्येला दिसलेल्या स्वरूपाप्रमाणें स्वरूप धारण करून जन्म घ्यावा लागेल व ही कन्या तुझी पत्नी होऊन तेथें तिचा कोणी तरी राक्षस अपहार करील. " असा शाप दिला. या शापाप्रमाणें विष्णूनें रामावतार घेतला व श्रीमती सीता झाली. सीतेच्या जन्माची कथा यापुढें दिली आहे. दंडकारण्यांत गृत्समद म्हणून एक ऋषि होते. त्यांचे स्त्रीनें साक्षात् लक्ष्मी आपली कन्या व्हावी अशी त्यांची प्रार्थना केली असतां ते त्यासाठीं प्रत्यहीं एका कलशांत दूध अभिमंत्रण करून ठेवीत असत. एकदां रावण तेथें आला व ऋषींवर विजय मिळविण्याकरितां त्यानें बाणाचीं अग्रें बोंचून त्यांचें रक्त काढिलें व तें सांठविण्यास हा कलश घेतला. पुढें कलश घेऊन तो परत गेला व त्यानें तो मंदोदरीच्या स्वाधीन केला. कलशांतील रक्त विषापेक्षां तीव्र आहे, यासाठीं तें प्राशन न करण्याविषयीं त्यानें तिला बजाविलें. रावण बाहेर गेल्यावर पतीचें आपल्यावर खरें प्रेम नसून तो नित्य परस्त्रियांशीं रममाण होतो असें मनांत येऊन मंदोदरीला वैताग आला व मृत्यु यावा या हेतूनें पतीनें विषापेक्षां तीव्र असल्याविषयीं सांगितलेलें कलशांतील रुधिर तिनें प्राशन केलें. त्याचे योगानें ती गर्भवती झाली. पति समीप नसतां गर्भ राहिलेला व त्याची गुप्तपणें व्यवस्था करण्याची कोठें सोय नाहीं, असें पाहून ती विमानांतून कुरुक्षेत्रीं गेली. तेथें गर्भ भूमींत पुरून ठेविला व ती परत आली. ही कन्या पुढें जनक नांगरीत असतां त्याला मिळाली. ही सीता होय. हा ग्रंथ वाल्मीकींचे नांवानें प्रसिद्ध आहे. तथापि ग्रंथ वाचूं लागतांच तो आधुनिक असावा असा संशय येतो, व ग्रंथ वाचून पुरा झाला म्हणजे त्याला दृढता येते ग्रंथाचे प्रारंभीं मंगलपर म्हणून जे श्लोक आहेत त्यांत प्रथम " नारायणं नमस्कृत्य " हा श्लोक दिला आहे

व पुढील श्लोकांत वाल्मीकींना नमन केलें आहे. रामायण हें नांव लोकांचें लक्ष वेधण्यापुरतें दिलें आहे, असें वाटतें. यांत प्रायः सीतामाहात्म्य असल्याचें वर सांगितलें आहे. रामायणांतील कथाभाग संक्षेपानें–किंबहुना रामायणाकडे बोट दाखवून अगदीं आंवरून घेतला आहे. राम वनवासाला जाण्याचे प्रसंगाचें पुढील वर्णन पहा.

अथ सीतालक्ष्मणाभ्यां सह केनापि हेतुना ।
जगाम विपिनं रामो दंडकारण्यमाश्रितः ॥१०।१॥

" नंतर कांहीं कारणास्तव सीता व लक्ष्मण यांसह राम अरण्यांत निघून गेला व दंडकारण्यांत राहिला. "

याप्रमाणें रामायणकथा संक्षेपानें सांगून सीता व राम यांचे उत्पत्तीच्या कथा, तसेंच सीतेनें युद्ध केलें त्या कथा विस्तारानें सांगितल्या आहेत. राम व मारुती यांची भेट प्रथम झाली त्या वेळीं रामानें मारुतीला जो उपदेश केला आहे त्यानें चार सर्ग (११ ते १४) व्यापिले आहेत व पुढील सर्गांत मारुतीनें रामाची स्तुति केली आहे. तसेंच १९ व्या सर्गांत सहस्रमुखी रावणाच्या पुत्रांचें सर्व सर्गभर कंटाळवाणें वर्णन आहे. अशा प्रकारें ग्रंथविस्तार निष्कारण झालेला आहे. सीतावियोगानें विव्हल झालेला राम व सुग्रीवाकडून सख्य-संपादनासाठीं आलेला मारुती यांची गांठ पडावी आणि त्यांनीं वेदांतपर भाषणें करीत रहावें असें निरूपण वाचलें म्हणजे स्वतां कवीला तारतम्य नसल्यामुळें त्याच्या तावडींत सांपडून हीं बिचारीं पात्रें हास्यास्पद मात्र झालीं आहेत, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. तसेंच सीतेचें सामर्थ्य रामाहून श्रेष्ठ असें दाखविण्याकारतां रामापुढें दशमुखी रावण उभा होता म्हणून सीतेपुढें सहस्रमुखी रावण कवीनें उभा केला! पण या सीतेचा दशमुखी रावणानें अपहार करून तिला अशोक वनिकेंत अडकवून ठेविली त्या वेळीं तिचें हें सामर्थ्य कोठें गेलें होतें, असा प्रश्न केल्यास त्याला आमचे कवि काय उत्तर देतील? हा सहस्र-मुखी रावण खरोखर अस्तित्वांत असता तर रावणवधानिमित्त अभिनंदन कर-ण्याकारितां आलेल्या महर्षींना त्याची वार्ता कां नसावी? त्याचा उपद्रव

लोकांला होत नव्हता असें म्हटलें तर मग त्याचा वध तरी कां केला ? एतावता हें सर्व कथानक नांवाप्रमाणें खरोखर अद्भुत आहे.

कवीनें कित्येक स्थळीं रामायणाचें शब्दशः अनुकरण केलें आहे. रामायणाची फलश्रुति वाल्मीकिरामायणांत पुढीलप्रमाणें आहे:—

**पठन् द्विजो वागृषभत्वमीयात् । स्यात् क्षत्रियो भूमिपतित्वमीयात् ।**
**वणिग्जनः पण्यबलत्वमीयात् । जनश्च शूद्रोऽपि महत्त्वमीयात् ॥१।१।१००**

यांत चारी वर्णांना रामायणपठणाचे योगानें काय फल मिळतें, तें वर्णानुक्रमानें वर्णन केलें आहे. या श्लोकाचें पुढील 'अद्भुत' अनुकरण पहा:–

**पठन् द्विजो वागृषभत्वमीयात् । क्षत्रान्वयो भूमिपतित्वमीयात् ।**
**वणिग्जनः पुण्यफलत्वमीयात् । शृण्वन् हि शूद्रोऽपि महत्त्वमीयात्॥१।२४॥**

या फलश्रुतींत सर्व शब्द सारखे आहेत; मात्र वैश्याचे फलांत त्यानें फेर केला आहे. वैश्यानें रामायण पठण केल्यास त्याला पण्यबल–व्यापारांत लाभ--होईल, असें वाल्मीकिरामायणांत सांगितलें आहे व अद्भुत रामायणांत केवल पुण्यफल प्राप्त होईल-पुण्य लागेल-असें सांगितलें आहे. हा फेर त्यानें बुद्ध्या केला, का लेखकाचा तो प्रमाद आहे, हें कळत नाहीं; पण आम्हीं दिलेला पाठ सर्व प्रतींत असेल, तर पण्यबल शब्दाचा अर्थ त्याला न कळून त्यानें हा यत्न केला नसेल ना, अशी शंका येऊं लागते; राज्याभिषेकानंतर रामाचे अभिनंदनार्थ ऋषि आल्याचें वर्णन उत्तरकांडाचे प्रारंभीं एका श्लोकांत आहे. ( ७।१।१ ) तोच श्लोक त्या प्रसंगीं याहि ग्रंथांत थोड्या शाब्दिक फेरानें आला आहे. ( १७।१ ).

उपनिषदें व गीता यांमधील कित्येक श्लोक या ग्रंथांत, कोठें थोडा फेर करून, तर कोठें जशाचे तसे घेतले आहेत. पुढील श्लोक पहा:—

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदा प्रकृतिसंभवः ॥ १।१८ ॥**
**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स श्रृणोत्यकर्णः ।**
**स वेत्ति विश्वं न हि तस्य वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं पुराणम्॥१।२४॥**
**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**

तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ११।३६ ॥
सर्वतः पाणिपादं तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥
सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ॥ १२।३ ॥
अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता चैव फलप्रदः ॥१३।८ ॥
पत्रं पुष्पं फलं तोयं मदाराधनकारणात् ।
यो मे ददाति नियतः स मे भक्तः प्रियो मतः ॥ १३।१४ ॥
ध्यानेन मां प्रपश्यन्ति केचिज्ज्ञानेन चापरे ।
अपरे भक्तियोगेन कर्मयोगेन चापरे ॥ १३।२३ ॥
त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतो धर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषोत्तमोऽसि१५।१६

वरील अवतरणांकडे पाहिलें म्हणजे तीं गीतोपनिषदांतून बहुतेक जशाचीं तशीं घेतलीं आहेत, हें वाचकांना सहज कळून येईल. सर्वथा सदृश असलेल्या पंक्ति तेवढ्या येथें घेतल्या आहेत. राम व मारुती यांच्या संवादांतील हीं अवतरणें असून त्यांतील सारें विवेचन वेदांतविषयक आहे आणि त्याचें सामान्य स्वरूप गीतेप्रमाणें आहे. मात्र गीतेंतील विवेचन प्रासंगिक आहे तर हें अप्रासंगिक आहे व हा दोहोंमध्यें महत्त्वाचा भेद आहे.

नारदपर्वतांची एक कथा थोड्या फेरानें शांतिपर्वांत आली आहे. तेथें राजा अंबरीष नसून सृंजय आहे व वानरमुखाची प्राप्ति त्यांत स्वतांचे प्रभावानें करण्यांत आली आहे. अर्थात् त्यांत विष्णूचा संबंध नाहीं. गीतेचें अनुकरण वर दाखविलें आहे. तसेंच श्रीकृष्णाचा एका उपकथेंत संबंध आला आहे. यावरून या ग्रंथाची रचना कधीं झाली असावी, याचें स्थूल अनुमान वाचकांस होण्यास अडचण नाहीं.

## १५ अध्यात्मरामायण.

रामचरित्रावर हा एक स्वतंत्र ग्रंथ आहे. वाल्मीकिरामायणाप्रमाणें याचीं कांडें ७ सात असून त्याचे सर्ग ६५ आहेत व एकंदर श्लोकसंख्या ४३९९ आहे. कथानकाची कांडशः केलेली विभागणी वाल्मीकिरामायणाप्रमाणें आहे. या ग्रंथाचा विशेष त्याच्या नांवांत व्यक्त झाला असून हा ग्रंथ पुष्कळांच्या नित्यपाठांतील

आहे. ग्रंथारंभीं या रामायणाचें माहात्म्य म्हणून ब्रम्हांडपुराणांतील एक सर्ग दिला आहे. याचे श्लोक ६० आहेत. सूतशौनकांतील संवादरूपानें हें निरूपण असून त्यांत नारद ब्रह्मलोकीं गेले असतां त्यांनीं ब्रह्मदेवाला कलियुगांत लोक दुराचारमग्न म्हणून त्यांच्या उद्धारार्थ सुकर उपाय विचारल्यावरून त्यांनीं अध्यात्मरामायणाकडे बोट दाखवून त्याची स्तुति केली आहे. यापुढें मूळ ग्रंथाला प्रारंभ झाला आहे. ही कथा शंकरांनीं पार्वतीला सांगितली असून प्रारंभीं "रामहृदय" म्हणून सीता व राम यांनीं मारुतीला केलेला उपदेश दिला आहे. रामाला अभिषेक झाल्यानंतर सर्व मंडळी स्वस्थ बसली असतांचा हा प्रसंग आहे, व या निमित्तानें त्यांत रामचरित्राचा वृत्तांत अत्यंत संक्षेपानें गोंविला आहे. हा संक्षेप ऐकून पार्वतीनें शंकरांला ही कथा सविस्तर सांगण्याविषयीं विनंति केली व शंकरांनीं तिला "स्वतां रामाकडून आपणाला कळलेली कथा सांगतों" (१।२।४) असें म्हणून सांगण्यास प्रारंभ केला आहे. पुढील रामचरित्र वाल्मीकिरामायणाप्रमाणें असून कथेच्या ओघाबरोबर येणाऱ्या संवादाचे प्रसंग साधून कधीं स्तोत्रांचे मिषानें तर कधीं प्रत्यक्ष उपदेश म्हणून वेदांतविषयाचें निरूपण केलेलें आहे. कित्येक प्रसंग तर ह्या निरूपणाचा उद्देश साधण्यासाठीं बुद्ध्या जुळवून आणिलेले आहेत. प्रारंभींच 'रामहृदय' निरुपण केल्याचें जें वर सांगितलें आहे तेवढें पाहिलें, तरी त्यावरून असे प्रसंग कवीनें कसे कौशल्यानें जुळवून आणिले आहेत हें कळून येईल. याची भाषा साधी, रचना सुंदर व शब्द मधुर आहेत. छंद मात्र बहुतेक अनुष्टुभ् असला तरी हें बाहुल्य वाल्मीकिरामायणाप्रमाणें असून इतर छंदांचा भरणाहि त्याचे बरोबरीनें आहे म्हटल्यास अत्युक्तीचा दोष येणार नाहीं. यांत प्रसंगानुरूप आलेलीं स्तोत्रें उत्तम असून प्रसिद्ध 'रामगीता' ही या ग्रंथाचे उत्तरकांडांत आलेली आहे. आतां वाल्मीकिरामायणाशीं या ग्रंथाची तुलना करून यांत काय विशेष आहे तें पाहूं.

### वाल्मीकिरामायणाशीं तुलना—कथानकाविषयीं.

रामाच्या बाललीला वाल्मीकींनीं मुळींच सांगितल्या नाहींत व या कवीला वाटलेली ही न्यूनता त्यानें आपल्या ग्रंथांत भरून काढलेली आहे. मखरक्षणार्थ

राजपुत्रांना नेण्याकरितां विश्वामित्र आल्यावेळीं दशरथ त्यांबरोबर पुत्रांना पाठविण्याचें नाकारूं लागला असतां वसिष्ठांनीं राजाला तो काश्यपाचा व राम विष्णूचा अवतार असल्याचें सांगून रामाचे संरक्षणाविषयीं त्याचे मनांत आलेल्या शंकेचा परिहार केला आहे. यात गंगावतरण व विश्वामित्रचरित्र या कथा नाहींत. सीताविवाहाचे वेळीं जनकानें आपल्या कन्येचा जो वृत्तांत वसिष्ठ-विश्वामित्रांना निवेदन केला, त्यांत राम विष्णूचा अवतार व सीता मायेचा अवतार असल्याचें नारदांकडून आपल्याला कळल्याचें त्यानें सांगितलें आहे व त्यांच्याच सूचनेवरूनच राजानें हा विवाहाचा योग घडवून आणिला आहे. यौवराज्याभिषेकाच्या पूर्वीं ब्रह्मदेवांकडून रामाकडे नारद आले असून त्यांनीं त्याला ज्या रावणवधासाठीं अवतार घेण्यांत आला तें कार्य राज्यकारभार पाहण्यांत न गुंतता सत्वर करण्याविषयींची आठवण दिली आहे. यौवराज्याभिषेकाचे कामीं प्रजाजनांचे पुढा व मांडलिक यांची संमति राजानें दरबार भरवून घेतल्याचें यांत वर्णन नाहीं. राम वनवासाला निघाले असतां त्यांना पाहून नागरिक लोक शोक करूं लागले, तेव्हां त्यांचें सांत्वन करतांना वामदेवनामक एका पुरुषानें पुढें येऊन भूमीचा भार हरण करण्याकरितां विष्णुच रामरूपानें अवतीर्ण झाल्याविषयीं सांगितलें आहे. ( २।२।२८ ) राम चित्रकूटावर वाल्मीकींचे आश्रमीं आले असतां महर्षींनीं त्यांचें स्वागत केलें व रामनामाचें माहात्म्य सांगण्याचे उद्देशानें त्यांनीं स्वतांचा पूर्ववृत्तांत सांगितला आहे. वाल्मीकींची ही कथा प्रसिद्ध आहे. ( २।६ ) भरत रामाला परत नेण्याकरितां अरण्यांत आला व आग्रह करूं लागला असतां त्याचा निर्धार पाहून निरुपाय होऊन रामानें वसिष्ठांला नेत्रसंकेत केला ( २।९।४१ ) व त्यास अनुसरून वसिष्ठांनीं भरताला एकांतीं बोलावून नेऊन राम हा रावणवधार्थ विष्णु अवतीर्ण झाला असल्याचें सांगितलें आहे. कैकेयीनें तर यापुढें रामाला एकीकडे बोलावून त्याचें खरें स्वरूप आपणाला या वेळीं कळल्याचें सांगून स्वतांचे दुर्वर्तनाबद्दल त्याची क्षमा मागितली आहे. ( २।९।५४) यांतील सुतीक्ष्ण अगस्त्यांचे शिष्य म्हणून सांगितले असून त्यांचे आश्रमीं राम एकदांच गेला आहे व पुढें ते गुरूचे आश्रमापर्यंत पोंचविण्यास त्याबरोबर गेले आहेत ( ३।३।६ )

पंचवटींत आश्रम बांधून राहिल्यावर लक्ष्मणानें प्रश्न केल्यावरून रामानें त्याला मोक्षमार्गाचा उपदेश केला आहे. ( ३।४ ) लक्ष्मण अरण्यांत असतां निद्राहारवर्जित राहिला होता असें येथें सांगितलें आहे. ( ३।४।१३ ) मारीच मृगरूपानें आल्यावेळीं रामानें सीतेला छायारूपानें आश्रमांत राहून मुख्य रूप अग्नींत गुप्तपणें स्थापण्याची आज्ञा केली आहे. ( ३।७।२, ३ ) व त्याप्रमाणें सीतेनें केल्यावर रावणानें या छायारूप सीतेचा अपहार केला आहे. लक्ष्मणाला मात्र हा प्रकार माहीत नसल्याचें पुढें वर्णन आहे. ( ३।८।२ ) वालिवधानंतर वर्षाकालीं रामलक्ष्मण किष्किंधेंतील एका गुहेंत राहिले असतां रामानें लक्ष्मणाला पूजेचा विधि निरूपण केला आहे. सुग्रीवानें सीताशुद्ध्यर्थ चारी दिशांना वानर पाठविल्याचें यांत वर्णन आहे; पण निघते वेळीं सुग्रीवानें त्यांना दिलेला भूगोलवर्णनाचा पाठ यांत नाहीं. सीतेचा शोध लागत नाहीं, म्हणून अंगदादि वानर चिंताकुल होऊन बसले असतां मारुतीनें त्यांना 'आपण विष्णूचे पार्षद असून रावणवधाकरितां विष्णूनें मनुष्यावतार धारण केला आहे व त्याचे साहाय्यार्थ आपण वानररूपानें अवतीर्ण झालों आहों,' असें त्यांना सांगून धीर दिल्याचें यांत वर्णन आहे. ( ४।७।१९, २० ) सीताशुद्ध्यर्थ लंकेंत गेलेल्या मारुतीला प्रथमच लंकाराक्षसीकडून सीता अशोकवनिकेंत असल्याचें कळलें, असें यांत वर्णन आहे. (५।१।२५) मारुती अशोकवनिकेंतील शिंशपावृक्षावर बसला असतां रावण तेथें आल्याचें यांतहि सांगितलें आहे. मात्र यांतील रावण 'आपण सीतापहार केला, तरी अद्यापि राम येऊन त्याचे हातून आपल्याला मृत्यु कसा येत नाहीं,' अशी चिंता करीत आला आहे. सेतुबंधाला प्रारंभ करण्यापूर्वीं रामानें रामेश्वराची स्थापना केल्याचें वर्णन यांत आहे. ( ६।४।१ ) यांतील युद्धाचें वर्णन रामायणाइतकें विस्तृत नाहीं. मुख्यमुख्य कथा प्रायः सारख्या आहेत. लक्ष्मणाला शक्ति लागून तो मूर्च्छित होऊन पडला असतां मारुती औषधी आणण्याकरितां गेल्याचें यांतहि सांगितलें असून त्यानिमित्त यांत कालनेमीची कथा आली आहे. मारुतीला मार्गांत विघ्न करण्याकरितां रावणानें याला पाठविला; रात्रण त्याजकडे आपल्या कार्यासाठीं आला असतां त्यानें त्याला पुष्कळ वेदान्तपर उपदेश केला आहे.

( ६।६ ) मारुती हिमालयाकडे गेला, परत येतांना मारुतीचे हातून हा राक्षस मरण पावला आहे. राम विष्णूचा अवतार असल्याविषयीं नारदांकडून आपणास कळल्याचें कुंभकर्णानें आपल्या भाषणांत एकदां सांगितलें आहे. ( ६।७।६४ ) इंद्रजिताशीं युद्ध करिते वेळीं, बारा वर्षें निद्राहारविवर्जित असलेल्या पुरुषापासून त्याला मृत्यु यावयाचा, अशी ब्रह्मदेवानें योजना केली असल्याचें बिभीषणानें रामाला सुचविलें असून त्याप्रमाणें लक्ष्मणानें जाऊन इंद्रजिताचा वध केला आहे. ( ६।८।६४, ६५ ) सर्व वीरांचा निःपात झालेला पाहून रावण उपायचिंतनाकरितां शुक्राचार्याकडे गेला असून ( ६।१०।४ ) पुढें त्यानें तपश्चर्येला प्रारंभ केला आहे. ( ६।१० ) त्याला विघ्न करण्याकरितां रामाची सेना तेथें गेली असून अंगदानें तर मंदोदरीला त्यापुढें फरफटत ओढीत आणिली आहे. ( ६। १०।२५ ) या वेळीं मंदोदरी व रावण यांमध्यें झालेल्या संवादांत विष्णूचे मत्स्यादि अवतारांचे उल्लेख असून सांप्रत तोच रामरूपानें अवतीर्ण झाल्याचें निरूपण केलेलें आहे. रामाला राज्याभिषेक झाल्यानंतर त्याचें अभिनंदन करण्याकरितां आलेल्या ऋषींशीं त्याचा संवाद झाला आहे. त्यांत ऋषींनीं त्याला नानाविध कथा सांगितल्या आहेत. या कथांमध्यें अगस्त्यांनीं रामाला रावण व सनत्कुमार यांचें झालेलें भाषण सांगितलें असून त्यांत विष्णूचे हातून मृत्यु आल्यास चांगली गति प्राप्त होते, असें त्याला त्यांजकडून कळल्याचें वर्णन आहे व याप्रमाणें आपणास मृत्यु यावा, म्हणून रावणानें सीतेचा अपहार करून हा योग जुळवून आणिला, असें निरूपण केलें आहे. ( ७।३ ) सीतेचा अपहार केला, तरी रावणानें तिचें मातेप्रमाणें पालन केल्याचें येथें अगस्त्य सांगत आहेत. ( ७।४।११ ) देवांनीं सीतेला वैकुंठीं लवकर येण्याविषयीं प्रार्थना केल्याचें तिनें रामाला सांगितलें आहे. ( ७।४।३६ ) सीतात्यागानंतर रामानें लक्ष्मणाला केलेला उपदेश तर रामगीता म्हणून प्रसिद्ध आहे. ( ७।५ )

### वाल्मीकिरामायणाशीं तुलना–ग्रंथरचनेविषयीं.

वाल्मीकिरामायणाशीं तुलना करून पाहातां अध्यात्मरामायणांत कथेच्या दृष्टीनें काय विशेष आहे हें येथवर सांगितलें; व हें पाहिलें म्हणजे कथाभागांतील फेरफार विशेष महत्त्वाचा , हें सहज लक्षांत येईल. अध्यात्मरामायणांत

जो कथाभाग अधिक आला आहे, तो वाल्मीकिरामायणाप्रमाणें कथाभागाचें निरूपण करीत असतां अनुषंगानें आला आहे. या कथाभागानें मूळ कथेंत उलथापालथ केलेली नाहीं. मुख्य कथानकाचा क्रम तर अगदीं सारखा आहे व त्यावरून वाल्मीकिरामायणाचा कथेच्या दृष्टीनें संक्षेप करून त्यांत नसलेला वेदांतपर भाग यांत विस्तारानें निरूपिला आहे, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. मागें रा. कृ. ब. गोडबोले यांनीं यांतील वेदांत भाग गाळून तीच कथा गद्यरूपानें ग्रथित केली असून ती "गद्यरामायण" म्हणून प्रसिद्ध आहे. वाल्मीकिरामायणाशीं कथानकाचे बाबींत तुलना करितांना या ग्रंथाचें साहाय्य घेतल्यास आमचें वरील अनुमान वाचकांच्या सत्त्वर लक्षांत येईल. आमची तर समजूत आहे कीं, कथेचा हा संक्षेप करितांना वाल्मीकिरामायण हा ग्रंथ पुढें ठेवून तो करण्यांत आला आहे. कोणतीहि विस्तृतकथा संक्षेपानें सांगावयाची म्हणजे तो ग्रंथ पुढें ठेवण्याची तादृश आवश्यकता नसते. कथाभागाचें साकल्यानें अवलोकन करून हें कार्य करितां येतें; पण अध्यात्मरामायणाची रचना अशा रीतीनें केलेली नाहीं. कथानिरूपण करितांना प्रसंगानुसार केलेलीं वर्णनें व कित्येक भाषणें यांमध्यें पुष्कळ स्थलीं या ग्रंथांमध्यें जें सादृश्य दिसून येतें तें पाहिलें म्हणजे या ग्रंथाचे रचनेविषयीं कल्पना लक्षांत येते व तीच आम्हीं वर दिली आहे. नमुन्याकरितां दोन ग्रंथांतील थोडीं अवतरणें येथें देतों व तीं पाहिल्यास चाणाक्ष वाचकांना अधिक ग्रंथ उलटण्याची आवश्यकता वाटणार नाहीं. राम व लक्ष्मण आणि भरत व शत्रुघ्न यांमध्यें बालपणींच प्रेम कसें होतें हें सांगतांना वाल्मीकिरामायणांत पुढीलप्रमाणें वर्णन आलें आहे.

**यदा हि हयमारूढो मृगयां याति राघवः ।**
(लक्ष्मणः) **अथैनं पृष्ठतोऽभ्येति सधनुः परिपालयन् ॥** १।१८।३१ ॥
**भरतस्यापि शत्रुघ्नो लक्ष्मणावरजो हि सः ।**
**प्राणैः प्रियतरो नित्यं तस्य चासीत्तथा प्रियः** ॥ ३२ ॥

हेंच वर्णन अध्यात्मरामायणांत पुढीलप्रमाणें आहे.

**लक्ष्मणस्तु सदा राममनुगच्छति सादरम्** ॥ १।३।६१ ॥
**सेव्यसेवकभावेन शत्रुघ्नो भरतं तथा ।**

रामश्चापधरो नित्यं तूणीबाणान्वित प्रभुः ॥ ६२ ॥
अश्वारूढो वनं याति मृगयार्थं सलक्ष्मणः ॥

या दोनहि अवतरणांतील विषय एक आहे व त्यांतील आशयहि प्रायः एक आहे. अर्थदृष्ट्या येथें तुलना करावयाची नसून मूळ ग्रंथ पाहणें महत्त्वाचें असल्यामुळें येथें अर्थ दिलेला नाहीं. वाल्मीकींचे वर्णनांत बंधुचतुष्टयांतील प्रेमभाव व्यक्त झाला असून अध्यात्मरामायणांत सेव्यसेवकभाव व्यक्त झाला आहे व तो येथें स्पष्ट शब्दांनीं सांगितला असून तो ग्रंथकाराचे पदरचा आहे.

कैकेयीनें राजाशीं वर मागितल्यावर राजा मूर्च्छित होऊन पडला असतां राम तेथें आला व राजाला काय झालें वगैरे तिला विचारूं लागला. या वेळीं कैकयीनें राजाचें कार्य तुझ्या हातीं आहे, पण तुझ्या भीतीनें तो बोलत नाहीं असें सांगितलें असतां राम क्रुद्ध होऊन त्यानें केलेलें भाषण वाल्मीकींनीं पुढील-प्रमाणें दिलें आहे.

उवाच व्यथितो रामस्तां देवीं नृपसंनिधौ ॥ २।१८।२७ ॥
अहो धिङ् नार्हसे वक्तुं देवि मामीदृशं वचः ।
अहं हि वचनाद्राज्ञः पतेयमपि पावके ॥ २८ ॥
भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे ।
तद् ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकांक्षितम् ।
करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ॥ ३० ॥

अध्यात्मरामायणांतील या प्रसंगाचें रामाचें भाषण पुढीलप्रमाणें आहे—

व्यथितः कैकयीं प्राह किं मामेवं प्रभाषसे ।
पित्रर्थे जीवितं दास्ये पिबेयं विषमुल्बणम् ॥ २।३।५९ ॥
अतः करोमि तत्सर्वं यन्मामाह पिता मम ।
सत्यं सत्यं करोम्येव रामो द्विर्नाभिभाषते ॥ ६२ ॥

रावण मारीचाकडे जाऊन साहाय्य करण्याविषयीं सांगत असतां मारीचानें उत्तर देतांना रामाचें भय आपणास कसें वाटतें याविषयींचें वर्णन दोनहि ग्रंथांत कसें लिहिलें आहे पहा.

अपि रामसहस्राणि भीतः पश्यामि रावण।
रामभूतमिदं सर्वमरण्यं प्रतिभाति मे ॥
( वा. रा. ३।३९।१६ )

रकारादीनि नामानि रामत्रस्तस्य रावण ।
रत्नानि च रथाश्चैव वित्रासं जनयन्ति मे ॥ १८ ॥
राममेव सततं विभावये । भीतभीत इव भोगराशितः ।
राजरत्नरमणीरथादिकं । श्रोत्रयोर्यदि गतं भयं भवेत् ॥
( अ. रा. ३।६।२२ )

तीन कांडांतील तीन अवतरणें वर घेतलीं आहेत व हीं सर्व कथाविषयक नसून आनुषंगिक वर्णनांतील अथवा भाषणांतील आहेत. वर्ण्य विषय एक असल्यामुळें कथाभाग एक असणें साहजिक आहे. तथापि वरील अवतरणांतील सादृश्य अशा प्रकारचें नसून त्यांतील कल्पना किंबहुना शब्दहि एक आहेत. अवतरणें जवळजवळ ठेवून ताडून पाहिलीं म्हणजे वाल्मीकिरामायणांतील कल्पना मूळची असून तीवरून अध्यात्मरामायणाची रचना करण्यांत आली, हें सहज लक्षांत येतें. कल्पना एक असली तरी वाल्मीकिरामायणांत ती व्यक्त करितांना ग्रंथविस्ताराचें भय मनांत बाळगिलें नाहीं व अध्यात्मरामायणाची तर संक्षेपाकडे प्रवृत्ति आहे व यामुळें वर्णनाचें खरें स्वरूप वाल्मीकिरामायणाचें अवलोकन केल्यानें कळतें तसें अध्यात्मरामायणावरून कळत नाहीं. मारीचाचे भाषणांतील वर्णन काव्यमय आहे, हें तर उघड आहे; तथापि त्याचें रहस्य अध्यात्मरामायणांतील श्लोकांपेक्षां वाल्मीकिरामायणांतील श्लोक वाचून बरोबर कळतें व मनाचें समाधान होतें. याविषयीं आतां आणखी एकच अवतरण देतों. सीतात्यागानंतर राम व लक्ष्मण यांचा जो संवाद झाला त्या प्रसंगाचें हें अवतरण आहे.

सौमित्रिणा पृष्ट उदारबुद्धिना ।
रामः कथाः प्राह पुरातनीः शुभाः ।
राज्ञः प्रमत्तस्य नृगस्य शापतो ।
द्विजस्य तिर्यक्त्वमथाह राघवः ॥

" उदारबुद्धि लक्ष्मणानें प्रश्न केल्यावरून रामानें त्याला प्राचीन शुभकथा

निरूपण केल्या. तसेंच नृगराजाचे हातून प्रमाद घडल्यामुळें त्याला ब्राह्मणाचा शाप होऊन तिर्यग्योनि प्राप्त झाली ही कथा मग सांगितली. ”

वाल्मीकिरामायणांतील उत्तरकांडांत सर्ग ५२ ते ५९ या सर्गांत हा संवाद आला आहे. यांत रामानें लक्ष्मणाला नृग, निमि व ययाति यांच्या कथा सांगितल्या आहेत. रामचरित्राशीं या कथांचा कांहीं संबंध नाहीं व यामुळें त्या कथा येथें संक्षेपानेंहि निरूपण करण्याची अध्यात्मरामायणकाराला आवश्यकता वाटली नाहीं. पण वाल्मीकिरामायणांतील सात सर्ग व्यापून राहिलेल्या या कथांचा निर्देशहि न करितां पुढें जाणें त्याला जड वाटूं लागलें. यासाठीं त्यानें “ नचाऽरिहिंसा विजयश्च हस्ते ” या नीतीचा अवलंब करून वरील श्लोक लिहिला आहे. अर्थात् ग्रंथविस्तार न करितां कथा गाळण्याचा दोष त्याला टाळतां आला. प्राचीन ग्रंथांतून पुष्कळ स्थलीं कथेचा संक्षेप सांगितलेला असतो. पण तो प्रायः पुढील सविस्तर निरूपणाचा उपक्रम असतो; म्हणजे ती संक्षिप्त कथा ऐकून श्रोत्यानें ती सविस्तर ऐकण्याची इच्छा व्यक्त करावयाची व मग ती वक्त्यानें साकल्यानें सांगावयाची अशी पद्धति आहे. येथें तसें कांहीं झालेलें नाहीं. नृगादिकांच्या कथांचा निर्देश करून स्वतां ग्रंथकारानें या कथा साकल्यानें जाणण्याची इच्छा असल्यास वाल्मीकींचा ग्रंथ पहावा असें पर्यायानें सुचविलें आहे; व अध्यात्मरामायणकारानें वाल्मीकिरामायणांतील कथा तो ग्रंथ पुढें ठेवून संक्षेपानें सांगितली असें जें आम्हीं वर अनुमान केलें आहे, त्याचें हेंच द्योतक होय.

बिभीषण रामाकडे आला असतां सुग्रीवादिकांचें मत त्याचा संग्रह न करण्याकडे असलेलें पाहून रामानें केलेल्या भाषणांत त्यानें जें आपलें व्रत सांगितलें तो श्लोक मात्र अध्यात्मरामायणांत जशाचा तसा घेतलेला आहे.

**सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते ।**
**अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद् व्रतं मम ॥**

(वा. रा. ६।१८।३३. ॥ व अ. रा. ६।३।१२)

“ जो एकदां मला शरण आला व मी तुझा आहें अशी याचना करूं लागला त्याचें सर्वांपासून रक्षण करणें हें माझें व्रत आहे. ” हें वचन त्यांत स्वतांचें कर्तृत्व दाखविण्यासाठीं कोणताहि फेरफार कवीनें न करितां घेतल्या-

मुळें त्यांतील रसाचा व वाचकांचे मनाचा मुळींच भंग होत नाहीं. कथा संक्षेपानें सांगत असतांहि कित्येक स्थलीं आलेलीं मूळ वचनें याप्रमाणें अन्यत्रहि कवीनें जशाचीं तशीं घेतलीं असतीं तर वाचकाला रसास्वाद देतां येऊन कवीची रसिकता अधिक व्यक्त झाली असती.

## दंतकथांचें प्राबल्य.

रामचरित्रविषयक अनेक दंतकथा लोकांत प्रचलित असून वाल्मीकिरामायण उघडून पाहातां त्यांत त्यांना कांहीं आधार मिळत नाहीं. अशा दंतकथांविषयीं एका भागांत आम्हीं स्वतंत्रपणें विवेचन केलें आहे. अध्यात्मरामायणकारानें वाल्मीकिरामायणाचा अनुवाद संक्षेपानें केला असला तरी दंतकथांचा संग्रह त्याबरोबर करण्यांत त्यानें कसूर केलेली नाहीं. रावणादि राक्षसांची पीडा दूर करण्याकरितां देवादिकांच्या प्रार्थनेवरून विष्णूनें रामरूपानें अवतार घेतला अशाविषयीं वाल्मीकिरामायणाचे प्रारंभीं निरूपण आलें आहे व या कथेचा अनुवाद अध्यात्मरामायणांत केलेला असता तर त्यांत कांहीं विशेष नव्हतें. पण यावांचून वाल्मीकिरामायणांत अवतारकल्पनेला पोषक अशी कथा नाहीं. ही कथाहि वाल्मीकिरामायणांतील मूळची नसल्याविषयीं " प्राक्षिप्तभागांत " विवेचन केलें आहे, हा भाग वेगळा. अध्यात्मरामायणांत वारंवार येणाऱ्या आध्यात्मिक चर्चेत ही कल्पना गृहीत असते; तसेंच याविषयीं त्यांत आणखी कथाहि आल्या आहेत. मूळ सोडून अर्थात् आधारावांचून केलेल्या या निरूपणामुळें विसंगतपणा मात्र कवीचे पदरीं आला आहे.

विश्वामित्र यज्ञरक्षणार्थ रामाला मागण्याकरितां राजाकडे आले, हें सांगतांना " मायेच्या योगानें परमात्मा रामरूपानें अवतीर्ण झाला आहे. तेव्हां त्याचें दर्शन घेण्याकरितां एकदां विश्वामित्र तेथें आले. " ( १।४।१ ) असा उपक्रम केला आहे; आणि राजानें त्यांना येण्याचें प्रयोजन विचारल्यावर त्यांनीं यज्ञरक्षणार्थ राजपुत्राला देण्याविषयीं राजाची विनंति करून ( १।४।७ ) कवीला तोंडघशीं पाडला आहे !

सीतास्वयंवराविषयींची दंतकथा प्रसिद्ध आहे. अध्यात्मरामायणांत स्वयंवराचें निरूपण न करितां वाल्मीकींप्रमाणें विवाहकथा निरूपिली आहे; पण स्वयं-

वर नसतां धनुर्भंग रामानें करितांच सीतेनें त्याचे गळ्यांत माळ घातल्याचें सांगितलें आहे. ( १।६।३१ ) व विवाहविधि तर यानंतर शुभमुहूर्तावर उरकण्यांत आला आहे. ( १।६।४५ ) सीता रामाला देण्याविषयींची सूचना नारदांनीं आपणास केल्याचें जनकानें विवाहानंतर सर्व मंडळींना सांगितलें असून तीं योगमाया व परमात्मा यांचे अनुक्रमें अवतार असल्याचेंहि त्याला त्यांजकडून कळल्याचें तो सांगत आहे; [ १।६।६३, ६५ ] आणि हें कळल्यावर ह्या विवाहाचा योग कसा जुळवून यावा याविषयीं तो चिंताकुल झाला आहे. [ १।६।६७ ] त्याच्या चिंतेचें कारण कवीनें काय कल्पिलें, तें कळत नाहीं. दोनहि राजकुलें मोठीं व अयोध्या तर मिथिलेपासून अवघी तीन दिवसांचे वाटेवर ( वा. रा. १।६८।१ ). अर्थात् नारदांकडून वरील माहिती मिळाल्यावर अयोध्येला जाण्यापलीकडे त्याला काय करावयाचें होतें ?

यौवराज्याभिषेकाचा विचार राजाकडून बाहेर पडण्यापूर्वी ब्रह्मदेवांकडून नारद रामाला राज्यकारभारांत न गुंततां अवताराचे उद्दिष्ट कार्याचें स्मरण देण्याकरितां आले आहेत. ( २।१।३३–३५ ) व हें वाचलें म्हणजे अवतारकल्पनेची कवीनें कशी उजळणी चालविली आहे, हें कळून येईल. रावणवधाकरितां रामानें अरण्यांत वास करून तेथें रावणाकडून सीतेचा अपहार होण्याची आवश्यकता येथें कवीनें गृहीत धरिली आहे. पण कार्य करावयाचें ठरल्यावर त्यासाठीं योग कसा जुळवून आणावयाचा हें रामाला कळणें शक्य होतें. लवणवधार्थ रामानें शत्रुघ्नाला पाठविलें त्या वेळीं तो कारण अथवा प्रसंग मुळींच शोधीत बसला नाहीं; तसें रावणाचा वध करावयास दुसरी योजना राज्याभिषेक झाल्यावरहि करतां आली असती. अर्थात् रामायणांतील पुढील कथा मनांत आणून ही कल्पना कवीनें जुळविली, हें उघड होत नाहीं काय ? राज्याभिषेकाला विघ्न आणण्यासाठीं देवांनीं सरस्वतीला पाठवून तिनें मंथरेंत प्रवेश केला ( २।२।४४ ) असें यापुढें सांगितलें; पण ही योजना देवांनीं रामाला विचारून केली होती काय ? देवांना पुढील भविष्य जर कळत होतें व त्यासाठीं ही योजना जर त्यांनीं केली, तर मग नारदांना पुढें सूचनार्थ पाठविण्याचा उतावळेपणा त्यांनीं कां केला ?

राम वनवासाला निघालेले पाहून लोक शोक करूं लागले. तेव्हां वामदेव-नामक कोणी ऋषि पुढें येऊन त्यानें राम हा विष्णूनें रावणवधार्थ घेतलेला अवतार होय, असें सांगून पूर्वींचे मत्स्यादि अवतारांचीं त्यानें वर्णनें केलीं. (२।५।१०-३२) अर्थात् या वेळीं रामाचें खरें स्वरूप सर्वांना कळून चुकलें. पण मग त्यानें स्वतः हें सर्व गुप्त ठेवण्याविषयीं ( रहस्यं गोपनीयं, ३२ ) सांगितलें याचें कारण काय ?

मायामृगाला धरण्याकरितां म्हणून रामानें त्याचे मागें जातेवेळीं आपण गेल्यावर रावण भिक्षुरूपानें येईल व सीतेचा अपहार करील हें लक्षांत घेऊन सीतेला गुप्त होऊन आश्रमांत राहाण्यास सांगितलें आहे. ( ३।७।४ ) सीतेला रावणाचा स्पर्श होऊं नये यासाठीं ही योजना आहे. पण त्यांनीं अवतार धारण केले म्हणजे मायेच्या योगानें मनुष्यरूप घेतलें, अर्थात् येथें दिसलेलीं त्यांचीं स्वरूपें मायामय होतीं व या दृष्टीनें या ग्रंथांत वारंवार प्रयोग आले आहेत. मग या मायामय सीतेनें पुनः मायामय वेष धारण केला असें सांगण्याचें प्रयोजन काय ?

रामाचे हातून आपल्याला मृत्यु यावा अशी रावणाची इच्छा होती व यासाठीं सीतेचा त्यानें अपहार केला; आणि स्त्रीसाठीं तरी तो त्वरेनें यावयाचा तो आला नाहीं, म्हणून त्याला चिंता लागून राहिली होती, असें एकदां कवीनें निरूपण केलें आहे. ( ५।२।१५ ) ही कल्पना वाचून तर हसूं येतें ! राम हा आपल्या वधाकरितां विष्णूनें घेतलेला अवतार आहे, हें रावणाला विदित असल्याची कल्पना या निरूपणाचे मुळाशीं आहे. अर्थात् रामाचे हातून मृत्यु आल्यानें आपल्याला मोक्षप्राप्ति होईल अशी त्याची भावना आहे. पण मोक्षप्राप्तीचा हा उपाय त्याला कोणीं सांगितला ? बिभीषणादिकांनीं त्याला सीता परत देऊन रामाला शरण जाण्याचा उपदेश केला, पण तो त्याला न पटल्याचें या ग्रंथांत सांगितलें आहे; तेव्हां मोक्षप्राप्तीची इच्छा पूर्ण होण्याचा सुलभ मार्ग सोडून त्यानें आपलें जीवित धोक्यांत घातलें असें होत आहे. यांत रावणाच्या दूर दृष्टीचें, का कवीच्या दूर दृष्टीचें कौतुक करावयाचें, तें आम्ही वाचकांवरच सोंपवितों. मोक्षप्राप्तीची इच्छा रावणाला झाल्याचें सांगण्यांत दुष्ट रावणाचे पदरीं एवढी

तरी नीतिमत्ता आपण बळेंच बांधीत आहों, हें कवीच्या लक्षांत कसें आलें नाहीं, हें कळत नाहीं.

वालि व सुग्रीव यांचे उत्पत्तीची कथा उत्तरकांडांत आली आहे. त्यांची उत्पत्ति सांगितल्यावर ब्रह्मदेवानें त्यांची किंकिष्धा नगरीवर योजना केल्याचें वर्णन केलें आहे. या वेळीं त्यांना आज्ञा करितांना भूभारहरणार्थ भगवंताचा अवतार होणार आहे, त्याला साहाय्य करण्याविषयीं ब्रह्मदेवानें सांगितलें आहे.(७।३।२१) म्हणजे भूमीला भार होणार आणि मग भगवंताचा अवतार होणार, हें एकुण ब्रह्मदेवाला पूर्वीं कळलें होतें तर! मग भूमीला भार झाला म्हणून अवतार धारण करण्यास भगवंताची प्रार्थना करण्यासाठीं तो क्षीरसागरीं गेल्याचें जें पूर्वीं सांगितलें आहे (१।२।७) त्याचें कारण काय? बरें, रामाला साहाय्य करणारे वालि व सुग्रीव या वेळीं झाले होते व आणि त्या वेळीं पृथ्वीवर असलेल्या सर्व वानरांना रामाला साहाय्य करण्याविषयीं येथें ब्रह्मदेव सांगत आहे; (७।३।२२) आणि विष्णूकडून अवतार धारण करण्याविषयीं आश्वासन मिळाल्यावर तोच पुनः देवांना रामाला साहाय्य करण्याकरितां भूतलावर वानररूपानें अवतीर्ण होण्याविषयीं सांगत आहे, याचा मेळ कसा घालावयाचा?

अवतारकल्पनेविषयीं पूर्वीं विवेचन केलें आहे व तींत तथ्य आहे याविषयीं वाद नाहीं; पण अवतारी पुरुष म्हटला म्हणजे त्याचा हेतु, त्याचा व्यवहार, सारें मायामय समजावयाचें, याविषयीं काय तो आमचा मतभेद आहे. अंतःकरणांतील आत्यंतिक श्रद्धेचें द्योतक म्हणून ते अशा कल्पना करीत असतात, पण सर्व व्यवहार मायामय म्हटल्यानें त्याला कृत्रिमता येऊन त्याचें महत्त्व कमी होतें, इकडे त्यांचें लक्ष जातें काय? विष्णु वगैरे देवांनीं मायेनें मनुष्यदेह धारण केले आहेत व त्यांनाच आपण रामादि पुरुष म्हणत आहों, हें दशरथ, वसिष्ठ, विश्वामित्र, अयोध्येंतील नागरिक, रावणादि बंधुत्रय, सुग्रीवादि वानर यांना कळलें असल्याचें अध्यात्म्यरामायणांत ठिकठिकाणीं लिहिलें आहे; पण त्यांच्या व्यवहाराविषयीं त्यांना काय वाटेल याची कल्पना कवीनें केलेली नाहीं. वस्तुस्थिति कळल्यावर राम वनांत गेल्यानें राजा किंवा नागरिक

यांना शोक तरी कां आणि कसा व्हावा? सीतेचा अपहार रावणानें केल्यावर रामानें जो विलाप केला, तो काय

**मोलें घातलें रडाया। नाहीं असूं आणि माया॥**

या तुकारामाचे अभंगाप्रमाणें कृत्रिम समजावयाचा?

रामचरित्रविषयक दंतकथांचा जो संग्रह अध्यात्मरामायणांत आहे त्याचे मुळाशीं अवतारभावनाच आहे, हें त्यांचें स्वरूप पाहिलें असतां कळून येईल. लक्ष्मण अरण्यांत असतां त्यानें बारा वर्षेंपर्यंत निद्रा घेतली नाहीं, किंवा आहार केला नाहीं अशी दंतकथा आहे व लक्ष्मण हा शेषाचा अवतार म्हणून त्याला तसें राहतां आलें ही कल्पना तिचे मुळाशीं आहे. लक्ष्मण निद्रा घेत असे व आहार करीत असे, याविषयीं वाल्मीकिरामायणांतील अवतरणें देऊन पूर्वीं विवेचन केलें असून त्यांत दंतकथेंतील असत्यता स्पष्ट केली आहे. हाच प्रकार इतर दंतकथांविषयीं आहे.

महर्षि वाल्मीकिविषयींच्या प्रसिद्ध दंतकथेचा तर अध्यात्मरामायणांत प्रसंग नसतां अनुवाद केला आहे व त्यावर आपल्या रसभरित भाषेचा रंग चढवून ती अधिक खुलविली आहे. महर्षि वाल्मीकि शूद्र नव्हते किंवा वाटमाऱ्याचा व्यवहारहि करीत नव्हते हें आम्हीं पूर्वीं दाखविलें आहे. राम अरण्यांत गेले असतां मार्गांत ते वाल्मीकींचे आश्रमीं आले. या वेळीं वाल्मीकींनीं रामाची जी स्तुति केली आहे तींत त्यांच्या तोंडून कवीनें ही दंतकथा आत्मवृत्त म्हणून वदविली आहे. म्हणजे वाल्मीकींचे काव्यांत त्यांच्या भेटीचें जें वर्णन दोनतीन श्लोकांत आलें आहे (२।५६।१६-१८) तेथें आमच्या कवीनें सबंध सर्ग लाविला आहे. दंतकथेविषयीं तर कवीला संशय वाटत होता अशी आमची मनोदेवता आम्हांला सांगते. सीतेनें दुसऱ्यानें दिव्य केलें त्या वेळीं तिच्यापूर्वीं वाल्मीकींनीं स्वतां शपथ घेतल्याचें वर्णन दोनहि रामायणांत आहे. वाल्मीकींच्या रामायणांतील त्यांचें पुढील भाषण पहाः—

**प्रचेतसोऽहं दशमः पुत्रो राघवनंदन।**
**न स्मराम्यनृतं वाक्यमिमौ तु तव पुत्रकौ॥७।९६।१८॥**
**बहुवर्षसहस्राणि तपश्चर्या मया कृता।**

**नोपाश्नीयां फलं तस्य दुष्टेयं यदि मैथिली ॥१९॥**
**मनसा कर्मणा वाचा भूतपूर्वं न किल्बिषम् ।**
**तस्याहं फलमश्नामि अपापा मैथिली यदि ॥२०॥**

" हे राघवनंदना, मी प्रचेतसाचा दहावा पुत्र आहें; अनृत भाषण केल्याचें मला कधीं स्मरत नाहीं. हे पुत्र तुझे आहेत. ही मैथिली जर दोषयुक्त असेल तर अनेक सहस्र वर्षें मीं जी तपश्चर्या केली तिचें फल मला प्राप्त होणार नाहीं. आजपर्यंत कायावाचामनेंकरून माझे हातून पाप घडलेलें नाहीं आणि मैथिली जर दोषरहित असेल तर माझ्या या निष्पाप आचरणाचें फल मला प्राप्त होईल. " वाल्मीकिरामायणांत वाल्मीकींचें जें भाषण दिलें आहे, त्यांतील हे महत्त्वाचे मधलेच श्लोक आम्हीं येथें घेतले आहेत. अध्यात्मरामायणकारानें वाल्मीकींची ही शपथ आपल्या ग्रंथांत बहुतेक जशाची तशी घेतली आहे. ( ७।७।२९-३३ ) वाल्मीकिरामायणांत हे श्लोक आठ आहेत.(७।९६।१५-२२ ) म्हणजे अध्यात्मरामायणकारानें तीन श्लोक गाळले आहेत. वर दिलेल्या अवतरणांतील शेवटचा व त्यापुढील दोन श्लोक त्यानें घेतले नाहींत. त्यानें हें विस्तारभयास्तव केलें असें नसून बुद्ध्या केलें आहे. कारण वरील अवतरणांतील शेवटच्या श्लोकांत वाल्मीकींनीं आपण पाप मुळींच केलें नाहीं, असें सांगितलें आहे व तें तर अध्यात्मरामायणांत दंतकथेवरून चितारलेल्या विस्तृत कथेला बाधक आहे. तेव्हां त्यानें तेवढा श्लोक गाळला आहे. पुढील श्लोकांत तर नवीन कांहीं सांगितलें नाहीं व यासाठीं ते घेतले न घेतले तरी सारखें आहे. वाल्मीकींचें भाषण दोहों ग्रंथांत शब्दशः सारखें असल्यामुळें कवीनें आपल्यापुढें वाल्मीकींचा ग्रंथ घेतला होता, यांत शंका नाहीं. तेव्हां हा श्लोक गाळण्यांत दंतकथा अबाधित राखण्याचा कवीचा हेतु होता असें कां म्हणूं नये?

## प्रक्षिप्त भागाचे आधीं का मग?

अध्यात्मरामायणाची रचना वाल्मीकींचे ग्रंथावरून करण्यांत आली असें वर दाखविलें आहे. तथापि ही रचना करिते वेळीं कवीपुढें असलेली वाल्मीकिरामायणाची प्रत सध्यां आमचे पुढें असलेल्या प्रतीप्रमाणें होती किंवा नाहीं? म्हणजे तींत प्रक्षिप्त भागाची भर पडली होती किंवा नाहीं, हा एक स्वतंत्रपणें

विचार करण्यासारखा प्रश्न आहे. वाल्मीकिरामायणांतील बालकांडाचे प्रारंभींची ऋष्यशृंगाची कथा प्रक्षिप्त असल्याचें मागें दाखविलें आहे व ही कथा या कवीनें विसंगतपणा न येईल अशा रीतीनें कुशलतेनें अनुवादिली आहे. याच कांडांतील प्रक्षिप्त भागांपैकीं गंगावतरणाची व विश्वामित्राची कथा, तसेंच किष्किंधाकांडांतील भूगोलवर्णन यांत मुळींच घेतलेलें नाहीं. तेव्हां केवळ ऋष्यशृंगाच्या कथेवरून कोणताहि सिद्धांत काढणें उचित होणार नाहीं. आणि दुसरें असें कीं, ती कथा अनुवादितांना त्यानें विसंगतता टाळिली आहे. कवीच्या येथील कौशल्यावरून वाल्मीकींचे ग्रंथांत या कथेनिमित्त आलेली विसंगतता त्याला पटली असें अनुमान करण्यास अडचण नाहीं. तथापि अशी विसंगतता कवीच्या लक्षांत न येतां जर ती कथा त्यानें अनुवादिली असेल तर तीवरून वरील प्रश्न सोडविणें सोपें जाईल व तो निर्णय अबाधित म्हणतां येईल.

अंगदप्रभृति वानर व संपाति यांची भेट झाली त्या प्रसंगींचे कांहीं सर्ग प्रक्षिप्त असल्याचें मागें दाखविलेलें आहे. वानरांचें कार्य व जटायूचें वर्तमान संपातीला कळल्यावर त्यानें सीतेला रावणानें नेल्याचें त्यांना सांगितलें व त्याचा पत्ता कळविला. या वेळीं त्यानें आपले पंख दग्ध होऊन गेले असल्यामुळें आपणाला त्यांना त्यांचे कामीं साहाय्य करितां येत नाहीं, असें म्हणून खेद प्रदर्शित केला आहे; व कांहीं वेळानें पंख फुटल्यावर वानरांना साहाय्य करण्याचें मनांतहि न आणतां त्यांना आपल्या कार्यासाठीं जाण्यास सांगून तो निःशंकपणें चालता झाला आहे. या विसंगततेनिमित्त या कथेंतील पुढील भाग आम्हीं प्रक्षिप्त ठरविला आहे. अध्यात्मरामायणांत ही कथा साकल्यानें आली असून ही विसंगतता कवीच्या लक्षांत न येतां ती त्यानें केलेल्या अनुवादांत तशीच राहून गेली आहे. मुद्यापुरते दोन श्लोक येथें उद्धृत केल्यानें हें वाचकांस सहज कळेल. संपाति म्हणतो—

**अहमेव दुरात्मानं रावणं हन्तुमुत्सहे ॥४।७।५४॥**
**भ्रातुर्हन्तारमेकाकी किं तु पक्षविवर्जितः ॥**

" दुरात्म्या रावणाचा स्वतांच एकट्यानें वध करावा अशी मला उत्सुकता

वाटते. ( कारण ) त्यानें माझ्या भ्रात्याचा घात केला आहे. पण मला पंख नाहींत; ( तेव्हां काय करणार ? )"

पश्यन्तु पक्षौ मे जातौ नूतनावतिकोमलौ ॥ ४।८।५३ ॥
स्वस्ति वोऽस्तु गमिष्यामि सीतां द्रक्ष्यथ निश्चयम् ॥

"पहा ! मला दोन नवे व अति कोमल असे पंख फुटले. तुमचें कल्याण असो. मी आतां जातों. सीतेचें दर्शन तुम्हांला निश्चयेंकरून होईल."

येथील वर्णन विसंगत आहे, हें स्पष्ट आहे व वाल्मीकिरामायणांतील विसंगतता कवीला न कळल्यामुळें त्यानें त्याचा अनुवाद आपल्या ग्रंथांत केला आणि याकरितां ती त्यांत आली आहे, हेंहि तितकेंच स्पष्ट आहे.

वाल्मीकिरामायणांतील युद्धकांडाचे शेवटीं असलेले रामायणसमाप्तीचे तीन श्लोक प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं मागें दाखविलें आहे. उत्तरकांडांतील कथा या कवीनें आपल्या ग्रंथांत अति संक्षेपानें सांगितली आहे. यामुळें आणि दुसरेहि कांहीं फेरफार त्यानें केल्यामुळें वाल्मीकींच्या ग्रंथांत प्राक्षिप्त भागांनिमित्त आलेली विसंगतता त्याचे ग्रंथांत आली नाहीं. तथापि ही समाप्ति पाहून सकृद्दर्शनीं "हा ग्रंथ येथें पुरा झाला काय ?" असा प्रश्न उपस्थित होतो व त्याचें उत्तर नकारार्थीं द्यावें लागतें. अर्थात् ही विसंगतता वाल्मीकींच्या ग्रंथाचें अंधानुकरण केल्यानें आली नाहीं काय ? हे श्लोक लिहितांना कवीनें जेथें तेथें "इदं रामायणं" हें रामायण असा संपूर्ण ग्रंथबोधक निर्देश केला आहे; व तो पाहून ग्रंथ येथेंच आटोपला असें वाचकांना वाटणें संभवनीय नाहीं काय? सर्व ग्रंथ महादेव व पार्वती यांच्यामधील संवाद म्हणून सांगितला आहे व हें लक्षांत घेऊन वाचकांनीं पुढील श्लोक वाचावे:—

दशवर्षसहस्राणि रामो राज्यमुपास्त सः ६।१६।३४॥
इदं रहस्यं धनधान्यसमृद्धिमत् दीर्घायुरारोग्यकरं सुपुण्यदम् ।
पवित्रमाध्यात्मिकसंज्ञितं पुरा रामायणं भाषितमादिशंभुना ॥३५॥

येथें रामानें दहाहजार वर्षें राज्य केल्याचें प्रथम सांगून, लागलीच हें अध्यात्मरामायण प्राचीनकालीं शंकरांनीं गायिल्याचें निरूपण केलें आहे आणि हें सर्व शंकर पार्वतीला सांगत आहेत. वाल्मीकिरामायणांतील येथील समाप्तिपर

श्लोकांत शंकराचे स्थानीं वाल्मीकींची योजना केलेली आहे व तो भाग प्रक्षिप्त ठरवितांना ही विसंगतता आम्हीं तेथें सांगितलेल्या कारणांपैकीं एक कारण आहे. तेथें "पुरा" या शब्दानें विसंगतता आणिली आहे, तर येथें स्वतां शंकरांनीं "पूर्वीं शंकरांनीं गायिलेलें" म्हणून रामायणाचा निर्देश केल्यामुळें विसंगतता आली आहे.

वाल्मीकिरामायणांत रामजन्माचा काल खालीं लिहिल्याप्रमाणें दिला आहे—

**ततोऽस्य द्वादशे मासे चैत्रनावमिके तिथौ ॥१।१८।८**
**नक्षत्रेऽदितिदैवत्ये स्वोच्चसंस्थेषु पंचसु ।**
**ग्रहेषु कर्कटे लग्ने वाक्पताविंदुना सह ॥९॥**
**प्रोद्यमाने जगन्नाथे सर्वलोकनमस्कृतम् ।**
**कौसल्याऽजनयद्रामं दिव्यलक्षणसंयुतम् ॥१० ॥**

"नंतर बारा महिन्यांनीं चैत्रांतील नवमीच्या दिवशीं पुनर्वसु नक्षत्र असतां व पांच ग्रह उच्चींचे असतां तसेंच चंद्र व बृहस्पति कर्कलग्नीं असतां दिव्य-लक्षणांनीं युक्त व सर्व लोकांना पूज्य असा जगदीश्वर राम कौसल्येच्या ठिकाणीं उत्पन्न झाला."

वरील श्लोकांत राशींचा उल्लेख असल्यामुळें ते प्राक्षिप्त आहेत असें रा. ब. वैद्य यांनीं लिहिलें आहे. कारण राशींचीं नांवें आर्य लोकांनीं ग्रीक लोकां-पासून घेतलीं आहेत; शिवाय गॉरिशिओच्या प्रतींत राशींचा उल्लेख असलेला दुसरा श्लोक नाहीं, असें त्यानीं लिहिलें आहे. आतां या श्लोकांचा अनुवाद अध्यात्मरामायणांत कशा रीतीनें केलेला आहे, तें पाहूं. यांत रामजन्माचा काल खालीं दिल्याप्रमाणें आहे:—

**मधुमासे सिते पक्षे नवम्यां कर्कटे शुभे ।**
**पुनर्वस्वर्क्षसहिते उच्चस्थे ग्रहपंचके ॥ १।३।१४ ॥**
**मेषं पूषाणि संप्राप्ते पुष्पवृष्टिसमाकुले ।**
**आविरासीज्जगन्नाथः परमात्मा सनातनः ॥१५॥**

वाल्मीकिरामायणापेक्षां यांत अधिक घालून किंवा त्यांतील श्लोकांचा खुलासा करून "मेषं पूषाणि संप्राप्ते" असें सांगितलें आहे. म्हणजे वाल्मीकिरामायणांत

"स्वोच्चसंस्थेषु पंचसु" असें लिहिलें आहे त्याचें 'उच्चस्थे ग्रहपंचके' असें रूपांतर करून शिवाय त्या ग्रहपंचकांतील सूर्य कोठें होता, तें स्पष्ट लिहिलें आहे. उच्चीं सूर्य असला म्हणजे तो मेषराशीला असावयाचा अशा सांप्रत प्रचलित असलेल्या समजुतीप्रमाणें लिहिल्यामुळें येथें कवि चुकला आहे. वास्तविक सर्व ग्रहांचीं उच्चस्थानें चल आहेत. रामजन्माला आज हजारों वर्षें होऊन गेलीं असल्यामुळें त्या वेळचीं व सध्यांचीं ग्रहांचीं उच्चस्थानें एक असणें शक्य नाहीं, हें कवीनें मनांत आणिलें नाहीं असें दिसतें. चंद्र पुनर्वसु नक्षत्रीं कर्कलग्नीं होता, असें सांगितलें आहे. म्हणजे दर राशीस दोन नक्षत्रें याप्रमाणें मिथुनान्तापर्यंत पावणेसात नक्षत्रें होतात. अर्थात् सातवें नक्षत्र जें पुनर्वसु त्याचे शेवटचे चरणीं चंद्र होता, म्हणून तो कर्कलग्नीं होता असें लिहिलें आहे. आतां दर नक्षत्रास चंद्राचा भोग पराकाष्ठा १३$\frac{1}{3}$ असतो. या मानानें सातवें नक्षत्र जें पुनर्वसु त्याचे अंतापर्यंत १३$\frac{1}{3}$×७ म्हणजे ९३$\frac{1}{3}$ अंश चंद्राचा पराकाष्ठा भोग त्या वेळीं होता. या वेळीं रवि कोठें होता हें पहावयाचें म्हणजे ९३$\frac{1}{3}$ अंशाचे मागें ९६ अंश गेलें पाहिजे. अर्थात् मेषाच्या मागें २$\frac{2}{3}$ अंश इतकें रविस्थान येतें. म्हणजे तो मेष राशीला नसून मीनाला होता, हें उघड आहे. अध्यात्मरामायणांत सध्यांच्या समजुतीप्रमाणें तो मेषाला होता, असें लिहिलें आहे. वाल्मीकिरामायणाचा अनुवाद करितांना अध्यात्मरामायणानें याप्रमाणें विवरण करण्याचा प्रयत्न केला आहे.* ग्रहस्थितिदर्शक वाल्मीकिरामायणांतील श्लोक मूळचे नस-

* हा शोध प्रसिद्ध ज्योतिःशास्त्रविशारद कै० रा. जनार्दन बाळाजी मोडक यांनीं "निबंधमालेच्या" ऑगस्ट, सप्टेंबर, ऑक्टोबर सन १८८१ च्या जोडअंकांत प्रसिद्ध केला आहे. यांत चंद्र वर्षारंभीं अश्विनीला होता असें गृहीत धरून त्याचा भोग काढिला आहे; पण तो अश्विनीलाच होता, असें मानण्यास प्रमाण नाहीं. रेवती किंवा त्यापूर्वींच्या नक्षत्राला तो असला तर सूर्य मेषीं होता हें अध्यात्मरामायणकारांचें लिहिणें बरोबर होईल. शिवाय तिथींची क्षयवृद्धि झाली असल्यास ती समजत नाहीं. आतां सर्व ग्रहांचीं उच्चस्थानें चल असतात असें जें एक प्रमाण त्यांनीं दिलें आहे तें विचारार्ह आहे. याबद्दल भास्कराचार्यांच्या सिद्धान्तशिरोमणींतून त्यांनीं आधार दिला आहे. या शोधाची युक्तायुक्तता ज्योतिःशास्त्रज्ञांनीं ठरवावयाची आहे व त्याकडे त्यांचें लक्ष जावें यासाठीं येथें त्याविषयीं माहिती दिली आहे.

त्याचें वर सांगितलें आहे. अर्थात् ते प्रक्षिप्त आहेत व त्यांचा अनुवाद अध्यात्म-रामायणानें केला आहे.

प्रक्षिप्त भागांचा अनुवाद अध्यात्मरामायणानें कशा रीतीनें केला आहे व त्यानिमित्त विसंगतता कशी आली आहे हें येथपर्यंत दाखविलें. अध्यात्मरामायणाची रचना वाल्मीकिरामायणांत प्रक्षिप्त भागांची भर पडल्यानंतर करण्यांत आली, हें आतां काय सांगावयाला पाहिजे ?

## भागवताचें अनुकरण.

अध्यात्मरामायणांतील रामचरित्र वाल्मीकिरामायणाप्रमाणें असलें तरी त्यांत नांवाप्रमाणें अध्यात्मविषय पुष्कळ आहे व हाच त्याचा विशेष आहे. त्याचें हें स्वरूप पाहिलें म्हणजे प्रसिद्ध भागवतपुराणाची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. त्यांतील दशमस्कन्धांत श्रीकृष्णचरित्र आलें असून यांत रामचरित्र आहे, हाच दोहोंमध्यें भेद आहे. रामचरित्रावर रामायणासारखा विशाल ग्रंथ असला तरी त्यांत अध्यात्मविषय आलेला नाहीं व भागवतांतील श्रीकृष्णचरित्राचे दृष्टीनें रामचरित्राविषयीं वाटणारी ही उणीव कवीनें हा ग्रंथ लिहून भरून काढिली, असें वाटतें. दोन स्थलीं सादृश्य दिसलें असतां कोणीं कोणाचें अनुकरण केलें हें ठरविण्यास प्रत्यक्ष प्रमाण देतां येणार नाहीं हें खरें; तथापि ज्या निरूपणांत अस्वाभाविकतेसारखे दोष असतील तें मूळचें नव्हे, असें म्हणतां येतें व अशा प्रसंगीं निर्णय करण्याचें हेंच एक सर्वमान्य साधन आहे.

रामजन्माचें वर्णन करितांना अध्यात्मरामायणांत कौसल्या प्रसूत होण्याचे वेळीं तिचे पुढें परमात्म्याची मूर्ति प्रकट झाली, असें वर्णन केलें आहे. ( १।३।१५ ) भागवतांत श्रीकृष्जन्माचें वर्णन याच प्रकारचें आहे.(१०।३।८) भगवंताची ती चतुर्भुज मूर्ति पाहून भागवतांत देवकी व वसुदेव यांनीं व रामायणांत कौसल्येनें त्याची स्तुति केली व शेवटीं या अलौकिक स्वरूपाचा उपसंहार करून बालभावानें प्रकट होण्याविषयीं दोनहि ग्रंथांत भगवंताची प्रार्थना करण्यांत आली आहे. शेवटची ही प्रार्थना तर दोनहि ग्रंथांत अगदीं एक आहे पहा—

उपसंहर विश्वात्मन्नदो रूपमलौकिकम् ॥

भा. १०।३।३० व अ. रा. १।३।२९.

वाल्मीकिरामायणांत ही अलौकिक कथा मुळींच नसून त्यांत सरळ जन्म झाल्याचें वर्णन केलें आहे. अर्थात् मुळांत नसलेली ही कल्पना भागवतावरून सुचली हें उघड आहे.

रामाच्या बाललीला वाल्मीकींनीं मुळींच वर्णिलेल्या नसून ही उणीव अध्यात्मरामायणानें भरून काढिली आहे. मात्र या कामीं भागवतांतील कल्पना त्यानें आधारार्थ घेतल्या आहेत. हें वर्णन फार थोडें आहे. "रामाच्या चपलपणास्तव तिनें घरचें काम सोडून दिलें. एकदां राम मातेकडे भोजन मागूं लागला असतां ती कामांत व्यग्र असल्यामुळें तिला ऐकूं आलें नाहीं; तेव्हां रामाला क्रोध येऊन त्यानें भांड्यावर काठी मारिली आणि शिक्यावरील दहीं व लोणी खालीं पाडिलें." ( १।३।५२–५४ ) येथील वर्णनांत कवीनें भागवताचें केवळ अंधानुकरण केलें आहे. प्रथम कौसल्येनें घरचें काम सोडिलें असें सांगतांना ती अयोध्याधिपतीची पट्टराणी होती, इकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं, असें दिसतें. तिला घरचें काम करावें लागत असे ही कल्पनाच आधीं खुळी आहे. त्यांची राहणी साधी होती, हें खरें; तथापि घरच्या कामाचा भार तिजवर नव्हता हें विसरतां नये. श्रीकृष्णाचे बाबींत नंदाची स्त्री यशोदा हिचेविषयीं असें वर्णन करणें अस्वाभाविक नाहीं. कारण नंद हा गोकुलांतील गोपांमध्यें प्रमुख असला तरी मथुराधिपतीकडे वार्षिक कर भरणारांपैकीं एक होता; म्हणजे फार तर त्या गांवचा तो एक "गांवकर" होता असें म्हणतां येईल. तेव्हां त्याची स्त्री यशोदा हिजवर घरचे कामाचा भार असणें साहजिक आहे. पुढील रामलीला सांगतांना तर कवीनें गोकुळांतील दहीं व लोणी शिक्यासुद्धां अयोध्यापतीचे वाड्यांत आणून सोडिलें आहे. राजवाड्यांत दहीं व लोणी असावयाचें व तें शिक्यावर असावयाचें याविषयीं आम्हांला शंका नाहीं, पण राजवाड्यामध्यें राजपुत्रादिकांचा व्यवहार स्वतंत्र असावयाचा व त्यांचा भोजनादिकापुरता असल्या बाबीशीं संबंध असावयाचा. राम व कृष्ण यांच्या भोंवतालची परिस्थिति व समाजांतील त्यांची योग्यता भिन्न होती, इकडे येथें लक्ष देणें अवश्य आहे.

रामचरित्राचें कार्य व व्याप्ति श्रीकृष्णचरित्राचे मानानें फार लहान व कवीला तर अध्यात्मविषय व भक्तिपर स्तोत्रें यांचा संग्रह निर्माण करण्याची मनीषा; यामुळें त्यानें या दृष्टीनें भागवताशीं सादृश्य यावें याकरितां प्रत्येक सर्गांत असा प्रसंग साधण्याचा प्रयत्न केला आहे. पण कित्येक प्रसंगीं त्यानें पूर्वापर ग्रंथाकडे न पाहिल्यामुळें त्याचा प्रयत्न हास्यास्पद झाला आहे. राम व सुग्रीव यांची भेट झाली तेव्हां त्यांचें सख्य झाल्यावर सुग्रीवानें रामाची स्तुति केली, तींत त्याचें तोंडीं पुढील उक्ति आहे:—

**न कांक्षे विजयं राम न च दारसुखादिकम्।**
**भक्तिमेव सदा कांक्षे त्वयि बंधविमोचिनीम्** ॥ ४।१।८५ ॥

" रामा, मला विजयाची किंवा स्त्री-सुखादिकांची इच्छा नाहीं. बंधापासून मुक्त करणारी तुझी भक्तिच माझे ठायीं असावी अशी मला इच्छा आहे. "

दोघांचें प्रारंभीं सख्य झालें तें दोघांचें इष्ट कार्य साधण्याचें कामीं एकमेकांस साहाय्य करावयाचें या मुद्यावर; पुढें रामानें सात ताल वृक्षांचा एका बाणानें भेद करून स्वतांचे सामर्थ्याविषयीं त्याला प्रचीति आणून दिली; व यावर आनंदित होऊन सुग्रीवानें वरील उद्गार काढिले आहेत. हे या प्रसंगीं त्याचे तोंडीं शोभतात काय, हें वाचकांनींच ठरवावें. हाच सुग्रीव पुढें रामाच्या साहाय्यानें त्याला स्त्री प्राप्त झाल्यावर विलासांत गुंग होऊन गेला आहे व लक्ष्मणाचे धनुष्याचा टणत्कार कानीं पडल्यावर जागा होऊन त्याला प्रतिज्ञेचें स्मरण झालें आहे. स्मशानवैराग्याचा एक प्रकार आम्हीं ऐकलेला आहे व अर्थात् तो संकटकालीं संभवतो, पण कार्यसिद्धीचे वेळचा हा वैराग्याचा प्रकार कोणता ?

किष्किंधा कांडाचे ४ थ्या सर्गांत रामानें लक्ष्मणाला पूजाविधीचा उपदेश केला आहे. हा प्रसंग वालिवधानंतर वर्षाकालीं राम तेथें राहिलेल्या कालांतील आहे. यांतील पूजाविधि म्हणजे भागवताच्या एकादशस्कंधातील पूजाविधीची संक्षिप्त आवृत्ति होय. दोन ग्रंथांत असलेल्या प्रतिपादनांत कसें सादृश आहे हें आतां तुलना करून दाखवूं.

| भागवत ११।२७ | अ. रामायण ४।४ |
|---|---|
| क्रियायोगं समाचक्ष्व भवदाराधनं प्रभो। यस्मात्त्वां ये यथाऽर्चन्ति सात्वताः सात्वतर्षभ ॥ १ ॥ | इदानीं श्रोतुमिच्छामि क्रियामार्गेण राघव। भवदाराधनं लोके यथा कुर्वन्ति योगिनः॥८॥ |
| एतद्वदन्ति मुनयो मुहुर्निःश्रेयसं नृणाम्। नारदो भगवान् व्यास आचार्योऽगिरसः सुतः ॥ २॥ | इदमेव सदा प्राहुर्योगिनो मुक्तिसाधनम्। नारदोऽपि तथा व्यासो ब्रह्मा कमलसंभवः ९ |
| एतद्वै सर्ववर्णानामाश्रमाणां च संमतम्। श्रेयसामुत्तमं मन्ये स्त्रीशूद्राणां च मानद ॥ ४ ॥ | ब्रह्मक्षत्रादिवर्णानामाश्रमाणां च मोक्षदम्। स्त्रीशूद्राणां च राजेन्द्र सुलभं मुक्तिसाधनम्। |
| भक्ताय चानुरक्ताय ब्रूहि विश्वेश्वरेश्वर ॥ ५ ॥ | तव भक्ताय मे भ्रात्रे ब्रूहि लोकोपकारकम् ॥१०॥ |
| न ह्यन्तोऽनन्तपारस्य कर्मकांडस्य चोद्धव। संक्षिप्तं वर्णयिष्यामि यथावदनुपूर्वशः॥ ६ ॥ | मम पूजाविधानस्य नांतोऽस्ति रघुनंदन। तथापि वक्ष्ये संक्षेपाद्यथावदनुपूर्वशः ॥ ११ ॥ |
| यदा स्वनिगमेनोक्तं द्विजत्वं प्राप्य पूरुषः ॥ ८ ॥ | स्वगृह्योक्तप्रकारेण द्विजत्वं प्राप्य मानवः ॥ १२ ॥ |
| अर्चायां स्थंडिलेऽग्नौ वा सूर्ये वाप्सु हृदि द्विजे ॥ ९ ॥ | हृदये वाऽनले वाऽर्चेत् प्रतिमादौ विभावसौ ॥ १३॥ |
| पूर्वं स्नानं प्रकुर्वीत धौतदन्तोऽगशुद्धये ॥ | प्रातःस्नानं प्रकुर्वीत प्रथमं देहशुद्धये ॥ १४ ॥ |
| उभयैरपि च स्नानं मंत्रैर्मृद्ग्रहणादिना ॥ १० ॥ | वेदतंत्रोदितैर्मंत्रैर्मृल्लेपमविधानतः ॥ |
| संध्योपास्यादिकर्माणि वेदेनाचोदितानि मे। | संध्यादिकर्म यन्नित्यं तत्कुर्याद्विधिना बुधः ॥ १५॥ |
| पूजान्तैः कल्पयेत् सम्यक् संकल्पः कर्मपावनीम् ॥ ११ ॥ | संकल्पमादौ कुर्वीत सिद्ध्यर्थं कर्मणां सुधीः। |

स्नपनं त्वविलेप्यायां अन्यत्र परिमार्जनम् ॥ १४ ॥ शिलायां स्नपनं कुर्यात् प्रतिमासु प्रमार्जनम् ।

द्रव्यैः प्रसिद्धैर्मद्यागः प्रतिमादिष्वमायिनः॥ १५ ॥ प्रसिद्धैर्गंधपुष्पाद्यैर्मत्पूजा सिद्धिदायिका । अमायिकोऽनुवृत्या मां पूजयेन्नियतव्रतः ।

स्नानालंकरणं प्रेष्ठमर्चायामेव तूद्धव । प्रतिमादिष्वलंकारः प्रियो मे कुलनंदन ॥ १८ ॥

स्थंडिले तत्त्वविन्यासो वन्हावाज्यप्लुतं हविः ॥१६॥ सूर्ये चाभ्यर्हणं श्रेष्ठं सलिले सलिलादिभिः । अग्नौ यजेत हविषा भास्करे स्थंडिले यजेत् ।

श्रद्धयोपहृतं श्रेष्ठं भक्तेन मम वार्यपि ॥ १७ ॥ भक्तेनोपहृतं प्रीत्यै श्रद्धया मम वार्यपि ॥ १९ ॥

पिंडे वाय्वग्निसंशुद्धे हृत्पद्मस्थां परां मम । अण्वीं जीवकलां ध्यायेन्नादान्ते सिद्धभाविताम् ॥ २३ ॥ तयात्मभूतया पिंडे व्याप्ते संपूज्य तन्मयः । हृत्पद्मे भानुविमले मत्कलां जीवसंज्ञिताम् ॥ २० ॥ ध्यायेत्स्वदेहमखिलं तया व्याप्तमरिंदम ॥

आवाह्यार्चादिषु स्थाप्य न्यस्तांगं मां प्रपूजयेत् ॥ २४ ॥ तामेवावाहयेन्नित्यं प्रतिमादिषु मत्कलाम् ॥ २६॥

अभ्यर्च्याथ नमस्कृत्य पार्षदेभ्यो बलिं हरेत् ॥ ४२ ॥ पार्षदेभ्यो बलिं दत्वा होमशेषं समापयेत् ॥ ३३ ॥

मुखवासं सुरभिमत्तांबूलाद्यमथार्पयेत् ॥ ४३ ॥ मुखवासं च तांबूलं दत्वा प्रीतिसमन्वितः ॥ ३४ ॥

शिरो मत्पादयोः कृत्वा बाहुभ्यां च परस्परम् । पाणिभ्यां मत्पदे मूर्ध्नि गृहीत्वा भक्तिसंयुतः ॥ ३६ ॥

प्रपन्नं पाहि मामीश भीतं मृत्युग्रहार्णवात् ॥ ४६ ॥ इति शेषां मया दत्तां शिरस्याधाय सादरम् । रक्ष मां घोरसंसारादित्युक्त्वा प्रणमेत्सुधीः ।

| | |
|---|---|
| उद्वासयेच्चेदुद्वास्यं ज्योति-<br>र्ज्योतिषि तत्पुनः ॥ ४७ ॥ | उद्वासयेत् यथापूर्वं प्रत्यग्ज्योतिषि<br>संस्मरन् ॥ ३७ ॥ |

येथील पूजाविधि दोन ग्रंथांत अगदीं सारखा असून कित्येक स्थलीं तर दोन ग्रंथांतील शब्द सारखे आहेत व अशीं स्थलें वर अवतरलीं आहेत. येथें शब्दतः सादृश्य पहावयाचें आहे व यासाठीं अर्थ येथें दिलेला नाहीं. हें सादृश्य पाहून एकानें दुसऱ्याचा अनुवाद केला, याविषयीं कोणाला शंका राहणार नाहीं. तथापि मूळ कोणतें याविषयीं कित्येक वाचकांचे मनाची ओढाताण होण्याचा संभव आहे; कारण याविषयीं निर्णायक प्रमाण येथपर्यंत दिलेलें नाहीं. याविषयीं प्रमाण द्यावयाचें म्हणजे विसंगतता कोणत्या ग्रंथांत आहे तें सांगितल्यास पुरे आहे. भागवतांतील पूजाविधि उद्धवगीतेंत आला आहे व हें सर्व प्रकरण वेदान्तविषयक चर्चेला वाहिलेलें आहे. अध्यात्मरामायणांतील पूजाविधिनिरूपण बुद्ध्या उपस्थित केलेलें आहे. पूजाविधि सांगून पुरा होतांच राम सीतेकरितां विलाप करूं लागला आहे व पूर्वसर्गांतीं तर सुग्रीवाचा राज्याभिषेक निरूपिला आहे. अर्थात् मधील निरूपण अप्रासंगिक होय हें उघड आहे. उद्धवानें प्रथम केलेल्या प्रश्नांत व्यासमहर्षींचा उल्लेख आहे व तो त्याचे तोंडीं शोभण्यासारखा आहे. पण ज्या वेळीं लक्ष्मणाचे तोंडीं व्यासांचें नांव आपणांस आढळतें, त्या वेळीं कालविपर्यास करण्यांत कवीनें घोडचूक केली असें आपणांस कळून येत नाहीं काय? कारण त्या वेळीं व्यासांचा जन्मच झाला नव्हता. मूळ ग्रंथ कोणता व अनुवाद कोणता, हें यावरून कोणाच्याहि आतां सहज लक्षांत येईल.

भगवद्गीतेमध्यें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला ज्ञानयोग आणि कर्मयोग या दोन निष्ठा सांगितल्या आहेत. ( ३।३ ) व गीतेंतील प्रतिपादनाचा मुख्य विषय या दोन निष्ठांची एकरूपता दाखविण्याचा आहे. भागवतामध्यें भक्ति ही स्वतंत्र निष्ठा आणखी सांगितली असून तेथें एकंदर निष्ठा तीन होत आहेत. ( ११।२०।६ ) भक्ति ही स्वतंत्र व तिसरी निष्ठा मानणें हा भगवद्गीतेहून भागवताचा विशेष आहे. येथें निष्ठांविषयीं आम्हांला चर्चा करावयाची नसून तो विषय स्वतंत्र आहे. अध्यात्मरामायणानें भागवताचा अनुवाद केल्याचें आम्हांला दाखवावयाचें असून त्यासाठीं भागवतांतील तीन निष्ठांचा उल्लेख वर केला आहे. आतां कौसल्येला केलेल्या उपदेशांतील रामाचें पुढील वचन पहाः—

**मार्गास्त्रयो मया प्रोक्ताः पुरा मोक्षाप्तिसाधकाः ।**
**कर्मयोगो ज्ञानयोगो भक्तियोगश्च शाश्वतः ॥ ७।७।५९ ॥**

" मोक्षप्राप्तीचे साधक म्हणून कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग असे तीन मार्ग मीं पूर्वी सांगितले आहेत. "

वर दिलेल्या व्यासांच्या उल्लेखावरून भागवतानंतर अध्यात्मरामायणाची रचना झाली, हें स्पष्ट आहे व मार्गत्रयाविषयींचें भागवताचें वैशिष्ट्य अध्यात्मरामायणांतहि आहे हें पाहिलें म्हणजे भागवताचा हा अनुवाद आहे, याविषयीं शंका वाटत नाहीं.

## स्वतांचें वैशिष्ट्य राखण्याचा प्रयत्न.

अशा रीतीनें अध्यात्मरामायणकारानें विषय रामचरित्राचा असल्यामुळें वाल्मीकिरामायणाचा व अध्यात्मविषय प्रतिपादावयाचा असल्यामुळें भागवताचा अनुवाद केला आहे. त्यानें आपल्या ग्रंथांत भागवताचा उल्लेख केला नाहीं, हें साहजिक आहे; कारण त्यायोगानें कालविपर्यासाचा दोष पदरीं पडून अनुवाद या दृष्टीनें ग्रंथाला तें एक वैगुण्य येणार. तथापि वाल्मीकिरामायणाचा उल्लेख त्याला टाळतां येण्यासारखा नसतां त्यानें टाळला आहे. वाल्मीकि व रामचरित्र यांचा संबंध इतका निगडित आहे कीं, तो तोडण्याचा प्रयत्न करूं लागल्यास नवीन दोष मात्र पदरीं पडतात. कारण वाल्मीकींनीं लिहिलेलें रामचरित्र राम राज्य करीत असतां लिहिलेलें व रामचरित्रांत त्यांनीं महत्त्वाची कामगिरी केलेली, असा रामचरित्राशीं त्यांचा दुहेरी संबंध आहे. यामुळें त्यांचा उल्लेख केल्यावांचून रामचरित्राला पूर्तता येत नाहीं. आणि अशा रीतीनें तो उल्लेख केल्यास अनुवादाचा दोष पत्करल्यावांचून गति नाहीं. तेव्हां कवीनें येथें नवी युक्ति योजिली. वाल्मीकींनीं रामायण केलें होतें हें सुद्धां त्यानें कोठें सांगितलें नाहीं. अर्थात् क्रौंचवधाची स्वभावमनोहर कथा त्याला सांगतां आली नाहीं. वाल्मीकींविषयीं असलेली दंतकथा त्यानें प्रसंग नसतां मध्यें गोंवून घेतली; आणि सीतेनें दिव्य केलें त्यापूर्वी रामाच्या दरबारांत कुशलवांनीं जें रामायण गायिलें त्याविषयीं निरूपण करितांना तो म्हणतोः—

कृत्स्नं रामायणं प्राह काव्यं बालकयोर्मुनिः ॥ ७।६।२८ ॥
शंकरेण पुरा प्रोक्तं पार्वत्यै पुरहारिणा ।
वेदोपबृंहणार्थाय तावग्राहयत प्रभुः ॥ २९ ॥

" महर्षि वाल्मीकींनीं त्या दोघां बालकांना त्रिपुरनाशक शंकरांनीं पूर्वी पार्वतीला सांगितलेलें सबंध रामायण काव्य त्यांच्या वेदाध्ययनाचें पुष्टीकरण व्हावें म्हणून पढविलें. "

येथें कुशलवांनीं कोणतें रामायण गायिलें अशी जिज्ञासा वाचकांना झाल्यास त्यासाठीं कवीचें हें निरूपण आहे. व अशा रीतीनें त्यांनीं अध्यात्मरामायण गायिलें असें त्यानें सूचित केलें आहे. 'शंकरांनीं पार्वतीला सांगितलेलें असें' म्हणून त्यानें हें रामायण रामचरित्र होण्यापूर्वीं निर्माण झालें होतें असेंहि दर्शविलें. आतां या रामायणाचा उपक्रम कसा आहे तो पहा. प्रथमच पार्वतीचा शंकरांना 'राम परमात्मा असून त्यानें सीतेकरितां विलाप वगैरे कसा केला' असा प्रश्न आहे व यानिमित्त सीतेनें मारुतीला सांगितलेलें रामहृदय शंकरांनीं पार्वतीला सांगितलें आहे. रामाला अयोध्येंत राज्याभिषेक झाल्यानंतरचा हा प्रसंग असल्याचें तेथें स्पष्ट म्हटलें आहे. यानंतर पार्वतीनें रामचरित्र सविस्तर सांगण्याविषयीं शंकरांची प्रार्थना केल्यावरून त्यांनीं तिला हें चरित्र सांगितलें आहे. प्रारंभीं शंकरांनीं जे " रामहृदय " सांगितलें तें प्राचीनकालीं सीतेनें मारुतीला सांगितलेलें, असें ते म्हणत आहेत. अर्थात् मध्यंतरीं काल फार गेला आहे. हा काल किती हें जरी अनुमानितां आलें नाहीं, तरी शंकरपार्वती याचा संवाद झाला त्या वेळीं राम गादीवर नसून त्यांना दिवंगत होऊन कांहीं काल गेला होता, हें निर्विवाद आहे. आणि असें मानिलें तरच शंकरांनीं पार्वतीला रामहृदय सांगतांना त्याविषयीं 'प्राचीनकालीं झालेला सीता व मारुती यांचा संवाद' असें म्हटलें आहे, तें सुसंगत होतें. यानंतर रामचरित्र सांगितलें आहे. येथें पार्वतीनें केलेल्या प्रश्नावरून, रामचरित्रांतील कांहीं ठळक गोष्टी माहीत होत्या, असें फार तर म्हणतां येईल; आणि यासाठीं सविस्तर चरित्र तिनें विचारिलें आहे. या ठळक गोष्टीहि शंकरांकडून तिला कळल्या असल्या तरी सविस्तर रामचरित्र तिला याच वेळीं कळलें, हें उघड आहे. हें चरित्र कुशलवांनीं रामाचे दरबारांत

गायिलें असें पुढें उत्तरकांडांत म्हटल्याचें वर सांगितलें आहे. म्हणजे रामानंतर पुष्कळ वर्षांनीं शंकरांनीं पार्वतीला सांगितलेलें रामचरित्र रामाचे दरबारांत कुशलवांनीं गायिलें, असें होत आहे ! कालाची ही ओढाताण कवीला आपला ग्रंथ रामाचे दरबारांत गाण्यांत आला हें सांगावयाचें असल्यामुळें झाला आहे. या कालाची संगति लावण्याचा प्रयत्न करावयाचा म्हणजे कालाबरोबर स्वतांची ओढाताण करावयाची आहे !

वाल्मीकींनीं केलेल्या रामचरित्राचा उल्लेख कवीनें केला नसला तरी त्यांनीं आपल्या काव्याला दिलेल्या " रामायण " या संज्ञेवरून त्यानें आपल्या ग्रंथाला नांव दिलें आहे. व रामायण शब्दाचा प्रयोग त्यानें कित्येक स्थलीं केलाहि आहे. (१।१।२६; २।४।७८; ४।५।२१; ७।५।१; ७।६।२८) येथें रामायण या शब्दाचा प्रयोग त्यानें रामचरित्र या अर्थीं केला आहे, हें खरें; तथापि या शब्दाचा प्रथम प्रयोग वाल्मीकींनीं आपल्या काव्याला नांव देण्याच्या निमित्तानें केला आहे, हें विसरतां येत नाहीं. कित्येक वेळां तर वाल्मीकींचें रामायण त्याला अभिप्रेत असावें असा भास होतो. रामायण नांवाबरोबर त्याला असलेली " आदिकाव्य " ही दुसरी संज्ञा त्यानें आपल्याहि काव्याला दिली आहे. ( ७।९।७४ ) संस्कृत वाङ्मयाचा इतिहास ज्याला साधारणपणें माहीत आहे, त्याला आदिकाव्य ही संज्ञा वाल्मीकिरामायणावांचून दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाला नाहीं हें माहीत असलें पाहिजे. कारण संस्कृत भाषेंतील तें पहिलें छंदोबद्ध काव्य होय. या दृष्टीनेंच महर्षींना " आदिकवि " अशी संज्ञा आहे. प्रारंभीं जें माहात्म्य दिलेलें आहे, त्यांत तर या रामायणाविषयीं सर्व पुराणांमध्यें श्रेष्ठ असें म्हटलें आहे. म्हणजे तेथें याची पुराणांत गणना केलेली आहे. पुराण-ग्रंथांमध्यें जीं महापुराणें व उपपुराणें सांगितलेलीं आहेत त्यांत या ग्रंथाचें नांव नाहीं व पुराणाचीं प्रसिद्ध पांच लक्षणें याला लागू पडत नाहींत. तथापि स्वतां कवि आपला ग्रंथ " आदिकाव्य " असल्याचें सांगतो व माहात्म्यामध्यें त्याला " पुराण " म्हटलें आहे, ही येथें गंमत आहे. आपला ग्रंथ फार प्राचीन आणि वाल्मीकींच्या काव्याहून स्वतंत्र आहे, असें कवीला सुचवावयाचें आहे. व यासाठीं त्यानें हे प्रयत्न केले आहेत; परंतु ते त्याच्या स्वतांच्या कृतीनेंच फसले आहेत.

## उपसंहार.

अध्यात्मरामायणाविषयीं येथपर्यंत जें विवेचन केलें त्यांत त्याचे कर्त्याविषयीं विचार केलेला नाहीं आणि समग्र ग्रंथ पाहतां त्यांत त्यानें आपलें नांव दिलेलें नाहीं. वाल्मीकिरामायणांत महर्षींनीं स्वतां तें काव्य ग्रथित केल्याचें सांगितलें असून त्याविषयीं प्रथमच त्यांनीं इतिहास दिला आहे. तसेंच प्रत्येक सर्गाची समाप्ति करितांना " इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये " असा उल्लेख केला आहे. अध्यात्मरामायणांत सर्गसमाप्तीचे वेळीं " इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे " असा उल्लेख असतो. म्हणजे त्यानें ग्रंथसमाप्तीचे श्लोकांत जरी आपल्या ग्रंथाला आदिकाव्य म्हटलें आहे, तरी तें प्रत्येक सर्गाचे अंतीं म्हणाण्याचें धाडस त्यानें केलें नाहीं. आणि ' आर्ष ग्रंथ ' असाहि उल्लेख तेथें त्याला करवला नाहीं. वाल्मीकिरामायणाचें अनुकरण या दृष्टीनें वास्तविक त्यानें तसे उल्लेख करावयाचे आणि यासाठीं ते नाहींत याचें महत्त्व आहे. नाहीं तर उल्लेखाचा अभाव हें कांहीं प्रमाण नव्हे. ग्रंथकाराचें नांव ग्रंथांत मुळींच आलेलें नाहीं, तथापि तो ग्रंथ व्यासांचा आहे, अशी लोकांत समजूत आहे. " संकल्पादिन्यासध्यानजपक्रम " सांगितलेली जी अध्यात्मरामायणाची प्रत मिळते तींत " बादरायण " हे या ग्रंथाचे कर्ते असा निर्देश प्रत्येक सर्गाचे प्रारंभीं करण्याचे संकल्पांत असतो, हे खरें; तथापि हा निर्देश बाह्य आहे व यासाठीं त्याला महत्त्व देतां येत नाहीं. सर्व पुराणें आणि महाभारत हे ग्रंथ व्यासांनीं केलेले आहेत; पण मूळ ग्रंथ त्यांत आधुनिक कवींनीं भर घातल्यामुळें इतके वाढले आहेत कीं, त्यांत मूळ ग्रंथ कोणता आणि प्रक्षिप्त भाग कोणता याचा विवेक करणें कठीण होऊन राहिलें आहे. सुदैवानें अध्यात्मरामायणांत तसा प्रकार झाल्याचें दिसून येत नाहीं. उपलब्ध ग्रंथ एकहातीं आहे असें वाटतें. मात्र पुराणांत त्याची जी गणना केल्याचें वर सांगितलें आहे त्यावरून तो व्यासांचे नांवावर मोडत असावा, अशी आमची समजूत आहे.

महाभारत व्यासांचें आहे व त्यांत वाल्मीकींनीं रामायण केल्याविषयीं स्पष्ट उल्लेख आहेत व अध्यात्मरामायणांत तर वाल्मीकींनीं रामायण केलें हें सांगण्याचें टाळण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे; तेव्हां हे दोन ग्रंथकार एक

असावेत अशी कल्पना करितां येत नाहीं. स्वतां महाभारतकार वाल्मीकींचा ग्रंथ प्राचीन मानितात आणि स्वतांच्या या ग्रंथाविषयीं कोठें उल्लेख करीत नाहीं. तेव्हां हा ग्रंथ नंतरचा, हें उघड दिसतें. भागवताचा त्यानें अनुवाद केल्याचें वर दाखविलें आहे. त्यावरूनहि श्रीकृष्णनिर्याणानंतर हा ग्रंथ निर्माण झाल्याचें व्यक्त होतें. जांबवानाला वर देते वेळीं त्याशीं द्वापारयुगांत होणाऱ्या युद्धाविषयीं जो रामाचे भाषणांत उल्लेख आहे, ( ७।९।३६ ) त्यावरूनहि श्रीकृष्णांनीं जांबवानाशीं केलेल्या युद्धाची भागवतांतील कथा कवीला अभिप्रेत आहे असें दिसतें. प्रारंभी जें माहात्म्य आहे त्यांत नारदांचा ब्रह्मदेवाला "प्रस्तुत कलियुगांत लोकांमध्यें दुराचार वाढले आहेत, यासाठीं त्यांच्या उद्धाराचा उपाय कोणता ? " असा प्रश्न आहे व त्याला उत्तर म्हणून ब्रह्मदेवांनीं नारदांला अध्यात्मरामायणाचें नांव सांगितलें आहे. तेथें हें पुराण शंकरांनीं पार्वतीला प्राचीनकालीं सांगितल्याचें म्हटलें आहे. पण त्याबरोबर त्याचा उदय--प्रकाश--व्हावयाचा आहे, असें सांगितलें आहे. अर्थात् कलियुगारंभ होऊन लोक पापप्रवण झाल्यानंतर नारदांनीं ब्रह्मदेवांना प्रश्न केला असून त्या वेळीं अध्यात्मरामायण प्रकट झालें नव्हतें, हें निर्विवाद आहे. म्हणजे या ग्रंथाचा काल उतरत उतरत अशा रीतीनें कलियुगाचें प्राबल्य होईपर्यंत आला आहे. माहात्म्यांत आलेल्या कलियुगाविषयींच्या उल्लेखाचें कोणास महत्त्व वाटत नसेल तर अयोध्यांकांडांत वामदेवानें नागरिकांला उद्देशून केलेल्या भाषणांत तो आला आहे, तिकडे त्यांनीं दृष्टि द्यावी. " कलियुगामध्यें रामनामावांचून मोक्षप्राप्तीला दुसरा उपाय नाहीं, " ( २।५।२७ ) असें तेथें तो म्हणत आहे. म्हणजे कवीच्या अनवधानतेमुळें रामचरित्राचा काल कलियुगांत येऊं पाहात आहे. पण रामचरित्राचा काल निश्चित न कळला तरी तें कलियुगांतील नव्हे हें निश्चित आहे व यासाठीं अशा उल्लेखांवरून रामचरित्राचा काल बदलावयाचा नसून कवीचा काल त्यानंतरचा असें म्हणतां येणार आहे.

वाल्मीकिरामायणांत यौवराज्याभिषेकाचे वेळीं राजा दशरथानें प्रजेची संमति मागितल्याचें सांगितलें आहे, व ही संमति नांवाची नसून खरोखरची होती याविषयीं पूर्वीं विवेचन केलें आहे. म्हणजे राजसत्तेवर प्रजेच्या अधिकाराची

कल्पना त्या वेळीं राजा व प्रजा या दोहोंमध्यें अनुस्यूत असल्याचें दिसत आहे. या कल्पनेला झोंके बसून ती दुर्बल कधीं झाली हें कळत नाहीं; तथापि महाभारतकालीं ती जिवंत होती यांत शंका नाहीं. भारतीयुद्धानंतर अठरा वर्षांनीं धृतराष्ट्रानें अरण्यवास पत्करिला. त्या वेळीं वनांत जाण्याला त्यानें आपल्या प्रजांची अनुज्ञा मागितली, व ती मिळाली तेव्हां तो अरण्यांत निघून गेला असें आश्रमवासिपर्वांत वर्णन आहे. अर्थात् प्रजेचा अधिकार यापुढें दीर्घ काल गेल्यावर लोपत लोपत गेला असावा. अध्यात्मरामायणांत प्रजेच्या अधिकाराची ही कल्पनाहि कवीला माहीत असल्याचें दिसत नाहीं. यौवराज्याभिषेकाचे वेळीं राजानें केवळ वसिष्ठांचें अनुमोदन घेतल्याचें वर्णन केलें आहे. ( २।२।४ ) म्हणजे प्रजेच्या अधिकाराचा लोप झाल्यावर—इतकेंच नव्हे तर त्याविषयींची कल्पनाहि लोप पावल्यावर अध्यात्मरामायणाची रचना झाली असली पाहिजे, हें उघड आहे. अध्यात्मरामायणांत सीताविवाहानंतर जनकानें पाठवणी केल्यावेळीं दिलेल्या देणग्यांत 'दीनार' नाण्याचा उल्लेख आला आहे.

**इति स्तुत्वा नृपः प्रादाद्राघवाय महात्मने ।**
**दीनाराणां कोटिशतं रथानामयुतं तदा ॥ १।६।७६ ॥**

" अशा रीतीनें स्तुति केल्यावर जनक राजानें माहात्म्या राघवाला शतकोटी दीनार व दहा हजार रथ दिले. "

दीनार हें रोमन नाणें असून तें हिंदुस्थानांत ख्रिस्ती शकाचे आरंभीं आलें असें म्हणतात. अर्थात् त्याचा उल्लेख असलेला हा ग्रंथ त्यानंतरच्या कालांतला हें उघड आहे. शाकटायनाचे उणादिसूत्रांत दीनार या शब्दाची व्युत्पत्ति दिलेली आहे व शाकटायन तर निरुक्ताचे पूर्वीचा आहे. तथापि दुसऱ्या कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत त्याचा उल्लेख नाहीं; शब्द पाहूं गेलें तर तो रोमन दिसतो. तेव्हां उणादि सूत्रांतील उल्लेखावरून विरुद्ध अनुमान करतां येत नाहीं.

प्रसिद्ध साधुवर्य विद्वच्छिरोमणि एकनाथ यांनीं आपल्या भावार्थरामायणांत निरनिराळ्या रामायणांविषयीं एके स्थलीं माहिती दिली असून तींत प्रस्तुत रामायणाविषयीं पुढीलप्रमाणें आपलें मत दिलें आहे—

**जें कां अध्यात्मरामायण। रामायणींचे वेंचे काढोन।**
**केलें आधुनिक निरूपण। ऋषिकृत जाण तें नव्हे॥** अरण्य २०।१५१॥

एकनाथांचा हा अभिप्राय महत्वाचा आहे. यांत त्यांनीं या काव्याचा कर्ता कोण, किंवा त्याची रचना कधीं झाली, हें सांगितलें नाहीं हें खरें; तथापि तो ग्रंथ व्यासांचा नसून नंतर झालेल्या कोणातरी कवीचा आहे, असें तो ग्रंथ वाचून आमचें जें मत झालें त्याला त्यांचें मत पोषक आहे, व यासाठीं तें आम्हीं येथें उद्धृत केलें आहे. नाथांनीं या ग्रंथाविषयीं अधिक माहिती दिलेली नाहीं. ही माहितीहि त्यांना परंपरेनें कळली असावी असें वाटतें आणि त्यांनाहि कवीचें नांव माहीत नसल्यामुळें त्यांनीं ग्रंथ आर्ष नव्हे, इतकें सांगून आटोपतें घेतलें आहे.

अध्यात्मरामायण हा ग्रंथ आर्ष नसल्यामुळें त्याचें प्रामाण्य एका प्रकारें कमी झालें आहे, हें खरें; तथापि ग्रंथ आर्ष नसतां व एकनाथांचे वेळीं कित्येकांना तरी त्याचें हें स्वरूप कळलें असतां नंतरच्या काळांत त्यानें स्वतांचे सामर्थ्यावर आर्ष ग्रंथासारखी लोकमान्यता संपादन केली ही गोष्ट कौतुकास्पद होय, यांत शंका नाहीं. नाथांचे कालींहि त्याचा प्रसार लोकांत असावा, असें वाटतें; व यासाठीं त्यानीं त्यांना माहीत असलेलें त्याचें स्वरूप एका ओंवींत प्रकट करून ठेविलें आहे. रामायण व भागवत या दोनहि ग्रंथांचा लोकांत प्रसार फार व या कवीनें कथेपुरता रामायणाचा व अध्यात्मविषयापुरता भागवताचा अनुवाद करून या दोन ग्रंथांचा सुंदर संयोग करण्याचा यशस्वी प्रयत्न केल्यामुळें आणि ग्रंथ आटोपशीर असल्यामुळें त्याचा प्रसार झपाट्यानें झाला. ग्रंथ आर्ष आहे अशी समजूत प्राचीन कालापासून लोकांत आहे व तीहि त्याचा प्रसार होण्यास व त्याविषयीं आदर वाटण्यास कारण आहे, हें खरें; तथापि कवीनें नवीन व स्वतंत्र मत प्रतिपादन केलें नसल्यामुळें त्यापासून लोकांचें अहित झालें नाहीं. वाल्मीकिरामायणाचा अनुवाद करितांना तर कवीनें कित्येक स्थलीं लोकांतील समजुतीलाहि मान दिला आहे. रावणाचें दहा तोंडांचें व वीस हातांचें भयंकर स्वरूप वाल्मीकिरामायणांत फार थोडें आलें आहे; बहुतेक वर्णन एक मस्तक व दोन हात असल्याविषयीं आहे. लोकांतील समजूत

तर त्याचें स्वरूप भयंकर होतें अशी आहे. या बाबींत कवीनें वाल्मीकींचा अनुवाद न करितां लोकांतील समजुतीला अनुसरून वर्णन केलें आहे. रावणाला दोन नेत्र असल्याचें अर्थात् मुख एक असल्याचें वर्णन आम्हांला या ग्रंथांत एके स्थलीं (६।११।१६) मात्र आढळलें. लोकांतील समजुतीशीं विरुद्ध असलेलें हें वर्णनहि कवीनें मूळ ग्रंथाचें परीक्षण करून बुद्धया केलें किंवा काय याची शंका आहे. कारण कित्येक स्थलीं सामान्य तारतम्य न ठेवितांहि त्यानें वर्णन केलें आहे. रामाचा निरोप कळल्यावर सुग्रीवाचा मद उतरून तो व लक्ष्मण दोघे रामाचे निवासस्थानाकडे आले. त्याविषयीं वर्णन करितांना वाल्मीकिरामायणांत ते शिबिकेंतून आल्याचें लिहिलें आहे; (४।३८।१६) आणि तो प्रदेश पर्वतमय आहे हें लक्षांत घेतां, तें युक्त दिसतें. पण अध्यात्मरामायणामध्यें ते रथांतून आल्याचें वर्णन केलें आहे. (४।६।३) अर्थात् सर्वत्र मूळ ग्रंथ कवीनें सूक्ष्म दृष्टीनें पाहिला असें म्हणवत नाहीं. तथापि कथेचा संदर्भ त्यानें कोठेंहि सोडिला नाहीं व रामकथा लोकांपुढें साकल्यानें एकदम राहण्यास त्याच्या ग्रंथाचें मोठें साहाय्य झालें आहे, यांत शंका नाहीं. रावणवधानंतर सीता पुढें आली असतां रामानें तिला उद्देशून जें भाषण केलें तें रामाच्या तोंडीं शोभण्यासारखें नसल्याविषयीं गुणदोषविवेचन करितांना आम्हीं लिहिलें आहे. येथें कवीनें तें भाषण मुळींच न देतां "अवाच्य" (६।१२।७५) भाषण केलें असें मोघम सांगितलें आहे व अशा रीतीनें आमच्या म्हणण्यास पर्यायानें त्याची संमति मिळाली आहे. येथें तें भाषण न देण्यांत त्याची सहृदयता व्यक्त होत आहे, आणि सर्व ग्रंथ इतका सर्वांगसुंदर होण्यास त्याचा हा गुण कारण झाला आहे. या कवीचें नांव किंवा चरित्र लोकांस परिचित नसावें हें मात्र वाङ्मयाचें व लोकांचें दुर्दैव होय.

## १६ आनंद–रामायण.

हें रामायण वाल्मीकींचें म्हणून प्रसिद्ध असून याचीं कांडें ९ आहेत. सर्व कांडांचे सर्ग १०९ असून ग्रंथसंख्या १२,२५२ आहे. सर्व ग्रंथ शंकरपार्वती यांमधील संवादरूपानें सांगितला असून दुसऱ्या कांडाचे तिसऱ्या सर्गापासून रामदास व विष्णुदास यांचा उपसंवाद आहे. नांवाप्रमाणें या ग्रंथांत सर्व रामचरित्र आलें आहे; तथापि पहिलें सारकांड यांत वाल्मीकिरामायणाचें सार आलें

असून पुढील सर्व कथाभाग प्रायः नवा आहे. यासाठीं त्याविषयीं माहिती प्रथम संक्षेपानें देऊं.

प्रथमच्या **सार**कांडांत वाल्मीकिरामायण संक्षेपानें आल्याचें वर सांगितलें आहे; तथापि त्यांत सर्व कथा आली आहे असें नाहीं. कांहीं कथा गाळल्या आहेत तर कांहीं नवीन सांगितल्या आहेत. सूर्यवंशांतील पुरुषांची नामावलि प्रथम देऊन पुढें दशरथकौसल्येचे विवाहाची कथा सांगितली आहे व पुढें रामचरित्राला प्रारंभ केला आहे. वाल्मीकिरामायणाचे सात कांडांतील कथा याचे तेरा सर्गांत आली आहे. रावणवध करून सीतेसह राम परत आल्यावर त्याला राज्याभिषेक झाला व त्याचें अभिनंदन करण्याकरितां अगस्त्यऋषि आले; आणि त्यांनीं त्याला रावणादिकांचे पूर्वींचे इतिहास सांगितले; इतकी कथा निरूपण करून तेराव्या सर्गाची व त्याबरोबर सारकांडाची समाप्ति झाली आहे. म्हणजे वाल्मीकिरामायणाचे उत्तरकांडांतील प्रारंभींच्या ४० सर्गांतील विषय यांत आला आहे.

दुसऱ्या कांडाचें नांव **यात्रा**कांड असें असून त्यांत प्रथम वाल्मीकींचे रामायणाविषयीं माहिती दिली आहे व ती प्रारंभींच्या दोन सर्गांत आली आहे; पुढें रामानें केलेल्या चारी दिशांकडील तीर्थयात्रेचें वर्णन सात सर्गांत आलें आहे. यात्रावर्णन करितांना प्रायः क्षेत्रांचीं नांवें व तेथें रामानें काय काय केलें तें संक्षेपानें सांगितलें आहे.

तिसऱ्या कांडाचें नांव **याग**कांड असें असून याच्या ९ सर्गांत रामाचे विलासांचें प्रायः निरूपण आहे.

पांचव्या कांडाचें नांव **जन्म**कांड असें असून त्याचे सर्ग ९ आहेत. सीता गर्भिणी होऊन तिला वनांत जाण्याची इच्छा झाली व पुढें तिजविषयींचा अपवाद रामाला कळला, त्यानिमित्त रामानें तिचा त्याग केला; अरण्यांत गेल्यावर ती वाल्मीकींचे आश्रमीं राहिली; तिला कुश नामक पुत्र झाला. या पुत्राला पाळण्यांत ठेवून सीता तमसा नदीवर जात असतां मध्येंच परत आली व मुलाला कडेवर घेऊन नदीवर गेली. वाल्मीकींना हें कळलें नाहीं व पाळण्यांत मूल नाहीं असें पाहून त्यांनीं लव्हाळ्याचें एक बालक निर्माण करून तें पाळण्यांत

ठेविलें. हाच सीतेचा दुसरा पुत्र लव होय. सीतेकरितां लवानें अयोध्येच्या उपवनांतील सुवर्णकमलें हरण करून आणिलीं व यानिमित्त त्याचा तेथील रक्षकांशीं संग्राम झाला. हा बालक वाल्मीकींचा शिष्य असल्याचें कळल्यावरून रामानें त्यांना यज्ञाकरितां म्हणून बोलाविलें व त्याप्रमाणें ते सीता व तिचे दोन पुत्र यांसह तिकडे गेले. यज्ञाचे वेळीं प्रथम दिवशीं कुशलवांनीं विलासकांडापर्यंत रामायणाचें गायन केलें. दुसरे दिवशीं अयोध्येजवळच्या ज्या पर्णकुटींत वाल्मीकि उतरले होते तेथें अश्वमेधाचा श्यामकर्ण परत येत असतां आला व लवानें धरून ठेविला, यानिमित्त रामादिकांचें त्या बालकांशीं युद्ध झालें. युद्धांत जय येत नाहीं असें पाहून रामानें हे बालक कोणाचे याचा शोध करण्यासाठीं आपल्या मंत्र्याला वाल्मीकींकडे पाठविलें. त्यांनीं जन्मकांड ऐकल्यावर तें कळेल असें त्याला उत्तर दिलें व कुशलवांना परत बोलाविलें. दुसरे दिवशीं जन्मकांडाचें गायन होऊन सर्व उलगडा झाल्यावर सीतेनें दिव्य केलें. मात्र सीता भूतलांत प्रविष्ट होत असतां राम क्रुद्ध झाल्याचें पाहून भूमातेनें तिला पुनः रामाचे स्वाधीन केली, हें यांत विशेष आहे. याप्रमाणें कथा आठ सर्गांत सांगून पुढील नवव्या सर्गांत लक्ष्मणादि बंधूंना दोन दोन पुत्र झाल्याचें सांगितलें आहे.

सहाव्या कांडाचें नांव **विवाह**कांड असें सांगून त्यांत आठहि राजपुत्रांचे विवाहांचीं वर्णनें आहेत. सर्गसंख्या ९ आहे.

सातव्या कांडाचें नांव **राज्य**कांड असें असून त्याचे दोन भाग आहेत. प्रत्येकाचे सर्ग १२ आहेत.

आठव्या कांडाचें नांव **मनोहर**कांड असें असून त्याचे सर्ग १८ आहेत. यांत रामाची उपासना, मंत्र, जप वगैरे यांची माहिती व त्यांचीं फलें सांगितलीं आहेत.

नवव्या कांडाचें नांव **पूर्ण**कांड असें असून त्याचे सर्ग ९ आहेत. रामाचें हस्तिनापुरीं गमन व स्वर्गारोहण या कथा यांत आल्या आहेत.

## वाल्मीकिरामायणाशीं तुलना.

आनंद रामायण वाल्मीकींनीं केल्याचें त्यांत स्पष्ट सांगितलें आहे. ग्रंथाचा

प्रारंभ "वाल्मीकिरुवाच" असा केलेला आहे व प्रत्येक सर्गाची समाप्ति " इति श्रीशतकोटिरामचरितांतर्गत श्रीमदानंदरामायणे वाल्मीकिये " अशी केली आहे, म्हणजे " वाल्मीकिरुवाच " या उपक्रमानें कोणाचें समाधान होत नसेल, तर समाप्तीनें शंका दूर होण्यासारखी आहे. नऊ कांडांतील कथानकाचें जें सार पूर्वीं दिलें आहे, तेवढें पाहिलें तरी यांतील कथाभाग बहुतेक अपूर्व आहे, असें वाचकांस कळून येईल. वाल्मीकिरामायणांतील कथाभाग या रामायणाचे पहिलें व पांचवें अशा दोन कांडांत आला आहे. आणि रामायणाचे उत्पत्तीची कथा दुसऱ्या कांडाचे प्रारंभीं आली आहे. दोन ग्रंथांतील कथाभागाची तुलना करावयाची म्हणजे आनंदरामायणांतील उपरिनिर्दिष्ट काय तो कथाभाग वाल्मीकिरामायणाशीं तुलना करण्यासारखा आहे; कारण बाकी कथाभाग प्रायः सर्व नवा आहे, म्हणजे वाल्मीकिरामायणाचें तें एक परिशिष्ट आहे. दोन ग्रंथांची तुलना करूं गेलें तर मुख्य कथा स्थूलतः सारखी आहे, असें म्हणण्यास अडचण नाहीं. भेद काय तो वर्णनांत आहे; पण तो महत्त्वाचा आहे व यासाठीं तशी तुलना करणें अवश्य आहे.

यात्राकांडाचे प्रारंभीं रामायणाचे उत्पत्तीची कथा आहे. यांत वाल्मीकिनारदांचा संवाद न देतां एकदम क्रौंचवधाची कथा सांगितली आहे. ही कथा दोन ग्रंथांत बहुतेक शब्दशः सारखी आहे. ब्रह्मदेवांची वाल्मीकींना झालेली आज्ञा सांगतांना पुढील श्लोक या ग्रंथांत वाल्मीकिरामायणाप्रमाणेंच आहेः——

**वृत्तं कथय धीरस्य यथा ते नारदाच्छ्रुतम् ।**

वा. रा. १।२।३२॥ आ. रा. २।१।३४.

" नारदाकडून श्रवण केल्याप्रमाणें बुद्धिप्रेरक रामाचें चरित्र कथन कर. " म्हणजे नारदांशीं वाल्मीकींचा संवाद झाल्याचें येथें सांगितलें नसलें तरी ग्रंथकाराला ती कथा येथें अभिप्रेत आहे, असें म्हणणें भाग आहे. निषादाला उद्देशून महर्षीनीं श्लोकरूप शाप म्हटल्यावर याच वृत्तांत समग्र रामायणाची रचना करण्याचें मनांत आल्याचें ज्या श्लोकांत सांगितलें आहे, तो दोन ग्रंथांत एक आहे. ( वा. रा. १।२।४१, आ. रा. २।१।४३ ) पण या श्लोकांतील महर्षींच्या भावनेविरुद्ध नानाविध वृत्तांत रामायणाची रचना केल्याचें ज्या श्लो-

कांत ध्वनित केलें असून, जो या विसंगततेनिमित्त आमच्या मतें प्रक्षिप्त आहे, तो आनंदरामायणांत थोड्या फेरानें आला आहे. वाल्मीकिरामायणांतील हा श्लोक पुढीलप्रमाणें आहे:——

उदार वृत्तार्थपदैर्मनोरमै-
स्तदाऽस्य रामस्य चकार कीर्तिमान् ।
समाक्षरैः श्लोकशतैर्यशस्विनो
यशस्करं काव्यमुदारदर्शनः ॥ ॥१।२।४३॥

" ( ब्रह्मदेवाची आज्ञा झाल्यावर ) उदारचरितबोधक पदें व सम अक्षरें ज्यांमध्यें आहेत, अशा शेंकडों मनोहर श्लोकांच्या योगानें उदारबुद्धि व कीर्तिमान् वाल्मीकिमुनींनीं यशस्वी रामाची कीर्ति वृद्धिंगत करणारें काव्य निर्माण केलें. " हाच श्लोक आनंदरामायणांत मात्र पुढीलप्रमाणें बदलून घातलेला आहे.

समाक्षरैः श्लोकवरैर्यशस्विनो
मुनिः स काव्यं शतकोटिसंमितम् ॥

म्हणजे तिसऱ्या चरणांत " श्लोकशतैः " ( शेंकडों श्लोकांचे योगानें ) असें पद होतें, त्याचे स्थानीं " श्लोकवरैः " ( सुंदर श्लोकांचे योगानें ) असें पद घातलें आणि पुढील चरण बदलून काव्याची ग्रंथसंख्या शतकोटि असल्याचें सांगितलें. प्रत्येक सर्गाचे समाप्तीला " शतकोटिरामचरित " म्हणून जो उल्लेख असतो, त्याचा उगम अर्थात् या श्लोकांत आहे. वाल्मीकिरामायणाशीं असलेलें वरील सादृश्य पाहिलें असतां कवीचा ' शतकोटि ' हा आवडता शब्द त्यानें येथें ग्रथित केला व पुढेहि योजिला असून, तत्त्वदृष्ट्या याहून त्याला महत्त्व देतां येण्यासारखें नाहीं, हें उघड आहे.

रामचरिताला प्रारंभ या ग्रंथांत दशरथकौसल्येचे विवाहापासून झाला आहे. ही कथा विस्तृत असून सर्व नवी आहे. अहल्या शिला होऊन पडली होती, तिचा उद्धार रामानें केल्याचें यांत वर्णन आहे. सीताविवाहाची कथा स्वयंवर म्हणून यांत सांगितली असून विस्तृत आहे. स्वयंवराकरितां अनेक राजे आले, त्यांबरोबर रावण आला असून धनुष्य सज्ज करीत असतां तें त्याचे उरावर पडल्याचें सांगितलें आहे. स्वयंवराची योजना होऊन गेल्यावर जनकाची विश्वा-

मित्रांशीं गांठ पडून सीतेचा रामाशीं विवाह करण्याचा त्याचा निश्चय झाला व पित्यानें केलेला पण रामाकडून पुरा होऊन तो आपल्याला पति मिळावा, म्हणून सीतेनें चवदा वर्षे वनवासाचा नवस केल्याचें यांत वर्णन केलें असून सीतेच्या नवसाचे निमित्तानें कर्त्यानें ही पुढील वनवासाची योजनाच केली आहे. स्वयंवरकथनाचे निमित्तानें यांत जनकाचे मुखानें सीतेच्या उत्पत्तीची एक अद्भुत कथा सांगण्यांत आली आहे. यांतील विवाहसमारंभ पांच दिवस चालला असून सर्व सोहळ्यांचें यथास्थित वर्णन केलेलें आहे. पुढें दिवाळसणानिमित्त सर्व मंडळी जनकाकडे आली असून, स्वयंवराचे वेळीं निराश होऊन परत गेलेल्या राजांनीं या प्रसंगीं त्यांजवर स्वारी केल्याचें यांत सांगितलें आहे. या युद्धांत भरत मूर्च्छित झाला असतां जवळ असलेल्या मुद्गलऋषींचे आश्रमांतून रामानें संजीवनी आणवून त्याला सावध केला आहे. या निमित्तानें मुद्गल व दशरथ यांची भेट होऊन मुनींनीं राजाला रामाचें खरें स्वरूप सांगितलें आहे. दशरथानें रामाला यौवराज्याभिषेक करण्याचें ठरविलें, त्या वेळीं पौरजनपदांची संमति घेतल्याचें यांत सांगितलेलें नाहीं. वनवासाला प्रारंभ माघ शु. १५ ला झाला आहे व प्रत्यागमन माघ शु. ४ ला झालें आहे. रामाचा मुक्काम दंडकारण्यांत ९ वर्षें व पंचवटींत ३॥ वर्षें सांगितला आहे. खरादिकांचें निवासस्थान त्र्यंबक म्हटलें आहे. सीतेच्या अपहारानंतर पार्वती सीतेच्या रूपानें रामाकडे आली व तिचें खरें स्वरूप ओळखून रामानें तिला वंदन केलें आहे. रामबाणानें वालि विद्ध होऊन पडला असतां त्यानें आपली पत्नी तारा हिला सुग्रीवाशीं रत होण्याची स्वतां आज्ञा केली आहे. सेतुबंधाचे वेळीं शिला समुद्रावर तरूं लागल्या व राम हीं अक्षरें दोन शिलांवर लिहूं लागल्यावर त्या एकमेकांस चिकटून राहूं लागल्या असें वर्णन आहे. सेतुबंधाचे निमित्तानें रामेश्वराचे स्थापनेची कथा आली आहे. रावणाशीं युद्ध झालें त्या वेळीं ऐरावण, मैरावण * व त्यांची पत्नी यासंबंधाची प्रसिद्ध दंतकथा यांत साकल्यानें

* लोकांमध्यें यांचीं नांवें अहिरावण व महिरावण अशीं प्रसिद्ध आहेत. आनंदरामायणांतील नांवें वरीलप्रमाणें आहेत. रावण आपल्या दूतांना त्यांजकडे जाण्याची आज्ञा करितांना सांगतोः-- ( पहा पृ. ४१५ )

आली आहे. इंद्रजिताची स्त्री सुलोचना हिजविषयींची प्रसिद्ध कथा यांत आहे. परत येते वेळीं रामानें धनुष्याचे अग्राचा प्रहार करून शंभर काठ्या सेतु तोडून टाकिला आहे. रामानें केलेला सीतेचा त्याग व पुन: स्वीकार या विषयींची कथा अगदीं अपूर्व असून तिचेविषयीं माहिती वरील संक्षेपांत आली आहे.

## आनंदरामायणाचा विशेष–भविष्यकल्पना

आनंदरामायणाचा वाल्मीकिरामायणाशीं तुलना करण्यासारखा कथाभाग फार थोडा आहे व तेवढ्यांतहि दोन ग्रंथांची एकवाक्यता नाहीं, हें वर दाखविलें आहे. ही तुलना करितांना आनंदरामायणाचा जो कांहीं विशेष अनुभवाला येतो तो त्यांतील कथानकाची अद्‌भुतता हा होय; व अवशिष्ट भागांतहि तो सर्वत्र व्यापून राहिला आहे. अथपासून इतिपर्यंत सर्व कथानक भविष्यकालीं होणारें म्हणून सांगितलें आहे. इतकेंच नव्हे तर मध्यंतरीं आलेल्या उपकथांमध्येंहि भविष्यज्ञानाचा कांहीं तरी संबंध सांगितलेला आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर या ग्रंथाला “ आनंदरामायण ” असें नांव देण्यापेक्षां कवीनें “ भविष्यरामायण ” असें नांव दिलें असतें तर उचित झालें असतें असें म्हणतां येईल. उत्तरकांडाचे प्रारंभीं दशरथकौसल्या यांचे विवाहाचें वर्णन करितांना रावणानें त्याला विघ्न आणिल्याचें सांगितलें आहे व त्यांना होणाऱ्या पुत्रापासून आपल्याला मृत्यु येणार असें त्याला ब्रह्मदेवाकडून कळलें, असें त्याला कारण दिलें आहे. या वेळीं ब्रह्मदेवाला रावणाचा “ आपणाला मृत्यु कोणापासून येईल ? ” असा प्रश्न दिला आहे. आणि त्यांच्या विवाहाला विघ्न करून आपला मृत्यु टाळण्याचा प्रयत्न करणारा रावण पुढें तीं दोघें त्याच्या हातीं सांपडलीं असतां ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून सोडून देत आहे. बरें, पुढील भविष्य इतकें अचुक जाणणारा ब्रह्मदेव रावणादिकांपासून पीडा होऊन भूमीला भार झाला असतां विष्णूला अवतार घेण्याविषयीं प््रार्थना करण्या-

---

गच्छध्वं त्वरितं दूताः पाताले तौ महाबलौ ।
ऐरावणो महादैत्यस्तथा मैरावणो महान् ॥१।२०।७३॥

“ हे दूत हो ! पातालामध्यें महापराक्रमी असे ऐरावण व मैरावण नांवाचे महादैत्य आहेत, त्यांजकडे तुम्ही त्वरित जा. ”

करितां गेलाच आहे. जनकानें सांगितलेल्या सीतेच्या वृत्तांतांत, दशरथ व मुद्गल मुनि यांचे संवादांतहि भविष्यज्ञानाचा चमत्कार आहे. स्वतां वाल्मीकींनीं रामाशीं त्यांची भेट झाली असतां रामाचें भावीचरित्र आपण पूर्वी रचिल्याचें सांगितलें आहे. (७।१३।१०२) व तेथें 'शतकोटि' हा कवीचा आवडता शब्द योजिलेला आहे. रामायणरचनेचा इतिहास यात्राकांडाचे प्रारंभीं दिला असल्याचें पूर्वी सांगितलें आहे; व यांतहि भविष्यज्ञानाचें सामर्थ्य प्रकट करण्यास तो विसरला नाहीं. पण भविष्यज्ञानाचें वर्णन करण्याचे भरांत कवीनें परस्परविरुद्ध विधानें करून वस्तुस्थिति मात्र व्यक्त करून ठेविली आहे. रामायणाविषयीं माहिती देतांना यात्राकांडांत सांगितलें आहे कीं, "वाल्मीकींनीं शतकोटि रामायण ग्रथित केल्यावर देवदानवादि सर्व लोक तें आपण नेणार म्हणून भांडूं लागले असतां विष्णूनें त्या काव्याचे तीन भाग करून सर्वांना वांटून दिले; या वेळीं भारतवर्षाचे वांटयास आलेल्या रामायण काव्यावरून पुढें व्यासमुनि अठरा पुराणें व महाभारत रचील; ऋर्षिकडून रामायणाचा हा भाग विध्वस्त झाला असतां व्यास पुनः सात कांडांचा व चोवीस हजार श्लोकांचा ग्रंथ निर्माण करून त्याचें रक्षण करील." (२।२) ही माहिती शंकरपार्वती याच्या संवादांत आली आहे. अर्थात् शतकोटि रामायणाचें सार सांगणारा हा ग्रंथ त्या वेळीं झालेला नव्हता. म्हणजे आधीं शतकोटि रामायणाची रचना, पुढें रामचरित्र, नंतर शंकरपार्वतींचा प्रस्तुतचा संवाद, आणि यानंतर रामायणावर व्यासांनीं केलेला सारभूत सप्तकांडात्मक ग्रंथ, असा हा क्रम आहे. रामायण ग्रंथ शतकोटि—अर्थात् विशाल—म्हणून त्याचें आकलन करितां यावें यासाठीं व्यास त्याचा संक्षेप करील असें येथें भविष्य वर्तविलें आहे; तर स्वतां शंकर हें भविष्य वर्तवितांना आपण रामायणाचें सार सांगतों म्हणतात. तेव्हां हें सार असतांना पुढें व्यासांनीं खटाटोप कां करावा ? यात्राकांडांतील कथेचा उपक्रम करितांना शतकोटि रामायणाचें हें सार पुढें रामदास विष्णुदासाला सांगेल असें म्हटलें आहे. (२।२।७६) आणि पुढील सर्व ग्रंथ यांच्या संवादांत सांगितला आहे. अर्थात् या वेळीं हा पुढील ग्रंथ व्हावयाचा होता, हें उघड आहे; आणि रामाच्या दरबारांत कुशलवांनीं गायिलेल्या रामायणांत या संवादांतील जन्म-

कांडापर्यंत ग्रंथ त्यांनीं म्हटल्याचें स्पष्ट लिहिलें आहे. रामायणाचे भाग व्यास करितील, वगैरे भविष्य रामापुढें वाल्मीकींनीं सांगितल्याचें यांत वर्णन करितांना तर स्वतां त्यांनीं "पूर्वीं व्यासांनीं शतकोटि रामायणाचे विभाग केले," (७।१३।१०७) असें तेथेंच विधान केलें आहे. सारकांड हें वाल्मीकिरामायणाचें सार म्हणून सांगितलें आहे (२।२।७१) व पुढील ग्रंथहि त्याचेंच सार म्हटला आहे! याचा मेळ कसा घालावयाचा? सर्व ग्रंथ सार म्हणतां येईल, पण त्यांतील एक भाग सर्व ग्रंथाचें सार कसा म्हणावयाचा? रामायण रचनेची कथा सांगतांना क्रौंचवधाचा वगैरे सर्व इतिहास दिला आहे व तो सर्व वाल्मीकिरामायणाशीं बहुतेक अक्षरशः जुळत आहे, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. नारदांशीं वाल्मीकींचा झालेला संवाद कवीनें गाळला आहे. तथापि त्याचा उल्लेख कवीची दृष्टि चुकवून वाल्मीकिरामायणाचा अनुवाद करितांना राहून गेला आहे व त्याबरोबर ब्रह्मदेवाची वाल्मीकींला जी आज्ञा झाली आहे तींत वाल्मीकिरामायणांतील एक श्लोक (१।२।३३) जशाचा तसा (आ. रा. २।१।१३५) आला आहे व त्यांत "रामाचें झालेलें चरित्र" असे स्पष्ट शब्द आहेत. मग झालेलें चरित्र सांगितल्यास तें भविष्य कसें म्हणतां येईल?

रामायणरचनेच्या इतिहासांत शतकोटि रामायणापासून व्यास पुढें अठरा पुराणें निर्माण करतील असें भविष्य केलें असल्याचें वर सांगितलें आहे. शंकर-पार्वतीच्या संवादांत हें भविष्य आलें आहे. (२।२) रामाचें प्रत्यक्ष चरित्र झाल्यावरचा हा संवाद आहे, हें उपक्रमावरून दिसत आहे. वाल्मीकींनीं रामाची गांठ पडली असतां रामायणाविषयीं जी माहिती त्याला सांगितली आहे, तींत तर रामायणावरून अठरा पुराणें व्यासांनीं केल्याचें सांगितलें आहे. (७।१३।९५; अष्टादशपुराणानि तथोपपुराणानि च कृतानि) रामायणाची रचना वाल्मीकींनीं रामजन्मापूर्वीं आधीं केल्याची कल्पना गृहीत धरिली तरी राम व वाल्मीकि यांची भेट झाल्यावेळीं पुराणांची रचना होऊन गेल्याचें यावरून स्पष्ट होत आहे आणि राम दिवंगत झाल्यावर झालेल्या शंकरपार्वतींच्या संवादांत पुराणाची रचना पुढें होणार असल्याचें भविष्य सांगितलें आहे. यांची संगति लावण्यास पुढें कोण वाल्मीकि व्हावयाचे आहेत, हें कळत नाहीं.

सीतात्यागाची कथा [ ५।३ ] पुढें आली असून रामानें यात्रा केल्या त्यांचें वर्णन पूर्वीं आलें आहे. [ २।५-९ ] यात्रेच्या वर्णनाचे प्रसंगानें सीता जेथें पुढें भूमिप्रवेश करणार त्या स्थानीं रामानें तीर्थ निर्माण केल्याचें सांगितलें आहे. [ २।६।१२६ ] म्हणजे कवीबरोबर चरित्रनायकाचें भविष्य जाणण्याचें सामर्थ्य प्रकट केलें आहे; आणि इकडे तोच राम, एखाद्या प्रसंगीं काय करावें असा विचार पडला असतां वाल्मीकींना बोलावून, त्यांनीं लिहिलेल्या स्वतांच्या चरित्रांत या वेळीं आपण काय केल्याचें सांगितलें आहे त्याचा शोध करीत असल्याचा दाखविला आहे. [ ७।१३ ] तेव्हां हें प्रदर्शन कवीच्या सामर्थ्याचें का रामाच्या सामर्थ्याचें समजावयाचें हें कळत नाहीं !

भविष्यकल्पनेच्या या भरांत उत्पन्न होणारी विसंगतता कवीच्याहि लक्षांत आली नाहीं असें नाहीं. शंकरपार्वतीच्या संवादांत त्यानें पार्वतीच्या तोंडीं एक प्रश्न घालून शंकरांकडून त्याचें उत्तर वदविलें आहे. पार्वती रामायण साग्र ऐकल्यावर शंकरांना विचारिते, “ हे देवा, ज्या वेळीं वाल्मीकींनीं रामायण केलें त्या वेळीं ज्या रामदासविष्णुदासांचा आपण संवाद सांगितला ते कोठें होते ? ” [ ९।९।७४ ] यावर शंकरांनीं “ रामाचें चरित्र ज्याप्रमाणें वाल्मीकींनीं पूर्वीं लिहिलें त्याप्रमाणें हा संवादहि त्यांनीं पूर्वीं लिहिला ” असें उत्तर देऊन तिचें समाधान केलें आहे. शंकरांनीं दिलेलें उत्तर ऐकून तिचें समाधान झालें असें तेथें लिहिलेलें नाहीं. पण त्यावर तिनें प्रश्न विचारिला नाहीं, त्यावरून तसें मानणें भाग आहे. वाल्मीकींनीं रामजन्मापूर्वीं रामायणाची रचना केली ही कवीची मूळ कल्पना असून तिच्या दृढतेसाठीं रामदासविष्णुदास यांच्या भावी संवादाची त्यानें योजना केली आणि कोणींहि त्याविषयीं शंका घेऊं नये म्हणून शंकरपार्वतीच्या संवादांत त्यावर विवरण करून ठेविलें आहे. पण यामुळें “ गंडस्योपरि पिटकः संवृत्तः ” [ गळवावर पुटकुळी ] या न्यायानें त्याची कल्पना चिघळत मात्र गेली आहे. ग्रंथाचा उपक्रम करितांना शंकरांनीं पार्वतीला रामाचें चरित्र झालेलें म्हणूनच सांगण्यास सुरवात केली आहे व प्रथमकांडाची समाप्ति करितांना रामानें अकरा हजार वर्षें राज्य केल्याचें सांगितलें आहे. अर्थात् भविष्यकल्पनेची बाधा कवीला येथपर्यंत झालेली नाहीं. पुढील

कांडाला प्रारंभ करितांना भविष्याची कल्पना कवीला आली व तीस अनुसरून रामदासविष्णुदासांच्या संवादाची योजना करून वरीलप्रमाणें त्यानें ग्रंथाचा उपसंहार केला आहे. रामदासविष्णुदासांचा हा संवाद शंकरपार्वती यांच्या संवादांतील अंगभूत आहे व यामुळें रामाचें झालेलें चरित्र म्हणून सांगण्याला शंकर प्रारंभ करितात व रामाचे राहिलेलें चरित्र सांगतांना मात्र ते भावी म्हणून सांगतात, अशी अनवस्था त्यांच्या भाषणांत उत्पन्न होत आहे. रामदास व विष्णुदास यांचा संवाद मात्र भावी, असें फार तर यात्राकांडांतील उपक्रमावरून म्हणतां आलें असतें; पण रामाचें सर्व चरित्र त्यांचे संवादरूपानें वाल्मीकींनीं त्या दोघांच्या व रामाच्या पूर्वीं लिहून ठेविलें असें कवीला दाखवावयाचें होतें व यासाठीं त्यानें पार्वतीच्या तोंडून शंका वदवून त्याची स्पष्ट नोंद केली आहे; आणि वाल्मीकींचें भविष्यज्ञानाचें सामर्थ्य प्रकट करितांना विवरण दिलें नसतें तर रामचरित्र होऊन गेलेलें व संवाद मात्र भावी असें झालें असतें; आणि मग त्या व्यक्तीला तादृश्य महत्त्व नसल्यामुळें त्यांत स्वारस्य राहिलें नसतें; व या दृष्टीनें कवीनें ही योजना केली असावी. पण कांहीं असलें तरी हें अनुमान आहे व कवीचे ठायीं ही दूरदृष्टि कल्पावी तर वरील अनवस्था त्याच्या लक्षांत आली नाहीं, यामुळें तिजवर विरजण पडलें आहे.

वाल्मीकींच्या प्रसिद्ध सप्तकांडात्मक रामायणाशीं प्रस्तुत ग्रंथाचा कित्येक स्थलीं विरोध येतो व हा आक्षेप आपल्या ग्रंथावर येणें संभवनीय आहे असें पाहून कवीनें त्याचें निरसन करण्याचा प्रयत्न केला आहे. रामायणसमाप्तीचे वेळीं विष्णुदासानें "आपण पूर्वीं कोणा ऋषीचे मुखांतून ऐकलेलें रामचरित्र प्रस्तुतच्या रामचरित्राहून बरेंच भिन्न आहे." (९।७।२७) असें सांगून, असा भेद असण्याचें कारण काय, असा रामदासाला प्रश्न केला आहे. यावर रामदासानें "वाल्मीकींनीं अनेक रामायणें केलीं असून कल्पभेदानुरूप तीं भिन्न आहेत" असें उत्तर दिलें आहे. पौराणिक ग्रंथांवरील टीकांमधून कोठें असली शंका उपस्थित झाली असतां कल्पभेदाची कल्पना हें टीकाकाराचें समाधान करण्याचें किंबहुना प्रतिपक्ष्याला गप बसविण्याचें अमूल्य साधन आहे व त्याचा उपयोग येथें मूळग्रंथांत केलेला आहे. येथें कल्पभेदानुरूप रामचरित्रें भिन्न आहेत

असें कवीनें सुचविलें आहे; अर्थात् प्रस्तुत ग्रंथ एका कोणत्या तरी कल्पांतला असें त्याला मानणें भाग आहे. मग या कल्पांतील विष्णुदासापुढें दुसऱ्या कल्पांतील रामायण येण्याचें कारण काय? भिन्नभिन्न कल्पांतील भिन्नभिन्न रामायणें लिहिणाऱ्या या ग्रंथकारानें कोणत्या कल्पाकरितां कोणतें रामायण याचा विवेक करून ठेवणें संभवनीय नाहीं काय? असा विवेक त्यानें केला असेल तर तो या गुरुमहाराजांनीं स्पष्टपणें कां सांगितला नाहीं? आणि तो सांगितलेला नाहीं तर तो आहे असें मानण्याला प्रमाण काय? बरें, कल्पभेदानुरूप रामायणें भिन्न, तर ते लिहिणारे आदिकवि तितके भिन्न कां नसावे? सारकांडाविषयीं लिहितांना तें वाल्मीकिरामायणाचें सार असल्याचें सांगितलें आहे. (२।२।७१) अर्थात् कोणत्या तरी एका काव्यांतील तो ग्रंथ साररूपानें तेथें पुरा झाला आहे. तेव्हां पुढील ग्रंथ दुसऱ्या कोणत्या तरी कल्पांतील असें मानणें भाग आहे. मग दोन कल्पांतील हे ग्रंथ स्वतां एकत्र केल्याचा दोष कवीचे पदरांत येत नाहीं काय? बरें, 'शतकोटि' असें जरी वाल्मीकींच्या रामायणाविषयीं सांगितलें असलें तरी ही संख्या तितक्या भिन्न ग्रंथांची नसून श्लोकांची आहे, हें उघड आहे; व या शतकोटिरामायणाची विभागणी करितांना श्लोकसंख्येची वांटणीच या ग्रंथांत केलेली आहे, यावरून तें स्पष्ट होतें. अर्थात् हा ग्रंथ एक असल्यामुळें यांतील वर्ण्यविषय राम एक असला पाहिजे. याच ग्रंथावरून झालेल्या कांहीं रामायणांचीं नांवें या ग्रंथांत दिलेलीं आहेत. (८।८) व त्यांतील कथा तर परस्परांशीं विरुद्ध आहेत. एकाच कल्पांतील व एकाच ग्रंथावरून झालेलीं हीं चरित्रें अशा रीतीनें भिन्न कां असावीं?

वनवासाला जाण्यापूर्वीं रामानें सीतेला परत येईपर्यंत तेथें राहण्यास सांगितलें असतां, सीतेनें आपणास बरोबर नेण्याविषयीं आग्रह धरिला; व याकरितां तिनें जीं कारणें सांगितलीं त्यांत ती म्हणते, "शिवाय, पूर्वीं मीं जें रामायण श्रवण केलें त्यांत सीतेवांचून राम दंडकारण्यांत गेलेला नाहीं." (१।६।१२) येथें तर तिनें एकाच रामायणाचा निर्देश केलेला आहे. रामायणें किती मानिलीं तरी तीं रामजन्मापूर्वीं झालीं असें कविकल्पनेला अनुसरून घेतलें पाहिजे; नाहीं तर वाल्मीकींनीं भविष्य केलें असें म्हणतां यावयाचें नाहीं. येथें तर

रामायण एक आहे व यावर रामानें कल्पभेदाचें बिनतोड उत्तर देण्याचा प्रयत्न न करितां तिचे म्हणण्याला मुकाट्यानें संमति दिली, असें याच कवीनें येथें वर्णन केलें आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सीतेनें पूर्वी श्रवण केलेलें हें रामायण त्या वेळीं सर्व लोकांला विदित असणें अवश्य आहे; कारण तें जगांत असल्यावर त्याचें ज्ञान सीतेवांचून इतरांना नव्हतें, असें म्हणतां येणार नाहीं,—निदान कवीनें अशी कोठें अट तरी नमूद करून ठेवण्याचा यत्न केलेला नाहीं;—तर सीतात्यागाचे प्रसंगीं तिजवर तिचें पावित्र्य तिचें चरित्रावरून लोकांला माहीत असणें संभवनीय असतां लोकापवाद कां उठावे ? अश्वमेधाच्या अश्वानिमित्त जो संग्राम झाला त्यापूर्वी कुशलवांनीं रामाचे यज्ञमंडपांत येऊन रामायण गायिल्याचें वर्णन केलेलें आहे. येथें कवीनें जन्मकांडापर्यंत रामायण गाण्याची वाल्मीकींनीं त्यांना आज्ञा केल्याचें सांगून ठेविलें आहे; पण रामायण निर्माण झाल्यावर तें गायन करीत ते वनांतून फिरत असत, (५।४।८१) आणि तेथें तर वरील मर्यादा नाहीं; मग त्याचा प्रसार या वेळीं लोकांत कां नसावा ? वाल्मीकींनीं शतकोटि रामायण रचिल्यावर त्याची विभागणी केल्याचें वर्णन करितांना तर मोठमोठे ऋषि आणि राजे आपण हें काव्य भूलोकांतून अन्यत्र नेऊं देणार नाहीं.' (२।२।७) असें म्हणूं लागले, असें सांगितलें आहे. अर्थात् हा प्रसंग रामापूर्वीचा हें उघड आहे. म्हणजे काव्याची लोकप्रियता व प्रसार त्या पूर्वी मानावयाचा तर सीतेविषयीं लोकापवाद कसे उठावे ? प्रसार मध्यंतरीं थांबला असें म्हणणें संभवनीय नाहीं व कवीनें तशी एकादी शापाची योजना तर केलेली नाहीं. तेव्हां आपण उलटसुलट गोळ्या मारूं तशा वाचकांनींहि माराव्या अशी तर कवीची कल्पना नाहीं ना ? अश्वमेधाचे वेळीं वरील प्रसंगानंतर कुशलवांनीं जन्मकांड म्हणून दाखविल्यावर ते रामाचे पुत्र असल्याचें सर्वांना पटल्याचें कवीनें सांगितलें आहे. आदल्या दिवशीं जन्मकांडापर्यंत त्यांनीं गायिल्यावर अपराण्ह झाल्यामुळें राहिलेला भाग दुसरे दिवशीं म्हणावा असें रामाकडून सुचविण्यांत आल्यावर त्या दिवशींचें काम पुरें झालें; आणि दुसरे दिवशीं जन्मकांड म्हणून झाल्यावर सीतेचा रामानें स्वीकार केला. पण यानंतर राहिलेला कथाभाग त्यांनीं

म्हणणें व त्याविषयीं श्रोत्यांना जिज्ञासा वाटणें संभवनीय असतां त्याविषयीं पुढें कांहीं लिहिलें नाहीं याचें कारण काय? यानंतर पुष्कळ काळ गेल्यावर रामकथा रामाकडील सूतादि श्रवण करीत असल्याचें ( ७।४।५६ ) वर्णन केलें आहे; व इतका रामचरित्राचा प्रसार झाल्यावरहि रामानें एकदां वाल्मीकींना बोलावून एका कामीं आपल्या चरित्रांत त्यांनीं काय भविष्य वर्तवून ठेविलें आहे, असा प्रश्न केला आहे ! ( ७।१३ ) तेव्हां या दोन भागांची संगति कशी लावावयाची?

वाल्मीकींनीं भविष्य म्हणून केलेलें हें रामचरित्र त्यांना नारदांकडून कळल्याचें सांगून कवीनें भविष्यकल्पनेवर स्वतां बोळा फिरविला आहेच. पुढें वाल्मीकींनीं स्वतां रामाकडे आल्यावर या काव्याचा जो इतिहास सांगितला आहे त्यांत रामचरित्र शंकरांकडून ब्रह्मदेवाला व ब्रह्मदेवाकडून नारदाला कळल्याचें वर्णन केलें आहे; (आ. ७।१४।१४९–५० ) अर्थात् चरित्राचे मूळ प्रवर्तक शंकर ठरतात. मग पार्वतीनें प्रश्न केला असतां वाल्मीकींचें नांव पुढें करून त्यांनीं इतका द्राविडी प्राणायाम कां करावा? का येथें कल्पांतर आहे?

वाल्मीकींना ब्रह्मदेवाकडून रामचरित्राचे ज्ञानाविषयीं वर मिळाल्याचें कवीनें सांगितलें आहे; अर्थात् त्यांना भविष्यज्ञान झाल्याचें मानिलें तरी त्याला रामचरित्राची मर्यादा दिलेली आहे हें विसरतां नये. आमचे कवि तर भविष्य वर्तवितांना इतके वाहावले आहेत कीं, त्यांनीं 'अर्जुन कपिध्वज कसा?' याविषयीं विस्तृत भविष्य निरूपण केलें आहे. ( ९।१८ ) या आख्यानांत अर्जुन व मारुती यांचा सेतुबंधाविषयींचा वाद आहे. वादाचा विषय सेतु–रामानें बांधिलेला; आणि वाद करणारी व्यक्ति मारुती–ह्यानें रामाची कामगिरी बजाविलेली; या गोष्टी खऱ्या असल्या तरी प्रस्तुत वादाचा रामचरित्राशीं संबंध कोणता? रामनामोद्यापनाची कथा तर पांडवांविषयीं आहे. ( ८।६ ) तिचा रामचरित्राशीं तर मुळींच संबंध नाहीं; मग या भविष्याला आधार काय? श्रीकृष्णांचे चरित्रांत त्यांनीं अनेक स्त्रियांशीं विवाह केल्याचें वर्णन आहे; आणि रामाचें एकपत्नीव्रत तर प्रसिद्ध आहे. रामराज्यांत सर्व स्त्रिया पतिव्रता असल्याचें वर्णन करणारा ( १।१३।१९७ ) हा कवि, रामाकडे कित्येक स्त्रिया येऊन आपला

स्वीकार करण्यविषयीं प्रार्थना करीत असल्याचें जेव्हां वर्णन करितो, तेव्हां त्याच्या या कवित्वाला आचरटपणाहून दुसरें नांव काय द्यावें हें आम्हांला कळत नाहीं! रामानें तर अशा सर्व स्त्रियांना पुढील जन्मीं त्यांच्या कामना पूर्ण करण्याचें आश्वासन दिल्याचें कवीनें निरूपण केलें आहे; आणि या स्त्रियांची संख्या तर इतकी आहे कीं, श्रीकृष्णचरित्रांत त्यांना जितक्या स्त्रिया सांगितल्या आहेत, त्यांहून ती अधिक भरेल अशी आमची समजूत आहे. अवशिष्ट स्त्रियांची कामना परिपूर्ण करण्याकरितां रामाला आणखी एकादा अवतार घेण्यास लावण्याचा कवीचा हेतु तर यांत नसेल ना?

मनोहरकांडाचे प्रारंभीं (८।१) तर कवीनें वाल्मीकिरामायणांतील बालकांडाचा पहिला सर्ग जशाचा तसा उतरला आहे. यांत नारदांकडून वाल्मीकींना कळलेलें रामचरित्र समग्र आलें आहे. आमच्या कवीनें याला लघुरामायण असें नांव दिलें असून, नारदकथित रामचरित्रावरून वाल्मीकींनीं शतकोटि रामायणाची रचना केली, असें त्यानें पुढें प्रसंगानुसार सांगितलें आहे. (२।१।३४; ७।१४।१५०–१५४) नारदवाल्मीकींचा हा संवाद तर कुशलवांसह सीता वाल्मीकींचे आश्रमांत असतां झाला असल्याचें आम्हीं वाल्मीकिरामायणावरून अन्यत्र दाखविलें आहे; आणि या कवीनें हा एकच सर्ग उतरून घेतला असला तरी नारदांना वाल्मीकींनीं केलेला "सांप्रत या लोकीं गुणवान् पुरुष कोण आहे?" हा प्रश्न त्यांत आला असल्यामुळें तेवढ्यावरून कवीचें भविष्यकल्पनेचें सारें गोपुर ढांसळून पडत आहे!

आतां आनंदरामायणाची एक प्रत मात्र अद्यापि मिळावयाची आहे. त्या प्रतींत रामदासानें विष्णुदासाला "पुढें महाराष्ट्रांत 'महाराष्ट्रीय' नांव धारण करणारा कोणी लेखक होणार असून तो रामायणाविषयीं विवेचन करितांना आनंदरामायणाचें खंडन करण्याचा प्रयत्न करील; परंतु तो त्याचा प्रयत्न मिथ्या असून त्याला संमति देणाराला रामाचा द्वेष करण्याचा दोष लागेल" असें भविष्य सांगितलेलें आहे; पण आतां यापुढें ती प्रत मिळेलच असें म्हणवत नाहीं.

## आनंदरामायणाचा दुसरा विशेष—विसंगतता.

वाल्मीकिरामायण वाचूं लागलें तर त्यांत प्रक्षिप्त भागावांचून अन्यत्र विसंगतता सहसा आढळत नाहीं. किंबहुना प्रक्षिप्त भाग ओळखण्याचें तें एक साधन आहे; पण आनंदरामायणांत विसंगतता शोधण्यापेक्षां सुसंगत वर्णनच शोधावें लागणार आहे! भविष्यकल्पनेविषयीं जें वर निरूपण केलें त्यावरून वाचकांना याविषयीं अंशतः कल्पना येण्यासारखी आहे. तथापि ती त्यांना निश्चितपणें पटावी, यासाठीं ग्रंथांतील इतर उदाहरणें देणें अवश्य आहे.

वनवासाला निघतेवेळीं माघ शुद्ध ५ असून रामाला अठरावें वर्ष लागून कांहीं दिवस झाले होते. [ १।६।७२–७३ ] सीता रामापेक्षां सहा महिन्यांनीं लहान होती. ( १।५।५४ ) विवाहानंतर तिला अकरा वर्षांनीं ऋतु प्राप्त झाला. [१-५।५४ ] अर्थात् विवाहाचे वेळीं दोघांचें वय सहा वर्षांचें होतें; दिवाळसणाचे वेळीं जनकाकडे सर्व मंडळी गेली असतां, परत येतांना त्यांवर स्वयंवरप्रसंगीं हताश झालेल्या राजांनीं स्वारी केल्याचें जें वर्णन केलें आहे त्यांत दशरथानें रामाला उद्देशून केलेल्या भाषणांत राम सहा वर्षांचा असल्याचें स्पष्ट म्हटलें आहे. [ १।४।२६ ] विवाह होऊन अयोध्येंत परत आल्यावर रामादि राजपुत्र आपापल्या स्त्रियांशीं रममाण झाले [ १।३।३८९ ] असें कवीनें वर्णन केलें आहे. त्यांच्या वयाकडे पाहून वाचकांनीं हें कितपत संभवनीय आहे, तें ठरवावें. याहून अधिक काय लिहावयाचें?

वरील विवाहकालाला जुळवून घेण्यासाठीं रामादि पुत्रांचें उपनयन राजानें त्यांचे पांचवे वर्षीं केल्याचें (१।२।२६) आणि सहा महिन्यांत त्यांनीं गुरूपाशीं सांग वेदचतुष्टय, नानाविध कला व शास्त्रें इत्यादिकांचें अध्ययन करून व तीर्थादिकांच्या यात्रा करून परत आल्याचें (१।२।२८--३०) कवीनें वर्णन केलें आहे. उपनयनकालाविषयीं कोणाला शंका येईल तर त्याकरितां त्यानें बलार्थी क्षत्रियांचें उपनयन सहावे वर्षीं करावयाचें (१।२।२७) असा शास्त्रार्थ देऊन पुनः त्याला बाध येऊं नये म्हणून रामाचें उपनयन गर्भाधानापासून सहावे वर्षीं करण्यांत आलें, (१।२।२६) असें त्यावर विवरण केलें आहे! शास्त्रार्थाची चर्चा कवीनें येथें केली यावरूनच त्यांतील अद्भुतता स्वतां त्याला पटली असें स्पष्ट होतें.

कुशाचें उपनयन वाल्मीकींचे आश्रमांतून तो परत अयोध्येला आल्यावर रामानें केल्याचें (५।९) वर्णन केलें आहे. येथेंहि वरील शास्त्रार्थ देऊन तें पांचवे वर्षी केल्याचें सांगितलें आहे. पण वाल्मीकींचे आश्रमीं असतां त्यांनीं सर्व विद्या संपादन केल्याचें लिहिलें आहे. (५।४।७९) तेव्हां त्यांचें अध्ययन उपनयनापूर्वीं झालें असें समजावयाचें काय? अध्ययनाला लागणारा काल व पात्रता यांविषयीं कवीनें येथें विचार तरी केला आहे काय?

## अध्यात्मरामायणाचा अनुवाद.

या कवीनें रामचरित्र वर्णन करितांना कित्येक स्थलीं वाल्मीकिरामायणांतील श्लोक व कल्पना घेतल्या आहेत, हें खरें; तथापि सीतात्यागापर्यंतच रामचरित्र सांगतांना कथासंदर्भाकरितां त्यानें आपल्यापुढें अध्यात्मरामायण ठेविलें होतें, अशी दोन ग्रंथांची तुलना करितां आमची समजूत झाली आहे. रामाच्या बाललीला, राज्यकारभारांत गढून न जातां आधीं रावणवध करण्याविषयीं देवांकडून नारदाचेद्वारां रामाला आलेली सूचना, सीतेनें बरोबर येण्याचा आग्रह धरितेवेळीं पूर्वीं अनेक रामायणें ऐकल्याचा उल्लेख, पौरजनांचें वामदेवानें केलेलें सांत्वन, भरत प्रायोपवेशनार्थ बसला असतां रामानें सुचविल्यावरून वसिष्ठांनीं त्याला केलेलें रामावताराचें हेतुनिरूपण, कैकेयीची रामाशीं क्षमायाचना वगैरे कथाभाग अध्यात्मरामायणांत वाल्मीकिरामायणापेक्षां अधिक असून ते यांतहि आले आहेत. वाल्मीकिरामायणांतील मूळकथा संक्षेपानें देऊन तिला वेदांताची जोड द्यावयाची अशी अध्यात्मरामायणाची पद्धति आहे; व वर दर्शविल्याप्रमाणें अधिक असलेला कथाभाग मात्र त्यांत सविस्तर निरूपिला आहे. हाच प्रकार अध्यात्मरामायणाचा अनुवाद करितांना आनंदरामायणांत केलेला आहे. दशरथ-कौसल्या यांच्या विवाहाची अद्भुत कथा वाल्मीकिरामायणांत किंवा अध्यात्मरामायणांत नाहीं, म्हणून ती कथा या ग्रंथांत विस्तारानें आली आहे; आणि नारदांनीं देवांकरितां येऊन रामाला केलेली सूचना केवळ उल्लेख करून एका श्लोकांत आटोपती घेतली आहे. सारकांडाहून पुढील सर्व कथा प्रायः नवीन आहेत व त्या सर्व सविस्तर सांगितलेल्या आहेत. अध्यात्मरामायणांत सविस्तर सांगितलेली असून आनंदरामायणांतहि त्याप्रमाणें सविस्तर सांगितलेली कथा म्हटली म्हणजे

वाल्मीकींचे पूर्वचरित्राविषयींची होय. कथानिरूपणाचे प्रसंग मात्र दोन ग्रंथांत अगदीं भिन्न आहेत. राम अरण्यांत गेले असतां वाल्मीकींच्या आश्रमीं उतरले व तेथें त्यांनी आपला पूर्ववृत्तांत निवेदन केला, अशी कल्पना अध्यात्मरामायणांत केली आहे; तर सीतेचा स्वीकार केल्यावर रामाकडून बोलावणें झाल्यावरून वाल्मीकि त्याजकडे गेले व त्यांनीं त्याला आपला पूर्ववृत्तांत निवेदन केला, अशी कल्पना आनंदरामायणांत आहे. पण गंमत ही कीं, दोन ग्रंथांतील हा वृत्तांत अगदीं अक्षरशः एक आहे. ( अ. रा. २।६।६५–८७ व आ. रा. ७। १४।१२१–१४९ ). येथें आनंद रामायणांत जी ग्रंथसंख्या अधिक दिसत आहे, ती ज्या मुनींनीं वाल्मीकीला आपल्या पापाचें फल भोगण्यास कुटुंबांत कोणी वाटेकरी आहे काय ? असें विचारण्यासाठीं त्याचे घरीं पाठविलें, त्यांनीं तो विचारून परत येईपर्यंत आपण तेथेंच राहात असल्याविषयीं दिलेलें आश्वासन त्याला पटावें म्हणून घेतलेल्या शपथा अध्यात्मरामायणांत नसतां यांत दिल्या आहेत; व जपाला प्रारंभ करण्यापूर्वीं एक दंड आपल्यापुढें वाल्मीकींनीं ठेविला त्याचा तपोबलानें मोठा पर्वत झाला, इतकी कथा यांत अधिक सांगितली आहे, त्यामुळें वाढली आहे. बाकी सर्व कथानकांत ‘ पुरा ’चे स्थानीं ‘ पुनः ’ ‘ आगतः ’ चे स्थानीं ‘ आगतम् ’ असल्या फेरफारावांचून कसली फिरवाफिरव केलेली नाहीं. एके स्थलीं मात्र अध्यात्मरामायणांत कवीची दृष्टि चुकवून म्हणा अथवा लेखकप्रमादानें म्हणा एक वाक्य अपूर्ण राहिलें आहे किंवा दीर्घ झालें आहे, तें आनंदरामायणानें सुधारून घेतलें आहे. अध्यात्मरामायणांत मूळ श्लोक पुढील-प्रमाणें आहेतः—

> इत्युक्त्वा राम ते नाम व्यत्यस्ताक्षरपूर्वकम् ।
> एकाग्रमनसाऽत्रैव मरेति जप सर्वदा ॥८०॥
> आगच्छामः पुनर्यावत्तावदुक्तं सदा जप ॥
> इत्युक्त्वा प्रययुः सर्वे मुनयो दिव्यदर्शनाः ॥ ८१ ॥

येथें “ इत्युक्त्वा ” याची द्विरावृत्ति होऊन वाक्य फार दीर्घ—दोन श्लोकांचें —झालें आहे, यासाठीं या कवीनें मध्यंतरीं क्रियापदाची योजना करून दोन भिन्न वाक्यें केलीं आहेत. प्रथम श्लोकाच्या ( ८० ) मध्यें त्यानें—

मुनयो मामुपदिशुर्मत्कृपापूर्णमानसाः ॥

अशी एक पंक्ति घालून वाक्याची सुधारणा केली आहे.

येथील आनंदरामायणाचा प्रयत्न मार्मिकपणाचा आहे. तथापि सर्व कथेंत दिसणारें सादृश्य पाहिल्यावर आनंदरामायणानें हा अध्यात्मरामायणाचा अनुवाद केला आणि ही सुधारणा केली, का अध्यात्मरामायणानें आनंदरामायणाचा अनुवाद करितांना लेखकाच्या गाबाळपणानें हें वाक्य अपूर्ण राहिलें, याचा निर्णय कसा करावयाचा ? दोन ग्रंथांत सादृश्य दिसल्यावर आधींचा कोणता व मागाहून कोणता हें ठरविण्यास दुसरीं प्रमाणें पाहणें अवश्य आहे. सादृश्याचा दुसरा प्रसंग सीतेनें दिव्य केलें त्या वेळीं आलेला आहे. अध्यात्मरामायणांतील कथानक वाल्मीकिरामायणाप्रमाणें आहे. आणि त्यामुळें येथें या दोन कथांच्या दृष्टीनें भिन्नता नाहीं. पण आनंदरामायणांतील कथानकाचें एकंदर धोरण या दोन ग्रंथांहून अगदीं वेगळें आहे. तथापि याबिषयींचें आनंदरामायणांतील वर्णन अध्यात्मरामायणाशीं तोलून पाहतां, कथेंतील फेराच्या दृष्टीनें आवश्यक असलेले फेरफार वगळले असतां—अगदीं शब्दशः एक आहे. ( अ. रा. ७।७। १७–४८ व आ. रा. ५।८।९–५८ ) अध्यात्मरामायणांत कुशलवांनीं रामायण गायिल्यावर वाल्मीकि व सीता यांच्या शपथा होऊन सीता गुप्त झाली आहे, तर आनंदरामायणांत रामायणाचे गायनानंतर संग्राम होऊन वरील प्रकार झाला आहे व यानंतर रामानें भूमीची प्रार्थना करून तिला परत मिळविल्याचें सांगितलें आहे. या फेरफाराला अनुसरून आनंदरामायणांत थोडे श्लोक अधिक आहेत. अध्यात्मरामायणाचा अनुवाद करितांना आनंदरामायणानें एके स्थलीं कथेच्या दृष्टीनें आवश्यकता नसूनहि फेरफार केला आहे. शपथ करण्याकरितां यज्ञमंडपांत सीतेनें प्रवेश केला त्या प्रसंगाचें वर्णन अध्यात्मरामायणांत पुढीलप्रमाणें केलें आहे."

कृतांजलिर्बाष्पकंठा सीता यज्ञं विवेश तम् ।
दृष्ट्वा लक्ष्मीमिवायांतीं ब्रह्माणमनुयायिनीम् ॥१६॥
वाल्मीकेः पृष्ठतः सीतां साधुवादो महानभूत् ॥

" सीतेनें त्या वेळीं हात जोडिले होते; तिचा कंठ भरून आला होता, व व अशा स्थितींत तिनें यज्ञमंडपांत प्रवेश केला. ब्रह्मदेवामागून लक्ष्मी जात असावी त्याप्रमाणें वाल्मीकींच्या मागून जातांना ती दिसत होती. तिला पाहतांच सर्वांनीं जयजयकार केला. "

येथें प्रारंभींचा सर्व श्लोक आनंदरामायणानें पुढीलप्रमाणें बदलून दिला आहे.

**कृतांजलिर्मुदा सीता शनैर्यज्ञं विवेश तम् ॥ २४ ॥**
**दृष्ट्वा लक्ष्मीमिवायांतीं श्रीविष्णुमनुयायिनीम् ॥**

येथें कथा एक असली तरी फेरफार महत्त्वाचे व बुद्धया केलेले आहेत. सीतेनें हात जोडल्याचें सांगितलें असलें तरी ती शोकार्त झाल्याचें दाखविलें नसून उलट ती आनंदानें हळूहळू पुढें जात असल्याचें सांगितलें आहे. आनंदरामायणांतील या प्रसंगीं तिच्या पुत्रांनीं रामावर विजय मिळविला होता व पतीनें तिचा त्याग केला असला तरी पुत्रांचें जातकर्म करावयास तो वाल्मीकींचे आश्रमीं गुप्तपणें येऊन गेला असल्यामुळें तिला शोक वाटण्याचें कारण नव्हतें व या कथानकाचे दृष्टीनें येथील फेरफार अयुक्त नव्हता. पुढील पंक्तींत वाल्मीकींचे मागून सीता जात असल्याचें वर्णन असून तेथें ब्रह्मदेवांचे मागून चालणाऱ्या लक्ष्मीची उपमा अध्यात्मरामायणांत दिली आहे. ही पंक्ति अनुवादितांना ब्रह्मदेवाचे मागून चालणाऱ्या लक्ष्मीची उपमा आनंदरामायणाला अयुक्त वाटली व त्यानें तेथें ब्रह्मदेवांचे स्थानीं विष्णूची योजना केली. कारण विष्णु व लक्ष्मी यांचें साहचर्य प्रसिद्ध आहे. पण अध्यात्मरामायणानें ही उपमा मार्मिकपणें व हेतुपूर्वक दिलेली आहे. त्याला येथें वाल्मीकींची वृद्धता व तपस्विता व्यक्त करावयाची होती व त्या दृष्टीनें त्यानें ब्रह्मदेवाची योग्य उपमा वाल्मीकींला दिली. उपमेंतील हा हेतु आनंदरामायणाला कळला नाहीं व यामुळें ती त्याला अयुक्त वाटली. अध्यात्मरामायणकार हा सामान्य कवि नसून मार्मिक होता असें पूर्वीं दाखविलें आहे व याकरितां त्यानें दिलेली उपमा सयुक्तिक असून तिचा अनुवाद आनंदरामायणांत इष्ट तो फेर करून केलेला आहे हें उघड आहे. हा फेरफार आनंदरामायणाच्या गाबाळ रचनेला शोभण्यासारखाहि आहे.

अध्यात्मरामायणाचा अनुवाद आनंदरामायणानें केला असें म्हणण्यास

आणखी प्रमाण दाखवावयाचें तर रामाच्या बाललीला वगैरेंच्या वर्णनांत तें मिळूं शकेल. येथील अनुवाद शब्दशः करितांनाहि आनंदरामायणानें त्यांत फेरफार करून आपली स्वतंत्रता स्थापित करण्याचा खटाटोप केला आहे पुढील अवतरणें पहा:—

| अध्यात्मरामायण. | आनंदरामायण. |
| --- | --- |
| भाले स्वर्णमयाश्वत्थपर्णमुक्ताफलप्रभम् । कंठे रत्नमणिव्रातमध्यद्वीपिनखांचितम् ॥ १।३।४४ ॥ | भाले स्वर्णमयाश्वत्थपर्णान्यातिमहान्ति च ॥१।२।१५॥ कंठे रत्नमणिव्रातमध्यद्वीपिनखांचिताः ॥ |
| कर्णयोः स्वर्णसंपन्नरत्नार्जुनसटालुकम् । | कर्णयोः स्वर्णसंपन्नरत्नार्जुनसटाकुलाः ॥ १६ ॥ |
| सिंजानमणिमंजीरकटिसूत्रांगदैर्वृतम् ॥ ४५ ॥ | सिंजानमणिमंजीरकटिसूत्रांगदैर्वृताः । |
| स्मितवक्त्राल्पदशनामिंद्रनीलमणिप्रभम् । अंगणे रिंगमाणं तं तर्णकाननुसर्वतः ॥ ४६ ॥ | स्मितवक्त्राल्पदशना इंद्रनीलमणिप्रभाः । अंगणे रिंगमाणाश्च संस्कारैः संस्कृताः शुभाः १७ |
| दृष्ट्वा दशरथो राजा कौसल्या मुमुदे तदा । | ते तातं रंजयामासुर्मातृश्चापि विशेषतः ॥ १८ ॥ |
| | कौसल्या नृपतिश्चापि नानावस्त्रैः सुभूषणैः । शोभायामासतुर्बालान् नानाव्याघ्रनखादिभिः ॥ १९ ॥ |
| भोक्ष्यमाणो दशरथो राममोहितचासकृत् ॥ ४७ ॥ आह्वयत्यातिहर्षेण प्रेम्णा नाऽऽयाति लीलया । आनयेति च कौसल्यामाह सा सस्मिता सुतम् ॥४८॥ धावत्यपि न शक्नोति ष्टुं योगिमनोगतिम् ॥ | रामः स पितरं दृष्ट्वा भोजनस्थं त्वरान्वितः । दुद्राव कवलं पात्राद् गृहीत्वा स पुनर्बहिः॥२०॥ कौसल्या बालकं धर्तुं दुद्राव नृपचोदिता । न तस्याः करगश्चासीद्योगिनामप्यगोचरः॥ २१ ॥ |

येथें शब्दांची तुलना करावयाची असल्यामुळें अर्थ साकल्यानें देत नाहीं-राजपुत्रांस घातलेल्या नानाविध अलंकारांचें वर्णन प्रारंभीं असून पुढें रामाची बालपणांतील एक लीला सांगितली आहे. अलंकारांचें वर्णन करितांना अध्यात्म. रामायणानें केवळ रामाचे अलंकारांचें वर्णन केलें आहे, तर आनंदरामायणानें तेच अलंकार सर्व राजपुत्रांच्या अंगावर चढविले आहेत. अध्यात्मरामायणांत केवळ रामाच्या अलंकारांचें वर्णन असलें तरी त्यावरून इतर राजपुत्रांच्या अंगावर तसेच अलंकार होते, असें अनुमानण्यास वास्तविक अडचण नाहीं; तथापि आनंदरामायणानें अनुमानाचे हे श्रमहि वाचकांना ठेविले नाहींत. दशरथ भोजन करीत असतां रामाला बोलावूं लागला व तो येत नाहीं असें पाहून त्यानें कौसल्येला त्याला घेऊन येण्यास सांगितलें आणि त्याप्रमाणें त्याला धरण्याकरितां ती त्याचे मागें धांवत गेली तरी तिला त्याला धरितां आलें नाहीं, असें वर्णन अध्यात्मरामायणानें केलें आहे. हाच प्रसंग आनंदरामायणानें थोडा बदलला आहे. दशरथ भोजन करीत असतां राम त्याच्या पात्रांतील एक घांस उचलून घेऊन पळूं लागला आणि कौसल्या त्याला धरूं लागली तरी तो तिचे हातीं लागला नाहीं अशी कल्पना आनंदरामायणानें केली आहे. वाल्मीकिरामायणांत यांपैकीं एकहि वर्णन मिळावयाचें नाहीं. तथापि येथील दोनहि ग्रंथांतील कल्पना असंभवनीय आहेत असें नाहीं; आणि त्या व्यक्त करून कवींनीं मोठें कौशल्य दाखविलें असेंहि नाहीं. अध्यात्मरामायणाचा अनुवाद आनंदरामायणानें केला एवढें आम्हांला येथें दाखवावयाचें आहे व यासाठीं वर अवतरणें घेऊन तुलना करण्याची खटपट आम्हीं करीत आहों. वर अवतारिलेल्या श्लोकांतील शेवटच्या श्लोकांत रामाला “योगिराजांचे मनाला ज्याचें ज्ञान होतें असा ( योगिमनोगतिम् )” असें विशेषण दिलें आहे; व तेथेंच आनंदरामायणानें “योग्यांनाहि अगोचर ( योगिनामप्यगोचरः )” असें विशेषण योजिलें आहे. या विशेषणांतील कल्पना वेदान्तविषयक ग्रंथांत पुष्कळ आढळते व अध्यात्मरामायण हा ग्रंथ त्यांपैकीं एक असल्यामुळें त्यांत ती शोभून जाते; किंबहुना त्याचा तीवर एक प्रकारचा अधिकार आहे. आनंदरामायण हा वेदान्तविषयक ग्रंथ नसून उलट रामाच्या विलासवर्णनाकरितां त्याचा अवतार आहे

यामुळें येथील कल्पना मूळची त्याची नाहीं, हें निर्विवाद आहे. अलंकाराचें वर्णन करितांना तर त्यानें स्वतांचें वैशिष्ट्य राखण्याकरितां एक श्लोक ( १९ वा ) अधिक घातला आहे. या नवीन श्लोकांत वाघनखादि अलंकारांचा आणखी निर्देश केला आहे; पण वाघनखांचा स्पष्ट निर्देश पूर्वीं (१६) येऊन गेला आहे व इतर अलंकारांचे वर्णनाकरितां तर मागील सर्व श्लोक आहेत, यामुळें द्विरुक्तिदोष मात्र कवीचे पदरांत पडला आहे. हा द्विरुक्तिदोषहि आमच्या कल्पनेला पोषक आहे.

दोन ग्रंथांतील विशिष्ट भागांची तुलना करून कोणीं कोणाचा अनुवाद केला, हें ठरविण्याचा येथवर जो प्रयत्न केला आहे, त्यानें कोणाचें समाधान झालें नसेल, तर त्याचेकरितां आतां एक बिनतोड प्रमाण देऊं, म्हणजे झालें. हें प्रमाण म्हणजे अध्यात्मरामायणाचा आनंदरामायणानें केलेला स्पष्ट उल्लेख होय. वाल्मीकींच्या शतकोटि रामचरितांतील भूलोकाच्या वांटयास आलेल्या भागावरून जे ग्रंथ निर्माण झाले, त्यांच्या नांवांचा एकत्र संग्रह करण्याचा प्रयत्न आनंदरामायणानें केला असून त्यांत प्रथमच पुढील श्लोक आहे:--

रामायणाद्व नाना संति रामायणानि हि ॥८।८।६२॥
शेषभूतं चतुर्विंशत्सहस्रं प्रथमं स्मृतम् ।
तथा च योगवासिष्ठमध्यात्माख्यं तथा स्मृतम् ॥६३॥

" ( शतकोटि ) रामायणावरून अनेक रामायणें झालीं असून त्यांत चोवीस हजार श्लोकांचा ग्रंथ प्रथम होय. तसेंच योगवासिष्ठ व अध्यात्मरामायण हे ग्रंथ ( त्यावरून झाले आहेत. )

आनंदरामायणानें स्वतांच अध्यात्मरामायणाचा आपल्याहून प्राचीन ग्रंथ म्हणून उल्लेख केला असल्यामुळें वरील प्रश्नाचा उलगडा आपोआप झाला आहे. प्राचीन ग्रंथाचा अनुवाद नंतरच्या ग्रंथानें केला, हें कोणालाहि कळण्यासारखें आहे व तेंच आम्हीं अन्य प्रमाणांनीं दाखविलें आहे.

## उपसंहार.

आनंदरामायणाविषयीं येथपर्यंत जें विवेचन केलें आहे, त्यावरून त्याचें स्वरूप कसें आहे, हें वाचकांस कळण्यास अडचण पडेल, असें वाटत नाहीं.

रामचरित्राविषयीं लोकांत प्रचलित असलेल्या बऱ्याच दंतकथा या ग्रंथांत आढळून येतात; किंबहुना अशा कथांचा संग्रह करणें हाच या ग्रंथाचा उद्देश आहे. वाल्मीकींनीं लिहिलेला ग्रंथ राम राज्य करीत असतां व रामाचे अनेक सद्गुण पाहून लोकशिक्षणार्थ लिहिलेला आहे. आनंदरामायण लिहिण्यांत कवीचा असा कोणताच हेतु दिसत नाहीं. रामाचें चरित्र किती पवित्र व थोर आहे, इकडे त्याची दृष्टि नसून चरित्रांत अद्भुतता असणें व तीवर लोकरंजन करणें इकडे कवीची विशेष प्रवृत्ति दिसते. रामाचा मनोनिग्रह केवढा होता, याची त्याला कल्पना नसून पुढील जन्मीं स्वीकार करण्याचीं कित्येक स्त्रियांना रामानें अभिवचनें दिल्याचें कवीनें जें वर्णन केलें आहे, त्यामुळें कृष्णचरित्रांतील अनेक स्त्रियांच्या संबंधाची बरीचशी एकवाक्यता करितां आली, तरी रामचरित्राला त्यानें कलंकच लाविला आहे. सीतात्यागाचें त्यानें जें एक कारण दिलें आहे ( ५।२।३६ ) तें तर अल्लडपणाचें द्योतक आहे. पण अशीं वर्णनें करून कवीला सामान्य तारतम्यहि नसल्याचें मात्र दिसून येतें. कोणत्या कालांतील ग्रंथ आपण लिहीत आहों याची त्याला आठवण नाहीं व यामुळें त्यानें आपली लेखणी जाईल तिकडे सोडून दिली आहे. अध्यात्मरामायणकार धूर्त असल्यामुळें त्यानें आपला ग्रंथ मोठ्या मार्मिकपणें ग्रथित केला असून त्यानें शंका घेण्यास वाव ठेविला नाहीं. त्याला चरित्रलेखनाचे कामीं वाल्मीकिरामायणाचा व आध्यात्मिक विषयांत भागवताचा आधार असतां त्यानें एकाहि ग्रंथाचें नांव घेतलें नाहीं. वाल्मीकिरामायणाचा उल्लेख अपरिहार्य असतांहि चातुर्यानें टाळिला आहे. आनंदरामायणानें भविष्यकल्पनेच्या भरांत सर्व पुराणें शतकोटि रामचरितावरून होणार आहेत, असें लिहून स्वतांचा काल मात्र पुराणांनंतरचा असल्याचें व्यक्त करून ठेविलें आहे. भागवताचा उल्लेख त्यानें स्पष्टपणें केला असून रामायणाचें सार म्हणून भागवतांतील "चतुःश्लोकी भागवत" या नांवानें प्रसिद्ध असलेले चार श्लोक जशाचे तसे उद्धृत केले आहेत. ( २।२ ) श्रीकृष्णाचा उल्लेख तर कित्येक वेळां आला असून महाभारतांतील गीता व सहस्रनाम यांचा उल्लेख ( ८।८।६ ) कवीनें एके स्थलीं केला आहे. अश्वत्थामादि सात चिरंजीवांविषयींचा श्लोक ( ८।८।११८ ) त्यानें दिला

दिला असून तो त्या वेळीं लोकांत प्रचलित असल्याचें सांगत आहे. रामाचे दिग्विजयांत कोंकण, महाराष्ट्र, विजयापुर (विजापूर ?), देवगिरि (७।७।१२८–१३०) यांचीं नांवें आलीं आहेत. महाराष्ट्र हें देशाचें नांव तर खि. श. पू. दोनशेंहून पूर्वींचे कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत आढळत नाहीं, असें डॉ. काणे यांनीं लिहिलें आहे. * रामानें केलेल्या यात्रांमध्यें पांडुरंगाचें दर्शन व चंद्रभागेचें स्नान त्यानें केल्याचें वर्णन केलें आहे. (२।७।७२) अर्थात् येथें पंढरपूर अभिप्रेत आहे. पांडुरंग "युगें अठ्ठावीस विटेवर उभा" असल्याचें नामदेवानें लिहिलें असलें तरी हें दैवत दोन हजार वर्षांहून अधिक प्राचीन नाहीं व म्हणून त्याचा उल्लेख करणारा हा ग्रंथ त्यानंतरचा, यांत शंका नाहीं. एक शूद्र तपश्चर्या करूं लागला म्हणून त्याचा रामानें वध केल्याची प्रसिद्ध दंतकथा यांत आली असून तिचा उपसंहार या ग्रंथांत थोडा वेगळा केला आहे. त्या शूद्रानें रामाला आपल्या वर्णाकरितां मोक्षप्राप्तीचा उपाय विचारला असतां रामानें त्याला रामनामाचा जप करावयाचा उपाय सांगितला आहे. यानंतर त्यानें कलियुगामध्यें लोक मंद बुद्धीचे होणार; व शूद्रांना उदरनिर्वाहाचे व्यवसायामुळें जप करण्याला तादृश अवसर मिळणार नाहीं, तेव्हां इकडे लक्ष देऊन उपाय सांगण्याविषयीं पुनः प्रार्थना केली असतां रामानें त्याला "शूद्रांनीं दुसऱ्याला वंदन करिते वेळीं 'रामराम' ह्मणावें" असा उपाय सुचविला आहे. (७।१०।११४) आणि रामाच्या या उपदेशाप्रमाणें तेव्हांपासून शूद्र वर्णामध्यें दुसऱ्याला वंदन करिते वेळीं 'रामराम' म्हणण्याचा प्रघात पडला असें तेथें सांगितलें आहे. (७।१०।१२१) ही दंतकथा कवीचे वेळीं प्रचलित असलेली त्यानें ग्रथित केली, हें उघड आहे. श्रीसमर्थ रामदास व शिवाजी यांचा या प्रघाताशीं जो संबंध जोडण्यांत येतो व त्याविषयीं जी एक आख्यायिका आहे, त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण त्यांचे पूर्वीं झालेल्या नामदेवाचे एका अभंगांत या प्रघाताचा उल्लेख आला असून तो अभंग फार दिवसांपूर्वीं रा. रा. बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं "केसरींत" प्रसिद्ध केलेला त्या वेळीं वाचल्याची आह्मांला आठवण आहे. तेव्हां वरील आख्यायिकेवरून हा ग्रंथ

---

* विविधज्ञानविस्तार, जानेवारी १९१९, "भारतवर्षाचा प्राचीन भूगोल."

शिवाजीमहाराजांनंतरचा असें म्हणण्याचें कारण नाहीं. मनोहरकांडाच्या सर्गांत वेदांतनिरूपण आलें असून त्यांत भगवद्गीतेंतील कांहीं श्लोक श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितलेले ह्मणून ( भविष्य म्हणून नव्हे ) उद्धृत केले आहेत व यांतच पुढील श्लोक आले आहेत—

**विवेकवैराग्यशमादिषट्कं मुमुक्षुता चेति प्रसिद्धमेतत् ।**
**लक्ष्माणि प्रत्येकमुशत्तमानि प्रोक्तान्यमीषां स्मृतिभूमिकासु॥२४५॥**
**साधनानां चतुष्कं च ह्येषणात्यागपूर्वकम् ।**
**संन्यासश्च गुरोः सेवा श्रवणादित्रयं ततः ॥२४६॥**
**पूर्वोत्तरसमाधी च पुंज एकादशात्मकः ।**

विवेकवैराग्य, शमादिषट्क, मुमुक्षुता, संन्यास, गुरुसेवा, श्रवण, मनन, निदिध्यास व पूर्व आणि उत्तर समाधि असा अकरांचा एक पुंज येथें सांगितला आहे यांतील प्रारंभींच्या चारांना साधनचतुष्टय असें म्हणतात. श्रीमच्छंकराचार्य यांचें ब्रह्मसूत्रावर जें भाष्य आहे त्यांत " अथातो ब्रह्म-जिज्ञासा " या प्रथम सूत्रांतील " अथ " ह्मणजे नंतर या शब्दावर टीका करितांना त्यांनीं पुढीलप्रमाणें निरूपण केलें आहे.

**नित्यानित्यवस्तुविवेकः इहामुत्रार्थभोगविरागः शमदमादिसा-धनसंपत् मुमुक्षुत्वं च तेषु हि सत्सु प्रागपि धर्मजिज्ञासाया ऊर्ध्वं च शक्यते ब्रह्मजिज्ञासितुं ज्ञातुं च न विपर्यये ।**

" नित्य कोणतें व अनित्य कोणतें याचा विवेक, ऐहिक वा पारलौकिक भोगांविषयीं विरक्ति, बाह्य व आंतर इंद्रियांचें दमन वगैरे व मोक्षप्राप्तीची इच्छा हीं प्राप्त झाल्यानंतर ब्रह्मजिज्ञासा अथवा ब्रह्मज्ञान होणें शक्य आहे, अन्यथा शक्य नाहीं. हीं साधनें धर्मजिज्ञासेनंतर प्राप्त झालीं असतां ब्रह्मजिज्ञासा होते असें नसून धर्मजिज्ञासेपूर्वींहि तीं प्राप्त झालीं, तरी ती होते." साधनचतुष्टयाचें हें निरूपण आचार्यांनीं श्रुतींतील आशयावरून केलें असलें तरी तें त्यांच्या परंपरेंतील आहे व त्यांच्या वेदांतावरील इतर स्फुट ग्रंथांतून त्याचा वारंवार उल्लेख केलेला आढळतो. अर्थात् याप्रमाणें त्यांनीं केलेल्या प्रसारानंतर त्यांतील कल्पना प्रस्तुत ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत ग्रथित केली असली पाहिजे. म्हणजे

श्रीशंकराचार्य आठव्या शतकांत झाले त्यापूर्वी या ग्रंथाच्या रचनेचा काल आणितां येत नाहीं.

श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं हा ग्रंथ दोनतीनशें वर्षांपूर्वी झालेला असावा असें अनुमान आपल्या "पंचवटीस्थलनिर्णयांत" दिलें आहे, परंतु तें सयुक्तिक दिसत नाहीं. एकनाथांनीं आपल्या भावार्थरामायणांत आनंदरामायणांतील कित्येक कथा अनुवादिल्या आहेत व यावरून तो ग्रंथ त्यांच्या पूर्वीचा होय यांत शंका नाहीं. अर्थात् त्याचा काल दोनतीनशें वर्षांच्याहि मागें नेला पाहिजे.

ग्रंथ आधुनिक म्हटला म्हणजे त्याचें प्रामाण्य कमी होतें; आणि या कवीनें अद्भुत आणि विसंगत वर्णनें करून त्यांत आणखी भर टाकिली आहे. तथापि वर उल्लेखिलेलें वेदांतनिरूपण व्यवस्थित असून त्यावरून वेदांतविषयक उपनिषदादि ग्रंथांवरील कवीचा व्यासंग व्यक्त होतो. राजनीतीवर एका कांडांत असेंच विस्तृत निरूपण आहे. रामाच्या उपासनेविषयीं या ग्रंथांतील विवेचन विस्तृत असून त्यांत मंत्र, तंत्र, मंडलें वगैरेंविषयीं पुष्कळ माहिती आली आहे, व त्यांचा संग्रह या दृष्टीनें हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. सर्व लोकांला परिचित व प्रिय असलेलें "रामरक्षास्तोत्र" याच ग्रंथांतील असून त्यांत थोडे श्लोक अधिक आहेत. याच रामरक्षास्तोत्रानें अभिमंत्रण करून वाल्मीकींनीं कुशाला विभूति लावल्याचें येथें वर्णन केलें आहे. उपासनेविषयींची येथील माहिती नारद-* पुराणावरून घेतल्याचें तेथें कवीनें केलेल्या उल्लेखावरून दिसतें. कवीची भाषा व वर्णनशैली कित्येक स्थलीं बरी आहे; तथापि सर्वसाधारणपणें सांगावयाचें तर तो सामान्य आहे असेंच म्हणावें लागेल. भाषेंत अशुद्ध प्रयोग बरेच आढळतात. आर्ष ग्रंथांत असले प्रयोग आढळले तरी त्यांना अशुद्ध म्हणतां येत नाहीं. कारण ज्या कालीं ते ग्रंथ झाले त्या कालीं ते शुद्ध म्हणूनच प्रचारांत

* येथें नारदपुराणाचा प्रमाणग्रंथ म्हणून कवीनें उल्लेख केला आहे व रामदास-विष्णुदास यांच्या संवादांत हा भाग आला आहे. यांतील रामचरित्र व हा संवाद दोनहि भावी असें कवि सांगतो आणि त्यानें उल्लेखिलेल्या नारदपुराणांत रामचरित्र झालेलें म्हणून सांगितलेलें आहे, ही गंमत आहे.

असतात व त्याकरितां तेथें ते ग्रथित केलेले असतात. हा ग्रंथ संस्कृत भाषा प्रचारांतून गेल्यानंतरचा असल्यामुळें आर्ष ग्रंथांतील प्रयोगाचें प्रामाण्य त्याला लाभणार नाहीं; आणि यांतील कित्येक अशुद्ध प्रयोग खरोखर आर्ष ग्रंथांतून शोध करूनहि आढळण्यासारखे नाहींत.

## १७ प्राकृत ग्रंथ–भावार्थरामायण.

रामचरित्रावर प्राकृत भाषांतून अनेक ग्रंथ असून ते प्रायः छंदोबद्ध आहेत. मराठींत नाथांचें भावार्थरामायण, मुक्तेश्वरांचें रामायण, श्रीधरांचा रामविजय हे प्रसिद्ध ग्रंथ आहेत. मोरोपंतांनीं तर रामचरित्राचें गायन १०८ प्रकारें केलें आहे. मोरोपंतांचे प्रयत्नांत विविधता असली तरी वाल्मीकींनीं सांगितलेल्या चरित्राबाहेर अधिक वर्णन करण्याकडे त्यांची प्रवृत्ति नाहीं. पण वरील ग्रंथकारांची दृष्टि अशा प्रकारची नाहीं. त्यांनीं रामचरित्रविषयक कथांचा संग्रह करण्याचे प्रयत्न केले आहेत व यामुळें केवळ वाल्मीकिरामायणाचा आधार घेऊन त्यांचा इष्ट हेतु सिद्धीस जाण्यासारखा नव्हता, हें उघड आहे. या सर्वांत भावार्थरामायण हा ग्रंथ मोठा आहे, ग्रंथसंख्या ४०००० आहे. वाल्मीकिरामायणाप्रमाणेंच याचीं सात कांडें आहेत. यांतील कांडांची विभागणी अध्यायांत केलेली आहे. यांत रामायणरचनेची व त्यानिमित्त क्रौंचवधाची प्रसिद्ध कथा न सांगतां अजराजाचा पुत्र दशरथ याची कथा प्रथम सांगून ग्रंथाला प्रारंभ केला आहे. रामचरित्रावर संस्कृत भाषेंत असलेले अनेक ग्रंथ--पुराणें, काव्यें, नाटकें वगैरे या सर्वांचा संग्रह करण्याचा प्रयत्न या ग्रंथांत नाथांनीं केला आहे. यांत योगवासिष्ठांतील रामाचें वैराग्य व वसिष्ठांचा उपदेश, स्कंदपुराणांतील सीतेच्या उत्पत्तीची कथा, सेतुबंधमाहात्म्यांतील कथा, अशा अनेक कथा आल्या असून हनुमन्नाटक, प्रसन्नराघव वगैरे नाटकांतील अवतरणें जेथें तेथें घेतलेलीं आहेत. एकाद्या विषयावर चर्चा करितांना अशा रीतीनें अवतरणें घेण्याचा परिपाठ आहे. परंतु चरित्रासारख्या सामान्य विषयाविषयीं लिहितांना अशा रीतीनें अवतरणें घेण्याचा परिपाठ अन्यत्र कोठें आढळत नसून तो नाथांच्या या ग्रंथांतच आढळतो. शिवाय हा ग्रंथ भाषांतररूप नसून अवतरणेंहि एका ग्रंथांतील क्रमानें आणि सर्व घेतलेलीं आहेत असें नाहीं. वाल्मीकिरामायणांतील अवतरणें कांहीं

कांहीं यांत आहेत; तथापि रामचरित्रावरील मुख्य आणि प्रमाणग्रंथ या दृष्टीनें नाथांनीं त्याकडे पाहिलेलें नाहीं व यामुळें पुष्कळ स्थलीं वाल्मीकींचे ग्रंथाविरुद्ध त्यांनीं चरित्राचें निरूपण केलें आहे. शत्रुघ्न हा लक्ष्मणाचा सहोदर बंधु असतां यांत लौकिक समजुतीला अनुसरून तो भरताचा सहोदर बंधु सांगितलेला आहे. रामजन्म सांगते वेळीं राम एकदम आविर्भूत झाला व कौसल्येच्या विनंतीवरून त्यानें बालरूप धारण केलें, असें यांत वर्णन केलें आहे. अध्ययनसमाप्तीनंतर यांतील राजपुत्रांनीं तीर्थयात्रा केल्या आहेत; यौवराज्याभिषेकाचा विचार निश्चित करण्यापूर्वीं रामानें प्रजाजनांची संमति घेण्याचा यत्न केला आहे. तथापि प्रजाजनांना उलट प्रश्न विचारून त्यांचें हृद्गत कळून घेण्याचें राजाचें जें चातुर्य वाल्मीकिरामायणांत व्यक्त होत आहे, त्याची वार्ताहि या ग्रंथांत मिळत नाहीं. सीतेच्या स्वयंवरांत रावण आल्याचें वर्णन यांत आहे. युद्धकांडांत ऐरावण व मैरावण यांच्या कथा असून पुढें उत्तरकांडांत रामाचे अश्वमेधाचे वेळीं. कुशलवांनीं रामायण गाऊन दाखविलें आहे; आणि अश्वमेधाचा अश्व लवानें धरिल्यामुळें युद्ध झाल्याचें वर्णन करून पुढें वाल्मीकींच्या सांगण्यावरून रामानें सीतेचा स्वीकार केला अशी कथा आहे. ही कथा आनंदरामायणाप्रमाणें आहे. पण कुश व लव हे दोन पुत्र सीतेला एकदम झाल्याचें यांत सांगितलें आहे. अश्वमेधानिमित्त रामसेनेचीं अनेक राजांशीं युद्धें झाल्याची रामाश्वमेधांतील कथा यांत नाहीं. कैकयीनें कळ लाविल्यामुळें रामानें पुनः सीतेचा त्याग केला असतां तिनें दिव्य केलें व भूमि दुभंग होऊन ती गुप्त झाली, अशी कथा यांत आहे; तर आनंदरामायणांत सीतेनें रामाबरोबर स्वर्गगमन केलें आहे. आनंदरामायणांतील, वाल्मीकींनीं आधीं रामचरित्र केलें व तें 'शतकोटि' होतें आणि त्याची शंकरांनीं वाटणी केली, वगैरे कल्पना यांत वारंवार अनुवादिल्या आहेत. वाल्मीकींविषयींची प्रसिद्ध कथा यांत सांगितलेली नसली तरी—

**ऐसें करितां हरिकीर्तन । व्यास जारज पुत्र पावन ॥**
**कोळ्या वाल्मीकाचें जाण । रामायण शिववंद्य ॥१।२२।५६॥**

असें लिहून नाथांनीं तिला मान्यता दिलेली आहे. नारदांनीं वाल्मीकींला उपदेश केल्याचें वृत्त नाथांनीं पुढीलप्रमाणें दिलें आहे—

उफराटें राम ये अक्षरीं । मरा मरा या उत्तरीं ।
नारद वाल्मीकीला उपदेश करी । दों अक्षरीं उद्धरिला ॥३।१।३॥

वाल्मीकिरामायण व इतर रामचरित्रें यांशीं तुलना करून पाहातां नाथांनीं रामविषयक कथांचा संग्रह करण्याकडे दृष्टि ठेविली असल्याचें दिसून येतें. ऐतिहासिक दृष्टया छाननी करण्याचा प्रयत्न त्यांनीं एक दोन स्थलीं केला आहे. श्रावणवधाची कथा सांगतांना नाथ म्हणतात–

होणारासारखी बुद्धि । मांडिली निशि अवस्था पारधी ।
अंधारीं श्रावणातें वधी । मातापिता खांदीं कावडीसी ॥१।१।५६॥
लौकिकाची लोकवार्ता । श्रावणें पितरीं कावडी ठेवितां ।
हे तंव समूळ अबद्ध कथा । तो मातापिता न विसंबे ॥५७॥
अंधारीं अंध मातापिता । झाडीं ठेवी हे मिथ्या वार्ता ।
खांदीं घेवोनि जाता । जीवनार्थ तो जाला ॥ ५८ ॥

येथें दंतकथा अबद्ध असून मूळ संबद्धकथा सांगण्याचा नाथांनीं प्रयत्न केला आहे. अर्थात् अशा रीतीनें दोन कथांचा विवेक करणें त्यांना संमत आहे. वाल्मीकिरामायणांत ही कथा राम वनांत निघून गेल्यावर दशरथाला पूर्वींचें स्मरण होऊन त्यानें ती कौसल्येला सांगितलेली आहे. त्या कथेंत श्रावण मातापित्यांना खांद्यावर घेऊन आल्याचें वर्णन नसून त्यांचा आश्रम तेथून जवळ होता व तेथून श्रावण पाण्याकरितां सरयूवर आला होता, असें वर्णन आहे. राजाचे बाणानें तो विद्ध होऊन पडल्यावर राजा त्याजकडे आला असतां तो म्हणतोः—

पितुस्त्वमेव मे गत्वा शीघ्रमाचक्ष्व राघव ।
न त्वामनुदहेत् क्रुद्धो वनमग्निरिवैधितः ॥२।६३।४४॥
इयमेकपदी राजन् यतो मे पितुराश्रमः ।
तं प्रसादय गत्वा त्वं न त्वा संकुपितः शपेत् ॥४५॥

"हे राघवा, तूंच माझ्या पित्याकडे लवकर निघून जा आणि त्याला हा वृत्तांत कळव. वृद्धिंगत झालेला अग्नि ज्याप्रमाणें वन दग्ध करितो त्याप्रमाणें तो क्रुद्ध होऊन तुला दग्ध न करो ! हे राजा, ही पाऊलवाट आहे व ती

थेट पित्याचे आश्रमापर्यंत आहे. तेव्हां तूं आतां या वाटेनें जा व ज्या रीतीनें तो क्रुद्ध होऊन तुला शाप देणार नाहीं अशा रीतीनें तूं त्याला प्रसन्न करून घे."

श्रावणाच्या तोंडच्या या शब्दांवरून त्याला राजाचा बाण लागला त्या वेळीं त्याची मातापिता तेथें नसून दूर होती, हें उघड आहे. येथें नाथांनीं तीं तेथेंच होतीं अशी जी माहिती दिली आहे व ती दूर असल्याची कथा मिथ्या असल्याचें जें पुनःपुनः सांगितलें आहे त्याला आधार काय ? रामचरित्राचे कामीं वाल्मीकींइतकें प्रामाण्य कोणाला देतां येणार नाहीं आणि नाथांनीं तर वाल्मीकींनीं सांगितलेल्या कथेचा अनुवाद करून ती अबद्ध ठरविली आहे, तेव्हां या कामीं प्रमाणभूत ग्रंथ त्यांना कोणता मिळाला ?

दोन भिन्न ग्रंथांत एकाच चरित्रनायकाविषयीं भिन्न कथा मिळाल्यास त्या भिन्नभिन्न कल्पांतील मानावयाचा प्रघात असून, विरोधाची संगति लावण्याचे कामीं हा प्रघात म्हणजे टीकाकारांच्या हातीं असलेलें अमोघ शस्त्र आहे. याचा उपयोग नाथांनीं अंगदरावणांचे संवादांत केला आहे. रामाकडून दूत म्हणून गेलेला अंगद रावणाला म्हणतोः—

**बहुत ऐकिले रावण । त्यांमाजील तूं कोण ॥६।७।७॥**
**विविध रावणांचें लक्षण । वदे विचक्षण अंगद ॥**
**एका रावणाची थोरी । सहस्रार्जुनाशीं युद्ध करीं ।**
**तेणें कवळोनि वाम करीं । क्षणामाझारीं धरियेला ॥७९॥**
**दुजा रावण उन्माद बळी । सवेग रिघोनि सुतळीं ।**
**रणीं जिणावया बळी । क्रोधानळीं चालिला ॥१००॥**
**तिज्या रावणाची ख्याती । श्वेतद्वीपगमनानुवृत्ती ॥**
**सांगितली सर्व ही तुजप्रती । यथानिगुतीं लंकेश ॥८।३१॥**
**चवथा रावण आतुर्बळी । ध्यानस्थ देखोनि वाली ।**
**त्यासी धरितां कपटमेळीं । तेणें काखेतळीं दडपिला ॥३३॥**

वाल्मीकिरामायणाचे उत्तरकांडांत या चारहि कथा आल्या आहेत. हा सर्व भाग प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं पूर्वीं दाखविलें आहेच. यांतील दुसरी व तिसरी

कथा ज्या सर्गांत आली आहे त्यांवर तर कतकाची टीका नाहीं. पण तेथें या सर्व कथा रामाकडून वध पावलेल्या एकाच रावणाविषयींच्या आहेत. तेव्हां नाथ म्हणतात याला प्रमाण काय? यांतील चौथा रावण तर भिन्न नसल्याचें पुढील ग्रंथावरून स्पष्ट दिसतें. अंगदाचे भाषणाचा उपसंहार पहा:—

**अंगद म्हणे त्यांतील तूं कोण । हें पुसावें न लागे जाण ।**
**माझे लातांचे वण । तुझे मुखीं संपूर्ण दिसती ॥६।८।४३॥**
**माझ्या मुताची बाळधार । तुझे मुखीं पडतां निरंतर ॥**
**तेहि चिन्हें उभय अधर । घांसली कोर दिसतसे ॥४४॥**

म्हणजे नाथांनीं केलेल्या पुढील वर्णनावरून पूर्वीं प्रतिपादिलेल्या चार रावणांपैकीं एक रावण आपोआप गळून पडला आहे.

रामचरित्राची रचना करिते वेळीं सत्यासत्याची चिकित्सा करण्याचा नाथांचा हेतु दिसतो, परंतु त्या कामीं आवश्यक असलेले प्रयत्न त्यांनीं केलेले दिसत नाहींत. किष्किंधाकांडांतील सुग्रीवाचे तोंडचें भूगोलवर्णन कसें विसंगत आहे हें आम्हीं मागें दाखविलें आहे. परंतु तेथील विसंगततेबद्दल नाथांना संशयहि आल्याचें दिसत नाहीं. सुग्रीवानें पूर्व दिशेचें जें वर्णन केलें आहे त्यांत कृष्ण, बलराम, सुभद्रा यांचे उल्लेख आहेत. (४।१२।५०) पश्चिम दिशेकडे कुरुक्षेत्र, नेपाळ, काश्मीर, हीं स्थळें सांगितलीं आहेत. (४।१२।६३) उत्तरेकडे तर सरयू, तमसा या नद्यांचे प्रवाहांतहि सुग्रीवानें शोध करण्यास वानरांना सांगितलें आहे. (४।१२।७९,८०) येथील विसंगतता तर उघड आहे व ज्यांना त्याविषयीं शंका वाटेल त्यांनीं त्या भूगोलवर्णनावर प्रक्षिप्त भागांत केलेलें विवेचन पहावें म्हणजे त्यांची शंका निरसन होईल.

रामचरित्रविषयक कथांचा एकच संग्रह करण्याचा नाथांचा एकंदरींत हा ग्रंथ लिहिण्यांत हेतु दिसतो व या दृष्टीनें पाहूं गेलें तर त्यांच्या ग्रंथांत सत्यासत्याची छाननी करून निर्भेळ सत्य कथा सांगितलेली असेल अशी अपेक्षा करणेंच अयुक्त होईल. अध्यात्मरामायणाविषयीं त्यांनीं जी माहिती सांगितली आहे, तीहि या ग्रंथाचें परीक्षण करून त्यांनीं दिलेली असावी असें म्हणवत नाहीं व यासाठीं त्यांना परंपरेनें असलेली माहिती त्यांनीं ग्रथित केली असें

आम्हीं मागें लिहिलें आहे. नाथांच्या या माहितीवरून अध्यात्मरामायण हा ग्रंथ त्यांना प्रमाण म्हणून मान्य नव्हता हें उघड आहे. अध्यात्मरामायणाचा आनंद-रामायणांत आदरपूर्वक उल्लेख आहे व याकरितां त्याचें प्रामाण्य नाथांना मान्य नसावें, हें युक्त दिसतें; परंतु नाथांनीं तर आनंदरामायणांतील अनेक कथांचा आपल्या ग्रंथांत संग्रह केला आहे. तेव्हां आमचें वरील अनुमान अन्यथा नव्हे हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. बाकी, नाथांची वर्णनशैली गंभीर व मोहक आहे आणि त्यांत त्यांचा आवडता विषय - वेदान्त—त्यांनीं मोठ्या खुबीनें गोंविला आहे यांत शंका नाहीं.

## १८ तुलसी रामायण—रामचरितमानस.

नाथांचें भावार्थरामायण ज्या कालीं झालें त्याच कालांत ( शके १४९७ ) उत्तर हिंदुस्तानांतील प्रसिद्ध संतकवि तुलसीदास यांनीं हिंदी भाषेंत रामायणावर " रामचरितमानस " हा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ हिंदी भाषा बोलणाऱ्या समाजांत फार प्रचलित आहे, आमचेकडे मराठी भाषेंत ज्याप्रमाणें गुरुचरित्राचा प्रसार व पाठ दांडगा आहे, त्याप्रमाणें उत्तरेकडे तुलसीरामायणाचा प्रसार आहे. तुलसीरामायणाच्या या हिंदी ग्रंथाचें मराठी रूपांतर श्रीमंत यादव शंकर जामदार यांनीं शके १८३५ मध्यें प्रकाशित करून मराठी वाङ्मयांत अपूर्व भर घातली आहे. नाथांचे भावार्थरामायणांत ज्याप्रमाणें संस्कृत भाषेंतील कित्येक रामचरित्रावरील ग्रंथांचें अद्भुत संमेलन पहावयास सांपडतें त्याप्रमाणेंच या ग्रंथाची स्थिति आहे. तथापि काव्यदृष्ट्या हा ग्रंथ स्वतंत्र आहे. यांत वाल्मीकिरामायण व अध्यात्मरामायण या ग्रंथांचा आधार घेतला असून कित्येक कल्पना प्रसन्नराघव व हनुमन्नाटक यांवरून घेतल्या आहेत. कथेचा क्रम कोणत्या तरी एका ग्रंथाप्रमाणें ठेवून मध्यंतरींचे प्रसंग इतर ग्रंथांचे आधारें रंगवावयाचे असा सामान्यपणें कवींचा सांप्रदाय असतो; पण तुलसीदासांचा सांप्रदाय स्वतंत्र आहे. त्यांच्या ग्रंथांत वाल्मीकिरामायणाप्रमाणें सात कांडें आहेत; तथापि रामाला राज्याभिषेक होऊन राम राज्य करूं लागले इतकें सांगून व रामराज्यांतील लोकस्थितीचें सुंदर वर्णन करून ग्रंथ समाप्त केलेला आहे. ही एकच गोष्ट आमचें अनुमान वाचकांना पटविण्यास पुरेशी आहे. प्रत्येक कांडांत वाल्मीकींप्रमाणें तितकी कथा सांगितलेली आहे, असें नाहीं.

रामायणाचे उत्पत्तीची अर्थात् क्रौंचवधाची व त्याचे प्रसाराची अर्थात् सीतेच्या दुसऱ्या दिव्याची या कथा यांत मुळींच सांगितलेल्या नाहींत.

बालकांडांत प्रारंभीं तुलसीदासांची प्रस्तावना त्यांच्या काव्याला शोभण्यासारखी विशाल व मनोहर आहे. प्रयागक्षेत्रीं माघमासीं दूरदूरचे ऋषि स्नानाकरितां येत असत. तेथेंच भरद्वाज मुनींचा आश्रम होता. यात्रेकरितां आलेल्या ऋषींपैकीं याज्ञवल्क्यमुनि यात्रेचें कार्य होऊन परत फिरूं लागले असतां त्यांची व भरद्वाजांची गांठ पडली. या वेळीं भरद्वाजांनीं याज्ञवल्क्याला रामचरित्र सांगण्यास प्रार्थना केली व त्याप्रमाणें त्यांनीं त्यांना रामचरित्र निरूपिलें असा ग्रंथाचा उपक्रम आहे. या मुनिद्वयाच्या संवादांत शंकरपार्वतींच्या संवादरूपानें प्रस्तुत चरित्र सांगितलेलें आहे. एकदां शंकर दक्षकन्या सतीसह अगस्त्यमुनींकडे गेले असतां त्यांचे तोंडून त्यांनीं रामकथा ऐकिली. अगस्त्यांचे आश्रमांतून ते परत कैलासाकडे येऊं लागले. याच वेळीं रावणानें सीतेचा अपहार केला व त्यानिमित्त राम अरण्यांत सीतेचा शोध करीत व तिचेकरितां विलाप करीत फिरत होते. अशा स्थितींत शंकरांनीं रामाचें दर्शन घेतलें व ते पुढें चालले. रामदर्शनानें आनंद वाटून शंकरांचा देह पुलकित झालेला पाहून सतीनें त्यांना तसें होण्याचें कारण काय, म्हणून प्रश्न केला. शंकरांनीं अरण्यांत स्त्रीचा शोध करीत फिरणाऱ्या ज्या राजकुमाराचें आपण दर्शन घेतलें, तो आपलें उपास्य दैवत असून त्याचे दर्शनानें आनंदित झाल्याचा हा परिणाम होय असें सांगितलें. तरी तिला तें पटेना. तेव्हां ती त्या राजकुमाराची परीक्षा करण्याकरितां सीतेचा वेष घेऊन त्याचे पुढें गेली व ती पुढें येतांच रामांनीं तिला वंदन केलें व "शंकर कोठें आहेत? आपण अरण्यांत एकट्याच कां फिरतां?" असा प्रश्न केला. हा प्रश्न ऐकून सती ओशाळली व तिची शंका निरस्त झाली. सतीच्या या वर्तनाचा शंकरांना राग आला व त्यांनीं तिचा त्याग केला. पुढें दक्षाचे यज्ञांत तिनें देहत्याग केला व पुढील जन्मीं ती हिमालयाची कन्या पार्वती झाली. येथें शिवपार्वतींच्या विवाहाचें विस्तृत वर्णन आलेलें आहे. एकदां कैलासपर्वतीं शंकर पार्वतीसह बसले असतां तिनें विचारिल्यावरून त्यांनीं तिला रामचरित्र सांगितलें.

शंकरांनीं पार्वतीला सांगितलेलें रामचरित्रहि काक भुशुंडि व गरुड यांचे

संवादरूपानें आहे. रामरावणयुद्धाचे प्रसंगीं राम नागपाशांत बद्ध झाले असतां तेथें गरुड आल्यावर त्यांची मुक्तता झाली व हें पाहून गरुडाला स्वतांविषयीं अभिमान व रामाविषयीं अनादर उत्पन्न झाला. तेव्हां भुशुंडि नामक एका वयोवृद्ध काकाशीं त्याची गांठ पडली व त्यानें त्याला समग्र रामचरित्र सांगून त्याच्या शंकेचा परिहार केला. गरुड व काक यांची विस्तृत कथा तुलसीदासांचे ग्रंथांत उत्तरकांडांत आली आहे.

बालकांडांत वरीलप्रमाणें उपक्रम केल्यावर रामावतार होण्याचीं कारणें म्हणून आणखी कांहीं कथा सांगितल्या असून या अशा आनुषंगिक कथांनीं अर्ध्याहून अधिक कांड व्यापिलें आहे. अत्रि ऋषींचे आश्रमीं जाऊन राम पुढें निघाले, येथपर्यंत कथा सांगून वाल्मीकींनीं अयोध्याकांडाची समाप्ति केली आहे, तर हीच कथा तुलसीदासांनीं अरण्यकांडाचे प्रारंभीं दिली आहे. किष्किंधा कांडांतील भूगोलवर्णन तुलसीदासांनीं मुळींच दिलेलें नाहीं. सुंदरकांडांत, समुद्रानें प्रकट होऊन सेतु बांधविण्याची सूचना केली, येथपर्यंत कथा आली आहे. युद्धकांडाचें नांव लंकाकांड असें दिलेलें आहे व त्यांत रावणवधानंतर रामादि मंडळी पुष्पकांत बसून अयोध्येकडे जातांना मार्गांत गुहाशीं त्यांची भेट झाली येथपर्यंत कथा आली आहे. वाल्मीकींनीं रामाला राज्याभिषेक झाल्याचें सांगून व रामराज्यांतील लोकस्थितीचें वर्णन करून युद्धकांडाची समाप्ति केली आहे, तर हीच कथा तुलसीदासांनीं उत्तरकांडांत विस्तारानें सांगून व काक भुशुंडीची कथा देऊन कांड व ग्रंथ यांची समाप्ति केली आहे.

तुलसीदासांनीं मूळ कथेंत अनेक प्रसंग नवीन निरूपिले आहेत. सीतास्वयंवराचें वर्णन विस्तृत असून सुंदर आहे. सीता व राम यांचा विवाह होण्यापूर्वीं जनकाचे उपवनांत दोघांची भेट होण्याचा योग कवीनें मोठ्या युक्तीनें जमवून आणिला आहे. येथील मिथिलेचें व विवाहसमारंभाचें वर्णन वाचनीय आहे. परशुरामाचा गर्वपरिहार विवाहापूर्वीं घडवून आणिलेला आहे. यांतील अहल्या शिला झालेली आहे. सीतेचा स्वयंवर झाल्याचें सांगून राम तिकडे " धनुषजज्ञ " पाहाण्याचे निमित्तानें गेल्याचें वर्णन केलें आहे. जनकाचा पण धनुष्य तोडण्याचा सांगितलेला आहे. अयोध्याकांडांत भरताच्या भेटीचा प्रसंग तर पुनःपुनः वाचण्यासारखा आहे. अरण्यांत भरत गेल्यावर जनक तेथें भेटण्याकरितां

आल्याचें वर्णन यांत विशेष आहे. अरण्यकांडांत लक्ष्मणाला रामानें उपदेश केल्याची कथा अध्यात्मरामायणाप्रमाणें आहे. सुंदरकांडांत बिभीषण व मारुती यांची गांठ पडून मारुतीला सीतेची वार्ता त्याजकडून कळल्याचें सांगितलें आहे. लंकाकांडांत मारुती औषधी आणण्याकरितां गेला व वाटेंत कालनेमीनें त्याला अवकाश लागावा म्हणून विघ्न आणिलें, वगैरे कथा अध्यात्मरामायणाप्रमाणेंच यांत आल्या आहेत.

तुलसीदासांचा ग्रंथ स्वतंत्र असून कथेला आधार वाल्मीकींचे ग्रंथापेक्षां अध्यात्मरामायणाचा अधिक घेतलेला आहे, असें एकंदरींत दिसतें. अध्यात्मरामायणानें भागवतांतील कल्पना आधाराला घेऊन रामचरित्र सांगतांना त्या धर्तीवर आध्यात्मिक उपदेश निरनिराळ्या प्रसंगांची योजना करून करण्याचा प्रयत्न केला आहे, तर तुलसीदासांनीं या कामीं त्याचा कथेपुरता आधार घेतलेला आहे. त्यांतील अध्यात्मविषय उचलेला नाहीं, किंवा त्याप्रमाणें स्वतंत्रपणेंहि तो गोंवण्याचा प्रयत्न प्रायः केलेला नाहीं. मात्र अध्यात्मरामायणानें ज्या भागवताच्या आधारावर आपल्या कल्पनेची उभारणी केली, त्यांतील भक्तिरस तुलसीदासांनीं उचलून त्याचा आपल्या सर्व ग्रंथांत जेथें तेथें संचय केला आहे. भागवतांतील कित्येक कल्पना तुलसीदासांनीं आपल्या ग्रंथांत कशा रीतीनें अनुवादिलेल्या आहेत, याचें सोदाहरण विवेचन त्यांच्या ग्रंथाचे भाषांतरकार श्रीमंत जामदार यांनीं तुलसीरामायणावरील आपल्या 'मानसहंस' नामक निबंधांत उत्तम प्रकारें केलें आहे. भाषासौन्दर्य, कल्पनाचातुर्य व भक्तिरसाचें प्राचुर्य या तीन गुणांचें सुंदर मीलन भागवतांत झालेलें आहे व त्या ग्रंथाची लोकप्रियता व प्रसार इतका वाढण्याचें कारण हें आहे, हें कोणाला प्रमाणें देऊन सिद्ध करण्याची आवश्यकता आहे, असें वाटत नाहीं. तुलसीरामायणांत आध्यात्मिक विवेचन भागवतासारखें नसलें तरी त्याची उत्तरेकडे इतकी लोकप्रियता होण्याचें कारण भागवतांतील वरील गुणत्रयीच्या मीलनाहून वेगळें नाहीं.

तुलसीदास केवळ कवि नसून दांडगे विद्वान् होते व यामुळें त्यांच्या विद्वत्तेची प्रभा त्यांच्या सर्व काव्यभर पसरलेली आहे. निरनिराळ्या ग्रंथांतील सादृश्यदर्शक अवतरणें श्रीमंत जामदार यांनीं आपल्या काव्यविवेचनांत दिलीं आहेत. 'श्वयुवमघोनाम तद्धिते' या प्रसिद्ध पाणिनीय सूत्रावर कवीनें केलेला कोटिक्रम त्यांनीं विवरणासह दिला

आहे. त्यांनीं दिलेल्या ग्रंथाबाहेरचें सादृश्य आम्हांला एके स्थलीं मिळालें तें येथें आतां दाखवितों. प्रसिद्ध माघ कवीच्या शिशुपालवध नामक काव्यांत पुढील श्लोक आहे:—

**पादाहतं यदुत्थाय मूर्धानमधिरोहति ।**
**स्वस्थादेवावमानेऽपि देहिनोऽपि वरं रजः ॥**

"लाथ मारिली तर भूमीवरील धूळहि डोक्यावर जाऊन बसते. तेव्हां अवमान झाला तरी स्वस्थ राहणाऱ्या पुरुषापेक्षां ती धूळहि श्रेष्ठ होय."

ही कल्पना तुलसीदासांनीं अयोध्याकांडांतील लक्ष्मणाचे भाषणांत अनुवादिली आहे. पुढील दोहा पहा:—

**छत्रि जाति रघुकुलजनम राम अनुज जग जान ।**
**लात हुँ मारे चढति सिर नीच को धूरिसमान ॥ २२१ ॥**

"मी जातिवंत क्षत्रिय असून रघुकुलांत जन्म घेतलेला आहें; आणि मी रामाचा पाठचा भाऊ आहें, हें सर्व जगाला विदित आहे. धुळीसारखी नीच कोण असेल ? परंतु तिला देखील लाथेनें तुडविली असतां ती डोक्यावर जाऊन स्वार होते."

कल्पनांतील सादृश्य पाहिलें असतां तुलसीदासांनीं वरील कल्पना माघकवीच्या काव्यांतून घेतली, यांत शंका राहात नाहीं. श्रीमंत जामदार यांनीं उत्तर रामचरित, वैराग्यशतक यांतील सादृश्येंहि आपल्या निबंधांत दाखविलीं आहेत व यावरून तुलसीदासांचा ग्रंथ म्हणजे पूर्वींच्या कित्येक कवींच्या सुंदर कल्पनांचा एकत्र संयोगच होय.

रामकथांचें निरूपण करितांना तुलसीदासांनीं वाल्मीकिरामायणाकडे विशेष लक्ष दिलें, असें म्हणतां येत नाहीं. पुष्कळ स्थलीं वाल्मीकींला सोडून त्यांचें निरूपण आहे. अयोध्याकांडांतील भरतभाव तुलसीदासांनीं सुंदर रंगविला आहे. परंतु त्यांत वाल्मीकींच्या रामाची तेजस्विता आलेली नाहीं. राम वनांत निघाले त्यासंबंधाच्या कथा सांगतांनाहि कैकेयीची निर्भर्त्सना करण्याचे कित्येक प्रसंग कवीनें त्यांत घेतलेले नाहींत. राजाचें शासन करून राज्य बळकावण्याचा उपदेश करणारा वाल्मीकींचा लक्ष्मण तुलसीदासांच्या काव्यांत नेभळट बनलेला आहे. राम प्रयागाचे दक्षिणेकडे गेल्यावरहि मार्गांत नगरें आणि गांवें लागल्याचें

वर्णन केलें आहे तें ( २।११० ) मुळींच विसंगत आहे. कवीच्या या वर्णन-पद्धतीवरूनच वरील अनुमान आम्हीं केलें आहे. अध्यात्मरामायणांतील पुष्कळ कथा व त्यांतील क्रम तुलसीदासांनीं घेतला आहे. रावणवधानंतर सीतेनें दिव्य केलें त्या प्रसंगीं रामांनीं केलेलें भाषण ज्याप्रमाणें अध्यात्मरामायणानें समग्र न देतां त्याविषयीं केवळ "अवाच्य" म्हणून उल्लेख केला आहे, त्याप्रमाणें तुलसीदासांनींहि येथें "दुर्वाद" ( ६।१२६ ) असें लिहून ठेविलें आहे. या एका गोष्टीवरून आमचें वरील अनुमान वाचकांस पटण्यासारखें आहे. बाकी काव्य या दृष्टीनें पाहिलें तर तें अत्यंत हृदयंगम आहे व तें आतां मराठी वेषांत श्रीमंत जामदारांनीं आपल्यापुढें आणून उभें केलें आहे. तेव्हां त्याचा रसास्वाद घेण्यास प्रत्येक महाराष्ट्रभाषाभिज्ञास मोकळीक मिळाली आहे. अर्थात् त्याचें गुणवर्णन श्रवण करण्यापेक्षां तें स्वतां वाचून पाहाणें अधिक सरळ नव्हे काय ?

## उपसंहार.

रामचरित्रावर संस्कृत भाषेंत जे ग्रंथ आहेत, त्यांतील प्रमाण म्हणून मानिलेल्या बहुतेक ग्रंथांचें व नमुन्याकरितां प्राकृत भाषांतील प्रमुख दोन ग्रंथांचें विवेचन येथवर केलें आहे. रामचरित्रावर संस्कृत भाषेंत, तसेंच अनेक प्राकृत भाषांत बहुत ग्रंथ आहेत; परंतु त्यांचें परिगणन करणें कष्टाचें असून त्याची तादृश आवश्यकता नाहीं. वाल्मीकींचा ग्रंथ राम राज्य करीत असतां निर्माण झालेला आणि इतर सारे ग्रंथ—कित्येकांतून रामचरित्र भावी म्हणून वर्णन केलें असलें तरी—रामानंतर दीर्घकालानें झाले आहेत; व यामुळें रामचरित्रविषयक प्रश्नाचा निर्णय करण्याचा त्यांस अधिकार स्वभावतः नाहीं. तथापि कित्येक ग्रंथांचें हें स्वरूप व्यक्तपणें कळत नाहीं व यासाठीं लोकांना तें व्यक्त करून दाखविणें आवश्यक असतें. रामचरित्रावर असलेले प्राकृत भाषेंतील ग्रंथ संस्कृत ग्रंथांवरून आपण रचना केल्याचें स्वतां सांगून आपला अधिकार उघड करितात, तसेंच संस्कृत भाषेंतील काव्यें, नाटकें, चंपू वगैरे ग्रंथहि त्यांनीं संदर्भ-ग्रंथांचें नांव दिलें नसलें तरी त्यांचा काल कळत असल्यामुळें त्यांचा अधिकार वाचकांच्या लक्षांत येण्यासारखा आहे. पण संस्कृत भाषेंतील कांहीं ग्रंथांचा रचनाकाल अनिश्चित असल्यामुळें व ते आर्ष ग्रंथांत मोडत असल्यामुळें त्यांच्या अधिकाराविषयीं कल्पना करितां येत नाहीं. वाल्मीकींचें रामायण हा अशा सर्व

ग्रंथांना आधार आहे; पण तो कित्येकांनीं स्पष्टपणें सांगितला आहे व कित्येकांनीं तो मुळींच सांगितला नाहीं. कित्येकांनीं तर आपला अधिकार स्वतंत्र स्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे. येथपर्यंत आम्हीं ज्या ग्रंथांची माहिती देऊन त्यांवर विस्तृत चर्चा केली आहे, त्यांत असे तीनहि प्रकारचे ग्रंथ आले आहेत. आमची तर समजूत आहे कीं, रामचरित्रविषयक सर्व दंतकथा यांत कोठें ना कोठें तरी आढळतील. कित्येक दंतकथा वाल्मीकिरामायणाचे कशा रीतीनें विरुद्ध आहेत व यासाठीं कशा अविश्वसनीय आहेत, याची चर्चा आम्हीं एका स्वतंत्र भागांत केली आहे. परंतु त्यांचें खरें स्वरूप या भागांत व्यक्त होणारें आहे. आर्ष म्हणून समजले गेलेले असेच ग्रंथ आम्हीं येथें चर्चेसाठीं घेतले आहेत. एकदोन अपवादांवांचून सर्व पौराणिक ग्रंथांतील रामचरित्र वाल्मीकींच्या ग्रंथाच्या आधारानें व त्यांच्याच क्रमानें सांगितलेलें आहे, असें दिसून येतें. रामायणावरील स्वतंत्र तीन ग्रंथांविषयीं आम्हीं माहिती दिली आहे व हे तीन ग्रंथ आणि वरील अपवादभूत पौराणिक ग्रंथ यांविषयींची माहिती देतांना आह्मांलाहि जरा विस्तृत चर्चा करावी लागली आहे. पुष्कळ दंतकथा या ग्रंथांतून मिळतात व हे ग्रंथ रामचरित्राविषयीं आपला अधिकार स्वतंत्रपणें सांगतात. याकरितां खरोखर या कामीं त्यांचा अधिकार किती आहे, हें वाचकांना कळावें हाच वरील चर्चा करण्यांत आमचा हेतु आहे. दंतकथा वाल्मीकिरामायणाशीं विरुद्ध असल्याचें दाखविलें तरी त्यांची सत्यता सिद्ध करण्यास वरील ग्रंथ प्रायः पुढें येतात आणि ते आर्ष आहेत अशी लोकांची श्रद्धा असल्यामुळें त्यांवर त्यांचा विश्वास बसतो. अशा दंतकथांचा प्रसार लोकांतील या श्रद्धेमुळें पूर्वींपासून होत आला आहे. हे ग्रंथ आर्ष नसून आधुनिक आहेत असें त्यांतीलच अंतःप्रमाणांनीं सिद्ध झाल्यावर दंतकथा हा आधार सुटला असें म्हणण्यास चिंता नाहीं. या ग्रंथांनीं खरें पाहूं गेलें तर दंतकथासंग्रह करण्याची कामगिरी केली आहे. व त्यांच्या या प्रयत्नामुळें त्यांचा प्रसार होऊन त्या टिकल्या आहेत. मात्र त्यांच्या या प्रयत्नाकडे प्रामाणिक ग्रंथ म्हणून न पाहतां त्यांचें संग्रहबुद्धीचें खरें स्वरूप आपण ओळखून ठेविलें म्हणजे झालें.

योगवासिष्ठ म्हणून प्रसिद्ध असलेल्या ग्रंथाला महारामायण असेंहि दुसरें नांव आहे व या नांवावरून रामचरित्र त्यांत सांगितलें असावें

असा भास होतो; परंतु खरें पाहूं गेलें तर त्यांत रामचरित्रांतील एक कथा केवळ विस्तारानें सांगितलेली आहे. राम वनवासाला जाण्यापूर्वींचा अर्थात् त्याच्या बालपणांतील हा कथाभाग आहे. रामाला संसाराविषयीं वैराग्य उत्पन्न होऊन तो उदास झाला असतां त्याला वसिष्ठांनीं उपदेश करून त्याचा मोह दूर केला; आणि हा उपदेश म्हणजेच योग-वासिष्ठ होय. वेदांतावरील ग्रंथांत हा विशाल असून यांत नानाविध शंका प्रश्न-रूपानें उपस्थित करून त्यांचा परिहार सांगोपांग केलेला आहे. मधूनमधून दृष्टांत म्हणून पुष्कळ कथा सांगितलेल्या आहेत आणि कित्येक स्थलीं अन्यहि कांहीं विषयांवर चर्चा केलेली आहे. फार काय सांगावें ? श्रीकृष्णांनीं अर्जुनाला उपदेशिलेली गीता भावी म्हणून यांत सांगितलेली असून त्यांत गीतेंतील कांहीं श्लोक थोडा फेरफार करून आणि कांहीं जशाचे तसे दिलेले आहेत. योगवासिष्ठ हा वेदान्तशास्त्रांतील महत्त्वाचा ग्रंथ असला तरी त्यांत निरूपिलेला प्रसंग सत्याचे कसोटीवर कसा टिकावा हा एक प्रश्न आहे व त्याचा निर्णय ग्रंथकारा-वर कसा उलटणार आहे, याची कल्पना यावरून वाचकांस सहज होईल. राम-चरित्र यांत वर्णिलेलें नाहीं व याकरितां त्याविषयीं येथें चर्चा करण्याचें कारण नाहीं; तथापि त्याच्या "महारामायण" या नांवासाठीं त्यांतील कथाप्रसंगाचा येथें निर्देश करून त्याचें स्वरूप व्यक्त करावें लागलें.

रामचरित्रावर संस्कृत भाषेंतच कांहीं काव्यें, नाटकें वगैरे असल्याचें वर सांगितलेलें आहे. त्यांतील कित्येक कथा वाल्मीकिरामायणाहून भिन्न आहेत हें खरें; तथापि रामचरित्राविषयीं प्रमाण म्हणून त्यांची लोकांत मान्यता नाहीं. याकरितां त्यांविषयींची माहिती देऊन अधिक चर्चा करण्याचें कारण नाहीं. दंतकथांचा प्रसार लोकांत फार आहे व त्यांवर लोकांची इतकी श्रद्धा आहे कीं तिचे योगानें मूळ कथानक, त्याला अनुकूल असो वा नसो, मागें पडलें आहे. दंत-कथांचा हा पडदा आपोआप बाजूला पडून रामायणाचें खरें स्वरूप लोकांपुढें यावें हा तर प्रस्तुत भाग लिहिण्यांत आमचा उद्देश आहे; आणि आमच्या या उद्देशाचे कामीं नाटकादिकांचें विघ्न येण्यासारखें नसल्यामुळें आम्ही त्यां-विषयीं अधिक चर्चा करीत नाहीं.

# परिशिष्टें

## परिशिष्ट-अ.

## रामायणकालीन प्रचलित कथा.

रामायणांत रामचरित्र क्रमानें सांगितलें आहे व तें सांगतांना कित्येक उपकथा आल्या आहेत. उपकथा संक्षेपानें सांगितल्या असोत अथवा विस्तारानें सांगितल्या असोत, त्या कालांतील मुख्य भाग वाचकांपुढें व्यक्त असतो. प्रचलित कथांचा प्रकार याहून भिन्न आहे. कारण त्या कथा सांगण्याचा तेथें उद्देश नसतो; तर कवीनें वर्णन करितांना किंवा कथांतील पात्रांनीं भाषण करितांना त्यांचा केवळ उल्लेख केलेला असतो. कथांतील अंगभूत श्रोता किंवा ग्रंथाचा वाचक यांना ती कथा अवगत आहे असें कथेंतील वक्त्यानें अथवा ग्रंथकारानें तेथें गृहीत धरिलेलें असतें. कथांतील पात्रभूत श्रोत्यांना ती अवगत असते, याविषयीं शंका नको; पण ग्रंथाच्या सर्व वाचकांना ती अवगत असते असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. रामायणांत अशा कित्येक कथांचे उल्लेख मधूनमधून आले आहेत. रामचरित्र सांगतांना असे उल्लेख ओघाबरोबर आले आहेत व यावरून त्या कथा त्या वेळीं प्रचलित होत्या, हें उघड आहे. अशा कथांचा एकत्र संग्रह येथें करावयाचा आहे. रामायणानंतर झालेल्या पुराणांतून व महाभारतांतून यांतील बहुतेक कथा आलेल्या आहेत आणि आम्हांलाहि प्रायः त्यांवरूनच त्यांचा उलगडा करून घ्यावा लागत आहे. यांतील कित्येक कथांचा उगम वैदिक ग्रंथांत आहे. व हा संग्रह करितांना त्यांच्या उगमांसहवर्तमान तो करणें उचित होतें; तथापि तसा प्रयत्न साधनांचे अभावीं आम्हांला करितां आला नाहीं, त्यास उपाय नाहीं. तथापि उगमांचा शोध करण्यास या संग्रहाचा उपयोग होण्यासारखा आहे व रामायणकालच्या प्रचलित कथा या दृष्टीनें त्यांचें महत्त्व आहे, हें मनांत आणून हा प्रयत्न केला आहे.

## विरोचनकन्या मंथरा.

विरोचन हा प्रल्हादाचा पुत्र व बलीचा जनक होय. याची कन्या मंथरा. सर्व पृथ्वीचा विध्वंस करावा असें एकदां तिच्या मनांत आलें व ती तसा प्रयत्न करणार असें पाहून इंद्रानें तिचा वध केला आणि पृथ्वीचें संरक्षण केलें. कित्येक कर्मे पातकावह असतात व यासाठीं तीं करितां नये, हें खरें; तथापि त्यांचे योगानें लोककल्याण होत असेल तर तीं करण्यांत दोष नसून उलट तीं करणें हें कर्तव्य आहे. ताटकावधाचे वेळीं स्त्रीवधानिमित्त राम साशंक झाले असतां विश्वामित्रांनीं हा दृष्टांत दिला आहे. *

## भृगुपत्नीचा वध.

देव आणि दैत्य यांमध्यें युद्ध चालू असतां दैत्यांना जय प्राप्त होईना, तेव्हां ते आपले पुरोहित शुक्राचार्य यांजकडे गेले. आचार्यांनीं त्यांला अभय दिलें; परंतु आपणाला संपूर्ण मंत्रसिद्धि नाहीं, असें पाहून ते त्यासाठीं तप करण्याकरितां निघून गेले. जातांना त्यांनीं दैत्यांना आपण परत येईपर्यंत देवांशीं सहकारिता करून युद्धाचा प्रसंग आणूं नका असें सांगितलें होतें. त्याप्रमाणें दैत्य वागूं लागले व देवांना विश्वास वाटावा म्हणून त्यानीं प्रल्हादाला त्यांजकडे पाठविलें. प्रल्हाद तर "आम्ही आतां युद्ध करण्याचें सोडून दिलें असून वल्कलें धारण करून तप करणार" असें सांगूं लागला. देवांना प्रथम विश्वास वाटला; परंतु मागाहून दैत्यांविषयीं संशय येऊं लागला. तेव्हां ते शस्त्रें धारण करून युद्धासाठीं दैत्यांकडे निघून गेले. दैत्यांना त्यांनीं त्यांचें कपट ओळखिल्याचें स्पष्ट सांगितलें व हें कळतांच दैत्य भिऊन शुक्राचार्यांच्या मातेला शरण गेले. तिनें देवांना शाप दिल्यामुळें देवांना निद्रा येऊं लागली. विष्णूनें सुचविल्याप्रमाणें इंद्रानें शुक्राचे शरीरांत प्रवेश केला व तो निर्भय झाला. शुक्राचे मातेनें हें पाहून ती क्रुद्ध झाली व तपोबलानें "आपण दोघांनाहि भक्षण करूं" असें सांगूं

---

* श्रूयते हि पुरा शक्रो विरोचनसुतां नृप ॥१।२५।२०॥
पृथिवीं हन्तुमिच्छन्तीं मन्थरामभ्यसूदयत् ॥

"हे राजपुत्रा, पूर्वी विरोचन दैत्याची कन्या मंथरा पृथ्वीचा घात करण्याची इच्छा करूं लागली असतां इंद्रानें तिचा वध केल्याचें श्रुत आहे"

लागली. तिचा उद्देश लक्षांत येतांच विष्णूनें चक्राचे योगानें तिचा शिरच्छेद केला. ताटकावधाचे प्रसंगींच ही कथा दृष्टांत म्हणून आली आहे. × ही कथा देवीभागवतांत आहे. ( ४।२।३० )

## श्येनकपोतीय आख्यान.

शिबिराजाचा पुत्र ( शैब्य ) वृषदर्भ म्हणून सोमवंशामध्यें एक राजा होऊन गेला. एक श्येनपक्षी ( ससाणा ) कपोताचे ( पारव्याचे ) मागें लागला असतां तो कपोत पक्षी भिऊन राजाला शरण गेला. राजानें त्याला अभय दिलें असतां तेथें श्येन आला व आपलें विहित भक्ष्य म्हणून राजाकडे कपोताला मागूं लागला. राजानें त्याला अभय दिलें असल्यामुळें तो त्याला सोडीना. कपोताचे बदली दुसरें भक्ष्य राजा त्याला देऊं लागला असतां त्यानें राजाला कपोताचे भारंभार स्वतांचें मांस देण्याची अट घातली. राजानें ती मान्य केली व स्वतांचे शरीरांतील मांस काढून तें तो तोलूं लागला. कपोताचें पारडें जड होऊं लागलें व राजाचे शरीरांतील सर्व मांस काढून झालें तरी तें कपोताचे भारंभार होईना. राजाचे शरीरांत केवळ अस्थि व चर्म राहिलें. तेव्हां तेथें इंद्रादि देव येऊन त्यांनीं त्याजवर अमृतसिंचन केलें व शरणागताचें रक्षण करण्याच्या त्याच्या व्रताचे योगानें त्याला स्वर्गप्राप्ति झाली. कैकेयीनें राजा दशरथाशीं वर मागितल्यावर तो ऐकून राजा कांकूं करूं लागला असतां, दिलेलें वचन कशा प्रकारें पाळलें पाहिजे हें सांगतांना, कैकेयीनें शैब्य राजाचा दृष्टांत दिला आहे. * हें श्येनकपोतीय आख्यान महाभारतांत तीन वेळां आलें आहे. ( वन. १३२, १३३ व २००; अनु. ६७ )

---

× विष्णुना च पुरा राम भृगुपत्नी पतिव्रता ।
अनिन्द्रं लोकमिच्छन्ती काव्यमाता निषूदिता ॥ १।२५।२१

" आणि त्याचप्रमाणें हे रामा, स्वर्ग लोक इंद्रशून्य करण्याची इच्छा करणारी जी भृगुपत्नी व शुक्रमाता तिचा विष्णूनें वध केल्याचेंहि ऐकण्यांत आहे. "

* शैब्यः श्येनकपोतीये स्वमांसं पक्षिणे ददौ ॥२।१२।४३॥

" शैब्य राजानें ( स्वतांचें वचन खरें करण्याकरितां ) आपलें मांस कपोताला दिल्याचें श्येनकपोतीय आख्यानांत सांगितलेलें आहे."

## अलर्क.

अलर्कनामक एक राजा होता. याजकडे एक अंध ब्राह्मण आला असतां राजानें त्याला वर देऊं केला; आणि त्या ब्राह्मणानें राजाकडे त्याचे नेत्र मागितले. आपलें वचन सत्य करण्याकरितां राजानें त्याप्रमाणें त्याला आपले नेत्र काढून दिले. वरील प्रसंगीं कैकेयीच्या तोंडींच हा दृष्टांत आला आहे. *

## इंद्र व बलि.

विष्णूनें वामनावतार धारण करून बलीला पाताळीं घातल्याची कथा प्रसिद्ध आहे. विष्णूनें हें कार्य इंद्राकरितां किंवा त्याचे प्रेरणेनें केलें होतें. यावांचून इंद्र व बलि यांचा संबंध संभवत नाहीं. वामनानें बलीला प्रथम वचनांत बद्ध करून घेतला व मग त्याला पाताळीं घातला, अशी ही कथा आहे. कैकेयीनें राजा दशरथाला याप्रमाणेंच प्रथम वचनांत गोंवून घेऊन मग त्याला तोंडघशीं पाडला व हें सांगतांना वरील वामनाचा दृष्टांत रामायणांत दिलेला आहे. ×

---

पृ.४५१वरून] संश्रुत्य शैब्यः श्येनाय स्वां तनुं जगतीपतिः ।

प्रदाय पक्षिणे राजा जगाम गतिमुत्तमाम् ॥२।१४।४॥

" शैब्य राजानें कपोताला अभयवचन दिलें व आपलें शरीर श्येन पक्ष्याला देऊन तो उत्तम गतीला गेला. "

* अलर्कश्चक्षुषी दत्त्वा जगाम गतिमुत्तमाम् ॥२।१२।४३॥

" अलर्क राजानें ( आपलें वचन खरें करण्याकरितां ) आपले नेत्र दिले व तो उत्तम गतीला गेला. "

तथा ह्यलर्कस्तेजस्वी ब्राह्मणे वेदपारगे ।

याचमाने स्वके नेत्रे उद्धृत्याविमना ददौ ॥२।१४।५॥

" त्याचप्रमाणें तेजस्वी अलर्क राजानें वेदपारंगत ब्राह्मण याचना करूं लागला असतां, मनाला खेद न वाटतां, आपले नेत्र काढून दिले. "

× एवं प्रचोदितो राजा कैकेय्या निर्विशंकया ।

नाशकत् पाशमुन्मोक्तुं बलिरिंद्रकृतं यथा ॥२।१४।११

" याप्रमाणें कैकेयीनें राजाला निःशंकपणें सांगितलें असतां बलीला ज्याप्रमाणें इंद्रानें टाकिलेला पाश तोडितां आला नाही, त्याप्रमाणें त्याला तिचा पाश तोडून मुक्त होतां आलें नाहीं. "

प्रेरक या नात्यानें या कथेंत इंद्राचा संबंध मानिल्यास ती येथें दृष्टांत म्हणून जमते. टीकाकारांनींच ही कल्पना सुचविलेली आहे. इंद्र व बलि यांचा जींत प्रत्यक्ष संबंध आहे अशी कथा कोठें आढळत नाहीं. तशी कथा कोणाला कोठें आढळल्यास व तींत इंद्रानें बलीला वचनबद्ध करून घेऊन फशीं पाडला असल्यास ती कथा येथें दृष्टांत म्हणून घेणें अधिक सुयुक्तिक होईल; परंतु तसा शोध लागेपर्यंत वरीलप्रमाणें समाधान मानणें भाग आहे.

## काश्यपाची मातृसेवा.

काश्यप ऋषीनें आपल्या घरींच राहून आपल्या मातेची सेवा केली व या तपश्चर्येच्या निमित्त त्याला स्वर्गप्राप्ति झाली. रामानें वनांत न जातां आपली सेवा करावी असें त्याला सांगतांना आपल्या उपदेशाचें महत्त्व त्याला पटावें म्हणून कौसल्येनें काश्यपाचा हा दृष्टांत दिला आहे. * काश्यपाची ही कथा मात्र कोठें मिळाली नाहीं.

## कण्डुऋषींची गोहत्या.

कंडु ऋषींना पित्यानें धेनूचा वध करण्याची आज्ञा केली; धेनूचा वध करण्यांत केवढा दोष आहे हें त्यांना कळत होतें; तथापि तो टाळूं लागल्यास पित्याच्या आज्ञेचें उल्लंघन केल्याचा दोष लागतो व तो गोहत्येहून अधिक वाईट, हें लक्षांत आणून त्यांनीं धेनूचा वध केला. पित्राज्ञापालनाचें महत्त्व केवढें आहे व पित्राज्ञेच्या उल्लंघनाचा दोष इतर दोषांचे मानानें कसा अधिक आहे, हें दाखविण्यासाठीं कौसल्येला उत्तर देतांना रामानें हा दृष्टांत × दिला आहे. ही कथाहि कोठें आढळली नाहीं.

---

* **शुश्रूषुर्जननीं पुत्र स्वगृहे नियतो वसन्।**
**परेण तपसा युक्तः काश्यपस्त्रिदिवं गतः ॥२।२१।२४॥**

" बाळा, काश्यपानें आपल्या घरीं राहून मातेची सेवा केली व त्याला मोठ्या तपश्चर्येचें फल प्राप्त होऊन तो स्वर्गाला गेला. "

× **ऋषिणा च पितुर्वाक्यं कुर्वता वनचारिणा।**
**गौर्हता जानता धर्मं कण्डुना च विपश्चिता ॥२।२१।३१॥**

" धर्मज्ञ, विद्वान् व वनवासी अशा कण्डु ऋषींनीं पित्याची आज्ञा पालन करण्याकरितां गाईचा वध केला. "

## रेणुकावध.

जमदग्नि ऋषींची पत्नी रेणुका. हिला पांच पुत्र होते. प्रसिद्ध परशुराम हा कनिष्ठ होय. एकदां रेणुका नदीवर गेली असतां तेथें एक राजा स्त्रियांसह जलक्रीडा करीत होता व ही त्याची क्रीडा पहात राहिली; यामुळें आश्रमांत परत येण्यास तिला थोडा विलंब लागला. जमदग्नि हा अत्यंत कोपी होता. त्यानें हिला आलेली पाहातांच आपल्या पुत्रांना तिचा वध करण्याची आज्ञा केली. परशुराम त्या वेळीं तेथें नव्हता, आणि तेथें चार पुत्र होते ते आज्ञा न मानितां स्वस्थ राहिले. तेव्हां त्यांना पित्यानें 'जड व्हाल' असा शाप दिला. इतक्यांत परशुराम आला. त्याला पित्यानें वरील आज्ञा केली व त्यानें तत्काल तिचा शिरच्छेद केला. त्या वेळीं त्याजवर पिता संतुष्ट होऊन वर देऊं लागला असतां त्यानें माता व बंधु यांना पूर्वस्थिति प्राप्त होऊन मातेला तिच्या वधाचें स्मरण नसावें असे वर मागितले व त्याप्रमाणें ती सजीव झाली. पित्राज्ञापालनाचें महत्त्व कौसल्येला सांगतांना रामानें रेणुकावधाचा हा दृष्टांत दिला * आहे.

## सावित्री

द्युमत्सेन राजाचा पुत्र सत्यवान् याची ही स्त्री. पतीला आयुष्य अल्प असल्याचें तिला विवाहापूर्वीं कळलें असूनहि तिनें त्याला पूर्वीं मनानें वरिलें असल्यामुळें त्याशीं विवाह केला व पुढें यमधर्म पतीचे प्राण हरण करून नेत असतां तिनें आपल्या चातुर्यानें पतीचे प्राण परत मिळवून त्याला सजीव केलें. सीता रामाला आपण अरण्यांत समागमें येणार असें सांगत + असतां व अत्रीचे

---

* **जामदग्न्येन रामेण रेणुका जननी स्वयम्।**
**कृत्ता परशुनाऽरण्ये पितुर्वचनकारणात्॥२।२१।३३॥**

" पित्याच्या सांगण्यामुळें जमदग्निपुत्र परशुरामानें तर अरण्यामध्यें कुऱ्हाडीनें स्वतः आपली जननी रेणुका तोडून टाकिली."

\+ **द्युमत्सेनसुतं वीरं सत्यवन्तमनुव्रताम्।**
**सावित्रीमिव मां विद्धि त्वमात्मवशवर्तिनीम्॥२।३०।६॥**

" द्युमत्सेनपुत्र वीर सत्यवानाला जशी सावित्री वश होती तशी मी आपणांला वश आहें असें आपण समजा."

आश्रमीं अनसूयेशीं बोलतांना पातिव्रत्याचें महत्त्व वर्णन करीत असतां तिनें सावित्रीचा दृष्टांत दिला आहे. ×

## ययाति.

सोमवंशीय नहुष राजाचा हा पुत्र स्वर्गास गेल्यावर आत्मस्तुतीनिमित्त पतन पावला असतां त्याचे दौहित्र ( कन्येचे पुत्र ) तपश्चर्या करीत होते तेथें प्राप्त झाला. त्यांशीं याचा अध्यात्मविषयावर संवाद झाला व त्यांनीं त्याला पुन: स्वर्गप्राप्ति करून दिली. रामाला वनांत पोंचवून सुमंत परत आला असतां राजा दशरथानें त्याला रामाचें वर्तमान सांगण्याविषयीं आज्ञा केली; व ही करितांना तें वर्तमान ऐकून ययाति राजाप्रमाणें आपण जिवंत राहूं असा त्यानें दृष्टांत दिला आहे. *

## उर्वशी व पुरूरवा.

पुरूरवा हा सोमवंशाचा मूळ पुरुष. उर्वशी ही स्वर्गांतील अप्सरा. हिच्या कांहीं अटी पत्करून राजानें तिशीं विवाह केला. राजापासून तिला संतति झाली व यानंतर कांहीं काल गेल्यावर एक अट मोडल्याचें निमित्त करून ती स्वर्गाला निघून गेली. ती परत येऊन तिचा समागम घडावा म्हणून राजानें बहुत प्रयत्न केला; परंतु त्यांचा उपयोग झाला नाहीं. एकदां तिची गांठ पडली व ती थोडे दिवस राजापाशीं होती पण पुन: निघून गेली. राजाची ही कथा ऋग्वेद, शतपथ ब्राह्मण, महाभारत व कांहीं पुराणें यांत असून ऋग्वेदांतील

---

× **सावित्री पतिशुश्रूषां कृत्वा स्वर्गे महीयते ।**
**तथावृत्तिश्च याता त्वं पतिशुश्रूषया दिवम् ॥२।११८।१०॥**

" सावित्री पतिसेवा करून आतां स्वर्गामध्यें पूज्य होऊन बसली आहे आणि त्या सावित्रीप्रमाणेंच वागणाऱ्या आपणहि पतिसेवेनें स्वर्ग हस्तगत करून घेतला आहे. "

* **आसितं शयितं भुक्तं सूत रामस्य कीर्तय ।**
**जीविष्याम्यहमेतेन ययातिरिव साधुषु ॥२।५८।१६॥**

" हे सूता, राम बसला कोठें, निजला कोठें, त्यानें भोजन कोठें केलें, हें सर्व मला तूं सांग; म्हणजे स्वर्गांतून साधूंमध्यें पडलेल्या ययाति राजाप्रमाणें तुझ्यासारख्या सज्जनापासून हा वृत्तांत ऐकून ( पुत्ररूप स्वर्गसुखापासून भ्रष्ट झालेला ) मी जिवंत राहीन. "

कित्येक ऋचांमध्यें त्यांचा संवाद आलो आहे. सीतेचा अपहार करण्याकरितां ज्या वेळीं रावण पंचवटींतील तिच्या आश्रमामध्यें गेला त्या वेळीं तेथें दोघांचा जो संवाद प्रथम झाला त्यांत वरील कथेंतील उर्वशीचा दृष्टांत आला आहे. सीतेला रावणानें प्रथम वश होण्याविषयीं समोपचारानें सांगून पाहिलें, व या प्रथम प्रयत्नाचे वेळीं ती वश होत नाहीं असें पाहून आपलें वैभव व रामाची अनुकंपनीय स्थिति यांचें तुलनात्मक वर्णन करीत तो म्हणतो, "हे भीरु, पुरूरव्याला लाथ मारून उर्वशी चालती झाली व मग तिला जसा पश्चात्ताप झाला तसा मला नाकारल्यामुळें पश्चात्ताप करण्याची पाळी तुजवर येईल *" उर्वशी व पुरूरवा यांच्या संबंधाची कथा संक्षेपानें वर दिली आहे व उर्वशीनें राजाला झिडकारिल्याचा वरील दृष्टांतांतील अभिप्राय अंशतः त्यांत आला आहे. उर्वशी जरी राजाचा त्याग करून चालती झाली तरी त्याचा कांहीं काल समागम झाल्यानंतर हा प्रकार घडून आला, व तिनें राजाला लाथ मारल्याचें तर कोठें सांगितलेलें नाहीं आणि यासाठीं दृष्टांतांतील अभिप्राय कथेंत अंशतः असल्याचें वर म्हटलें आहे. कथेंतील प्रकाराकडे पाहिलें तर त्यांत राजाला तिचें वेड लागल्याचें दिसून येतें व ऋग्वेदांतील संवादांत व महाभारतादि ग्रंथांत राजानें तिचेकरितां विलाप केल्याचीं वर्णनें आहेत. तिनें राजाकरितां शोध किंवा विलाप केल्याचें वर्णन कोठेंहि नाहीं. तेव्हां या प्रसंगीं रावणाला देहभान राहिलें नसल्यामुळें त्यानें हा दृष्टांत त्या लहरींत दिला असावा, किंवा त्या प्रसंगीं त्याला इष्ट असलेला फेरफार त्यानें दृष्टांत देतांना बुद्ध्या केला असावा, असें वाटतें. अशी कल्पना केल्यावांचून दृष्टांताची संगति लावितां येत नाहीं.

## घृताची व विश्वामित्र.

विश्वामित्र ऋषि तपश्चर्या करीत असतां त्यांस विघ्न करण्याकरितां स्वर्गलोकांतून एक अप्सरा आली. तिचें सौंदर्य पाहून हे मोहित झाले व तिच्यासह विलास करूं लागले आणि तपश्चर्या तेथेंच समाप्त झाली. महाभारतांत व

---

* प्रत्याख्याय हि मां भीरु पश्चात्तापं गमिष्यसि ।
चरणेनाऽभिहत्येव पुरूरवसमुर्वशी ॥३।४८।१८॥

पुराणांतरीं या अप्सरेचें नांव मेनका असें दिलें असून शकुंतला ही त्या ऋषीं-पासून तिला झालेली कन्या, असें सांगितलें आहे. रामायणामध्यें अप्सरेचें नांव घृताची असें दिलें आहे. या अप्सरेच्या संबंधीं भिन्न कथा कोठें आढळत नाहीं. अप्सरेला पाहून ते मोहित झाले एवढ्या मुद्यापुरता त्यांच्या कथेचा दृष्टांत रामायणांत आला आहे. सुग्रीव विलासांत दंग होऊन, सीताशुद्धीविषयीं त्याला विस्मरण झाल्याचें दिसूं लागलें असतां लक्ष्मण क्रुद्ध होऊन त्याजकडे गेला; त्या वेळीं त्याचा कोप शांत करण्याकरितां सुग्रीवानें तारेला पाठविलें. तिनें लक्ष्मणाशीं भाषण करितांना सुग्रीवाची त्या वेळीं दिसणारी विलासपरता साह-जिक आहे असें सांगितलें व त्याचे समर्थनार्थ " घृताची अप्सरेच्या ठिकाणीं आसक्त झालेल्या विश्वामित्राला दहा वर्षें एका दिवसाप्रमाणें वाटलीं " + असा दृष्टांत दिला आहे.

## अनुल्हाद व इंद्राणी.

इंद्राची स्त्री शची पितृगृहीं असतां तेथें दैत्य अनुल्हाद आला व त्यानें तिच्या पित्याची संमति लबाडीनें मिळविली आणि शचीचा अपहार केला. इंद्राला जेव्हां ही वार्ता कळली तेव्हां इंद्र सत्वर तेथें आला व त्यानें तिचा अपहार करणाऱ्या अनुल्हादाचा व या कामीं संमति देणाऱ्या तिचे पित्याचा वध केला आणि आपली स्त्री परत मिळविली. अशा रीतीनें त्या दैत्यानें शचीचा अपहार करून स्वतांचा नाश मात्र करून घेतला. सुग्रीवानें रामाशीं भाषण करतांना रावणानें केलेल्या सीतेच्या अपहाराला हा मार्मिक दृष्टांत दिला आहे.*

---

+ घृताच्यां किल संसक्तो दश वर्षाणि लक्ष्मण ।
अहोऽमन्यत धर्मात्मा विश्वामित्रो महामुनिः ॥४।३५।७॥

* जहारात्मविनाशाय मैथिलीं राक्षसाधमः ।
वंचयित्वा तु पौलोमीमनुल्हादो यथा शचीम् ॥४।३९।६॥

" अनुल्हादानें ज्याप्रमाणें इंद्राची स्त्री शची हिचा तिचे पित्याला फसवून अपहार केला व स्वतांचा नाश करून घेतला, तसाच स्वतांचे नाशाकरितां त्या राक्षसाधमानें सीतेचा अपहार केला आहे. "

## वामनाचें स्वरूप.

विष्णूनें वामनरूप धारण करून बलिराजाकडे तीन पावलें भूमि मागितली व त्यानें ती देऊं केल्यावर आपलें विशाल रूप प्रकट करून दोन पावलांनीं सर्व त्रैलोक्य व्यापून टाकिलें आणि तिसरें पाऊल त्यानें मस्तकावर ठेवून त्याला पाताळांत घातलें, ही कथा प्रसिद्ध आहे. वामनानें कार्यापुरतें विशालरूप धारण केलें होतें व तें आटोपल्यावर त्यानें पूर्वरूप धारण केलें. मारुतीनें समुद्रोल्लंघन करिते वेळीं विशालरूप धारण केलें होतें व लंकेंत पोंचल्यावर त्यानें पूर्ववत् लहान रूप धारण केलें, हें सांगतांना वामनाचा हा दृष्टांत दिलेला आहे.[1] तसेंच अशा रीतीनें बळीला पाताळीं घाढून असुराकडे गेलेली लक्ष्मी विष्णूनें परत मिळविली हा दृष्टांत सीतेनें अशोकवनिकेंत रावणाला उद्देशून भाषण करितांना दिला आहे, आणि आपला पति आपणास सोडवून परत घेऊन जाईल असें सांगितलें आहे.[2] वामनानें तीन पावलांत त्रैलोक्य व्यापून टाकिलें व हा पराक्रम त्यानें मूर्ति लहान असतां केला. अतिकाय व लक्ष्मण यांचें युद्ध होत असतां अतिकाय लक्ष्मणाला बाल म्हणून त्याची अवहेलना करूं लागला तेव्हां लक्ष्मणानें उत्तर देतांना त्याला वामनाचे वरील पराक्रमाची आठवण दिली आहे.[3]

---

१. तद्रूपमतिसंक्षिप्य हनूमान्प्रकृतौ स्थितः ।
त्रीन्क्रमानिव विक्रम्य बलवीर्यहरो हरिः ॥५।१।२००॥

" सारांश, बलीचें वीर्य हरण करणारा श्रीहरि ज्याप्रमाणें तीन पावलें टाकिल्यावर वृद्धिंगत केलेलें शरीर संकुचित करून राहिला, त्याप्रमाणें हनुमानहि तें आपलें रूप अतिशय संकुचित करून व स्वाभाविक वानररूपाचें अवलंबन करून राहिला. "

२. अपनेष्यति मां भर्ता त्वत्तः शीघ्रमरिन्दमः ।
असुरेभ्यः श्रियं दीप्तां विष्णुस्त्रिभिरिव क्रमैः ॥५।२१।२८॥

" तीन पावलें टाकून ज्याप्रमाणें विष्णूनें दैत्यांपासून उज्वल लक्ष्मी हरण करून नेली, त्याप्रमाणें शत्रूंना जेरीस आणणारा माझा भर्ता तुझ्यापासून मला सत्वर घेऊन जाईल."

३. बालोयमिति विज्ञाय नं चावज्ञातुमर्हसि ।
बालो वा यदि वा वृद्धो मृत्युं जानीहि संयुगे ॥
बालेन विष्णुना लोकास्त्रयः क्रान्तास्त्रिविक्रमैः ॥६।७१।६४॥

## हिरण्यकशिपूची पत्नी कीर्ति.

हिरण्यकशिपूची पत्नी कीर्ति इंद्रानें हरण केली होती; परंतु ती त्यानें नारदाचे द्वारां परत मिळविली, अशी कथा आहे. रावणानें सीतेला उद्देशून जें भाषण केलें, त्यांत त्यानें हा दृष्टांत दिला आहे. मात्र हिरण्यकशिपूनें कीर्ति परत मिळविली तसें रामाला तुला परत नेतां येणार नाहीं, असें तो सांगत आहे. * हिरण्यकशिपूचे पत्नीचें नांव कीर्ति असल्याचें कोठें सांगितलेलें नाहीं; तथापि दृष्टांतांत ती पत्नी असल्याची विवक्षा दिसते. कदाचित् त्याचे पत्नीचें हें दुसरें नांव असेल.

## इंद्र व वृत्र.

वृत्रासुराचा वध इंद्रानें दधीचि ऋषीच्या अस्थींपासून वज्र करवून त्याचा प्रहार त्याजवर करून केला, ही कथा प्रसिद्ध आहे. अशोकवनिकेंत सीतेनें रावणाला उद्देशून जें भाषण केलें, त्यांत हा दृष्टांत आला आहे.' ती म्हणते, " वज्रानें एक हात तुटल्यावर वृत्रासुराचा राहिलेला दुसरा हात ज्याप्रमाणें युद्धामध्यें इंद्राच्या दोन्ही हातांशीं टिकाव धरण्यास समर्थ झाला नाहीं, त्याप्रमाणें त्या रामलक्ष्मणांशीं तुझें युद्ध चालू झालें असतां तुला साहाय्य करणारें तुझें सैन्य टिकाव धरणार नाहीं. "

इंद्रजिताचा वध झाल्यावर ज्या वेळीं रावण क्रुद्ध झाला त्या वेळीं तो जांभया

---

पृ. ४५८ वरून ] " हा बाल आहे असें समजून अवज्ञा करणें तुला योग्य नाहीं. मी बाल असों अथवा वृद्ध असों, संग्रामामध्यें आज तुला माझ्यापासून मृत्यु येणार, हें तूं समजून ठेव; आणि बालरूपी विष्णूनेंच तीन पावलांच्या योगानें तीन लोक व्यापून टाकिले हेंहि तुझ्या लक्षांत असूं दे."

* न चापि मम हस्तात्त्वां प्राप्तुमर्हति राघवः ।
हिरण्यकशिपुः कीर्तिमिंद्रहस्तगतामिव ॥५।२०।२८॥

" इंद्रानें कीर्तीचें हरण केलें असतां हिरण्यकशिपूला ज्याप्रमाणें ती परत मिळवितां आली त्याप्रमाणें माझ्या हातून तुला प्राप्त करून घेण्याचें रामाचे अंगीं सामर्थ्य नाहीं. "

१. तस्य ते विग्रहे ताभ्यां युगग्रहणमस्थिरम् ।
वृत्रस्येन्द्रस्य बाहुभ्यां बाहोरेकस्य विग्रहे ॥५।२१।३२॥

देऊं लागला असतां त्याच्या मुखांतून धूमयुक्त अग्नि बाहेर पडल्याचें वर्णन केलें असून तेथें त्याला वृत्रासुराची उपमा दिलेली आहे.

## पतिव्रता स्त्रिया.

अशोकवनिकेंत राक्षसी सीतेचें मन वळवूं लागल्या असतां तिनें आपण रामाचेंच अवलंबन करून राहणार असें सांगतांना दृष्टांतास्तव कित्येक पतिव्रता स्त्रियांचीं नांवें सांगितलीं आहेत. हीं नांवें (१) सूर्याची सुवर्चला, (२) इंद्राची शची, (३) वसिष्ठांची अरुंधती, (४) चंद्राची रोहिणी, (५) अगस्त्यांची लोपामुद्रा, (६) च्यवनाची सुकन्या, (७) सत्यवानाची सावित्री, (८) कपिलाची श्रीमती, (९) सौदासाची मदयंती, (१०) सागराची केशिनी, व (११) नलाची दमयंती येणेंप्रमाणें अकरा आहेत.

## पाताळांत पृथ्वी.

हिरण्याक्ष नामक असुर पृथ्वीला पाताळांत घेऊन गेला असतां विष्णूनें वराहअवतार धारण करून तिला वर उचलिली व तिच्या पूर्वीच्या स्थळीं स्थिर केली. सीतेनें रामाला मारुतीबरोबर जो संदेश सांगितला त्यांत शेवटीं तिनें पाताळांत गेलेल्या पृथ्वीचा भगवंतांनीं उद्धार केला त्याप्रमाणें रावणाच्या बंदींतून आपली मुक्तता करण्याची विनंती केली आहे.

---

१. कोपाद्विजृंभमाणस्य वक्त्राद्व्यक्तमिव ज्वलन् ।
उत्पपात सधूमाग्निर्वृत्रस्य वदनादिव ॥६।९२।१८॥

२. दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः ।
तं नित्यमनुरक्ताऽस्मि यथा सूर्यं सुवर्चला ॥५।२४।९॥
यथा शची महाभागा शक्रं समुपतिष्ठति ।
अरुन्धती वसिष्ठं च रोहिणी शशिनं यथा ॥१०॥
लोपामुद्रा यथाऽगस्त्यं सुकन्या च्यवनं यथा ।
सावित्री सत्यवन्तं च कपिलं श्रीमती यथा ॥११॥
सौदासं मदयन्तीव केशिनी सगरं यथा ।
नैषधं दमयन्तीव भैमी पतिमनुव्रता ॥१२॥

३. ऊर्ध्वं मासान्न जीवेयं सत्येनाहं ब्रवीमि ते ।

## तारकामय संग्राम.

तारकासुर उन्मत्त होऊन प्रजेला पीडा देऊं लागला असतां शंकरपुत्र कार्तिकेय यानें त्याशीं युद्ध करून त्याचा वध केला. तारकासुराशीं झालेलें हें युद्ध तारकामय संग्राम म्हणून प्रसिद्ध आहे. वानरसेना किष्किंधेहून समुद्राकडे जात असतां ती तारकामय संग्रामांतील देवसेनेप्रमाणें प्रकाशत असल्याचें वर्णन लक्ष्मणानें आपल्या भाषणांत केलें आहे. *

## कपोताचें स्वमांससमर्पण.

पूर्वी एक व्याध अरण्यांत जाऊन व तेथें पांखरें जाळ्यांत धरून त्यांवर आपला निर्वाह करी. तो अत्यंत क्रूर असल्यामुळें त्याच्या बांधवांनीं त्याचा त्याग केला होता व यामुळें तो त्याच्या कुटुंबांत एकटाच राहिला होता. एकदां पांखरें धरण्यासाठीं हातांत जाळें घेऊन तो अरण्यांत संचार करीत असतां एकदम वादळ होऊन मोठी वृष्टि झाली. चोहोंकडे पाणीच पाणी होऊन अरण्यांतील पशुपक्षी त्रस्त होऊन गेले असतां झाडाखालीं थंडीनें कुडकुडत पडलेली एक कपोती त्यानें अवलोकन केली. स्वतां हाहि थंडीनें कांपत होता; तथापि त्याला तिची करुणा न येतां त्यानें तिला आपल्या जाळ्यांत धरिली व पुढें चालला. तेथून त्याचा गांव दूर होता; तेव्हां सायंकाळपर्यंत गांवीं जातां येणार नाहीं असें पाहून त्यानें अरण्यांतच राहाण्याचा विचार केला. पुढें एका मोठ्या वृक्षाखालीं जाऊन तेथेंच राहाण्याचें त्यानें ठरविलें. इतक्यांत सूर्यास्त होऊन आकाश अगदीं निरभ्र झालें. वृक्षाचीं पानें भूमीवर आंथरून त्यानें आपणाकरितां शय्या केली व तीवर तो थंडीनें कुडकुडत पडला. जाळ्यांत

---

पृ. ४६० वरून ] **रावणेनोपरुद्धां मां निकृत्या पापकर्मणा ॥**
**त्रातुमर्हसि वीर त्वं पातालादिव कौशिकीम् ॥५।३८।६५॥**

" महिन्याच्यापुढें मी जिवंत राहणार नाहीं हें मी खरेंखरें सांगून ठेवितें. तस्मात् पातालामध्यें बुडून गेलेल्या पृथ्वीला ज्याप्रमाणें भगवानांनीं तारिलें त्याप्रमाणें हे वीर, दुराचारी रावणानें कपट करून येथें अडकवून ठेविलेल्या मला तूं तार. "

*** व्यूढानि कपिसैन्यानि प्रकाशन्तेऽधिकं प्रभो ।**
**देवानामिव सैन्यानि संग्रामे तारकामये ॥६।४।५५॥**

सांपडलेल्या कपोतीचा पति त्या वृक्षावरच होता, तो आपली स्त्री आली नाहीं तेव्हां तिचा कोठें तरी घात झाला असें समजून विलाप करूं लागला. पतीनें आठवलेले आपले गुण तिनें श्रवण केले व तिला धन्यता वाटली. इतक्यांत वृक्षाखालीं कांपत पडलेल्या व्याधाचें तिला स्मरण झालें व तिनें जाळ्यांतूनच पतीला त्या अतिथीचा सत्कार करण्याविषयीं सुचविलें. त्याप्रमाणें तो कपोत व्याधाकडे आला व त्याची विचारपूस करून त्यानें सुचविल्यावरून प्रथम त्याचेसाठीं त्यानें सुकलेलीं पानें गोळा केलीं व अग्नि आणून तीं पेटवून शेकोटी केली. पुढें त्या व्याधानें क्षुधा लागल्याचें सांगितल्यावरून कपोतानें त्याचे आहाराकरितां स्वतां अग्नींत उडी टाकिली. कपोताची ही धर्मपरायणता पाहून त्या व्याधाला उपरति झाली व त्यानें त्यापुढें आपला क्रूर व्यवसाय सोडून देण्याचा निश्चय केला; आणि पातकांचे निष्कृतीसाठीं सर्व भोगांचा त्याग करून देह शुष्क करण्याचें ठरविलें. त्यानें प्रथम जाळ्यांत धरिलेल्या त्या कपोतीला सोडून दिलें. तिनें अतिथिसत्कारासाठीं पतीनें देहत्याग केल्याचें पाहून स्वतांहि अग्निप्रवेश केला. याप्रमाणें स्वधर्मपरिपालनाचे योगानें तीं दोघें स्वर्गलोकीं गेलीं. इकडे तो व्याध आपल्या निश्चयाला अनुसरून महारण्यांत निघून गेला व तेथें वणव्यांत सांपडून मरण पावला. कपोताची ही कथा महाभारतांतील शांतिपर्वांत ( अध्याय १४३–१४८, कुंभकोण प्रत ) आली असून ती भार्गवमुचकुंद यांचे संवादरूपानें भीष्मांनीं युधिष्ठिराला सांगितलेली आहे. बिभीषणाचा संग्रह करावा का न करावा याविषयीं चर्चा चालली असतां रामानें त्याचा संग्रह करणें अवश्य आहे हें सांगतांना कपोताचा दृष्टांत दिला आहे.*

---

* **श्रूयते हि कपोतेन शत्रुः शरणमागतः ।**
**अर्चितश्च यथान्यायं स्वैश्च मांसैर्निमंत्रितः ६।१८।२४॥**
**स हि तं प्रतिजग्राह भार्याहर्तारमागतम् ।**
**कपोतो वानरश्रेष्ठ किं पुनर्मद्विधो जनः ॥२५॥**

" आपल्या निवासस्थानासमीप आलेल्या शत्रूचेंहि कपोतानें योग्यरीतीनें पूजन केलें व भक्षणाकरितां स्वतांचें मांस समर्पण करून तें स्वीकारण्याविषयीं त्याची प्रार्थना केल्याची एक कथा आहे. हे वानरश्रेष्ठा, भार्या हरण करणारा व्याध आला असतांहि जर

आणि गंमत ही कीं, रामायणांतील दृष्टांतविषयक श्लोक व महाभारतांतील कथेच्या उपक्रमाचा श्लोक हे बहुतेक अगदीं सारखे आहेत. अर्थात् रामायणकालीं ही कथा चांगली प्रचलित होती व यामुळें कपोताचा दृष्टांत ऐकतांच वक्त्याचा आशय श्रोत्याला पटला आणि त्यानें, युधिष्ठिरानें भीष्मांला ती कथा सविस्तर सांगण्याविषयीं ज्याप्रमाणें विनंति केली त्याप्रमाणें केली नाहीं. महाभारतानें त्या वेळीं लोपत चाललेल्या कथांचा अशा रीतीनें संग्रह करून केवढी कामगिरी बजाविली आहे, तें यावरून कळून येईल.

## शंकर व अंधकासुर.

शंकरांची स्त्री पार्वती, तिचा अपहार करण्यास अंधक नामक असुर उद्युक्त झाला असतां शंकरांनीं त्याला आपल्या गणामध्यें स्थान दिलें. अंगद व इंद्रजित् यांचें युद्ध झालें त्याचें वर्णन करितांना या युद्धाची उपमा रामायणांत दिलेली आहे.[1]

## इंद्र व नमुचि.

नमुचि नामक असुराशीं युद्ध करून इंद्रानें त्याचा वध केला. मारुतीचें अकंपनाशीं युद्ध झालें त्याचें वर्णन करितांना हातांत वज्र घेऊन नमुचीवर चालून गेलेल्या इंद्राप्रमाणें मारुती अकंपनावर धांवला, अशी उपमा दिलेली आहे.

## इंद्र व शंबर.

शंबर नामक दनुपुत्र असुराचा इंद्रानें वध केला. कुंभकर्णाचा वध झाल्यावर रावण चिंताग्रस्त झाला असतां त्रिशिरा युद्धार्थ बाहेर पडला. या वेळीं त्यानें भाषण करितांना " इंद्रानें मारिलेल्या शंबरासुराप्रमाणें माझ्या हातून राम वध

---

पृ. ४६२ वरून ] कपोतानें त्याचें आदरातिथ्य केलें तर माझ्यासारख्या पुरुषानें याचा आदर कसा बरं करूं नये ? "

१. अंगदेनेन्द्रजित्सार्धं वालिपुत्रेण राक्षसः ।
अयुध्यत महातेजास्त्र्यंबकेण यथाऽन्धकः ॥६।४३।६॥

" त्रिलोचन शंकरासहवर्तमान ज्याप्रमाणें अंधकासुरानें युद्ध केलें त्याप्रमाणें महातेजस्वी इंद्रजित् राक्षस वालिपुत्र अंगदाशीं युद्ध करूं लागला. "

२. ततस्तमभिदुद्राव राक्षसेन्द्रमकम्पनम् ।
पुरा हि नमुचिं संख्ये वज्रेणेव पुरन्दरः ॥६।५६।१७॥

पावून शयन करील" अशी उपमा दिली आहे. इंद्र व शंबर यांमधील युद्धाची उपमा सुग्रीवानें कुंभ राक्षसाला उद्देशून केलेल्या भाषणांतहि आली आहे.

## विष्णु व नरकासुर.

नरक हा एक दनुपुत्र असुर होता. याचा वध विष्णूनें केला. त्रिशिरा राक्षसानें रावणाला उद्देशून भाषण केल्याचें जें मागील कथेंत सांगितलें आहे, तींतच हा दृष्टांत आला आहे. ( ६।६९।७ )

## त्रिपुरगोपुर.

मयासुरानें देवदैत्यांचा संग्राम होऊन दैत्यांचा पराभव झाल्यावर ब्रह्मदेवाचा वर संपादन करून अभेद्य अशीं तीन फिरतीं पुरें निर्माण केलीं; व या तीन पुरांचें आधिपत्य तीन असुरांकडे दिलें. पुढें राक्षस उन्मत्त होऊन त्रैलोक्याला पीडा होऊं लागली असतां शंकरानीं तीन पुरें फिरतां फिरतां समसूत्रांत येण्याचा समय साधून बाण सोडिला व त्यांचा नाश केला. अतिकायावर लक्ष्मणानें बाणांचा प्रहार केला असतां तो कांपूं लागल्याचें सांगतांना शंकरांचे बाण लागून ताडित झालेल्या त्रिपुराचे गोपुराची उपमा दिली आहे.

## इंद्रकृत मुनिवध.

त्वष्टा नामक प्रजापतीचा विश्वरूप म्हणून एक पुत्र होता. याला तीन मुखें असून तो एकानें सोमपान, दुसऱ्यानें सुरापान व तिसऱ्यानें वेदाध्ययन

---

१. **शम्बरो देवराजेन नरको विष्णुना यथा।**
**तथाऽद्य शयिता रामो मया युधि निपातितः ॥६।६९।७॥**

२. **महाविमर्दे समरे मया सह तवाद्भुतम् ।**
**अद्य भूतानि पश्यन्तु शक्रशम्बरयोरिव ॥६।७६।७७॥**

"यास्तव, इंद्र व शंबर ह्यांमध्यें झालेल्या महायुद्धाप्रमाणें माझ्यासहवर्तमान समरांगणामध्यें होणारें तुझें अद्भुत महायुद्ध आज प्राणी अवलोकन करोत."

३. **राक्षसः प्रचकम्पेऽथ लक्ष्मणेषुप्रपीडितः ।**
**रुद्रबाणहतं घोरं यथा त्रिपुरगोपुरम् ॥६।७१।७५॥**

"तदनंतर रुद्राच्या बाणानें ताडित झालेल्या त्रिपुरासुराच्या घोर गोपुराप्रमाणें लक्ष्मणाच्या बाणानें ताडित झालेला तो राक्षस कांपूं लागला."

करीत असे. बृहस्पति एकदां बाहेर गेले असतां इंद्रानें याला पौरोहित्य दिलें व तो यज्ञ करूं लागला. विश्वरूपाची माता दैत्यांची भगिनी व यामुळें त्याचा मातुलकुलाकडे साहजिक ओढा होता. इंद्राच्या यज्ञांत हा गुप्तपणें दैत्यांना हविर्भाग देऊं लागला. कांहीं कालानें शोध करितां करितां इंद्राला हें कपट उमगलें व त्यानें तत्काळ त्याचा वध केला. इंद्रानें विश्वरूपाचा वध करून मग आपले यज्ञ केले. इंद्रजितानें मायामय सीतेचा वध केल्याचें रामाला कळविलें असतां तो निराश झाला, तेव्हां लक्ष्मणानें सांत्वनपर भाषण करितांना धर्म व पुरुषप्रयत्न यांच्या श्रेष्ठते व कनिष्ठतेविषयीं जें निरूपण केलें त्यांत इंद्राच्या या वागणुकीचा दृष्टांत आला आहे. *

## अमृतमंथन.

देव आणि दैत्य यांनीं अमृताकरितां सागराचें मंथन केल्याची कथा प्रसिद्ध आहे. या वेळीं त्यांनीं मंदरपर्वताची मंथ्याचे स्थानीं योजना केली होती. रावण क्रोधानें दांत चावूं लागला, तेव्हां त्याचा ध्वनि समुद्राचें मंथन करिते वेळीं मंथा दोहोंकडे ओढला जात असतां झालेल्या ध्वनीप्रमाणें ऐकूं येऊं लागल अशी उपमा आली आहे. ×

## अष्टावक्र व कहोल.

अष्टावक्र हा कहोल ऋषीचा पुत्र. हा गर्भांत असतां पिता अध्ययनाची आवृत्ति करीत होता ती ऐकून यानें गर्भांतूनच पित्याला " अद्यापि तुम्हांला

---

* यदि धर्मो भवेद् भूत अधर्मो वा परंतप ।
न स्म हत्वा मुनिं वज्री कुर्यादिज्यां शतक्रतुः ॥६।८३।२९॥

" हे शत्रुतापना, धर्म अथवा धर्माहून अन्य असलेला पुरुषप्रयत्न जर मुख्य असता तर विश्वरूपसंज्ञक मुनीचा वध करून वज्रपाणि इंद्राला अश्वमेधरूप धर्म करण्याचें कारण पडलें असतें."

× दन्तान्विदशतस्तस्य श्रूयते दशनस्वनः ।
यन्त्रस्याकृष्यमाणस्य मथ्नतो दानवैरिव ॥६।९२।२३॥

" तो दांत खाऊं लागला असतां त्याच्या दातांचा ध्वनि समुद्रमंथनसमयीं दानवें आकर्षण करीत असलेल्या मंदर पर्वतरूप मंथनयंत्राच्या ध्वनीप्रमाणें ऐकूं येऊं लागला."

आवृत्ति करावी लागते काय ?" असा प्रश्न केला; हें ऐकून पित्यानें क्रुद्ध होऊन त्याला "आठ ठिकाणीं वक्र होशील" असा शाप दिला. या शापास अनुसरून तो तसा उपजला आणि त्याच्या आकृतीला अनुसरून त्याला अष्टावक्र असें नांव मिळालें. हा लहान असतां वरुणाचा पुत्र बंदी यानें कहोलास वादांत जिंकून उदकांत बुडविलें; तेव्हां याची माता सुजाता पुत्राला घेऊन तिचा पिता उद्दालक म्हणून ऋषि होता त्याजकडे आली. अष्टावक्र जाणता झाल्यावर त्याला पित्याचें वर्तमान कळलें. तेव्हां वरुणपुत्र बंदी ऐंद्रद्युम्नि नामक जनक राजाकडे होता त्याजकडे गेला आणि त्यानें त्याला वादांत जिंकलें. बंदीनें वादांत जिंकून पुष्कळ ब्राह्मण उदकांत बुडविले होते, तथापि त्यांना अशा रीतीनें त्यानें आपल्या पित्याकडे यज्ञाकरितां पाठविलें होतें. वादांत हरल्यावर बंदीनें ही वस्तुस्थिति अष्टावक्रास सांगितली आणि त्या वेळीं यज्ञ समाप्त व्हावयास झाला असल्यामुळें त्यानें पिता परत येईपर्यंत त्याला राहून घेतलें. पुढें कहोळ लवकरच परत आला. जनकानें उभयतां पितापुत्रांचा सत्कार केला. पित्याला पुत्राचा पराक्रम कळून संतोष झाला व ते परत येऊं लागले असतां मार्गांत त्यानें एका नदींत पुत्राला स्नान करावयास सांगून त्याचा देह सरळ केला. येथें अष्टावक्रानें ज्याप्रमाणें पित्याचा उद्धार केला त्याप्रमाणें रामानें आपला उद्धार केला अशी उपमा युद्धसमाप्तीनंतर सीतेनें दिव्य केल्या वेळीं तेथें देवांबरोबर आलेल्या दशरथानें केलेल्या भाषणांत आली आहे. जनकाचे वंशावलीमध्यें या राजाचें नांव आढळत नाहीं. ही कथा महाभारतांतील वनपर्वांत आली आहे. *

---

* **तारितोऽहं त्वया पुत्र सुपुत्रेण महात्मना ।**
**अष्टावक्रेण धर्मात्मा कहोलो ब्राह्मणो यथा ॥६।११९।१६॥**

"सारांश, धर्मात्म्या कहोल ब्राह्मणाचा ज्याप्रमाणें त्याच्या अष्टावक्रसंज्ञक पुत्रानें उद्धार केला, त्याप्रमाणें हे पुत्रा, तूं महात्म्या सत्पुत्रानें माझा उद्धार केला आहेस."

# परिशिष्ट—आ.
## रामायणांतील वाक्प्रचार.

कोणत्याहि वाङ्मयाला त्यांतील वाक्प्रचार भूषणभूत असतात. भाषेचा प्रसार ज्या मानानें असतो त्या मानानें वाक्प्रचार अधिक असतात व ती प्रचलित असतां दिवसानुदिवस त्यांची अभिवृद्धि होत असते. कित्येक वाक्प्रचारांचा आशय सरळ असतो व सहज कळतो; पण कित्येकांचा आशय सांकेतिक असतो व यामुळें ती भाषा नित्य बोलणाऱ्या लोकांना मात्र तो कळतो. प्राचीन संस्कृत वाङ्मयांतील कित्येक वाक्प्रचार दुर्बोध होण्याचें कारण हेंच होय. रामायणांतील कित्येक पात्रांच्या भाषणांतून कांहीं वाक्प्रचार मधून मधून आले आहेत व त्यांचा संग्रह येथें केला आहे.

१ लक्ष्मण राज्य स्वतां बळकावण्याचा उपदेश रामाला करितांना म्हणतो:—

... .. ............... .......मृदुर्हि परिभूयते ॥२।२१।११॥

"नरमपणा असला कीं त्याचा नाश व्हावयाचा ( हें निश्चित )" किंवा "मऊ सांपडलें कीं लोक कोपरानें खणूं लागतात."

२ राम वनवासाला निघण्यापूर्वी राजवाड्यांत त्याविषयीं चर्चा चालली असतां सुमंत्र सारथ्यानें कैकेयीच्या मातेच्या आग्रही स्वभावाविषयीं एक गोष्ट सांगितली व तिची कन्या कैकेयी मातेच्या वळणावर गेली असा अभिप्राय त्यानें बोलून दाखविला. या गोष्टीचा उपक्रम करितांना तो म्हणतो:—

**न हि निंबात् स्रवेत् क्षौद्रं लोके विगदितं वचः ॥२।३५।१७॥**

"कडुलिंबाच्या झाडांतून कधीं मधाचा स्राव होत नाहीं." अशी लोकांत म्हणच आहे.

३ सुमंत्राच्या वरील भाषणांत तो पुढें म्हणतो:—

**सत्यश्चात्र प्रवादोऽयं लौकिकः प्रतिभाति माम् ।**
**पितॄन् समनुजायन्ते नरा मातरमंगनाः ॥२।३५।२८॥**

"पुरुष पित्याच्या व स्त्रिया मातेच्या वळणावर जातात, अशी जी लोकांत म्हण आहे तिची सत्यता ( तुझें आचरण पाहून ) मला अगदीं बरोबर पटली."

४ रामाला परत आणण्याकरितां गेलेला भरत चित्रकूटावर रामाची गांठ पडल्यावर त्याशीं भाषण करितांना म्हणतोः—

**अंतकाले हि भूतानि मुह्यन्तीति परा श्रुतिः ।**
**राज्ञैवं कुर्वता लोके प्रत्यक्षा सा श्रुतिः कृता ॥२।१०६।१३॥**

" अंतकालीं सर्व प्राण्यांला मोह होतो, अशी पुरातन श्रुति आहे व राजानें अशा प्रकारें आचरण करून लोकांना तिचा प्रत्यय आणून दिला. "

५ पंचवटींत राहात असतां एकदां गोदावरीवर स्नानासाठीं जातांना लक्ष्मण भरताविषयीं प्रशंसा करीत म्हणतोः—

**न पित्र्यमनुवर्तन्ते मातृकं द्विपदा इति ।**
**ख्यातो लोकप्रवादोऽयं भरतेनान्यथा कृतः ॥३।१६।३४॥**

" द्विपादप्राणी ( मनुष्य ) पित्याचें अनुकरण न करितां मातेचें करितात, अशी जी लोकांत म्हण प्रसिद्ध आहे, ती भरतानें खोटी केली. "

६ जटायु मृत झाल्याचें पाहून राम शोक करितांना म्हणतोः—

**..........................कालो हि दुरतिक्रमः ॥३।६८।२१॥**

" कालाचें अतिक्रमण करणें एकंदरींत कठीण आहे. "

हें वचन कबंध रामाला उद्देशून भाषण करीत असतां त्याचे तोंडीं, ( ३। ७२।१६ ) तसेंच अशोक वनिकेंत सीतेकडे पाहून मारुतीचे तोंडीं आलें आहे. ( ५।१६।३ ).

७ सीतेला अशोकवनामध्यें राक्षसी त्रास देऊं लागल्या असतां शोक करीत ती म्हणतेः—

**लोकप्रवादः सत्योऽयं पंडितैः समुदाहृतः ।**
**अकाले दुर्लभो मृत्युः स्त्रिया वा पुरुषस्य वा ॥५।२५।१२॥**

" स्त्रीला काय किंवा पुरुषाला काय वेळ भरल्यावांचून मृत्यु येणें कठीण अशी जी म्हण पंडित सांगतात ती अगदीं खरी आहे. "

८ मारुतीकडून रामलक्ष्मणांचें कुशल कळल्यावर आनंदित होऊन सीता म्हणतेः—

**कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति माम्।**
**एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ॥५।३४।६॥**

"मनुष्य जिवंत असला तर शंभर वर्षांनीं तरी त्याला आनंदाचे दिवस येतील अशी जी लोकांमध्यें म्हण आहे ती खरोखर कल्याणकारक आहे."

राम परत येत असल्याचें शुभवर्तमान मारुतीनें नंदिग्रामीं भरताला सांगितलें असतां त्यानेंहि या म्हणीचा उच्चार केला आहे. (६।१२६।२)

९ मारुती व सीता यांचा संवाद झाल्याचें कळल्यावर राक्षसी तिला त्या-विषयीं माहिती विचारूं लागल्या असतां ती आपल्याला माहीत नसल्याचें सांगत सीता म्हणते:—

**अहिरेव अहेः पादान् विजानाति न संशयः ॥५।४२।९॥**

"सापाचीं पावलें सापाला निःसंशय कळतात." (तेव्हां मला त्याची माहिती कशानें असणार?)

१० सीता परत देण्याचा उपदेश माल्यवान् करूं लागला असतां रावणानें तसें करण्याचें नाकारतांना, कोणाशीं नमतें घेण्याचें आपणास माहीत नाहीं, असें सांगत तो म्हणतो:—

**द्विधा भज्येयमप्येवं न नमेयं तु कस्यचित्।**
**एष मे सहजो दोषः स्वभावो दुरतिक्रमः ॥६।३६।११॥**

"प्रसंगीं फाटून माझ्या चिरफळ्या होतील, पण मी कोणाशीं नम्रपणें वागणार नाहीं. हा माझा स्वाभाविक दोष आहे आणि स्वभाव तर पालटतां येणें अशक्य आहे."

यांतील पूर्वार्धाप्रमाणेंच एक वचन (अपि पर्वणि भज्येत न नमेतेह कस्य-चित्) महाभारतांतील विदुलोपदेशांत आहे.

११ मंदोदरी रावणवधानंतर विलाप करितांना म्हणते:—

**प्रवादः सत्यमेवाऽयं त्वां प्रति प्रायशो नृप।**
**पतिव्रतानां नाऽकस्मात् पतन्त्यश्रूणि भूतले ॥६।१११।६७।**

"हे राजा, पतिव्रतांचे अश्रु (कांहीं तरी अनर्थ ओढवल्यावांचून) सहजा-सहजीं भूतलावर पडत नाहींत अशी लोकांत जी म्हण आहे, ती तुझ्याकडे पाहतां खरी ठरली आहे."

## परिशिष्ट-इ.

## संस्कृत भाषेंतील रामायणें.



संस्कृत भाषेंतील रामायणांविषयीं माहिती देऊन त्यांचें समालोचन "रामायणाचे अवतार" या भागांत साकल्यानें केलें आहे; तथापि रामचरित्रविषयक सर्व ग्रंथांची माहिती-कांहीं ग्रंथ आम्हांला मिळाले नाहींत व कांहींचें आम्हांला तादृश महत्त्व वाटलें नाहीं, यासाठीं-यांत आली आहे, असें म्हणतां येत नाहीं. शेट गोवर्धनदास लक्ष्मीदास यांनीं प्रकाशित केलेल्या "आनंदरामायणा" चे प्रतींत संस्कृतभाषेंतील रामायणांची एक यादी दिली आहे. हा संग्रह संपादकांनीं कोणत्या ग्रंथांचे आधारें केला, हें तेथें सांगितलेलें नाहीं व यावरून तो त्यांचा स्वतांचा प्रयत्न असावा, असें वाटतें. यांतील कित्येक रामायणें कोणत्या ग्रंथांतील आहेत हें नांवांवरून व्यक्त होतें, तर कित्येकांविषयीं कांहीं माहिती मिळत नाहीं किंवा अनुमानितां येत नाहीं; तथापि संग्रह या दृष्टीनें त्यांचा येथेंहि संग्रह केला आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १ वाल्मीकि रा. | १५ क्रौंच रा. | २९ बिभीषण रा. | ४३ अंबिका रा. |
| २ योगवासिष्ठ रा. | १६ भरत रा. | ३० आनंद रा. | ४४ अवधूत रा. |
| ३ अध्यात्म रा. | १७ जैमिनि रा. | ३१ व्यासोक्त रा. | ४५ आचार्य रा. |
| ४ हनुमद् रा. | १८ आत्मधर्म रा. | ३२ शुक रा. | ४६ औशनस् रा. |
| ५ नारद रा. | १९ श्वेतकेतु रा. | ३३ शेष रा. | ४७ ईश्वर रा. |
| ६ लघु रामायण. | २० जटायु रा. | ३४ आगम रा. | ४८ कपिल रा. |
| ७ बृहद् रा. | २१ रवि रा. | ३५ कूर्म रा. | ४९ कलि रा. |
| ८ अगस्त्य रा. | २२ पौलस्ति रा | ३६ स्कंद रा. | ५० कालिका रा. |
| ९ सार रा. | २३ देवी रा. | ३७ अरुण रा. | ५१ कुमार रा. |
| १० देह रा. | २४ गुह्यक रा. | ३८ पद्म रा. | ५२ गणेश रा. |
| ११ वृत्त रा. | २५ मंगल रा. | ३९ धर्म रा. | ५३ गरुड रा. |
| १२ ब्रह्म रा. | २६ विश्वामित्र रा. | ४० आश्चर्य रा. | ५४ चंपू रा. |
| १३ भारद्वाज रा. | २७ सुतीक्ष्ण रा. | ४१ अद्भुत रा. | ५५ जैन रा. |
| १४ शिव रा. | २८ सुग्रीव रा. | ४२ अत्रि रा. | ५६ जांबुवंत रा. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५७ दुर्वासस् रा. | ६६ ब्रह्मवैवर्तक रा. | ७५ मानव रा. | ८३ वायु रा. |
| ५८ नंदि रा. | ६७ ब्रह्मांड रा. | ७६ मार्कंडेय रा. | ८४ विष्णु रा. |
| ५९ नल रा. | ६८ भविष्योत्तर रा. | ७७ मारुती रा. | ८५ श्रीरंग रा. |
| ६० नाटक रा. | ६९ भागवत रा. | ७८ मुद्गल रा. | ८६ सनत्कुमार रा. |
| ६१ नील रा. | ७० भार्गव रा. | ७९ लिंग रा. | ८७ वामन रा. |
| ६२ नारसिंह रा. | ७१ भारत रा. | ८० वरद रा. | ८८ स्कंद रा. |
| ६३ पद्म रा. | ७२ मैन्द रा. | ८१ वरुण रा. | ८९ सूर्य रा. |
| ६४ पाराहार रा. | ७३ मरीचि रा. | ८२ वसिष्ठ रा. | ९० हरिवंशीय रामायण. |
| ६५ बकदाल्भ्य रा. | ७४ माहेश्वर रा. | | |

---

## परिशिष्ट-ई.

## लंकेचें स्थान,-सुमात्राद्वीपाशीं.

लंकेच्या स्थानाविषयीं चर्चा करितांना निरनिराळ्या मतांविषयीं पूर्वीं आम्हीं विचार केला आहे. परंतु सुमात्राद्वीपाशीं लंकेचें स्थान असावें ही कल्पना तोंपर्यंत पुढें आली नसल्यामुळें आम्हांला त्याविषयीं कांहीं विचार करावा लागला नाहीं. ही कल्पना अलीकडे प्रो. अधिकारी यांनीं पुढें आणिली असून तद्विषयक त्यांचा लेख "इंडियन् नॅशनल हेरल्ड" च्या एका अंकांत नुक्ताच प्रसिद्ध झाला आहे. लेखाचा नामनिर्देश करितांना त्यांनीं प्रस्तुतचें सिंहलद्वीप हीं पूर्वींची लंका नसून सुमात्राद्वीप हीच पूर्वींची लंका असावी असें सांगितलें व लंका सुमात्राद्वीपाशीं कोठें तरी असावी असा लेखाचा उपसंहार केला आहे. अशा रीतीनें त्यांच्या मनांत अनिश्चितता दिसत असली तरी त्यांनीं पुढें आणिलेलीं प्रमाणें न पाहतां सोडून देतां येत नाहींत व यासाठीं त्यांविषयीं आतां विचार करूं.

प्रो. अधिकारी यांचा लेख लहान आहे, पण त्यांत विशेष विवेचन न करितां क्रमानें निरनिराळीं प्रमाणें दिलीं आहेत व शेवटीं त्या सर्व प्रमाणांचा सारांश सांगून वरीलप्रमाणें निष्कर्ष काढिला आहे. त्यांनीं पुढें आणिलेल्या प्रमाणांपैकीं बहुतेकांविषयीं, यापूर्वीं लंकेच्या स्थानाविषयीं विवेचन करितांना या ग्रंथांत विचार केलेला आहे व या दृष्टीनें त्यांत अपूर्णता राहिलेली नाहीं. तथापि त्या

प्रमाणांवरून निघालेल्या सिद्धांतांत भेद दिसून आल्यामुळें त्यांविषयीं संक्षेपतः तरी निर्देश करून विचार करणें भाग आहे. रामायणांत हिंदुस्थानापासून लंका शंभर योजनांवर सांगितलेली असून रामाचा सेतु शंभर योजनें सांगितलेला आहे व प्रस्तुतचें सुमात्राद्वीप हिंदुस्थानापासून ८०० मैलांवर असल्यामुळें रामायणोक्त अंतराची संगति लागत आहे. प्रो. अधिकारी यांनीं हें प्रमाण महत्त्वाचें म्हणून पुढें केलें आहे. लंकेच्या स्थानाविषयीं विचार करितांना रामायणाचा अधिकार त्यांनीं पूर्णपणें मान्य केलेला आहे. परंतु त्यांनीं पुढें आणिलेल्या प्रमाणांत याखेरीज इतर सर्व प्रमाणें रामायणाबाहेरचीं आहेत, ही मौज आहे. प्रस्तुतचें सिंहलद्वीप ही पूर्वींची लंका मानिली तर रामायणोक्त अंतराची संगति लागत नाहीं हें खरें आहे. तथापि मधील अंतराचे निर्देश ज्या कालीं करण्यांत आले त्या कालीं हे निर्देश स्थूलमानानें करण्यांत आले असल्यामुळें अगदीं हात घालून मोजतां नये हें पूर्वीं आम्हीं सांगितलें आहे व रामायणोक्त इतर वर्णनाची संगति लागल्यावर ही संगति लागली नाहीं म्हणून त्याचें तादृश्य महत्त्वहि राहात नाहीं.

सुमात्राद्वीपांत पूर्वीं काळ्या रानटी लोकांची वस्ती होती व या लोकांना "राक्क" ( Rakka ) असें म्हणत असत. राक्षस या संस्कृत शब्दाचा "राक्क" हा अपभ्रंश असावा, असा प्रो. अधिकारी यांचा तर्क आहे. या द्वीपांतील एका नगरीचें नांव "लरांतक" ( Larantak ) असें असून तो "नरांतक" शब्दाचा अपभ्रंश असावा असें प्रो. अधिकारी म्हणतात. नरांतक हा रावणाचा एक सेनापति असल्याचें प्रसिद्ध आहे. याच द्वीपांत समुद्राला लागून "सोमिलंका" ( Somilanka ) अथवा "सामलंगा" (Samlanga) या नांवाचें मोठें शहर असून हा "सुवर्णलंका" शब्दाचा अपभ्रंश असला पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. लंकेंत सुवर्णाचें वैपुल्य असल्याचें रामायणांत सांगितलेलें असून त्याचा अनुभव सुमात्राद्वीपांत अद्यापि येतो अशी आणखी माहिती प्रो. अधिकारी यांनीं स्वमतपुष्ट्यर्थ दिली आहे. प्रो. अधिकारी यांचे वरील सर्व तर्क संभवनीय आहेत. परंतु असलीं प्रमाणें गौण होत, हें विसरतां नये. रामायणांतील वर्णनावरून लंकेचें स्थान निश्चित झाल्यावर असल्या प्रमाणांनीं त्याला बाध येणार नाहीं. श्री. किबेसाहेबांनीं

मध्यहिंदुस्थानांत लंकेचें स्थान ठरवितांना अशीं पुष्कळ प्रमाणें पुढें आणिलीं आहेत. फार कशाला, खटपट केली तर हिंदुस्थानाबाहेर युरोपांतहि कोठें-तरी असलें नामसादृश्य शोधून काढितां येईल ! सुमात्राद्वीपांत "राक्का" नामक रानटी लोकांची वस्ती पूर्वीं होती व हा शब्द राक्षस शब्दापासून झाला, असें जें प्रमाण प्रो. अधिकारी यांनीं पुढें केलें आहे, तें किती विलक्षण आहे ? राक्षस हे रानटी लोक होते, अशी भावना या कल्पनेच्या मुळाशीं आहे; पण रामायणां-तील वर्णनावरून ही भावना कशी चुकलेली आहे, हें आम्हीं स्वतंत्र प्रकरणांत दाखविलें आहे. तेव्हां राक्का या रानटी लोकांचे वस्तीचा रामायणांतील राक्ष-सांशीं संबंध जोडण्यांत अर्थ काय ?

भास्कराचार्यांच्या ग्रंथांत रावणाचे लंकेविषयीं एक-दोन उल्लेख आहेत व त्यांवरून प्रो. अधिकारी यांना आलेली शंका खरी आहे; तथापि त्या शंकेचा परिहार कशा रीतीनें करावयाचा, हें आम्हीं पूर्वीं दाखविलें असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

प्रो. अधिकारी यांचें मुख्य व प्रथमचें प्रमाण वायुपुराणांतील असून, ही कल्पना त्यांना त्यावरून सुचली असावी, असें एकंदरींत दिसतें. वायुपुराणांत लंकापुरी मलयद्वीपांत असल्याचें सांगितलें असून सध्यांचें मलायाद्वीपकल्प हेंच पूर्वींचें मलयद्वीप असा प्रो. अधिकारी यांचा तर्क आहे. वायुपुराणांतील हें अवतरण लंकाविषयक चर्चेच्या प्रसंगीं आम्हीं घेतलें आहे, तें वाचकांनीं येथें अवश्य पहावें. मात्र या अवतरणांतील निर्देशावरून तेथें सध्यांचें 'मालदीव' विवक्षित असावें, अशी कित्येकांची कल्पना आहे व तीवरून त्यांनीं लंका-पुरीचें स्थान मालदीव बेटांत असावें, असें ठरविलें आहे. वायुपुराणांतील हा निर्देश कसा चुकीचा आहे, हें आम्हीं तेथें दाखविलें आहे. तेथें मलयद्वीप शब्दानें मालदीव विवक्षित असावें, अशी जी कल्पना आहे, ती मात्र सयुक्तिक आहे. "मलय" व "मलाया" या दोन शब्दांत सादृश्य दिसतें. यावरून प्रो. अधिकारी यांचा तर्क अधिक संभवनीय वाटतो; परंतु वायुपुराणांत मलय-द्वीपाचें वर्णन करितांना पुढें जो एक श्लोक दिलेला आहे, त्यावरून

त्याचें स्थान निश्चित करितां येतें व त्यावरून हा श्लोक ढांसळून पडतो. पुढील श्लोक पहा:--

**तस्य** ( मलय ) **द्वीपस्य वै पूर्वे तीरे नदनदीपतेः ।**
**गोकर्णनामधेयस्य शंकरस्यालयं महान्** ॥ ४८।३० ॥

" त्या ( मलय ) द्वीपाचे पूर्वेला समुद्राचे तीरीं गोकर्णनामक शंकराचें मोठें स्थान आहे. "

मलयद्वीपाचे पूर्वेला गोकर्ण म्हणजे गोकर्णाचे पश्चिमेला मलयद्वीप हें उघड आहे. गोकर्णाचें स्थान निश्चित आहे व त्याचे पश्चिमेला-थेट नसलें तरी त्या दिशेला-मालदीवच येतें; मलायाद्वीपकल्प तर उलट त्याचे पूर्वेला आहे. तेव्हां मलायाद्वीपकल्पांतील सुमात्रा ही लंका असावी, ही कल्पना वायुपुराणांतील निर्देशावरून निष्पन्न होणें शक्य नाहीं.

दुसरें असें कीं, सुमात्राद्वीप हिंदुस्थानच्या थेट दक्षिणेला नसून आग्नेयीला आहे, व रामायणांतील लंका हिंदुस्थानच्या थेट दक्षिणेला सांगितलेली * आहे. सुमात्राद्वीपाच्या पश्चिमेकडील भाग डोंगराळ असून त्यांत पुष्कळ ज्वालामुखी आहेत. रामायणांतील लंकेच्या उत्तरेकडील भागांत मोठे पर्वत असल्याचें सांगितलेलें आहे व तें या कल्पनेला बाधक आहे. लंकेंत एकहि ज्वालामुखी असल्याचें रामायणांत वर्णन नाहीं, तेव्हां कांहीं शब्दांतील सादृश्यावरून लंकेचें स्थान सुमात्राद्वीपापर्यंत कसें लांबवितां येणार ?

## परिशिष्ट-उ.

## आदिरामायण अथवा रामायणाची मूळ प्रत.

रामायणाच्या ज्या दोन प्रती सध्यां उपलब्ध आहेत त्यांविषयीं " संकीर्ण विवेचन " करितांना एके स्थळीं थोडी माहिती दिली आहे; व त्या निमित्तानें ह्यासंबंधीं आपलें मत व्यक्त केलें आहे. या विषयावरील एक चर्चात्मक निबंध

* Nelson's Encyclopædia, पु. २१, पृ ४२०.

अमेरिकेंतील येल युनिव्हर्सिटीमधील प्रो. ई. वॉशबर्न हॉपकिन्स * यांनीं लिहिलेला नुकताच पहाण्यांत आला. या निबंधांत रामायणाच्या प्रतींची तुलना करून कोणती प्रत मूळ असावी याविषयींची चर्चा केलेली आहे. ही तुलना करितांना त्यांनीं मुंबईप्रत व गौडप्रत या दोन प्रतींबरोबर तिसरी "पश्चिमोत्तर शाखीय" प्रत घेतली आहे. लाहोर येथील दयानंद-महाविद्यालयाकडून प्रसिद्ध झालेल्या ज्या एका प्रतीचा आम्हीं रामायणाच्या प्रतींविषयीं माहिती देतांना शेवटीं उल्लेख केला आहे व जिला अन्य प्रसंगीं लाहोरप्रत असें म्हटलें आहे, ती हीच होय. प्रो. हॉपकिन्स यांनीं आपल्या लेखांत या प्रतीविषयीं "पश्चिमोत्तरशाखीय" इतकाच उल्लेख केला आहे; तथापि त्यांनीं केलेला व लाहोर-प्रतीवर असलेला हा निर्देश एक असल्यामुळें त्यांनीं चर्चेकरितां घेतलेली प्रत लाहोरप्रत होय, यांत शंका नाहीं. गौडप्रत आम्हांला पाहाण्यालाहि मिळालेली नाहीं व लाहोरप्रतीचे अयोध्याकांडांतील कांहीं सर्ग आमचे हातीं आले आहेत; त्यामुळें तुलना करण्याइतकी अनुकूलता आमचेपाशीं नाहीं, हें उघड आहे. लाहोरप्रत गौडप्रतीवरून छापिली जात असावी असें या साधनाच्या अभावीं आमचें अनुमान होतें व तसें आम्हीं तेथें लिहिलें होतें; परंतु प्रो. हॉपकिन्स यांनीं तुलना करितांना जीं अवतरणें दिलीं आहेत त्यांवरून ती एक स्वतंत्र प्रत असावी, असें लक्षांत आलें. म्हणजे लाहोरप्रतीसुद्धां रामायणाच्या तीन प्रती सध्यां उपलब्ध आहेत, असें निष्पन्न होतें.

रा. रा. अभ्यंकर यांनीं मुंबईप्रतीची गौड प्रतीशीं तुलना केली व जी माहिती दिली तिचा अनुवाद यापूर्वीं आम्हीं केला आहे. प्रो. हॉपकिन्स यांजपुढें तुलना करितांना दोन प्रती समग्र होत्या व लाहोर प्रतीचा कांहीं भाग त्यांना मिळाला होता असें त्यांनीं लिहिलें आहे. लाहोर प्रत त्यांचे हातीं किती आली होती हें त्यांनीं येथें स्पष्ट लिहिलेलें नाहीं; तथापि त्यांनीं तुलना करितांना जीं अवतरणें दिलीं आहेत त्यांत त्यांनीं त्या प्रतींतील आमचे हातीं आलेल्या भागापुढील अवतरण एकहि दिलेलें नाहीं, हें येथें लक्षांत घेणें अवश्य आहे.

* हा निबंध "अमेरिकन ओरिएन्टल् सोसायटी"च्या सप्टेंबर १९२६ च्या अंकांत याच नांवानें ( Original रामायण ) प्रसिद्ध झाला आहे.

## गौडप्रत व पश्चिमोत्तरशाखीय प्रत यांची तुलना.

मुंबई प्रतीची गौडप्रतीशीं तुलना करून रा. अभ्यंकर यांनीं कथानकाच्या दृष्टीनें तींत अपूर्वता नसून, भेद आहे पण तो शाब्दिक आहे, असें आपलें मत दिलें आहे. त्यांनीं दोन प्रतींतली बालकांडाची अक्षरशः तुलना केली होती. परंतु पढील कांडांची तुलना केलेली नाहीं व त्यांविषयीं विशेष माहिती दिलेली नाहीं. लाहोरप्रतींतील अयोध्याकांडाचा जो भाग पुढें आला आहे त्यावरून तींत सामान्यतः कथानकाचे दृष्टीनें भिन्नता नसली तरी अपूर्वता आहे असें दिसतें. आतां हा भाग मूळचा असावा का प्रक्षिप्त असावा हा प्रश्न वेगळा आहे व त्याचा आपण मागाहून विचार करूं. मात्र प्रो. हॉपकिन्स यांचे लेखावरून हा भाग गौडप्रतींतहि आहे असें कळून आलें. असो. लाहोर प्रतींतील अयोध्याकांडाचा प्रारंभ--

**कस्यचित्त्वथ कालस्य राजा दशरथः सुतम् ।**

या श्लोकानें झाला असून हा श्लोक मुंबई प्रतींतील बालकांडाचे शेवटच्या सर्गांत १५ वा आहे. विवाहानंतर कांहीं काल गेल्यावर भरत मातुलगृहीं गेला, या कथेचा हा उपक्रम असून त्यानिमित्त राजा दशरथ त्याला बोलावून तिकडे जाण्याची आज्ञा करीत असल्याचें येथें सांगितलें आहे. मुंबईप्रतींतील बालकांडांत यापुढें कांहीं श्लोक आहेत; पण त्यांत विशेष कथा सांगितलेली नाहीं. लाहोरप्रतींत यापुढें भरताला दशरथानें जातेवेळीं केलेला उपदेश, भरताचा नगरप्रवेश, भरताचें अध्ययन, भरताचें दशरथाकडे दूतप्रेषण इतक्या कथा अधिक आहेत. गौडप्रतींतहि या कथा शाब्दिक फेरानें आल्या आहेत. भरत मातुलगृहीं गेल्यावर कांहीं काल गेला व पित्याकडे त्यानें दूत पाठविला, ही कथा दोन प्रतींत कशी सांगितलेली आहे, हें तुलना करून आमचे वाचकांना पाहतां यावें, यासाठीं दोन प्रतींतील अवतरणें प्रथम देऊं.

गौड प्रतः—

**तदास्यऽबुद्धिः संजज्ञे दूतं प्रेषयितुं पितुः ।**
**अथाऽऽहूयाब्रवीद् वृद्धं सुहृदं ब्रह्मवादिनम् ।**
**अयोध्यां गच्छ भद्रं ते त्वरितो जवनैर्हयैः ।**
**पितरं तत्र कौसल्यां ब्रूयास्त्वं मातरं च मे ।**

मातामहकुले चापि यथा वर्तामहे वयम् ।
× ब्रूयाश्च ……… कौसल्यामभियादनम् ॥

लाहोर प्रत:—

तस्य बुद्धिः समभवत् पितुः संप्रेक्षणं * प्रति ।
संदिदेश तदा दूतं ब्राह्मणं शुभलक्षणम् ।
अयोध्यां गच्छ भद्रं ते दूत शीघ्रं नृपोत्तमम् ।
पितरं कुशलं ब्रूहि मातॄश्च भ्रातरौ तथा ।
पृष्ट्वा च कुशलं तेभ्यो वाच्यो दशरथः प्रभुः ।
मातामहगृहे तात वर्तते ( वर्तऽह ) त्वदनुग्रहात् ।

भरताचे मनांत दूत पाठविण्याची कल्पना आली व त्यानें एका ब्राह्मणाला बोलावून आणून अयोध्येला जाण्यास सांगितलें व त्याबरोबर वडील मंडळींना वंदनपूर्वक आपलें कुशल कळविलें, एवढी कथा या दोन अवतरणांत शाब्दिक फेरानें सांगितलेली आहे. दोनहि अवतरणें ताडून पाहिलीं असतां हा शाब्दिक फेर सहज लक्षांत येईल. प्रो. हॉपाकिन्स यांनीं दोन प्रतींतील आणखी अवतरणें देऊन या दोन प्रतींतलि शाब्दिक भेद व अर्थदृष्ट्या सादृश्य हीं विशद करून दाखविलीं आहेत; पण या कामीं अधिक अवतरणें देण्याचीं तादृश आवश्यकता आहे, असें दिसत नाहीं. मुंबईप्रतीशीं गौडप्रतीचें अशा प्रकारचें सादृश्य असल्याचें मागें सांगितलें आहे; पण त्याहूनहि गौडप्रतीचें लाहोरप्रतीशीं अधिक सादृश्य आहे, हें आम्हांला प्रो. हॉपकिन्स यांच्या लेखावरून लक्षांत आलें तें येथें दाखविलें आहे.

## वरील कथेची ग्राह्याग्राह्यता.

रामचरित्राचे दृष्टीनें दोनहि प्रतींत एकवाक्यता आहे, असें आम्हीं रा. अभ्यंकर यांनीं दिलेल्या माहितीवरून पूर्वीं सांगितलें व सामान्यत: तें खरें

× गौड प्रतींतील हें अवतरण प्रो. हॉपकिन्स यांच्या लेखावरून आम्हीं घेतलें आहे.

* येथें लाहोरप्रतीच्या संपादकांनीं "संप्रेक्षणं" असा पाठ ग्राह्य म्हणून दिला असून "संप्रेषणं" असा पाठभेद दिला आहे. "संप्रेक्षणं" पेक्षां "संप्रेषणं" हा पाठ अर्थदृष्ट्या सुसंगत म्हणून अधिक ग्राह्य दिसतो, असें येथें प्रो० हॉपकिन्स यांनीं लिहिलें असून तें आम्हांलाहि सयुक्तिक दिसतें.

आहे; पण लाहोरप्रतींत जी ही नवी कथा आढळून आली व प्रो. हॉपकिन्स यांच्या वरील लेखावरून जी गौडप्रतींत असल्याचें कळून आलें, तीमुळें आमच्या वरील समजुतीस थोडें आंदोलन मिळालें आहे. तेव्हां या कथेच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं प्रथम विचार करून मग प्रो. हॉपकिन्स यांच्या लेखांतील पुढील मुद्यांकडे वळूं. लाहोरप्रतींतील ही अपूर्व कथा गौडप्रतींत अयोध्याकांडाचे प्रारंभीं नसून बालकांडाचे अंतीं आहे व हा विशेष प्रो. हॉपकिन्स यांच्या प्रस्तुत लेखावरून आम्हांला कळला. कांडांतील हा भेद तादृश महत्त्वाचा नसला, तरी त्यांत अपूर्वता आहे, म्हणून तो येथें नमूद करून ठेविला आहे. प्रक्षिप्त भागाविषयीं विवेचन करितांना बालकांडांतील अंत्यसर्गांतील शेवटचा व अयोध्याकांडांतील प्रथम सर्गांतील प्रारंभींचा भाग प्रक्षिप्त असल्याचें आम्हीं दाखविलें आहे. मुंबईप्रतीच्या बालकांडांतील वरील प्रक्षिप्त भाग तर लाहोरप्रतींत शाब्दिक भेदानेंहि नसल्याचें आम्हीं तेथें सांगितलें आहे; पण अयोध्याकांडांतील आमच्या मतें प्रक्षिप्त असलेला भाग लाहोरप्रतींत आहे व वरील कथा त्यापूर्वीं त्या प्रतींत आलेली आहे. या नवीन कथेचा उपक्रम लाहोरप्रतींत पुढील श्लोकांनीं झालेला आहे:—

**श्रुत्वा दूतं तु संप्राप्तं कैकेयेभ्यो नृपात्मजम् ।**
**भरतं चाप्यनुज्ञातं राज्ञा राजीविलोचनम् ॥१।५॥**
**प्रहृष्टा तत्र कैकेयी........ ........ ...॥**

" कैकेयाधिपतीकडून दूत आल्याचें व राजीवलोचन अशा राजपुत्र भरताला ( तिकडे जाण्याविषयीं ) राजानें अनुज्ञा दिल्याचें ऐकून कैकेयीला आनंद झाला. "

दशरथानें भरताला मातुलगृहीं जाण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणें शत्रुघ्नासह तिकडे जाण्याचें त्यानें मनांत आणिलें असें या पूर्वींच्या श्लोकांत सांगितलें आहे व तो मुंबईप्रतींत आहे. वरील श्लोकांत दूताचें आगमन व राजाची अनुज्ञा या दोन गोष्टी कैकेयीला अपूर्व म्हणून कळल्याचें वर्णन आहे. हा दूत म्हणजे भरताचा मातुल युधाजित् होय. युधाजित् तर विवाहाचे वेळीं आल्याचें पूर्वीं सांगितलें असून तीन प्रतींत असलेल्या कथासादृश्यास्तव तें लाहोरप्रतींत

सांगितलेलें असेलच. मग या गोष्टींत अपूर्वता कसली राहिली? यापुढें कैकेयीची संमति सांगितल्यावर—

**आपृच्छ्य पितरं सोऽथ रामं चाक्लिष्टकारिणम् ॥१९॥**
**मातॄश्चैव महाबाहुः शत्रुघ्नसहितो ययौ ॥**

याप्रमाणें या श्लोकांत भरत सर्वांचा निरोप घेऊन शत्रुघ्नासह निघाल्याचें सांगितलें आहे. मुंबई प्रतींतील जो श्लोक वर अवतरिलेला आहे त्यापुढें त्या प्रतींत एक श्लोक असून प्रस्तुतचा श्लोक त्यापुढें जवळजवळ तसाच आहे. लाहोरप्रतींत असलेला अपूर्व कथाभाग म्हणून जो वर सांगितला आहे तो यापुढें आहे. भरत मातुलाबरोबर आजोळीं गेल्यावर त्यानें एकदां आपल्या मातामहाला विनंति करून त्याचे द्वारां तेथील आचार्यांकडे दशरथानें जातेवेळीं केलेल्या उपदेशाप्रमाणें विद्या संपादन केली, असा प्रसंग या प्रतींत वर्णिलेला आहे. पुढील श्लोक पहाः—

**प्रदाय शिष्यमात्मानं तेभ्यः स रघुनंदनः ॥२१९॥**
**आचार्येभ्यस्ततो विद्या धर्मेणाधिजगाम ह ॥**

"त्या रघुनंदनानें त्या आचार्यांपासून शिष्य म्हणून त्यांजकडे राहून धर्मानें विद्या संपादन केल्या."

यापुढें कोणतें अध्ययन त्यानें केलें याविषयीं एक श्लोकार्ध असून त्यांत वेदवेदांगांचा उल्लेख आहे; पण त्याविषयीं संपादकांनीं संशय प्रदर्शित केला असल्यामुळें तो आम्हीं विचारांत घेत नाहीं. तथापि भरताकडून गेलेल्या या दूतानें राजा दशरथाकडे गेल्यावर भरताचे अध्ययनाविषयीं जें वर्णन केलें आहे त्यांत "धनुर्वेद, वेद, नीति, अर्थशास्त्र" वगैरे कित्येक विद्यांचा उल्लेख आला आहे (२।२८–२९) व शेवटीं हें सर्व भरतानें "तुम्हीं सांगितल्याप्रमाणें केलें" (तव वाक्येन नोदितः) असा आपला अभिप्राय नमूद केला आहे. दशरथानें भरताला जातेवेळीं विद्यासंपादनाविषयीं जो उपदेश केला त्याची या प्रतींत याप्रमाणें संगति राखिलेली आहे. हा कथाभाग लक्षांत घेऊन आतां आमच्या वाचकांनीं मुंबईप्रतींतील पुढील श्लोक पहावा.

**सर्वे वेदविदः शूराः सर्वे लोकहिते रताः ।**
**सर्वे ज्ञानोपसंपन्नाः सर्वे समुदिता गुणैः ॥१।१८।२५॥**

"ते सर्व राजपुत्र वेदवेत्ते व शूर असून सर्वहि लोकहिताविषयीं तत्पर होते आणि सर्वहि ज्ञानसंपन्न असून गुणी होते."

यावरून भरतानें अयोध्येंत असतां व विवाहापूर्वी सर्व विद्या संपादन केल्या होत्या, हें उघड होतें. या विद्या कोणत्या याविषयीं येथें स्पष्ट उल्लेख नाहीं. तथापि ज्या एका वेदविद्येचा येथें उल्लेख आहे तीमुळें तिचें अध्ययन त्यानें मातुलगृहीं गेल्यावर केल्याचें लाहोर प्रतींत सांगितलें आहे, तें गतार्थ होत नाहीं काय? मुंबईप्रतींत वरील श्लोकांपुढें रामाविषयीं वर्णन करितांना गजारोहण, अश्वारोहण, रथचर्या व धनुर्वेद यांत तो निपुण असल्याचें सांगितलें आहे. अर्थात् त्याचे बरोबरीचा भरत त्यांविषयीं अनभिज्ञ असावा हें संभवनीय दिसतें काय? लाहोर प्रतींत हे श्लोक असल्याचें आम्हीं पाहिलें नाहीं, हें खरें; तथापि तीन प्रतींतील कथासादृशास्तव ते तींत आहेत असें आम्हीं गृहीत धरूनच चालत आहों. त्या प्रतींतील वरील श्लोकांचें निश्चित स्थान आज आम्हांला सांगतां येत नाहीं, हीच काय ती येथें न्यूनता आहे. भरताचा संदेश ऐकून कौसल्यादि राजस्त्रिया, राम, लक्ष्मण व राजा दशरथ यांना आनंद झाल्याचें या सर्गाचे अंतीं सांगितलें आहे. पुढील तिसऱ्या सर्गाचा प्रारंभ–

**गतेऽथ भरते रामो लक्ष्मणश्च महामतिः ।**
**पितरं देवसंकाशं पूजयामासतुस्तदा ॥३।१॥**

"भरत गेल्यावर राम व महामति लक्ष्मण हे आपल्या देवतुल्य पित्याची मानमान्यता ठेवूं लागले."

या श्लोकानें झाला आहे. हा श्लोक मुंबईप्रतींतील बालकांडांत थोड्या फेरानें आहे. (७७।२०) आणि हा फेर म्हणजे लक्ष्मणाला तींत "महाबलः" (महाबलाढ्य) असें म्हटलें आहे, हाच होय; व लाहोरप्रतींतील पाठभेद घेतला तर तोहि निघून जाईल. म्हणजे मुंबईप्रतींत भरत निघाल्याचा जो श्लोक असल्याचें वर सांगितलें आहे त्यापुढें एका श्लोकांत युधाजित् आपल्या भाच्याला घेऊन आपल्या नगरींत गेला, इतकें सांगून त्यापुढेंच प्रस्तुतचा श्लोक

दिलेला आहे व भरत निघून गेल्याच्या पूर्वीच्या वर्णनानंतर तो सुसंगतहि दिसतो. लाहोर प्रतींत हा श्लोक भरताकडून राजाकडे दूत आल्याचें वर्णन झाल्यावर आला आहे. तो तेथें वाचूं लागलें म्हणजे किती विचित्र दिसतो ! श्लोकाच्या प्रारंभाकडे पाहिलें तर जणुंकाय भरत नुक्ताच गेला असावा, असें वाटूं लागतें; आणि मागील कथा पहावी तर भरत गेल्यावर तो मातामहाकडे पुष्कळ काल राहिला व तेथें त्यानें अनेक विद्या संपादन केल्यावर राजाकडे दूत पाठविला; म्हणजे मध्यंतरीं इतका दीर्घकाल गेला, असें कळून येतें. अर्थात् मधील कथाभागामुळें ही विसंगतता उत्पन्न झाली, असें होत नाहीं काय? पण मौज ती यापुढेंच आहे. लाहोरप्रतींत वरील श्लोकापुढें रामलक्ष्मण राज्यकारभार पाहूं लागल्याचें वर्णन केलें असून तें मुंबईप्रतींतील बालकांडांतहि आलें आहे. यापुढें लाहोरप्रतींत पुढील श्लोक आहे:—

अथ राजा दशरथः सस्मार प्रेषितौ सुतौ ॥२५॥
उभौ भरतशत्रुघ्नौ किंचिच्छोको बभूव ह ॥

" नंतर राजा दशरथाला दूर गेलेल्या आपल्या दोघांहि पुत्रांचें—भरतशत्रुघ्नांचें—स्मरण झालें व त्याला किंचित् खेद वाटला."

वास्तविक राजाला पुत्रांकडील कुशल त्यांकडून दूत येऊन या वेळीं नुकतेंच कळलें होतें. मग आतां जो त्याला एकदम दुःखाचा उमाळा आला, त्याचें कारण काय? हा श्लोक मुंबईप्रतींतील अयोध्याकांडांत प्रारंभींच आहे. ( १।४ ) पण मधील कथाभाग त्या प्रतींत नसल्यामुळें तेथें तो विसंगत वाटत नाहीं. बाकी त्याच्या विश्वसनीयतेविषयींचा प्रश्न वेगळा आहे व त्यासंबंधींचें विवेचन " प्रक्षिप्त भागांत " आम्हीं पूर्वी केलेंच आहे. असो. लाहोरप्रतींतील वरील कथाभाग, भरतानें ज्या विद्या संपादन केल्याचें तींत सांगितलें आहे त्यांकडे पाहिलें व त्यांच्या संपादनाचे कामीं आवश्यक असलेला दीर्घकाल लक्षांत घेतला म्हणजे आपोआप अविश्वसनीय ठरतो. रामादिकांचे विवाह व वनवास यांमध्यें एका वर्षाहून अधिक काल गेलेला नाहीं, हें आम्हीं रामायणांतील प्रमाणांवरून मागें सिद्ध केलें आहे व म्हणून भरताचा मातुलगृहीं वास त्याहून अल्पकाल असणार आणि त्या कालाकडे पाहिलें म्हणजे भरताचें वरील विद्या-

संपादन अगदीं असंभवनीय दिसूं लागतें. एकंदरींत लाहोरप्रतींतील हा सर्व कथाभाग ( प्रारंभींचे बहुतेक दोन सर्ग ) प्रक्षिप्त आहे, हें उघड आहे.

## पाठभेद कां असावे तें कळत नाहीं.

लाहोरप्रतींतील प्रक्षिप्त भाग निवडून काढण्याचें काम प्रस्तुत आमचेपुढें नाहीं व वरील विवेचन करण्यांत तसा आमचा हेतुहि नाहीं. प्रो. हॉपकिन्स यांनीं लाहोरप्रत पाहून आपला लेख लिहिला आहे; पण तो लिहिते वेळीं या मुद्याकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं व आपला अभिप्राय तीन प्रतींतील कांहीं भागाची केवळ तुलना करून त्यांनीं सांगितला. यासाठीं वरील लांबलचक विवेचन आम्हांला करावें लागलें आहे. तीन प्रतींमध्यें कथानकाच्या व अर्थाच्या दृष्टीनें एकंदरींत सादृश्य आहे, पण शब्दशः तुलना करूं गेलें तर तीनहि प्रती एकमेकींशीं मिळत नाहींत, असें प्रो. हॉपकिन्स यांनीं तीन प्रतींतील निरनिराळ्या प्रसंगांचीं अवतरणें देऊन चांगल्या प्रकारें सिद्ध केलें आहे. पण त्यावरून त्यांनीं असें अनुमान केलें आहे कीं, वाल्मीकिमहर्षींनीं ज्या वेळीं रामायण रचिलें तेव्हांपासून रामायणाचा प्रसार तें मुखोद्गत करून तद्द्वारा होत गेल्यामुळें शाब्दिक भेदाला प्रारंभ तेव्हांच झाला. × महर्षि वाल्मीकींनीं कुशलवांना रामायण पढविलें व ते त्याचें गायन करूं लागले असें रामायणांत वर्णन आहे व यावरून त्यांची कल्पना संभवनीयहि आहे. पण रामायणाच्या उप-

---

प्रो. हॉपकिन्स यांची कल्पना पुढीलप्रमाणें आहेः--

Let it be conceded that वाल्मीकि originally composed a रामायण. But when he himself began to repeat the verses in which he had enshrined the tale he probably varied them in unessentials, such for example, as ( above ) विप्रेभ्यः for द्विजेभ्यः and no sooner had his poem became the public property of rhapsodes aud bards than this process began to affect whole clauses and verses and, further, the original text began to be expanded partly for the sake of beautifying it and partly for the sake of inculcating moral and religious teachings.

लब्ध असलेल्या तीन प्रती अर्थदृष्ट्या सर्वथा सदृश असून त्यांमध्यें भेद शब्दांपुरता असता तर त्यांची कल्पना पूर्णपणें ग्राह्य धरितां आली असती. मुंबईप्रत व गौडप्रत यांमध्यें जितकें सादृश्य आहे, त्याहून तें गौडप्रत व लाहोरप्रत या दोहोंमध्यें अधिक आहे, असें प्रो. हॉपकिन्स यांनींच दाखविलें आहे व तें खरें आहे. पण लाहोरप्रतीमध्यें कित्येक स्थळीं गौडप्रतीहून अधिक श्लोक आहेत व वर दाखविलेली कथा गौडप्रतींत बालकांडाचे अंतीं व लाहोरप्रतींत अयोध्याकांडाचे प्रारंभीं आहे, असा दोहोंमध्यें भेद कां असावा ? अर्थात् हे भेद रामायणाचा प्रसार मुखद्वारां होण्याचें थांबल्यानंतरच्या कालांतील होत असें दिसत नाहीं काय ? रामायणाचा प्रसार मुखद्वारा होत असतां हे भेद पडले, अशी कल्पना करितांना त्या वेळीं त्याची लेखी प्रत झाली नव्हती, असें जें ध्वनित होत आहे तें तर सर्वथा चिंत्य होय. रामायणकालीं लेखनकला होती हें मागें आम्हीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. रामायणांतील प्रक्षिप्त भागाचा काल निश्चित नसला तरी एक नाहीं हें निर्विवाद आहे. तथापि रामायणांत प्रारंभीं पाठभेद पडले व कांहीं प्रती कागदावर पडून निश्चित झाल्या आणि त्यानंतर त्यांत प्रक्षिप्त भाग घुसडण्यांत आला असा क्रम सरळ दिसतो. तेव्हां हा प्रक्षिप्त भाग तरी सर्व प्रतींत एकसारखा असणें आवश्यक नाहीं काय ? बरें, हा प्रक्षिप्त भाग प्रती भिन्न-भिन्न प्रांतीं असल्यामुळें एकसारखा असणें असंभवनीय मानिलें तर त्यांत भेद तरी पूर्णत्वानें दिसणें आवश्यक होतें. उघड उघड प्रक्षिप्त असलेला भाग दोन प्रतींत शब्दभेदानें यावा याची संगति कशी लावावयाची ? लाहोर प्रतींतील जी कथा आम्हीं वर दिली आहे ती स्वभावतः पूर्वापर कथेशीं कशी विसंगत आहे, हें आम्हीं येथें दाखविलें आहे; अर्थात् ती प्राक्षिप्त आहे. मग ती दोन प्रतींमध्यें भिन्न शब्दांनीं सांगितलेली कां असावी ? म्हणजे एका प्रांतांतील प्रतींत प्राक्षिप्त भागाचा समावेश कोणीं केल्यानंतर दुसऱ्या प्रांतांतील प्रतींत तीच कथा वेगळ्या शब्दांनीं समाविष्ट करण्याचें कार्य दुसऱ्या प्रक्षेपकानें केलें असें येथें गृहीत धरावें लागत आहे व तें मुखपरंपरेनें रामायणाचा प्रसार होत असतां पाठभेद झाले या कल्पनेला विरुद्ध आहे. लाहोरप्रतींतील वरील अपूर्व कथेंत भरताच्या विद्यासंपादनाविषयीं सांगतांना—

**ततोऽस्य बुद्धिः संजाता धर्मं श्रोतुं सनातनम् ॥२। ५॥**

"नंतर सनातनधर्म श्रवण करण्याचें त्याचे मनांत आलें."

असें वर्णन आहे व येथील "सनातन" शब्द नूतन धर्माच्या अर्थात् बौद्धधर्माच्या अपेक्षेनें योजिलेला आहे व म्हणून ही सर्व कथा बुद्ध-कालानंतर प्रक्षेपिलेली आहे, यांत शंका नाहीं. ही कथा दोन प्रतींत भिन्न शब्दांनीं सांगितलेली आहे. मुखपरंपरया रामायणाचा प्रसार होत असतां हे पाठभेद झाले, असें गृहीत धरिलें तर बुद्धकालानंतरहि कांहीं कालपर्यंत हा प्रसार मुखद्वारा होत होता, असें मानावें लागेल व तें तर कोणालाहि पटण्यासारखें नाहीं.

## आदिरामायणाची कल्पना.

रामायणाच्या या तीन प्रती पाहून त्यांमध्यें सर्वांत प्राचीन अर्थात् मूळची प्रत कोणती असावी, असा प्रश्न अंतःकरणामध्यें साहजिक उत्पन्न होतो व तो प्रो. हॉपकिन्स यांजपुढेंहि उपस्थित झाला आहे; मात्र हा प्रश्न सोडवितां येण्यासारखा नाहीं, असें त्यांनीं प्रांजळपणें लिहिलें असून कोणाहि शोधक जिज्ञासूला हा अनुभव सारखाच येईल; तथापि तीन प्रतींचें तुलनात्मक अध्ययन केल्यास प्रक्षिप्त भागाची निवड करण्यास कांहीं साहाय्य होईल व त्यावरून चरित्राचे दृष्टीनें निश्चित प्रत करितां येईल, अशी आमची समजूत आहे. आतां कित्येक मराठी संतकवींच्या ग्रंथांतील 'आदिरामायणा'चे उल्लेखांवरून मूळ रामायणाची त्यांना माहिती असावी, असा जो प्रो. हॉपकिन्स यांच्या लेखांत ध्वनि निघत आहे व ज्यानिमित्त रामायणाची मूळ प्रत शोधण्याचा प्रयत्न त्यांनीं करून प्रस्तुतचा लेख लिहिला आहे, त्यांत मात्र कांहीं अर्थ नाहीं. मराठी कवींपुढें बव्हंशीं मुंबईप्रत होती व कदाचित् कोणातरी कवीनें गौडप्रतींतील अवतरण दिलें असलें तरी —आणि प्रत कोणती हें उद्धृत केलेल्या पाठाचे सादृश्यावरून ठरवावयाचें हें उघड आहे—त्यांनीं मूळ प्रत व मागाहूनची प्रत अशा चिकित्साबुद्धीनें वरील निर्देश केला आहे, असें संभवत नाहीं. रामायणाला आदिकाव्य असें म्हणण्याचा प्रघात आहे व याच दृष्टीनें कोणी त्याला आदिरामायण असें नांव दिलें असेल असें वाटतें. असा निर्देश कोणीं केला आहे वगैरे माहिती त्यांनीं दिलेली नाहीं

तथापि अर्वाचीन संतकवींच्या ग्रंथांत वरील उल्लेख असल्याचें त्यांनीं लिहिलें आहे, त्यावरूनहि त्याला विशेष महत्त्व द्यावें असें वाटत नाहीं.

## मनुस्मृति व महाभारत यांशीं तुलना.

रामायणाच्या तीन प्रतींची एकमेकींशीं तुलना करितांना महाभारत आणि मनुस्मृति यांतील कित्येक अवतरणें देऊन रामायणांतील कित्येक श्लोकांचें त्यांशीं सादृश्य दाखविण्याचा प्रयत्न प्रो. हॉपकिन्स यांनीं या वेळीं हाताबरोबर केला आहे. हीं अवतरणें ज्या विषयासंबंधीं आहेत त्याकडे पाहिलें म्हणजे तीन ग्रंथांमध्यें दिसून येणाऱ्या सादृश्याचें तादृश महत्त्व आहे असें वाटत नाहीं. कारण हा विषय "अराजक राष्ट्र" संबंधीं आहे. राष्ट्रावर कोणीतरी रक्षक असावा ही भावना आमच्या राष्ट्रामध्यें फार प्राचीन कालापासून चालत आलेली आहे व राजा आणि प्रजा यांचा परस्पर संबंध एका धर्मानें बांधला गेला असल्यामुळें कोणत्याहि कालांतील ग्रंथांत त्यासंबंधी एकवाक्यता असावी यांत नवल नाहीं. रामायण हा महाभारतासारखा संग्रहग्रंथ नसला तरी दोहों-मध्यें जवळ जवळ सारखे असलेले कांहीं श्लोक आणखीहि सांपडूं शकतील, अशी आमची समजूत * आहे; व याचें कारण कांहीं विषयांसंबंधीं राष्ट्रामध्यें असलेली एकभावना, हें होय.

---

* उदाहरणार्थ पुढील श्लोक पहाः—

**गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।**
**उत्पथं प्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥** वा. रा. २।२१।१३॥

"आपला गुरु असला तरी तो जर उन्मत्त होऊन त्याला कार्य कोणतें व अकार्य कोणतें हें कळत नाहींसें झालें व तो उन्मार्गाला प्रवृत्त झाला तर त्यालाहि शासन करणें अवश्य आहे."

हा श्लोक महाभारतामध्यें दोन स्थळीं आम्हांला आढळला; दोनहि स्थळीं त्याचा अंत्य चरण थोडा बदललेला आहे. ("न्याय्यं भवति शासनम्" १।१५३।६४ व "परित्यागो विधियते" ५।१७८।४८ कुंभघोणप्रत) तसेंच रामायणांतलि कौसल्येच्या भाषणांतलि एक श्लोक (२।३७।२४) व मनुस्मृतींतलि (१।५।१४४) एक श्लोक यांमध्यें कसें सादृश्य आहे हें आम्हीं पूर्वी दाखविलेंच आहे. (प्र. खं. पृ. १४९।१५०)

## रामायणानंतर महाभारत.

महाभारत हा ग्रंथ रामायणानंतरचा आहे, याविषयीं अद्यापि वाद राहिला आहे, असें वाटत नाहीं. पण प्रो. हॉपकिन्स यांनीं या निमित्तानें जातांजातां संशय प्रदर्शित करून ठेविला आहे. × महाभारताचा सध्यां दिसत असलेला अवाढव्य विस्तार रामायणानंतरचा असें त्यांनीं मत दिलें असून मूळ भारत

---

× प्रो. हॉपाकिन्स म्हणतातः—

While not prepared to dispute the further generalization that महाभारत has borrowed from रामायण and thus shows its later date, I would observe that the induction refers only to the psendo-epical didactic twelfth book and to the later first book, so that the argument is not convincing as regards the priority of the great epic ... ... ... but only as it now exists in its encyclopedic form. This applies not to the रामायण story in महाभारत but only to the particular citation under question here, and yet in point of fact a somewhat similar objection to the above generalization may be made in the case of the पुरा गीतः श्लोको वाल्मीकिना ... ... न हन्तव्याः स्त्रिय इति in that the quotation appears in महाभारत 7, 143, 67 in an attempt to excuse अर्जुन after भूरिश्रवा's death. Professor Jacobi himself is careful to say only that the रामायण was known as an old work before the (whole) महाभारत was completed ( Das R. p. 71 ). This द्रोण quotation was probably inserted midway in time between the creation of the कुरु epic and the addition of the धर्मशास्त्र. It would at any rate have been more convincing if वाल्मीकि had been cited by name in some part of the महाभारत not otherwise marked as late."

( यांतील अधोरेखांकित भाग मूळांत तसा नसून आम्हीं तो मुद्दाम तसा छापिलेला आहे. वरील विवेचनांत याचा सारांश आला असल्यामुळें येथें समग्र भाषांतर दिलेलें नाहीं.)

पूर्वींचें असावें असें त्यांच्या प्रतिपादनाचें एकंदरींत धोरण आहे. भूरिश्रव्याचा वध सात्यकीनें अधर्मानें केला, त्या वेळीं स्वतांच्या कृत्याचे समर्थनार्थ प्रमाण म्हणून रामायणांतील जो एक श्लोक वाल्मीकींनीं गायिलेला म्हणून त्यानें बोलून दाखविला व ज्यानिमित्त रामायण महाभारताहून प्राचीन असल्याचें सिद्ध करितां येतें, तो श्लोक महाभारतांत मागाहून घुसडलेला असावा असा तर्क करण्यांत तर प्रो. हॉपकिन्स यांनीं पाश्चात्य विद्वानांच्या मनांत आमचे संस्कृती-विषयीं एकंदरींत जी भावना नांदत असते तिचें एक प्रकारें प्रदर्शनच केलें आहे. रामायण हा ग्रंथ महाभारताला सध्यांचें स्वरूप प्राप्त झालें त्याचे पूर्वींचा आहे, एवढेंच नव्हे तर मूळ भारताचे पूर्वींचा आहे, हें आम्हीं मागें दाखविलें आहे व रा. अभ्यंकर यांचें या मुद्यावर लहानसें स्वतंत्र पुस्तक आहे. पण हा मुद्दा सिद्ध करण्याचें जें एक प्रमुख प्रमाण त्यावरच प्रो. हॉपकिन्स यांनीं अशा रीतीनें घाला घातला आहे. वास्तविक हा श्लोक भर युद्धाचे प्रसंगीं एका योद्धयानें म्हटलेला म्हणून महाभारतांत दिलेला आहे व त्यामुळें महाभारतांत संग्रहबुद्धीनें अनेक कथा समाविष्ट करण्यांत येऊन जी वाढ झाल्याचें आपण पाहतों तींत या श्लोकाची गणना करतां येण्यासारखी नाहीं, हें कोणाहि विवेकी पुरुषाला पटण्याजोगें आहे. आधीं रामायणांतील प्रस्तुतचा श्लोक सर्वांचे तोंडीं राहण्या-इतका महत्त्वाचा नाहीं व त्यामुळें प्रक्षेपकानें त्याचा समावेश मागाहून केला अशी कल्पना संभवत नाहीं. प्रो. हॉपकिन्स यांनीं त्यावर आक्षेप घेतांना कोण-तेंहि प्रमाण पुढें केलेलें नाहीं व जें एक प्रमाण पुढें केलें आहे, तें वाल्मीकि-रामायणाचा उल्लेख महाभारताच्या मूळ भागांत अन्यत्र नाहीं, हें होय; पण महाभारताचा मूळचा भाग कोणता व मागाहूनचा कोणता हें ठरविण्याचा अधिकार जोंपर्यंत ते आपल्या हातीं ठेवीत आहेत, तोंपर्यंत दुसरा उल्लेख कोणीं कदाचित् दाखविला—तसा उल्लेख अद्यापि कोणाला आढळला नाहीं—तर त्याची वाट ते वरीलप्रमाणें लावणार नाहींत, असें कशावरून समजावें? महाभारतांत को-णता भाग मागाहूनचा असावा, यांविषयीं सांगतांना त्यांनीं आदिपर्व व शांतिपर्व यांचा निर्देश केला आहे व तेथें त्यांनीं या पर्वांचा मोघम निर्देश केला असला तरी प्रक्षिप्त भाग या पर्वांत बराच आहे, असें सांगण्याचा त्यांचा हेतु असावा, असें आमचें अनुमान आहे व तें बरोबर असेल तर त्यांत कांहीं

अयुक्तिक नाहीं; आणि या दृष्टीनें वरील पर्वांबरोबर वन व अनुशासन यांची गणना करण्यांत यावी, असें आम्हींहि म्हणतों. या वेळीं प्रो. हॉपकिन्स यांना आमचा प्रश्न आहे कीं, वरील पर्वें सोडून दिल्यावर बाकीचा भाग सामान्यपणें मूळचा आहे, असें तुमच्या म्हणण्यावरून तुम्हांला मान्य असल्याचें सिद्ध होत नाहीं काय ? आणि अशा रीतीनें स्वतांला मूळचा म्हणून मान्य असलेल्या भागांतील प्रमाण मुळांतील नसावें असें तुम्हीं म्हणण्यानें तुमच्या प्रतिपादनांत परस्पर विरोध उत्पन्न होतो, याची वाट काय ? रामायणाचे मूळ प्रतीविषयीं विचार करावयाचा म्हणजे वास्तविक वरील मुद्यांकडे लक्ष द्यावयाचें कारण नाहीं; पण प्रो. हॉपकिन्स यांनीं ते पुढें आणिले व यासाठीं त्यांविषयीं आम्हांला येथें दोन शब्द लिहावे लागले आहेत.

## परिशिष्ट—ऊ

## रावणाचें भाष्य व पदपाठ.

(प्र. खं. पृष्ठ १८५.)

सायणाचार्यांच्या ऋग्वेदावरील भाष्यामध्यें रावणाचे भाष्याविषयीं मतभेत सांगतांना कांहीं स्थलीं उल्लेख आहेत. उल्लेखांचें निश्चित स्थान आतां सांगतां येण्यासारखें नाहीं, तरी त्यांत असे उल्लेख आहेत, यांत शंका नाहीं. हा भाष्यकार रावण व रामाचा शत्रु रावण हे एक होत, का नामसादृश्यास्तव हा अभेद वाटतो, हें कळण्यास मात्र मार्ग नाहीं.

रावणाच्या व्याकरणग्रंथाविषयींचा उल्लेख भर्तृहरीच्या "वाक्यपदीया"वरील टीकेमध्यें (द्वितीय कांड, श्लोक ४८९) पुढीलप्रमाणें आला आहे. "तत्र ह्युपलतले रावणविरचितो मूलभूतव्याकरणागमस्तिष्ठति केनचिच्च ब्रह्मरक्षसाऽऽनीय चंद्राचार्यवसुरातगुरुप्रभृतीनां दत्तः ॥" टीकाकारानें येथील उल्लेख राक्षस रावणाविषयीं केलेला आहे, असें एकंदरींत दिसतें; तथापि त्याविषयीं प्रत्यक्ष प्रमाण त्यानें कांहीं दिलेलें नाहीं व सध्यां उपलब्ध नाहीं. त्या कालीं तशी समजूत होती, इतकें यावरून म्हणतां येईल व आम्हींहि संग्रहबुद्धीनेंच ही माहिती येथें दिली आहे.

रावणाचे पदपाठाविषयीं उल्लेख संत नामदेव यांच्या एका अभंगांत आढळला, तोहि येथें संग्रहबुद्धीनें देऊन ठेवितों.

**रावणानें वेदां ऋचा पदें केलीं। सीतेलागीं आली भ्रांति कैशी।**

—आवटे यांची गाथा, अभंग २११७

श्रीमच्छंकराचार्यांच्या शतश्लोकीवर आनंदगिरींची जी एक टीका आहे, तीमध्यें एके स्थलीं एक श्रुति उद्धृत करून तीवर रावणभाष्य व सायणभाष्य यांतील अवतरणें घेतलेलीं आहेत ( श्लोक ६६ ) व यावरूनहि रावणभाष्याचें अस्तित्व दिसून येतें.

## परिशिष्ट—ऋ,

## वानरांची भाषा.

( प्र. खं. पृष्ठ २३४, वानरांच्या भाषेविषयीं चर्चा केलेली आहे त्यापुढें )

वानरांची आपापसांत बोलण्याची भाषा भिन्न असावी असा संशय मारुतीचे भाषणावरून येत असला तरी तत्त्वतः त्यांमध्यें भिन्नता नसावी असें जें आमचें अनुमान आहे त्याला वानरांच्या नांवांवरून दृढता येते. मनुष्यांच्या व वानरांच्या समाजांतील नांवांमध्यें सादृश्य दिसत नसलें तरी वानरांच्या नांवांमध्यें मनुष्यांच्या नांवांप्रमाणें कांहीं अर्थ व्यक्त होतो, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. उदाहरणार्थ सुग्रीव, वाली, अंगद इत्यादि नांवें पहावीं. भाषा अगदीं भिन्न असेल तर एका समाजांतील व्यक्तीचे नांवामध्यें जो अर्थ असेल त्याचा बोध दुसऱ्या समाजाला त्याची भाषा कळल्यावांचून होणें शक्य नाहीं; आणि वानरांच्या नांवांवरून होत असलेला अर्थबोध हाच दोनहि समाजांच्या भाषा तत्त्वतः एक असल्याचा द्योतक होय.

## परिशिष्ट—ॠ

( द्वितीय खं. पृ. ५२१।० दसरींवरील टीकेमध्यें )

**जग्राह सूर्यं स्वर्भानुरपर्वणि महाग्रहः ॥**

असें रामायणांतील अवतरण देऊन त्यावर खंडन केलें आहे त्यापुढें:—

रामायणांतील वरील उल्लेखावरून ग्रहणाचा बोध घ्यावयाचा नसून उत्पातांचें वर्णन अशा प्रकारें करण्याची आमचेकडे पद्धति असल्यामुळें त्याला प्रामाण्य देतां येणार नाहीं. हरिवंशामध्यें बाणासुराचा ध्वज पडून उत्पात होऊं लागल्याचें वर्णन "उषाहरण" सांगतांना केलें आहे. त्यांत एके स्थळीं जणुं काय हाच श्लोक शब्दभेदानें आला आहे.

**राहुरग्रसदादित्यमपर्वणि विशां पते ॥१७१।६३॥**

---

# संकीर्ण विवेचन पृ. ९३ मधील केसरींतील लेख

द्वितीय खंड पृ. ९३ वर "प्रो. परांजपे व उत्तरकांड" या शिरोलेखांतील विवेचनामध्यें "केसरीं" त पूर्वी प्रसिद्ध झालेला लेख द्यावयाचा असतां चुकीनें छापावयाचा राहिला, तो येथें देतों. द्विरुक्ति होऊं नये म्हणून कांहीं भाग गाळला असून शेवटचें अवतरण विषय विशद होण्याकरितां थोडें वाढविलें आहे.

"वाल्मीकिरामायणांतील षट्कांडात्मक भाग लिहून झाल्यानंतर तेथें ग्रंथसमाप्ति करण्यांत येऊन मग कांहीं कालानें शेवटचें उत्तरकांड रचिलेलें आहे, असा सिद्धांत प्रो. परांजपे यांनीं या व्याख्यानांत प्रतिपादिलेला आहे. ते म्हणतात, "यांपैकीं उत्तरकांडाच्या अखेरीसच वाल्मीकीनें आपल्या रामायणग्रंथाची परिसमाप्ति केली, अशी सामान्यतः समजूत आहे. ही समजूत तर बरोबरच आहे. कारण ती स्पष्टच आहे. परंतु खुद्द रामायणांतीलच अंतःप्रमाणांवरून असें दिसतें कीं, बालकांडाच्या प्रारंभापासून तों उत्तरकांडाच्या समाप्तीपर्यंत एकंदर रामायणाच्या रचनेला जी कालावधि लागली असेल तिच्या दरम्यान अशीहि एक वेळ असली पाहिजे कीं, जेव्हां रामायण या ग्रंथाची युद्धकांडाच्या अखेरीसच समाप्ति झालेली होती." (पृ. २) प्रोफेसरसाहेबांचा हा सिद्धांत शब्दांत थोडासा फरक केल्यास आम्हांला मान्य आहे; परंतु तो त्यांनीं ज्या अठरा प्रमाणांवर उभारला आहे, त्यांपैकीं एकहि आम्हांला युक्त वाटत नाहीं. तेव्हां त्यांनीं पुढें केलेल्या प्रमाणांविषयीं आतां विचार करूं.

प्रारंभींचीं आठ प्रमाणें, प्रमाण—अंक ३ व ४ हे सोडून, एकमेकांशीं विशेष संलग्न आहेत, यासाठीं त्यांचा एकत्र विचार करणें सोयीचें होऊन त्यामुळें पुनरुक्ति करावी लागणार नाहीं; याकरितां तसें करूं. रामायणाच्या फलश्रुतीचे श्लोक उत्तरकांडाच्या शेवटीं ज्याप्रमाणें आहेत त्याप्रमाणें ते युद्धकांडाच्याही शेवटीं आहेत. एका ग्रंथांत अशा रीतीनें दोन स्थलीं समाप्ति असत नाहीं व प्रत्येक कांडाच्या शेवटीं फलश्रुति देण्याची पद्धतिहि रामायणांत नाहीं, हें त्यांनीं

प्रत्येक कांडाचे शेवटचे श्लोक देऊन दाखविलें आहे व तें कोणालाहि पटण्यासारखें आहे. परंतु युद्धकांडाच्या शेवटीं जे समाप्तीचे श्लोक आहेत ते वाल्मीकींचे नाहींत ही गोष्ट प्रोफेसरसाहेबांना कळूनही त्यासंबंधीं त्यांनीं पूर्ण विचार केला नाहीं असें मानणें भाग आहे. हे श्लोक १८ असून त्यांपैकीं शेवटच्या दोन श्लोकांखेरीज बाकीच्या १६ श्लोकांवर कतकाची टीका नाहीं, यासाठीं ते प्रक्षिप्त असले पाहिजेत, हें उघड आहे. यावर प्रो. परांजपे म्हणतात, "या फलश्रुतीच्या श्लोकांवर कतकानें व्याख्यान कां केलें नसावें, याचा आपण थोडासा विचार करूं. एकंदर रामायणाचीं सात कांडें असून उत्तरकांडाच्या शेवटीं रामायण समाप्त झालें आहे, ही सार्वत्रिक उघड गोष्ट होय. असे असतां एकंदर ग्रंथाच्या मध्येंच युद्धकांडाच्या शेवटीं ग्रंथ समाप्त झाल्यासारखा दिसतो, हें काय अशी शंका कोणालाहि येणें अगदीं स्वाभाविक आहे. आणि तशी ती कतकालाहि आली असली पाहिजे. तेव्हां एकंदर ग्रंथाच्या सुसंगतपणाकरितां आणि वाक्यरचनेकरितां युद्धकांडाच्या शेवटचे फलश्रुतीचे श्लोक प्रक्षिप्त आणि व्याख्यानाला अनर्ह आहेत असें मानून कतकानें या प्रश्नाची विल्हेवाट लाविली असावी, असें एक कारण दिसतें." (पृ. १७) प्रोफेसरसाहेबांचा हा तर्क चिंत्य आहे. कारण फलश्रुतीच्या अठरा श्लोकांपैकीं दोन श्लोकांवर कतकाची टीका आहेच. तेव्हां त्याला वरील शंका येऊन त्यानें ते श्लोक प्राक्षिप्त ठरविणें हें सुतराम् असंभवनीय आहे. या शंकेचें समाधान प्रोफेसरसाहेब करितात— "सगळ्या रामायणाचें अनुष्टुभ् हें सामान्य वृत्त आहे व त्याप्रमाणें सगळे सर्ग अनुष्टुभ् छंदामध्यें लिहिलेले असून प्रत्येक सर्गाच्या शेवटचे एक किंवा अधिक श्लोक दुसऱ्या कोणत्यातरी भिन्न वृत्तामध्यें लिहिलेले आहेत. ........ त्याप्रमाणें युद्धकांडाच्या या शेवटच्या १२८ व्या सर्गांतील पहिल्यापासूनचे (एक ठिकाणचा अपवाद खेरीज करून) सर्व श्लोक अनुष्टुभ् छंदामध्यें असून शेवटचे १२१ व १२२ हे श्लोक रामायणांतील सामान्य नियमानुसार उपेंद्रवज्रा या भिन्न वृत्तामध्यें आहेत. तेव्हां एकंदर ग्रंथांतील सार्वत्रिक नियमानुसार दिसून येत असलेले हे भिन्नवृत्तनिबद्ध श्लोक प्रक्षिप्त मानणें कतकाला साहसाचें वाटलें असावें, आणि बहुधा त्या श्लोकांवरचा प्रक्षिप्तत्वाचा

प्रसंग टळला असावा." (पृ. १८) खरोखर, या समाधानानें प्रोफेसरसाहेबांचें तरी समाधान कसें झालें हें कळत नाहीं. सर्गाच्या शेवटचे एक किंवा अधिक श्लोक अनुष्टुभभिन्न वृत्तांत असतात हा नियम रामायणांत सार्वत्रिक आहे असें प्रोफेसरसाहेब म्हणतात; परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. रामायणांत असेहि कित्येक सर्ग आहेत कीं, त्यांचे सर्व श्लोक अनुष्टुभ् छंदांत आहेत. आतां असे सर्ग थोडे आहेत ही गोष्ट खरी आहे. परंतु अशा थोड्याशा सर्गांत हाही सर्ग समाविष्ट करण्यास प्रत्यवाय कोणता? अपवाद आहेत असें ठरल्यावर याच सर्गानें अपवाद नसावें असें मानण्यास प्रमाण काय? अर्थात् प्रोफेसरसाहेबांचें वरील समाधान निरुपयोगी असून युद्धकांडाच्या शेवटीं फलश्रुतीचे श्लोक पाहून कतकाला शंका आली असें ते म्हणतात, ती केवळ त्यांची कल्पना होय.

आतां प्रोफेसरसाहेब जर रामायणतिलक टीकेंतील शब्दांकडे नीट पहाते तर त्यांची अशी फसगत झाली नसती. हे श्लोक प्रक्षिप्त आहेत, असें मत सांगतांना "अत्र फलश्रुतिश्लोकाः कतकव्याख्याने नोपलभ्यन्ते" असे शब्द या टीकेंत आहेत व ते सदर विवेचनांत प्रोफेसरसाहेबांनीं दिलेच आहेत. (पृ.१५) या शब्दांचा सरळ अर्थ "हे श्लोक कतकव्याख्यानांत आढळत नाहींत" असा आहे. म्हणजे कतकानें रामायणाच्या ज्या प्रतीवरून टीका लिहिली, तींत त्याला हे श्लोक न मिळाल्यामुळें त्यानें त्या श्लोकांवर टीका लिहिलेली नाहीं. कतकानें हे श्लोक प्रक्षिप्त ठरविले, ही कल्पना प्रोफेसरसाहेबांनीं कोठून काढिली, हें कळत नाहीं. कतकाची टीका नाहीं यासाठीं प्रक्षिप्त मानून छापिलेले कित्येक सर्ग उत्तरकांडांत आहेत, ही गोष्ट रामायण वाचणारास सहज कळून येईल. कतक हा प्राचीन आणि मान्य टीकाकार असल्यामुळें व तो जाणूनबुजून कांहीं भागावर टीका करणार नाहीं, हें असंभवनीय असल्यामुळें त्याची टीका नसलेला भाग प्रक्षिप्त मानण्याची वहिवाट योग्यच आहे. शिवाय प्राचीन ग्रंथांवरील टीका वाचणारांस हीहि गोष्ट माहीत असली पाहिजे कीं, ते टीका करितांना ग्रंथांतील प्रक्षिप्त किंवा प्रामादिक भाग काढून टाकण्यापेक्षां तो खरा मानून एकंदर ग्रंथाची संगति लावण्याचा प्रयत्न करीत असतात. रामायणावरील टीकांतून असे प्रयत्न दृग्गोचर होत असून कित्येक वेळां ते हास्यास्पदहि झाले

आहेत, ही गोष्ट प्रोफेसरसाहेबांस माहीत असेलच आणि या नियमास अनुसरूनच युद्धकांडांतील शेवटच्या फलश्रुतीच्या दोन श्लोकांवर कतकानें निःशंकपणें टीका लिहिली आहे व बाकीचे श्लोक त्याला मिळते, तर त्यांवरहि त्यानें टीका लिहिली असती.

परंतु आपले नेत्र कार्यक्षम असतां कतकाचे उपनेत्र आपणांला काय करावयाचे आहेत ? युद्धकांडांतील हे श्लोक वरवर वाचणारांसहि ते प्रक्षिप्त आहेत ही गोष्ट सहज कळून येणार आहे. सदर श्लोकांतील खालील पंक्ति पहाः—

आदिकाव्यमिदं चार्षं पुरा वाल्मीकिना कृतम् ॥१०५॥
शृणोति य इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ॥११०॥
शृण्वन्ति य इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ॥१११॥
पूजयंश्च पठंश्चैवमितिहासं पुरातनम् ॥११४॥

या श्लोकांत रामायणाचा उल्लेख करितांना "वाल्मीकींनीं प्राचीनकाळीं केलेलें काव्य" असा केलेला आहे. खुद्द वाल्मीकिमहर्षि आपल्या काव्याला "प्राचीनकाळीं केलेलें काव्य" असें कसें म्हणतील ? व लोकांला तरी तें कसें पटेल ? प्रो. परांजपे जर आपल्या निबंधाला "रामायणाविषयीं आपले प्राचीनकाळचे विचार" असें नांव देते तर लोकांना त्या निबंधाबद्दल आदर वाटेल असें प्रो. साहेबांस वाटतें काय ? वाल्मीकिमहर्षि प्राचीनकालीं झाले ही गोष्ट ज्याला पटली होती म्हणजे वाल्मीकींनंतर जो पुष्कळ कालानें झाला अशा एखाद्या कवीचा हा प्रयत्न आहे; आणि त्याला तारतम्यज्ञान नसल्यामुळें त्याची फसगत झाली. त्यानें वाल्मीकिमहर्षींविषयीं आदर वाटण्याकरितां योजिलेला "पुरा" शब्द त्याच्या स्वतांच्या नाशास कारण झाला. या शब्दाकडे प्रोफेसरसाहेब लक्ष देते तर त्यांना ही गोष्ट पटली असती व असल्या डळमळित पायावर त्यांनीं आपल्या सिद्धांताची इमारत उभारली नसती.

प्रमाण अंक ३ मध्यें प्रो. परांजपे म्हणतात, "आकांक्षेच्या तत्त्वावर या प्रश्नाचा उलगडा करण्याचा यत्न केल्यास युद्धकांडाच्या शेवटापर्यंतच्या काव्यांत आलेल्या कथाभागांतील रावणवध आणि रामराज्याभिषेक यांच्या पलीकडे आकांक्षेची तृष्णा स्वाभाविकपणें आणि सहृदयपणें जाऊं शकत नाहीं, हें कोणींहि

कबूल करील" (पृ. ९) प्रो. परांजपे यांचा हा कोटिक्रम रामायण वरवर वाचून पाहणारास पटण्यासारखा आहे. इतर पौराणिक ग्रंथ आणि रामायण यांच्या स्वरूपांत किती फरक आहे, हें प्रोफेसरसाहेबांच्या लक्षांत आलेलें नाहीं. राम हा विष्णूचा अवतार या दृष्टीनें वाल्मीकींनीं रामायण लिहिलेलें नाहीं. प्रक्षिप्त भाग काढून टाकिला तर रामायणांत या गोष्टीचा उल्लेखहि सांपडेल का नाहीं, याची शंका आहे. रामायण लिहिण्यांत वाल्मीकींचा उद्देश एका सर्वगुण-संपन्न श्रेष्ठ पुरुषाचें चरित्र लोकांपुढें ठेवावें एवढाच होता, ही गोष्ट रामायणाच्या प्रारंभाकडे लक्ष दिल्यास सहज पटण्यासारखी आहे. वाल्मीकींनीं नारदाला केलेले प्रश्न पुढें दिल्याप्रमाणें होते:—

**कोऽन्वस्मिन् सांप्रतं लोके गुणवान् कश्च वीर्यवान् ।**
**धर्मज्ञश्च कृतज्ञश्च सत्यवाक्यो दृढव्रतः ॥१।१।२॥**
**चारित्रेण च को युक्तः सर्वभूतेषु को हितः ।**
**विद्वान् कः कः समर्थश्च कश्चैकप्रियदर्शनः ॥३॥**
**आत्मवान् को जितक्रोधो द्युतिमान् कोऽनसूयकः ।**
**कस्य बिभ्यति देवाश्च जातरोषस्य संयुगे ॥४॥** *

या प्रश्नाला उत्तर म्हणून नारदांनीं रामचरित्र सांगितलें आहे व तेंच पुढें वाल्मीकींनीं सविस्तर लिहिलें आहे. तेव्हां प्रो. परांजपे यांची आकांक्षेची कल्पना जरी गृहीत धरली तरी तिची तृष्णा राज्याभिषेकापर्यंत न थांबतां पुढील कथा ऐकून घेतल्यावांचून स्वस्थ बसणार नाहीं, हें कोणीहि मान्य करील. सीता-त्याग ही रामचरित्रांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट असून रामाचें यश त्या योगानें फार वाढलें आहे. तेव्हां ही गोष्ट सांगण्याची कल्पना वाल्मीकींच्या मनांत नव्हती, असें म्हणणें त्यांच्या प्रारंभींच्या हेतूंना सोडून होणार आहे.

प्रमाण अंक ४ मध्यें प्रो. परांजपे म्हणतात, "जसें एकादें सुईचें टोक संपावयाच्या जागेकडे जातांना निमुळतें होत जातें तशी कांहीं अंशीं काव्याच्या समाप्तीची गोष्ट असते....व ती त्याप्रमाणें युद्धकांडाच्या शेवटच्या १२८ व्या सर्गाच्या शेवटींशेवटींहि चांगली दृग्गोचर होते—थोडक्यांत गोषवारा देत देत

* या श्लोकांचा अर्थ प्रथम खंड पृ. ८ वरील विवेचनांत आला आहे.

आणि आपल्या गोष्टीचें टोंक अगदीं निमुळतें करीत करीत कवीनें युद्धकांडाच्या शेवटच्या सर्गांत आपल्या वाचकांचीं मनें समाप्तीसाठीं तयार केलीं असल्याचें स्पष्ट दिसून येत आहे. " ( पृ. ९–१० ) युद्धकांडाच्या शेवटीं कथेचें टोंक निमुळतें होत गेलें आहे, ही गोष्ट खरी आहे. परंतु या गोषवाऱ्यांत वास्तविक कथाभाग किती आहे याचा विचार पुढें ओघानें येणार आहे. आणि त्याप्रमाणें त्यांतील प्राक्षिप्त भाग काढून टाकिला म्हणजे उरलेला कथाभाग गोषवाऱ्यासारखा वाटणार नाहीं.

प्रमाण अंक ९ मध्यें प्रो. परांजपे लिहितात, "युद्धकांडाच्या शेवटीं रामाला पुत्र झाल्याचा, त्यानें अश्वमेध केल्याचा आणि सुग्रीव व बिभीषण आपापल्या देशीं गेल्याचा असे उल्लेख घाईघाईनें करण्यांत आले असून त्याबद्दलचीं सविस्तर वर्णनें उत्तरकांडांत आलीं आहेत. पुढें विस्तृत वर्णन करावयाचें असतां ज्यापक्षीं त्यांचा त्रोटक उल्लेख पूर्वीं करण्यांत आला आहे, त्यापक्षीं युद्धकांडाच्या समाप्तीच्या वेळीं उत्तरकांडाच्या तात्कालिक रचनेची कल्पना कर्त्याच्या डोक्यामध्यें नसावी, असें दिसतें." ( पृ. २० ) प्रो. परांजपे यांची अनुमान करण्याची पद्धति चुकीची नाहीं. परंतु या उल्लेखांची खरी किंमत किती आहे, हें त्यांना न कळल्यामुळें ते येथें घसरले आहेत. युद्धकांडाच्या शेवटीं ज्याप्रमाणें फलश्रुतीचे श्लोक प्राक्षिप्त आहेत, त्याप्रमाणें त्यापूर्वींचे कांहीं श्लोकहि आहेत हें त्यांच्या लक्षांत आलेलें नाहीं. रामाचे पुत्र कुश आणि लव यांनीं रामाच्या दरबारांत रामायण गायिलें ही गोष्ट प्रोफेसरसाहेबांस मान्य आहे आणि या गोष्टीचा उल्लेख करून ते पुढें एके ठिकाणीं लिहितात, "परंतु सरळ दृष्टीनें पाहिलें तर फक्त घडलेल्याच गोष्टी माणसांनीं सांगाव्या हें स्वाभाविक आहे; आणि कुशलवांनींहि फक्त घडलेल्या गोष्टींचींच वर्णनें गायिलीं असावीं असा तर्क करण्यास कांहीं ठिकाणीं प्रत्यंतरें मिळतात." ( पृ. १८ ) प्रो. परांजपे यांच्याच या तर्काप्रमाणें वरील श्लोक प्राक्षिप्त ठरत आहेत. या श्लोकांतील पुढील उल्लेख पहा:—

**राज्यं दशसहस्राणि प्राप्य वर्षाणि राघवः ॥९५॥**
**ईजे बहुविधैर्यज्ञैः ससुतभ्रातृबांधवः ॥९७॥**
**दश वर्षसहस्राणि रामो राज्यमकारयत् ॥१०४॥**

रामाचें राज्य चालू असतां खुद्द त्याच्या दरबारांत " रामानें दहा हजार वर्षें राज्य केलें, " असें सांगणें शक्य आहे काय ? त्याच्या पुत्रांची व त्याची भेटहि अद्यापि झाली नव्हती; मग त्यानें मुलांसहवर्तमान यज्ञ केले, या उल्लेखाची किंमत काय राहिली ?

आतां या प्रमाणांतील दुसऱ्या भागाकडे वळूं. सुग्रीव व बिभीषण हे आपापल्या नगरीला गेल्याचें वर्णन युद्धकांडाच्या शेवटीं असून त्याच प्रसंगाचें वर्णन उत्तरकांडांत विस्तृतपणें आलें आहे. यावर प्रो. परांजपे म्हणतात, " तेव्हां पुढें विस्तृत वर्णन यावयाचें असूनहि युद्धकांडाच्या शेवटीं ही गोष्ट ज्या अर्थी थोडक्यांत सांगितली गेलेली आहे, त्या अर्थी पुढील उत्तरकांड लिहिण्याची कल्पना त्या वेळीं कवीच्या मनामध्यें नसावी, असें दिसतें. " ( पृ. २१ ) एकाच ग्रंथांत एकाच प्रसंगाचीं वर्णनें दोन स्थलीं येणें संभवनीय नाहीं. अर्थात् अशीं वर्णनें आढळल्यास त्यांपैकीं एक प्रक्षिप्त असलें पाहिजे, हें उघड आहे. या दोहोंपैकीं प्रक्षिप्त कोणतें तें दोनहि वर्णनें लक्षपूर्वक वाचिलीं असतां ओळखितां येईल. युद्धकांडांतील शेवटच्या सर्गांतील शेवटचा कांहीं भाग प्रक्षिप्त आहे, ही गोष्ट खरी; तथापि राज्याभिषेकानंतर जमलेल्या मंडळींना निरोप देण्याचें काम त्याच प्रसंगीं वर्णिलें जाणें हें सयुक्तिक दिसतें व म्हणून तेथील वर्णन प्रक्षिप्त मानितां येत नाहीं. उत्तरकांडांतील वर्णन अवेळीं दिसत असून त्यांत मेळ मुळींच नाहीं. निरोप मिळालेल्या मंडळींत सुग्रीवबिभीषणांबरोबर अनेक राजेहि सांगितले असून त्यांत जनक, युधाजित्, काशीपति प्रतर्दन, व पुष्पक विमान हींहि आहेत; परंतु ही मंडळी आली केव्हां, याचें पूर्वीं नांव नाहीं. प्रतर्दनाचें नांव तर हेंच पहिलें व हेंच शेवटचें आहे. इतर राजांना निरोप देतांना रामाच्या तोंडीं पुढील वाक्य आहेः—

**भवन्तश्च समानीता भरतेन महात्मना ।**
**श्रुत्वा जनकराजस्य काननात्तनयां हृताम् ॥७।३८।२५॥**

" जनककन्या सीतेचा अरण्यांत अपहार झाल्याचें वर्तमान ऐकून महात्म्या भरतानें तुम्हांला बोलावून आणिलें. "

या वाक्यांतील कथेचा मेळ कसा घालावयाचा ? असलीं विसंगत वर्णनें

वाल्मीकींच्या ग्रंथांत कधीं तरी शोभतील काय ? यासाठीं उत्तरकांडांतील हें वर्णन प्रक्षिप्त असून, त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या घोंटाळ्याची संगति लावण्याचें कारण उरत नाहीं.

प्रमाण अंक १० याची सारी भिस्त अध्यात्मरामायणावर आहे. अध्यात्मरामायणांत वाल्मीकिरामायणाप्रमाणेंच युद्धकांड व उत्तरकांड यांच्या शेवटीं फलश्रुतीचे श्लोक आहेत. अध्यात्मरामायण हा वाल्मीकिरामायणाचा संक्षिप्त अनुवाद आहे, ही गोष्ट खरी आहे. दोन रामायणांतील हें सादृश्य पाहून प्रो. परांजपे म्हणतात, "वाल्मीकिरामायणामध्यें युद्धकांडाच्या शेवटीं फलश्रुतीचे वगैरे श्लोक कोणीं तरी अस्थानीं घसडून दिलेले आहेत; व उत्तरकांडाच्या शेवटीं एकंदर ग्रंथसमाप्तीच्या वेळीं जे श्लोक यावयाचे ते येथें युद्धकांडांत ग्रंथाच्या मध्येंच येणें वाजवी नाहींत, असें जर अध्यात्मरामायणाच्या कर्त्याला वाटलें असतें तर त्यानें आपल्या रामायणाच्या युद्धकांडाच्या शेवटीं तसले श्लोक खात्रीनें घातले नसते. वाल्मीकींच्या काव्यांत मागाहून कोणीं तरी घुसडून दिलेल्या गांवढळ चुकांचेंहि अनुकरण करण्याला कांहीं अध्यात्मरामायणकार बांधला गेलेला नव्हता. असें असून देखील ज्या अर्थीं त्यानें आपल्याहि काव्यामध्यें युद्धकांडाच्या शेवटीं हे ग्रंथसमाप्तीचे व फलश्रुतीचे श्लोक येऊं दिले आहेत, त्या अर्थीं मूळ वाल्मीकिरामायणांतील हे समाप्तिनिदर्शक श्लोक श्रद्धेय आणि विश्वसनीय असावेत, असेंच त्यास वाटत असलें पाहिजे." (पृ. २२) अध्यात्मरामायणकाराला हे श्लोक वाल्मीकींचे वाटले, यांत शंका नाहीं; परंतु त्यांबद्दल त्यानें शंका घेऊन निर्णय केला, असें मात्र नाहीं. त्यानें निःशंकपणें या श्लोकांचा अनुवाद केला आहे. प्रो. परांजपे म्हणतात त्याप्रमाणें अध्यात्मरामायण हें वाल्मीकिरामायणाचे समंजसतापूर्ण अनुकरण नसून आंधळें अनुकरण आहे. कारण वाल्मीकिरामायणांत जो प्रक्षिप्त भाग आहे, त्याचाहि अनुवाद त्यानें असाच कित्येक स्थलीं केला आहे. प्रस्तुत वादाचा विषयच घ्या ना ? वाल्मीकिरामायणांत कांहीं कारणानें ग्रंथसमाप्तीचे श्लोक कर्त्यानें मध्येंच दिले आहेत, ही गोष्ट गृहीत धरिली तर अध्यात्मरामायणकाराला तरी तें कारण नव्हतें ना ? त्यानें मध्येंच ग्रंथसमाप्ति करण्याची घाई कां केली ? अर्थात् ही घाई अंधानुकरणाची द्योतक होय. चित्रकाराच्या

हातून चित्रावर चुकून डाग पडला असतां त्यावरून चित्र काढणाऱ्या चित्रकारानें तो डाग वेलबुटींतील एक प्रकार समजून आपल्या चित्रांतहि काढल्यास त्याला लोक काय नांव देतील ? तेंच नांव अध्यात्मरामायणकाराला मिळणार.

प्रमाण ११ वें, यांत महाभारतांतील रामोपाख्यानाची समाप्ति रामाच्या राज्याभिषेकापर्यंत झाली आहे, हें सांगून त्यावरून स्वतांच्या मताला थोडीबहुत पुष्टि मिळाल्यावांचून राहात नाहीं, असें सांगितलें आहे. परंतु या प्रतिपादनाबरोबरच भारतांत अशी समाप्ति आहे, त्याचें कारण काय तें सांगून ठेविलें आहे व त्याहून वेगळें समाधान करण्याची आवश्यकता नसल्यामुळें या प्रमाणाविषयीं विचार करण्याचें कारण नाहीं.

प्रमाण १२ वें, यांत "दशरथजातक" यांतील कथेची समाप्ति रामाच्या राज्याभिषेकाबरोबर होते, हें सांगून या सादृश्यावरून वादाचा मुद्दा सिद्ध होतो, असें प्रतिपादिलें आहे; परंतु हें प्रमाण अगदीं क्षुद्र असून प्रो. परांजपे यांनाहि तें तसें वाटत आहे. मग तें पुढें करण्याचे श्रम तरी त्यांनीं कां घेतले, हें कळत नाहीं.

प्रमाण १३ वें, हेंहि वरीलप्रमाणेंच आहे. "आदौ रामतपोवनादिगमनम्" या प्रसिद्ध श्लोकांत रामाच्या राज्याभिषेकापर्यंत कथा सांगितली आहे व यावरून युद्धकांडाच्या शेवटीं रामायणाची समाप्ति झाली होती हें सिद्ध होत आहे, असें प्रो. परांजपे म्हणतात. हा श्लोक आधुनिक असावा, असें तेंच सांगतात. अर्थात् उत्तरकांडासहित रामायण कवीपुढें असणें शक्य आहे. असें असतां उत्तरकांडांतील सीतात्यागासारखी अत्यंत महत्त्वाची गोष्ट त्यानें आपल्या श्लोकांत गोंविली नाहीं, हा त्याचा गाजरपारखीपणा होय. त्याच्या भोळेपणाचा फायदा प्रो. परांजपे यांनीं कां घ्यावा ?

प्रमाण १४ वें, यांत प्रो. परांजपे रामायणाच्या प्रारंभाकडे वळले आहेत. ते म्हणतात—"एकदां वाल्मीकींच्या आश्रमामध्यें नारद आले होते. तेव्हां वाल्मीकींनीं त्यांना विचारिलें कीं, हल्लीं या लोकांमध्यें उत्तम राजा कोण आहे ? *

* वाल्मीकींचा प्रश्न बराच वेगळा आहे. पूर्वीं त्याचा उतारा घेतला आहे. तो वाचकांनीं येथें पहावा.

या प्रश्नाच्या ओघानें नारदांनीं वाल्मीकींला रामचरित्रांतील मुख्यमुख्य गोष्टी थोडक्यांत सांगितल्या आहेत.....परंतु त्यांची समाप्ति मात्र रावणवधानंतर अयोध्येंत परत आलेल्या रामाला जो राज्याभिषेक झाला तेथेंच करण्यांत आलेली आहे. आतां जर उत्तरकांडाच्या शेवटपर्यंतच्या रामायणरचनेची कल्पना वाल्मीकींच्या मनामध्यें पहिल्यापासून असती तर त्यानें अर्थात् या उपोद्घातांतर्गत अनुक्रमणिकेमध्यें उत्तरकांडांतील कांहीं प्रमुख गोष्टींचा उल्लेख करून ठेविला असता....यावरून....रावणवधोत्तर राज्याभिषेकापर्यंतचीच गोष्ट लिहिण्याचा वाल्मीकींचा पहिल्यानें संकल्प असला पाहिजे." (पृ. २९) प्रो. परांजपे यांनीं हें प्रमाण देतांना त्या प्रसंगाकडे चांगलें लक्ष दिलेलें दिसत नाहीं. एक तर या सर्गांत रामायणांतील कथा अनुक्रमानें सांगितल्या असल्या आणि यामुळें ही एक या ग्रंथाची अनुक्रमणिका आहे असें वाटलें, तरी हा सर्ग वाल्मीकींनीं रामायणाची अनुक्रमणिका म्हणून लिहिलेला नाहीं. अर्थात सर्व कथांचा उल्लेख करण्यास ते बांधले जात नाहींत. शिवाय नारद व वाल्मीकि यांमधील या संवादाचा काळच असा होता कीं, त्या वेळीं उत्तरकांडांतील कथा घडून आली नव्हती. "सांप्रत सर्व लोकांत गुणवान् कोण आहे ?" या वाल्मीकींच्या प्रश्नाला उत्तर म्हणून नारदांनीं रामचरित्र सांगितलें. या वेळीं रामाचें राज्य चालू असून सीता वाल्मीकींच्याच आश्रमांत आपल्या दोन मुलांसह होती. म्हणजे उत्तरकांडांतील सीतात्याग ही एकच गोष्ट त्या वेळीं घडली होती; व ती सांगण्याला कांहीं वाल्मीकींला दुसरा ज्योतिषी नको होता. यावरून राज्याभिषेकापर्यंतचें रामचरित्र नारदांच्या तोंडीं घातलें आहे तें योग्यच आहे असें कोणासहि दिसून येईल.

नारदांनीं सांगितल्याप्रमाणें रामचरित्राची रचना करण्यास ब्रह्मदेवांनीं आज्ञा केल्यावरून वाल्मीकींनीं रामायण लिहिलें; व हें सांगतांना रामायणांत ज्या ठळक गोष्टींचें वर्णन आलें आहे त्यांची यादी बालकांडाच्या तिसऱ्या सर्गांत आली आहे. यांतहि राज्याभिषेकापर्यंतचीच गोष्ट सांगितली आहे व हें प्रो. परांजपे यांचें १५ वें प्रमाण होय. या दुसऱ्या अनुक्रमणिकेंत मात्र "वैदेह्याश्च विसर्जनम्" असा उत्तरकांडांतील सीतात्यागाच्या कथेचा उल्लेख आला आहे.

प्रो. परांजपे यांनीं हा उल्लेख संशयास्पद ठरविला आहे आणि आम्हांला तर तो सर्व सर्ग संशयास्पद वाटत आहे. तेव्हां या प्रमाणाविषयीं अधिक विचार करण्याचें कारण नाहीं.

रामायणाची ग्रंथसंख्या २४००० असून त्याचीं कांडें ७ व सर्ग ५०० असल्याचें सांगितलें आहे. या संख्येचा मेळ घालतांना पुष्कळ टीकाकारांनीं हात टेकले आहेत. कारण सध्यां उपलब्ध असलेल्या रामायणाच्या प्रतींत सर्ग-संख्या ६४५ असून ग्रंथसंख्या २४३३५ आहे. यांतील सर्गसंख्येकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं. कारण सर्ग कोठें समाप्त करावा याचा निर्बंध नसल्या-मुळें रामायणाच्या वेगवेगळ्या प्रतींत वेगवेगळ्या स्थलीं सर्ग समाप्त केलेले आहेत. तेव्हां ग्रंथसंख्या हीच विचारार्ह बाब होय. रामायणांतील प्रक्षिप्त भाग काढून टाकिल्यावर—धडधडीत प्राक्षिप्त दिसणारा भाग आंतच ठेवावा, असा आग्रह कोणीहि समंजस मनुष्य धरणार नाहीं.—ग्रंथसंख्या २४००० च्या आंत येते, मग या उल्लेखांत महत्त्व काय राहिलें ? हें कोडें उकलतांना प्रो. परांजपे यांनींहि हात टेकले आहेत. तथापि रामायणाचे सर्ग ५०० सांगितले आहेत. ती युद्धकांडापर्यंतच्याच सर्गांची संख्या आहे असें एका टीकाकाराचें मत देऊन आपलें मत सिद्ध करण्यास त्यांनीं हें एक प्रमाण उभें केलें आहे. परंतु या पांचशें सर्गांतील श्लोकांची संख्या २४००० सांगितली आहे व ती युद्धकां-डांतापर्यंत अवघी २०००० भरते याची वाट काय ? श्लोकसंख्या मात्र उत्तर-कांडासहित रामायणाची मानावी तर हा पंक्तिप्रपंच करण्यास आधार कोणता ? अर्थात् ही संगति लावितां येत नाहीं. यासाठीं ही संख्या सांगणारा श्लोकच प्राक्षिप्त आहे, असा कतकाचा अभिप्राय मान्य करणें अधिक श्रेयस्कर दिसतें.

कुशलवांनीं रामाच्या दरबारांत रामायण गायिलें तें रोज वीस सर्ग याप्रमाणें गायिलें. हें गायन पंचवीस दिवस चाललें होतें असें युद्धकांडाच्या शेवटीं जें एक गद्य आहे त्यांतील "पंचविंशेऽहनि वर्तमानकथाप्रसंगः समाप्तः" या उल्लेखावरून दिसतें. अर्थात् या गायनांतील सर्गांची संख्या ५०० भरते आणि हीच संख्या वरील श्लोकांत उक्त आहे. "तेव्हां यावरून एकदां रामायण युद्ध-कांडाच्या शेवटींच समाप्त करण्यांत आलेलें असावें, असें जें इतर प्रमाणांवरून

दिसून येतें, त्याला या प्रमाणावरून तर फारच बळकटी येते." (पृ. ३७) प्रो० परांजपे यांचें हें १७ वें प्रमाण होय. या गद्याच्या योगानें सर्गसंख्येचा मेळ तर चांगलाच जमतो; परंतु याच गद्यांत "चतुर्विंशत्सहस्रकायाम्" असा ग्रंथसंख्येचा उल्लेख आला आहे, त्याबद्दल प्रोफेसरसाहेबांनीं विचार केलेला नाहीं. वरील श्लोकाची संगति लावितांना जें कोडें पडलें होतें तें येथेंहि अशा रीतीनें तसेंच शिल्लक राहातें. शिवाय हें गद्य गॉरिशिओच्या रामायणाच्या प्रतींत नाहीं हा भाग वेगळाच.

रामायणाचें गायन कुशलवांनीं रामाच्या दरबारांत केलें त्या वेळीं तें ऐकून सर्वांस आनंद झाल्याचें रामायणांत सांगितलें आहे. हा आनंद तर उत्तरकांडांतील दुःखकारक प्रसंग ऐकून होणें शक्य नाहीं व हें गायन ऐकणारी मंडळीहि पूर्वीं झालेल्या गोष्टी यांत वर्णिल्या आहेत असें म्हणत आहे. यावरून त्या वेळीं गायिलेल्या रामायणांतील कथा त्यापूर्वीं घडली होती तितकीच असली पाहिजे, हें उघड आहे. यावरूनहि वादाचा मुद्दा सिद्ध होतो, असें प्रमाण अंक १८ यांत म्हटलें आहे. प्रो० परांजपे यांच्या या प्रमाणाकडे पाहिलें तरी त्यांचा मुद्दा सिद्ध झाल्याचें दिसून येत नाहीं. कारण त्या वेळीं घडलेल्या गोष्टींत सीतात्याग येतो व ती कथा तर युद्धकांडांत आहे. अर्थात् ही कथा त्यांच्या गायनांत आली असें म्हणावें लागतें. मग युद्धकांडाच्या शेवटीं रामायणाची समाप्ति झाली होती हा मुद्दा सिद्ध कसा होणार?

याप्रमाणें प्रो० परांजपे यांच्या अठराहि प्रमाणांनीं त्यांचा मुद्दा सिद्ध होत नाहीं, ही गोष्ट सिद्ध झाली आहे. प्रो० परांजपे यांचा सिद्धांत त्यांच्या शब्दांत थोडा फेरफार केल्यावर आम्हांला मान्य असल्याचें प्रारंभीं सांगितलें आहे. तेव्हां वादाचा मुद्दा दुसऱ्या कोणत्या रीतीनें सिद्ध होतो, हें पाहूं. रामायणाच्या बाबींत विचार करावयाचा म्हटला म्हणजे लोकांत रामचरित्राविषयीं असलेल्या समजुती मनांतून साफ काढून टाकणें जरूर आहे. वाल्मीकिरामायण हा एक आपणांस पूर्वीं माहीत नसलेला अपूर्व ग्रंथ वाचीत आहों अशा बुद्धीनें तो वाचला पाहिजे. नाहीं तर रामायणांतील कथा व आपले पूर्वग्रह यांच्या खडाजंगींत मनुष्य बेजार होऊन जातो. असो. प्रस्तुत वादाचा मुद्दा सिद्ध करण्यास

रामायणाच्या प्रारंभाकडे पाहूं. रामाचा जन्म होण्यापूर्वी वाल्मीकींनीं रामायण रचून ठेविलें होतें अशी समजूत आहे; परंतु खुद्द वाल्मीकि ही गोष्ट सांगत नाहींत; तर रामाचें राज्य चालू असतां रामायण रचिल्याची ते स्पष्ट कबुली देतात. रामायणाचा प्रारंभच असा आहे कीं, वाल्मीकींनीं नारदमुनींना "सांप्रत सर्व लोकांत गुणवान् पुरुष कोण आहे ?" असा प्रश्न विचारिला असतां त्यांनीं रामाचें नांव सांगितलें व तो श्रेष्ठ कसा हें दाखविण्याकरितां त्याच्या चरित्रांतील कथा क्रमानें सांगितल्या. रामाला राज्याभिषेक होईपर्यंत वृत्तांत या कथांत आला आहे व या राज्यांत लोक सुखी राहतील ही ओघानेंच सिद्ध होणारी भविष्यत्कालांतील कथा नारदाच्या भाषणांत आहे. यानंतर ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून नारदांनीं सांगितलेली कथा वाल्मीकींनीं छंदोबद्ध केली. ज्या वेळीं ही गोष्ट घडून आली त्या वेळीं सीता आपल्या दोन मुलांसह वाल्मीकींच्याच आश्रमांत होती; व हीं दोन मुलें मोठीं—सुमारें बारा वर्षांचीं झालीं होतीं. त्यांचें या वेळीं वेदाध्ययन झालें होतें, असें रामायणांत स्पष्ट लिहिलें आहे. यांना वाल्मीकींनीं रामायण पढविलें. वाल्मीकींनीं कुशलवांना सांगितलेलें रामायण किती होतें हाच खरोखर वादाचा मुद्दा होय × व ही गोष्ट प्रो० परांजपे यांच्या निबंधांत एके स्थलीं ओघानेंच बाहेर आली आहे. (पृ. ३८) वाल्मीकींनीं रामायण लिहिलें त्या वेळीं रामाचे पुत्र त्यांच्या आश्रमांत असून मोठे झाले होते हें वर लिहिलेंच आहे; या पुत्रांना व त्यांच्या पुण्यशील मातेला राजाकडे नेऊन पोंचविण्याचें कार्य महर्षींना करावयाचें होतें. शिवाय हें कार्य लोकांतील गैरसमज दूर करून करावयाचें होतें. लोकांतील गैरसमज दांडगाईचे उपाय योजून कधींहि जात नाहींत. आणि तसे उपाय योजावयाचे नव्हते म्हणूनच रामानें सीतेचा त्याग केला होता. हा गैरसमज दूर करण्यास एकच उपाय होता व तोच महर्षींनीं योजिला. हा उपाय म्हटला म्हणजे रामाच्या पवित्र चरित्राचा प्रसार करून सीतेचें चारित्र्य लोकांस पटविणें हा होय. परंतु याहि उपायाला एक अडचण होती. रामाचे पुत्र हे कांहीं सामान्य नव्हते. त्यांना आपल्या आईचा पित्यानें निष्कारण त्याग केला ही गोष्ट कळली तर ते स्वस्थ कसे बस-

× या मुद्यासंबंधीं स्वतंत्र विवेचन द्वि० खं० पृ० ६५ वर आलेलें आहे.

णार? ते कांहीं तरी खटपट केल्यावांचून स्वस्थ राहिले नसते. बाकी लोकांत जी कथा प्रचलित आहे तींत तर ही खटपट होऊन पितापुत्रांचें युद्धहि झालें आहे! परंतु महर्षींना ही कल्पना नको होती. यासाठीं त्यांनीं त्यांना ही गोष्ट न कळेल अशा रीतीनें वागविलें व त्यांना आपला रामाशीं संबंध न कळेल इतकेंच रामायण पढविलें. रामानें अश्वमेध आरंभिला त्या वेळीं महर्षि आपल्या शिष्यांसह तिकडे गेले होते. रामायणाचा प्रसार करून राजपुत्रांना व त्यांच्या मातेला उघड्या माथ्यानें राजाच्या स्वाधीन करण्याला ही संधि चांगली होती; कारण अश्वमेधाच्या निमित्तानें देशांतील मोठमोठे लोक तेथे एकत्र झाले होते. रामायणाचें गायन करण्याची आज्ञा राजपुत्रांना करितांना महर्षि म्हणतात—

ऋषिवाटेषु पुण्येषु ब्राह्मणा वसथेषु च ।
रथ्यासु राजमार्गेषु पार्थिवानां गृहेषु च ॥७।९३।५॥
रामस्य भुवनद्वारि यत्र कर्म च कुर्वते ।
ऋत्विजामग्रतश्चैव तत्र गेयं विशेषतः ॥६॥
लोभश्चापि न कर्तव्यः स्वल्पोऽपि धनवांछया ।
किं धनेनाश्रमस्थानां फलमूलाशिनां सदा ॥७॥
यदि पृच्छेत् स काकुत्स्थो युवां कस्येति दारकौ ।
वाल्मीकेरथ शिष्यौ द्वौ ब्रूतमेवं नराधिपम् ॥ ८ ॥

"ऋषीचे आश्रम, पुण्यकारक अशीं ब्राह्मणांचीं गृहें, लहानमोठे रस्ते, राजवाडे, रामाचे वाड्याचें महाद्वार या स्थलीं, तसेंच जेथें अश्वमेधाचें कर्म चाललें आहे तेथें, विशेषेंकरून ऋषिजनांचे अग्रभागीं (तुम्ही रामायणाचें गायन करा.)........(या गायनाचें निमित्तानें) द्रव्यलाभ व्हावा असें वाटून द्रव्याचा स्वल्पहि लोभ धरूं नका. आश्रमांत राहून फलमूलांवर आपण उपजीविका करणारे, आपणांला द्रव्य मिळवून काय करावयाचें आहे? ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें जर तुम्हांला 'तुम्ही कोणाचे पुत्र?' असा प्रश्न केला तर 'आपण दोघे वाल्मीकींचे शिष्य आहों' असें राजाला तुम्ही उत्तर द्या."

वाल्मीकींच्या या आज्ञेवरून त्यांनीं राजपुत्रांला कसें वागविलें होतें व आपण आश्रमवासी—वाल्मीकींचे शिष्य—यापलीकडे वास्तविक माहिती त्यांना किती

दिली होती, हें स्पष्ट होतें. रामायणाचें गायन कोठें करावयाचें हें सांगतांना त्यांनीं जीं स्थानें सांगितलीं आहेत त्यांवरून रामचरित्राचा प्रसार करण्याचा त्यांचा हेतु उघड दिसत असून अशा रीतीनें त्यांनीं सीतेचें दिव्य होण्यापूर्वी त्यासाठीं लोकांच्या अंतःकरणाची सिद्धता चालविली होती, असें म्हणावें लागतें. महर्षींच्या या हेतूला अनुसरून त्यांनीं राजपुत्राला युद्धकांडापर्यंत रामायण शिकविलें असलें पाहिजे हें उघड आहे. उत्तरकांडांतील सीतात्यागापुढील कथा तर त्या वेळीं घडत होती. अर्थात् समग्र उत्तरकांड रामाच्या महाप्रस्थानानंतर लिहून महर्षींनीं रामायण समाप्त केलें असावें. युद्धकांड आणि उत्तरकांड यांमध्यें इतर कांडांपेक्षा अधिक कालांतर गेलें हें निर्विवाद आहे. मात्र प्रो. परांजपे यांच्या प्रतिपादनामध्यें हा काल दीर्घ असल्याचा जो ध्वनि निघत आहे त्यांत तथ्य नाहीं, इतकेंच आम्हांला सांगावयाचें आहे.

